# रा म शा स्त्री

'प्रतिभेच्या न्यायमंदिरां' तील निवडक स्फुटें

किंमत २ रुपये

# राम शास्त्री

'प्रतिभेच्या न्यायमंदिरां'तील निवडक स्फुटें

किंमत २ रुपये

# विषय-सूचि

## सन १९३५

**अंक १** :—कै. पावगी; " तांबे व टागोर; " विडंबनकाव्यास अहेर; बर्नार्ड शॉच्या प्रस्तावना; जावडेकरकृत 'राज्यशास्त्रा'चें परीक्षण; मराठींत श्रेष्ठ कवयित्री कां नाहींत ?; बडोद्याचें साहित्यसंमेलन.

**अंक २** :—' आई ' नव्हे, ' अनोळखी बाई ! '; उत्प्रेक्षा हठाकृष्ट असतात काय ?; ' झेंडूचीं फुलें ' मात्सर्यामुळें फुललीं ?; भाषांतरांची आवश्यकता; संगीताचें मराठीकरण.

**अंक ३** :—' कैदाशिणीचें कोडें; कॅलिबनच कॅलिबन !; खांडेकर, कोव्या व फुरसें !; अपसिद्धांतांचा पॅसिफिक महासागर !; " Et tu Brutus "; राजवाड्यांचा धातुकोश; विज्ञानबोध.

**अंक ४** :—महाराष्ट्रानें बुद्धास केलेला अन्याय; प्रो. पटवर्धनांस उत्तर; हिंदींतहि तोच प्रकार; बंगाली चित्रकला; सरदेसाई–' सरकार ' यांची कामगिरी; मराठी मासिकांचें संकुचित स्वरूप. " मुक्त छंद " शब्दाचा घोटाळा.

**अंक ५** :—कथात्मक काव्य; रवींद्रांची ' पूजारीण '; पानिपत-प्रकरणाची नवी बाजू; कांहीं नवे अर्थ; संतवाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टि.

**अंक ६** :—टीकावाङ्मयाचा उथळपणा; काव्य व इंग्रजी नांवें; भारतीयांचें इंग्रजी लेखन; हिंदी भाषेची थोरवी; खोटा स्वाभिमान.

**अंक ७, विशेषांक** :—टोपण नांवाचें प्रयोजन.

**अंक ८** :—' प्राचीन महाराष्ट्र '; वाङ्मय व चारित्र्य; वाङ्मय व स्वातंत्र्य; हिंदी साहित्यसंमेलन.

**अंक ९** :—भाषा कशी असावी ?; पेशवेकालीन नीतिमत्ता; पुनः एकदां ‘ गीतारहस्य ’ !;

**अंक १०** :—कोल्हटकरस्मृति; गोमंतक–साहित्य–संमेलन; गडकरी व अत्रे; माणुसकीचें सार्वजनिक विडंबन.

**अंक ११** :—नाट्यकलेचें पुनरुज्जीवन; चिपळूणकर, आगरकर व कोल्हटकर; पुनः एकदां माटे–प्रकरण; संशोधक व संकलनकार.

**अंक १२** :—पुण्याची इतिहास–परिषद; लेखनप्रगति कां खुंटते ?; पिंजारलेल्या मिशांचा भयंकर चेहरा !; माधव ज्यूलियनचें स्थान; रोलँची काव्याची व्याख्या.

**अंक १३** :—हिमालयाएवढ्या चुका !; देवनागरी–लिपी; कोल्हटकरांवरील हल्ले !; आमचे कवि व ब्रौनिंग; पुणें विरुद्ध प्रो. जोशी.

**अंक १४** :—साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद; मराठी वाङ्मयाचा इतिहास; दूषण ?—छे, ‘ भूषण ’च ! खांडेकरांचें लंगडें आत्मसमर्थन.

**अंक १५** :—वाङ्मयांतील बुवाबाजी; ख्रिस्तवासी कविवर्य ‘ ए. ई. ’; मुनशी प्रेमचंदांचा स्तुत्य उपक्रम.

**अंक १६** :—उथळपणाची तरफदारी !; गडकरी व प्रो. माधवराव पटवर्धन; महाकवि न्हानालाल यांचें भाषण.

**अंक १७** :—खांडेकर आणि मी; औंधकरांचें औदार्य.

**अंक १८** :—सयाजीराव अध्यक्ष; वाङ्मयचौर्यांचा आळ; अमृत कीं हलाहल ?; बालकवींची समग्र कविता.

**अंक १९** :—नवमतवाद; स्त्रियांचीं चित्रें; भाषाशैली [ Style ] ‘ राजा उदार झाला, हातीं भोपळा दिला; ’ साहित्य–परिषद मुग्ध कां ?; मुंबई साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद; प्रो. पटवर्धनांचा सडेतोडपणा ! हेवादावा नव्हे तर काय ?

**अंक २० :**—' जागतिक वाङ्मय ' व कंपूशाही; ललितवाङ्मय व विद्वत्ता; दोन ध्रुव; भवभूतीचें पद्मपूर सांपडलें.

**अंक २१ :**—इंदूरचें अध्यक्षपद; कै. अण्णासाहेब किर्लोस्कर; रंगभूमि व बोलपट.

**अंक २२ :**—मुंबई–साहित्यसंमेलन; खांडेकरांचें भाषण; टॉलस्टॉयचें पुण्यस्मरण; गूढगुंजन व रूपक.

**अंक २३ :**—ललितवाङ्मयांतील विद्वत्ता; मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड २ रा.

**अंक २४ :**—' छुप्पे रुस्तुम ' रंगणांत आले; व्यक्तिद्वेषाचा वृथारोप; तत्त्व कीं व्यक्ति ?; साम्यवादाबद्दल साम्यवाद्यांचा अभिप्राय ! ; जागतिक वाङ्मय व कंपूशाही; अलंकारादिकांची वकिली; वाङ्मयांतील बुवाबाजी.

## सन १९३६

**अंक १ :**—साक्षात्कार लक्ष्मीचा, सरस्वतीचा नव्हे ! ; बाळासाहेबांचें भाषण; नावीन्य नाहींच, पण बिनचूकपणाहि नाहीं ! ; समाजविषयक प्रश्न.

**अंक २ :**—वाङ्मयांत संप्रदाय असावेत काय ?; 'परप्रेरित' रसिकता; ऋस्वरयुक्त व्यंजनें; बुद्धदेव बोस; नवमतवाद व प्रो. वा. म. जोशी; रुड्-यार्ड किप्‌लिंग.

**अंक ३ :**—फ्रॉइडचें आत्मचरित्र; गाल्सवर्दीचें वैगुण्य; बनहट्टींचें भाषण; रोमाँ रोलाँ शतायु होवोत !

**अंक ४ :**—कलावंत व शास्त्रज्ञ; कार्लाईलचा ' बापडा शेले '; अत्रे यांचें भाषण; प्रो. वा. म. जोशी यांस उत्तर; माडखोलकरांचा प्रश्न.

**अंक ५ :**—प्लेटोची थोरवी; ' मेघनादवध ' महाकाव्य; टागोर शहर ! ! ; गूढवाद व गूढवादी; पत्रवाङ्मय; मोबदला नाकारल्याचे दाखले.

**अंक ६ :**—अक्षरवाङ्मय तें अक्षरवाङ्मयच; राजकारण व वाङ्मय; खांडेकरांच्या प्रस्तावनेंत दडपादडपी !

**अंक ७ :**—भारतीय कला; एका गौरकायाचा अभिप्राय.

**अंक ८ :**—आधुनिक कविता व माडखोलकर; जुने व नवे माडखोलकर; स्त्रैणत्वाचा आरोप; नैराश्याचा सूर; स्वातंत्र्याकांक्षेचा अभाव; कवीकडून भलतीच अपेक्षा; विधानांचा व विचारांचा गोंधळ; प्रसिद्धिलालसा.

**अंक ९ :**—इतिहासाची व्याप्ति; सत्यसंशोधन कठिणच; नागपूरचीं दोन अधिवेशनें.

**अंक १० :**—प्राचीन कवींचीं पदें; लेखक ' कथाविषय ' बनतात; गॉर्कीचा अलंकार; राजकीय पुढारी व साहित्य.

**अंक ११ :**—' लंडन मर्क्युरी ' मधील चर्चा; जोसेफ कोन्राडचें स्थान; प्रो. कृ. पां. कुळकर्णी यांचें भाषण; संमेलनाध्यक्षांचें भाषण कसें असावें ?; विचित्र स्त्री.

**अंक १२ :**—आत्मचरित्र; जी. के. चेस्टर्टन; मॅक्झिम गॉर्की; शारदाबाईचा तडाखा.

**अंक १३ :**—' बालकवि '; कलावंताचें आत्मचरित्र; चरित्रनायक व चरित्रलेखक; संमेलनाध्यक्षाच्या भाषणाबाबत पुरावा; भाषाशुद्धि व कुळकर्णी; ' फुलपात्र '; पळसाला पानें तीन !

**अंक १४ :**—तेजस्वी वाङ्मयाचे प्रणेतेः टिळक. टीका व व्यक्तिद्वेष; ' भावनेचें तर्कशास्त्र; ' शॉविषयीं जुना अभिप्राय; केळकर व केंद्रवाद; सर रॉय यांचा प्रांताभिनिवेश.

**अंक १५ :**—उद्यांचा ' गॉर्की-दिन '; शोपेनहॉरचे वाङ्मयविषयक विचार; आल्डस हक्स्ले; मेटरलिंक व नाटकांतील संगीत.

**अंक १६ :**—गॉर्कीचे आक्षेपक; टॉलस्टॉय व रोमाँ रोलाँ; शॉ आत्मचरित्र कां लिहीत नाहींत ?; साम्यवाद्यांचा ' आंतरहेतु '; प्रो. वा. म. जोशी यांची साक्ष; ग्रंथसंग्रहालयाचा संकुचितपणा.

**अंक १७ :**—तात्त्विक वादांतील अभिनिवेश; लेखक स्वतःची कृति वाचतात काय; कवि यशवंत यांचें भाषण.

**अंक १८ :**—थॉमस मॅन यांचे तीन अवतार; मराठी व्याकरण परिषद; 'फ्रान्सचा गोल्डस्मिथ' ॲनातोले फ्रान्स; एच्. जी. वेल्स यांचा सन्मान; पंडित भातखंडे गेले !; कवि यशवंत यांना उत्तर पाहिजे.

**अंक १९** प्रेमचंदांचें शोचनीय निधन; साहित्यिकांचें राजकारण; कै. शिवरामपंत परांजपे यांचे लेख.

**अंक २० :**—चार संमेलनाध्यक्ष; 'काळा 'तील निबंधांचें पुनरुज्जीवन; झांशीच्या संग्रामदेवतेवर शिंतोडे; आंग्ल कविवर्य ए. इ. हाउसमन.

**अंक २१ :**—खांडेकरांचें भाषण; साहित्यिकांची विचित्र अभिरुचि; 'कुठें तरी थांबलेंच पाहिजे !'; 'केसरी 'ची फोल गर्जना; मृत्यूनंतर नको, जीवंतपणींच; लेखक व लोकप्रियता.

**अंक २२ :**—मराठी विजांचा पुरस्कार.

**अंक २३ :**—संशोधनांतील श्रेय; पुनः एकदां 'तांबे' प्रकरण; निद्राभ्रमिष्ट; जर्मनींतील टीकावाङ्मयाची मुस्कटदाबी; वरेरकरांचें भाषण.

## सन १९३७

**अंक २ :**—इतिहासक्षेत्रांतील वादळ; किर्लोस्करांचे तीन सुरुंग; पु. य. देशपांडे यांचें भाषण; राहुल सांकृत्यायन.

**अंक ३ :**—भारतीय वाङ्मयांत मराठी नाटकें; "राजसत्ता व वाङ्मय-प्रसार"; पुश्कीन.

**अंक ४ :**—जुन्या घटनांच्या अद्‌भुत उपपत्ति; रे. टिळकांपेक्षां लक्ष्मीबाई श्रेष्ठ ?; कार्लाईलची फ्रेंच राज्यक्रांति; प्रांताभिनिवेशाचा झटका; टागोरांचा एक आंग्ल टीकाकार; वेडा कीं मुक्त ?

**अंक ५ :**—राजकवीचा स्वर्गवास; राष्ट्रभाषा संस्कृत अं ?; भाषा-शास्त्रज्ञांचा अभिप्राय; कै. दिवाकरांच्या नाट्यछटा; हिंदी सा. संमेलनाचे अध्यक्ष जमनालाल; सन्माननीयांचें अभिनंदन.

अंक ६ :—महाराष्ट्राचा महापंडित गेला; साम्यवादाचा आसूड; झेकोस्लोव्हाकियांत गीता; केळकरांचा प्रसाद; चाफेकर–वाक्सुधा; जमनालालजींचें भाषण.

अंक ७ :—" महाराष्ट्राचें सुणें " कोण ?; ' छंदोरचने 'चा प्रकाशन–समारंभ; ' संपादक ' शब्दाचा अर्थ; टीकाकारांची कैफियत; केंद्रवादाची कोण ही दहशत !

अंक ८ :—साहित्यिकांची उपेक्षा; कै. चंद्रशेखरांचा आदर्श; ' भारत–भारती'चें फोल समर्थन; पुनः एकदां ' प्रसाद '; भाषांतराचें महत्त्व; कांहीं स्फुट वचनें.

अंक ९ :—ऐतिहासिक व्यक्तींचे दोष झांकावे काय ?; गडकरी व चंद्रशेखर; मराठीविरुद्ध मोरोपंतांची साक्ष; पुण्याचें शारदोपासक संमेलन; ही ओहोटी कीं भरती ?; व्यासपीठावरील भयंकर प्राणी !

अंक १० :—ललितग्रंथास पारितोषिकें कमीच !; पांगारकरांचें 'वाङ्मय-पुराण '; माडखोलकरांचें भाषण; ' काव्याला ओहोटी लागली आहे काय ?; शाबास प्रो. माटे !; मराठी व गुजराती नियतकालिकें.

---

# शुद्धिपत्र

[ पुढें महत्त्वाच्या अशाच स्थळांचें शुद्धिपत्र दिलें आहे. उडालेले, ज्यास्त वा चुकीचे पडलेले अनुस्वार, इकार, उकार, काना, मात्रा, अक्षर आणि विरामचिन्हें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येतील. ]

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९ | ६ | उमटलीं | उमललीं |
| १० | ४ | पाश्चात्य | पाश्चिमात्य |
| ,, | २४–२५ | गुजराती–वि. सी. गुर्जर | बंगाली–वि. सी. गुर्जर |
| २८ | ९ | निजदून | निसटून |
| ,, | १२ | अबोधे ! | अबोध ! |
| ४१ | २१ | प्रथाविता | उडविता |
| ६१ | ३ | तो त्यांच्या | तो त्यांच्या या |
| ६२ | २४ | झाला | आला |
| ७७ | १२ | उपयुक्त | उपर्युक्त |
| ७८ | ११ | स्वयंसिद्धि | स्वयंसिद्ध |
| ८५ | १२ | प्रेमभास | प्रेमभाव |
| ८७ | ३ | कतितांच्या | कवितांच्या |
| ९४ | [ क्रमांक ] | ७३ | ७४ |
| ९९ | १२ | प्रतावना | प्रस्तावना |
| १०५ | १ | म्हणजे | म्हणे |
| १२६ | १० | साम्यवादी | साम्यवाद |
| १२७ | [ अवतरण ] | कटुता असेल तर सत्याचीच | "ही कटुता असली तर ती सत्याची आहे." –वि.स.खांडेकर |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३० | ११ | 'पश्चातापबुद्धी'च | 'पश्चातबुद्धी'च |
| १५८ | २–४–१४ | Shelly | Shelley |
| १६६ | ४ | या | ( हा शब्द नको ) |
| १७७ | ३ | awakeing | awakening |
| १८१ | १३ | वागावयास | वागवावयास |
| १८८ | १४ | घडणेतील | घटनेंतील |
| १९६ | ८–९ | रॉबर्ट ब्रौनिंग | रॉबर्ट व एलिझाबेथ ब्रौनिंग |
| २०१ | २४ | त्यांच्या | त्यांचा |
| २०२ | ,, | झळ | ढळ |
| २०६ | २२ | काय | ( हा शब्द नको ) |
| २१२ | १९ | and | ,, |
| २२७ | ६ | वगैरेंवर | वगैरेंस |
| २३९ | ७ | impiently | impatiently |
| २५४ | २५ | अकटविकट | अकटोविकट |
| २५५ | ११ | अनुकरण | अनुरणन |
| २६२ | ,, | झुळळ | झुळझुळ |
| २६४ | ३ | त्या | या |
| २८२ | १७ | असतात | नसतात |
| २८३ | १६ | झळ | ढळ |
| २९३ | १० | author | author of |
| ३१८ | ४ | तर, | सर |
| ३३८ | २६ | प्रकारचे | ' प्र 'कारचे |

# रामशास्त्री

## १ कै. पावगी

" भारतीय साम्राज्य" या छोटेखानी ज्ञानकोशासारख्या ग्रंथांचे व इतरहि अनेक विद्वत्ताप्रचुर इंग्रजी-मराठी पुस्तकांचे कर्ते, श्री. नारायण भवानराव ऊर्फ नाना पावगी यांनीं ८ डिसेंबर रोजीं "शारदालोकीं" प्रयाण केल्याचें वृत्त वर्तमानपत्रांतून जाहीर झालेंच आहे. कै. पावगींचें लोकोत्तर ग्रंथकर्तृत्व लक्ष्यांत घेतां त्यांना मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष होण्याचा मान आयुष्यांत लाभूं नये याचा अचंबा वाटल्याखेरीज रहात नाहीं! करंदीकर-किबे-अणे यांच्याहि वांट्याला जें स्थान आलें, त्याला हा थोर ग्रंथकार मात्र मुकावा, हें दैवदुर्विलसितच नव्हे काय? सामाजिक दर्जा, राजकारण, किंवा निदान थोडीफार ललितवाङ्मयनिर्मिति यांची जोड असल्याखेरीज निवळ विद्वत्तेला महाराष्ट्रांत किंमत नाहीं, असा निष्कर्ष यावरून कुणी काढल्यास, तो अतिव्याप्त ठरत असला, तथापि कै. पावगींच्या बाबतींत तरी तो तंतोतंत खरा ठरतो, असें म्हणणें भाग आहे!

*　　　*　　　*

## २ "तांबे व टागोर"

"प्रतिभे"च्या गेल्या अंकीं वरील मथळ्याखालीं या कविद्वयांतील कांहीं साम्यस्थळें देण्यांत आलीं आहेत. तीं वाचून माझा एक मित्र उद्‌गारला, "अरे! रोमन नोव्हॅरो या होलीवूडच्या "अपोलो"सारख्या अत्यंत सुंदर सिनेमा-नटावर गौरकाय छबकड्या जितक्या फिदा नसतील, तितके तुम्ही लोक तांब्यांच्या कवितेवर आषक आहां, आणि इकडे पहावें तों त्यांनीं टागोर लुटलेला! - हें उघड उघड वाङ्मयचौर्यच नव्हे काय?" इ. इ.

वाङ्मयाचे ( १ ) स्वतंत्र ( २ ) अन्य कृतीवरून सुचलेले व ( ३ ) भाषांतरित, असे, स्थूल मानानें, तीन विभाग होतात. पहिल्या व तिसऱ्या विभागांविषयीं विशेष सांगण्यासारखें कांहीं नाहीं. भानगड आहे दुसऱ्या विभागांत येणाऱ्या वाङ्मयाचीच ! कवि झाला तरी तो संस्कारक्षम असतो, हें माझ्या उपरोक्त मित्रासारखे आक्षेपक विसरतात. या संस्कारक्षमतेमुळें दुसऱ्याची सुंदर कृति वाचून त्याप्रमाणें रचना करण्याची कुणासहि इच्छा होणारच. त्याला तांबे तरी अपवाद कसे असतील ? ज्या टागोरांची "तांब्यांनीं उसनवारी" केली, त्यांनींहि विद्यापति-चंडीदासप्रभृतींचें काय कमी अनुकरण केलें ? मिल्टननें ग्रीक व लॅटिन कवींच्या काव्य-भांडारावर काय थोडथोडके दरवडे घातले ? तात्पर्य, अशा परप्रेरित कृतींत उसनवारी कितपत आहे हें पाहण्याबरोबरच स्वतंत्र भाग किती आहे, हेंहि पाहिले पाहिजे; आणि, उसनवारीपेक्षां स्वतंत्र भागांचें प्रमाण जर तींत अधिक असलें, तर ती कृति शंभर टक्के नसली, तथापि नव्वद टक्के तरी "मौलिक" ( original ) आहे, असाच निर्णय द्यावयास पाहिजे.

पुष्कळ वेळां त्या त्या लेखकाचें ज्ञान, आवडनिवड, परिस्थिति यांची शक्याशक्यता न पाहतांच त्याजवर वाङ्मयचौर्याचा आरोप लादण्यांत येत असतो ! इंग्रजी भाषेचें बेताचेंच ज्ञान असलेल्या व त्या भाषेंतील रचना प्रायः न वाचणाऱ्या ना. ह. आपटे या प्रसिद्ध कादंबरीकारावर "पहांटे पूर्वीचा काळोख" ही कादंबरी हार्डीच्या एका कादंबरीवरून लिहिल्याचा आरोप मागें करण्यांत आला होता, ही गोष्ट अनेकांस आठवत असेल ! टिळकांचें "गीतारहस्य" बच्चा-इ-साकूच्या पुश्तु भाषेंतील एखाद्या ग्रंथावरून निर्माण झाल्याचें अजून कुणी कसें प्रतिपादिलें नाहीं, याचेंच मला कित्येकदां आश्चर्य वाटत असतें !!

* * *

## ३ विडंबनकाव्यास अहेर

अलीकडे विडंबनकाव्याची पैदास किती झपाट्यानें होत आहे, हें नियतकालिकांच्या वाचकांस सांगावयास नकोच. कोणतेंहि साहित्यविषयक नियतकालिक उघडा, त्यांत एखाद्या विडंबनकाव्याची ठेंच लागली नाही,

असें सहसा घडावयाचें नाहीं ! "नवजीवना"च्या दिवाळी-अंकांत रा. व. ना. नाईक यांचा "कवि आणि काव्य" या शीर्षकाचा वाचनीय लेख प्रसिद्ध झाला आहे, त्यांतील विडंबनकाव्याविषयींचा पुढील उतारा, त्या काव्यप्रकाराच्या पुरस्कर्त्यांस नजर करतोंः—

"कवितेच्या थोर नांवावर आपण आज वाटेल तें लिहिण्यास प्रवृत्त होतों. एकमेकांची थट्टा अथवा टर कवितेंत लिहून त्या प्रकाराला Satire आणि Parody असें नांव देतों...पोपचें Dunciad काव्य किंवा बायनरचें Don Juan काव्य यांची गणना कोणताही इंग्रजी टीकाकार अव्वल कवितेंत करीत नाहीं. त्याला कोणीही डांटेची Divine Comedy अथवा मिल्टनचें Paradise Lost यांच्या जोडीस बसविणार नाहीं."

आमच्या संपादकांनीं आपापल्या नियतकालिकांतून विडंबनकाव्यास अजिबात मज्जाव करण्याची वेळ आतां आली आहे, असें मला वाटतें.

* * *

## ४ बर्नार्ड शॉंच्या प्रस्तावना

बर्नार्ड शॉ यांनीं आपल्या ग्रंथांना जोडलेल्या, लांबलचक पण विचार-प्रवर्तक, प्रस्तावनांचा स्वतंत्र खंड नुकताच प्रसिद्ध झाला आहे. नीतिशास्त्र, सामाजिक प्रश्न, राजकारण, इत्यादि महत्त्वपूर्ण विषयावर शॉ यांची भेदक पण वेधक लेखणी किती कुशलतेनें चालते, याची साकल्यानें कल्पना या ग्रंथावरून कुणासहि येईल. मात्र यांत चर्चिलेले कांहीं विषय आज शिळे वाटण्याचा संभव आहे, यांत शंका नाहीं. यावर आपली नेहमींची "मुजोरी" चालवून शॉ म्हणतात, "The prefaces are still rather ahead of the times than behind them"! तें कांहीं असो, एका महत्त्वपूर्ण व्यक्तीचे महत्त्वपूर्ण विषयावरील महत्त्वपूर्ण विचार म्हणून हा प्रस्तावनाखंड भविष्यकाळांतहि आदरणीय वाटल्यावांचून राहणार नाहीं.

* * *

## ५ जावडेकरकृत "राज्यशास्त्रा"चें परीक्षण

"विविधज्ञानविस्तारा"च्या जून, जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर, १९३४ च्या जोडअंकांत ( अबब ! हा काय जोडअंक कीं जोडअंकाचा आजोबा ? )

रा. शं. द. जावडेकर यांनीं रा. केळकर यांच्या "राज्यशास्त्रा"चें सुमारें पन्नास पृष्ठांचें " जंगी " परीक्षण केलें आहे. केळकरांच्या ग्रंथाचें परीक्षण, व तें जावडेकरांनीं केलेलें, तेव्हां तें प्रतिकूल असावें, यांत काय आश्चर्य ? मात्र तें पुष्कळच मार्मिक उतरलें आहे, हेंहि कांहीं खोटें नाहीं. उदाहरणार्थ, केळकरांनीं " राज्यशास्त्रां"त वेळींअवेळीं व लागू–गैरलागू जे दृष्टांत वा उपमा घुसडून दिलेल्या आहेत, त्यांवर जावडेकरांनी उडविलेले कोरडे कुणासहि सार्थच वाटतील. उपमा–दृष्टांतांनीं लेखन खुलतें हें खरें; पण त्यांचा उपयोग करतांना स्थल, काल व औचित्य यांचा विचार करावयास नको का ? साखरेनें श्रीखंडास गोडी येत असली, तरी पण नुसत्या साखरेचा पाक म्हणजे श्रीखंड नव्हे, ही गोष्ट विसरतां कामा नये ! तशांत "राज्यशास्त्रा"सारख्या शास्त्रीय विषयाच्या ग्रंथांत तर उपमा–दृष्टांतांचा उपयोग फारच माफक व जपून केला पाहिजे. प्रो. हॅरोल्ड लास्की यांच्यासारख्या राज्यशास्त्राच्या आचार्यांच्या तद्विषयक ग्रंथांत पानांमागून पानें उलटीत जावीं, तरी उपमा–दृष्टांत आढळत नाहींत ! तात्पर्य, केळकरांना शास्त्रीय दृष्टि नाहीं, हें जावडेकरांचें विधान सरसकट खरें आहे, असें मला वाटत नसलें, तथापि तें " राज्यशास्त्र " ग्रंथापुरतें खरें आहे, असें दुःखानें कबूल करावें लागतें !

* * *

## ६ मराठींत श्रेष्ठ कवयित्री कां नाहींत ?

परवां मी एका बंगाली मासिकांत वंगकवयित्री कामिनी रॉय यांजविषयीं एक लेख वाचला. तो पाहून माझ्या मनांत प्रश्न उद्भवला कीं, मराठींत सध्यां अशा श्रेष्ठ कवयित्री कां नाहींत ? बंगालींत कामिनीसारख्याच इतरहि अनेक उच्च कवयित्री अर्वाचीन काळीं झाल्या आहेत; हिंदींतहि महादेवी वर्मा व अन्य कवयित्री काव्यवीणेंतून स्वर्गीय स्वर छेडीत असल्याचें आपण ऐकतों. मग मराठीनेंच असें काय पाप केलें आहे कीं, तींत प्रस्तुत एकहि प्रतिभासंपन्न कवयित्री नसावी ? माझ्या अल्पबुद्धीनें याची कारण परंपरा पुढीलप्रमाणें आहे : अलीकडे काव्यनिर्मिति पूर्वीपेक्षांहि धडाक्यानें होत असली, तथापि काव्याविषयींचें पहिलें औत्सुक्य आतां राहिलेलें नाहीं.

यामुळें आमच्याकडील प्रतिभासंपन्न स्त्रिया कादंबरी, लघुकथा, वगैरे इतर वाङ्मयप्रकारांकडे वळलेल्या आहेत. एरवीं ज्या भाषेंत सौ. टिळक, " कृष्णाबाई, " विभावरी शिरूरकर अशा थोर कथालेखिका दृग्गोचर व्हाव्या, तिला कवयित्रीचेंच तेवढें वावडें कां असावें ? कारण ज्या महाराष्ट्रभूमीनें मुक्ताबाई, जनाबाई सारख्यांना जन्म दिला, ती कवयित्री निर्माण करण्याच्या बाबतींत असमर्थ आहे, असें कदापि म्हणतां यावयाचें नाहीं !

* * *

## ७ बडोद्याचें साहित्यसंमेलन

आज बरेच दिवस आधुनिक मराठी वाङ्मयाच्या निःसत्त्व, रोगी, व अनिष्ट अशा स्वरूपाबद्दल चोहोंकडे ओरड चाललेली असल्यामुळे मराठी साहित्यसंमेलनाचें अध्यक्षीय भाषण नेहमींच्या चाकोरींतून बाहेर पडून जास्त मार्गदर्शक होईल अशी कोणी अपेक्षा केली असल्यास, त्यांची अत्यंत निराशा झाल्याशिवाय राहिली नसेल. ' तुम्ही अंधारांत चांचपडत असून भलत्या अनिष्ट मार्गानें जात आहां ' अशी नुसती नेहमींचीच हाकाटी करण्यापेक्षां मार्ग उजाळून दाखविण्याची विधायक कामगिरी अध्यक्षांच्या भाषणांत झाली असती तर, सर्वच दृष्टींनीं साहित्यसंमेलनाला अपूर्वता आली असती. पण अशा ' तत्त्वद्रष्ट्यांचाच ' आमच्यांत अजून संपूर्ण अभाव आहे, ही गोष्ट फिरून एकवार प्रत्ययास आली. याच ठिकाणीं मॅक्झिम गॉर्की यांच्या, थोड्या महिन्यांपूर्वी, तशाच पदावरून झालेल्या भाषणाची अथवा एच्. जी. वेल्स यांच्या ' पेन-क्लब'च्या भोजनप्रसंगीं केलेल्या भाषणाची विरोधाभासानें आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं.

तरुण रशियाचा ध्येयमार्ग किंवा वेल्स यांचें जागतिक राष्ट्राचें स्वप्न कोणाला पसंत नसेल, तथापि त्यांच्याप्रमाणें तत्त्वदृष्टीनें पाहण्याची तऱ्हा व विधायक कार्यपद्धति कोणालाच नापसंत होण्याचें कारण नाहीं.

—**प्रतिभा,** वर्ष ३, अंक १

## ८ ‘ आई ’ नव्हे, ‘ अनोळखी बाई ! ’

बडोद्याच्या तत्त्वज्ञान–समाजशास्त्र–विभागाच्या परिषदेंत अध्यक्ष म्हणून श्री. वि. रा. शिंदे यांनीं जें भाषण केलें, त्यांत आरंभीं एक अत्यंत मार्मिक विधान आलेलें आहे. भाष्यग्रंथांच्या प्रथेमुळें भारतीय तत्त्वज्ञानाची वाढ कुंठली, हेंच तें विधान होय. अशाच अर्थाचें प्रतिपादन प्रो. वामनराव जोशी यांनीं, गोव्याच्या साहित्यसंमेलनांत, ‘ गीतारहस्य ’ ग्रंथ उपलक्षणा-दाखल घेऊन, पर्यायानें केलें होतें. त्यावेळीं कित्येक बेगडी टिळकभक्तांना बसलेला धक्का पुष्कळांस विदित असेल !

अर्थात् भाष्यग्रंथांचें मुळींच महत्त्व नाहीं, असें कुणीच म्हणत नाहीं; मूळ ग्रंथांचें विशदीकरण होण्यासाठीं त्यांची आवश्यकता खचित आहे. परंतु आद्य शंकराचार्यांच्या लोकोत्तर भाष्यानंतर ज्याला म्हणून तत्त्वज्ञानविषयाची आवड आहे, त्यानें गीतेसारख्या ग्रंथावर टीका लिहायची, अशीच पद्धत पडली ! गीताग्रंथ उत्कृष्ट आहे, याबद्दलहि वाद नाहीं; परंतु त्या एकाच ग्रंथांतून कुणी अद्वैत, कुणी द्वैत, तर कुणी विशिष्टद्वैत काढून दाखवितो, हें चमत्कारिकच नव्हे काय ? शिवाय, या भाष्यामुळें जगाच्या विचार-संपत्तींत नवीन भर प्रायः पडत नाहीं ती नाहींच ! कारण गीता ज्ञानयोगपर आहे का कर्मयोगपर आहे, हें दाखविल्यानें फार तर मूळ ग्रंथांतील विवेचनावर प्रकाश पडेल, पण त्यामुळें त्या त्या भाष्यकारानें जगाच्या तत्त्वविचारांत नवीनता आणली, असें थोडेंच होतें ?

पाश्चिमात्य तात्त्विक वाङ्मयाचा इतिहास पाहिल्यास तिकडील तत्त्वज्ञांनीं भाष्यग्रंथनिर्मितीवर भर दिल्याचें बिलकूल आढळणार नाहीं. एकच उदाहरण द्यावयाचें, तर तें विद्यमान फ्रेंच तत्त्ववेत्ता हेन्री बर्गसाँ यांचें देतां येईल. बर्गसाँचा मुख्य सिद्धांत Intuition—अंतःप्रेरणा— याबद्दलचा आहे. त्याच्या या सिद्धांताबद्दल क्वचित् कुणाचा मतभेद होईल, नाहीं असें नाहीं; पण A. A. Luce यांचें Bergson's Docrine of Intuition हें पुस्तक

वाचल्यास बर्गसाँच्या या तत्त्वसिद्धांताची अपूर्व थोरवी लक्ष्यांत येईल. तात्पर्य, पाश्चिमात्य तत्त्वज्ञ पूर्वींच्या विचारसंपत्तींत स्वतःजवळचें एखादें दुसरें तरी माणिकमोतीं भरतीला घालण्याचा यत्न करतात, तसें आपल्याकडील भाष्यग्रंथांनीं कितपत होतें ?

बरें, आजच्या चिकित्साप्रधान युगांत रुचतील अशाप्रकारें या भाष्यग्रंथांची रचना असेल म्हणावें, तर तसेंहि प्रायः दिसत नाहीं. टिळकांचें 'गीतारहस्य' त्यांतल्या त्यांत आधुनिक पद्धतींचें आहे, हें खरें; परंतु तें याहीपेक्षां चिकित्सापूर्ण असतें, तर बरें होतें. जर्मनपंडित Garbe याच्या Introduction to the Bhagwatgita ' या छोटेखानी पुस्तकाच्या मानानें 'गीतारहस्य' अधिक पांडित्यप्रचुर आहे, हें उघड आहे, परंतु Garbe ची प्रस्तावना विशेष चिकित्साप्रधान आहे, तर टिळकांच्या ' गीतारहस्या'चें पान न् पान श्रद्धेनें रंगलेलें आहे ! कुणास ' गीतारहस्या 'चा हा गुण वाटेल तर वाटो, पण नवीन पिढीच्या अंतःकरणाची पकड घेण्याच्या दृष्टीनें त्याचें हें एक वैगुण्यच होय, असें म्हटलें पाहिजे. खाडिलकरांनीं, नागपूरच्या साहित्यसंमेलनांत, ' गीतारहस्या'ला ' आई ' म्हणून संबोधिलें होतें, तथापि सदर कारणामुळें अलीकडील तरुणांस हा ग्रंथ " आई " न वाटतां ' अनोळखी बाई'च वाटतो !!

* * *

वरील प्रतिपादन ' गीतारहस्या 'ची व्यर्थ कुचाळी करण्यासाठीं केलेलें नाहीं. भाष्यग्रंथ म्हणून शांकरभाष्यानंतर हाच ग्रंथ येतो, हें मीहि मान्य करतों. परंतु तत्त्वज्ञानविषयक ग्रंथाचा आदर्श म्हणून असे भाष्यग्रंथ ठेवण्यांत न येतां, तो मान कँट, स्पेन्सर प्रभृति तत्त्वज्ञांच्या स्वतंत्रप्रज्ञायुक्त ग्रंथांनाच देणें वाजवी आहे, हें दिग्दर्शित करण्यापुरताच ' गीतारहस्या 'चा वर केलेला आहे. रा. शिंदे अगर प्रो. जोशी यांनीं त्याचा नामनिर्देश केला, त्यांत तरी त्यांचा याखेरीज दुसरा कोणता हेतु होता ?

* * *

## ९ उत्प्रेक्षा हठाकृष्ट असतात काय ?

साहित्यसंमेलनांतर्गत काव्यविभागपरिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत, प्रो. माधवराव पटवर्धन, एका ठिकाणीं, म्हणतात, ''गोविंदाग्रजांच्या 'अरुणा'ला तर अनुभूताची आवश्यकताच नव्हती. कारण त्यांना केवळ कल्पना-चमत्कार करून दाखवायचा होता. अशा हठाकृष्ट चमत्काराच्या प्रकरणीं त्यांच्यावर मात करून केशवकुमारांनीं ' भयंकर अरुण ' निर्माण केला, हें विडम्बन यथायोग्यच झालें.'' या अवतरणांत उत्प्रेक्षा या सामान्यतः हठाकृष्ट असतात, असें प्रो. पटवर्धन ध्वनित करतात, असा तर्क त्यांचीं एतद्विषयक मतें लक्ष्यांत घेतां बांधावा लागतो. परंतु त्यांचें हें विधान अतिव्याप्त आहे. उत्प्रेक्षा या खरोखरच ओढूनताणून आणतां आल्या असत्या, तर सारेच मराठी कवि बाणभट्ट झाले नसते काय ? उलटपक्षीं, गडकरी, सावरकर हे चारदोन कवि वगळल्यास कोणत्याहि आधुनिक कवीस उत्कृष्ट उत्प्रेक्षा साधल्याचें आढळत नाहीं ! हें कशाचें द्योतक आहे बरें ?

खरी गोष्ट अशी आहे कीं, कांहीं कवि भावनाप्रधान, तर कांहीं कल्पनाप्रधान असतात. आणि रम्योदात्त उत्प्रेक्षा सुचतात, त्या कल्पना-प्रधान कवीलाच. बाणाच्या कादंबरींत चंद्रकोरीवर एक उत्प्रेक्षा आहे. चंद्रकोर ही जणुं काय वराहावतारांतील भगवंताचा दांत असून त्या दांतानें क्षीरसमुद्रांत बुडणारी पृथ्वी तो ' महावराह ' उचलून धरीत आहे, अशी ती अचाट उत्प्रेक्षा आहे ! अशा प्रकारची भव्य ( Sublime ) कल्पना सुचणें जातिवंत प्रतिभेशिवाय शक्य आहे काय ? याचा वाचकांनींच निर्णय द्यावा ! परंतु पाश्चिमात्य वाङ्मयांत ' Rhetorics 'ला गौणत्व देण्याची पद्धति आहे, ती पाहून आम्हीहि उपमा–उत्प्रेक्षांना नाकें मुरडायला लागलों आहों ! तरी बरें कीं याच भाषणांत प्रो. पटवर्धन यांनीं अनुकरणावर यथास्थित फटकारे उडविले आहेत !!

मात्र उपमा–उत्प्रेक्षांतच काव्यसर्वस्व सांठविलेलें असतें, असें मला सुचवायचें नाहीं. तसेंच गोविंदाग्रजांचा ' अरुण ' नीरस आहे, हा प्रोफेसर

साहेबांचा गर्भित अभिप्राय मलाहि संमतच आहे. परंतु ही कविता रद्दड ठरण्याचें कारण उत्प्रेक्षा या मूलतः हठाकृष्ट असतात हें नसून या कवितेंतील मात्र बहुतेक उत्प्रेक्षा हठाकृष्ट आहेत, हें आहे. केवळ उत्प्रेक्षा असलेली कविता देखील सरस होऊं शकते. याचें उत्तम उदाहरण म्हणजे शेलेची ‘ Cloud ’ ही कविता होय.

* * *

## १० ‘ झेंडूचीं फुलं ’ मात्सर्यामुळें फुललीं !

याच भाषणांत ‘ झेंडूचीं फुलें ’ रविकिरणमंडळाच्या मत्सरामुळें उमटलीं, असें प्रो. पटवर्धन म्हणतात. मंडळाचे सदस्य व केशवकुमार यांचे खाजगी संबंध कसे आहेत, हें मला ठाऊक नाहीं, व ठाऊक करून घेण्याचें कारणहि नाहीं. परंतु ‘ झेंडूच्या फुलां’तील ‘ श्यामलेस ’ या कवितेसारख्या कांही कविता मात्सर्याऐवजीं विशिष्ट लकबी हाणून पाडण्याच्या बुद्धीनेंच निर्माण झाल्या असाव्या, असा अजमास होतो. पटवर्धनांची फार्शी शब्दांची अतिरिक्त उपयोग करण्याची लकब हास्यास्पद नव्हती, असें तेहि म्हणणार नाहींत. तिचीच या कवितेंत थट्टा केली आहे, एवढेंच. आणि पटवर्धनांचीं ही खोड सुटल्याचें अलीकडे दिसत आहे, याचें श्रेयहि मुख्यतः याच कवितेकडे जातें.

* * *

## ११ भाषांतरांची आवश्यकता

रा. सा. चाफेकर यांचें साहित्यसंमेलनीय भाषण जसें इतर बाबतींत ‘ पुराणमतवादी ’ झालें तसेंच तें भाषांतराबाबतहि झालें. अथर्ववेद, शतपथ–ब्राह्मण, या संस्कृत ग्रंथांचें मराठींत भाषांतर व्हावयाला पाहिजे, असें ते म्हणाले; पण फ्रेंच, जर्मन, रशियन इत्यादि भाषांतील महत्त्वपूर्ण ग्रंथांचें भाषांतर होण्याच्या आवश्यकतेबद्दल मात्र त्यांनीं चकार शब्दहि काढला नाहीं ! उपरोक्त संस्कृत ग्रंथांचें भाषांतर होणें जरूर आहे, हें मलाहि मान्य आहे. परंतु स्फूर्तीचे जिवंत झरेच असे जे रशियन वगैरे भाषांतील ग्रंथ, त्यांचे मराठी अनुवाद प्रसिद्ध होणें हें तर त्याहूनहि जरूर आहे !

परंतु इकडे पहावें, तों आमचे प्रकाशक भारत-भागवताच्या त्याच त्या शिळ्या कढीला ऊत आणण्यांत गर्क झालेले दिसतात !!

जगांतील नवीन विचार काय आहेत, हें समजून घेऊन शिवाय त्यांचे प्रवाह समाजाच्या खालच्या थरांपर्यंत झिरपत जाण्यासाठीं वरील पाश्चात्य भाषांतील ठळक ठळक ग्रंथांचें भाषांतर मराठींत होणें अगत्याचें आहे, याबद्दल सहसा मतभेद होणार नाहीं. अशा अनुवादांच्या अभावीं किती अज्ञान असूं शकतें, याचें पाश्चिमात्य वाङ्मयाविषयींचें नव्हे, तर खुद्द आपल्याकडीलच एक उदाहरण देतां येण्याजोगें आहे. सर महंमद इक्बल हे लाहोरचे एक जात्यंध मुसलमान पुढारी आहेत, एवढेंच आपण वर्तमानपत्रांतून वाचतों. परन्तु उर्दु-फार्शीतील ते रवींद्र-नाथांच्या तोडीचे एक महान् कवीहि आहेत, ही गोष्ट किती जणांस माहित असेल? आणि, माहित असली, तरी "सारे जहाँसे अच्छा । प्यारा हिंदोस्ताँ हमारा" या गजलात्मक राष्ट्रगीताशिवाय त्यांच्या कोणत्या कविता आपल्या परिचयाच्या आहेत? सर इक्बल हे राजकारणांत दुराराध्य जात्यभिमानी असतील, परंतु वाङ्मयप्रांतांत तरी ही गोष्ट आड येण्याचें कारण नाहीं. मग त्यांच्या निवडक कवितांचें मराठींत भाषांतर कां होऊं नये?—अशीं कैक उदाहरणें देतां येतील.

नाहीं म्हणायला, प्रो. हुदलीकर, प्रो. माधवराव पटवर्धन प्रभृतींनीं जर्मन-फार्शी भाषांतील कांहीं ग्रंथ मराठींत अनुवादिले आहेत. पण व्हावयाच्या कामापेक्षां झालेलें काम अत्यल्प आहे. खेरीज, ज्यांना स्पर्शहि झाला नाहीं, अशा अनेक परभाषा अवशिष्ट आहेत. येथें कांहीं भाषा व त्यांचे जाणते यांचीं नांवें देतों—

उर्दु-फार्शी—प्रो. मा. त्रिं. पटवर्धन
बंगाली—शं. बा. शास्त्री, वि. अं. गिजरे.
गुजराती—वि. सी. गुर्जर, बाळूभाई मेहता, काका कालेलकर.
कानडी—वि. रा. शिंदे, प्रो. जहागिरदार.
पाली—प्रो. धर्मानंद कोसंबी, प्रो. चिं. वि. जोशी.

फ्रेंच—अ. ज. करंदीकर.

जर्मन—प्रो. स. बा. हुदलीकर.

पोर्तुगीज—वि. स. सुखटणकर. इ० इ०

या गृहस्थांच्या त्या त्या भाषेच्या ज्ञानाचा उपयोग करून घेण्याची बुद्धि आमच्या ' भारत-भागवत 'वाल्या प्रकाशकांस कधीं होणार ?

साहित्यसंमेलनानें तरी अश्लीलतेबद्दल व्यर्थ हांकाटी करीत बसण्यापेक्षां असल्या भाषांतराची योजना करून ती सिद्धीस नेल्यास अधिक उपयुक्त कार्य केल्यासारखें होईल !

*　　　*　　　*

## १२ संगीताचें मराठीकरण

कवि तांबे यांचा वरील लेख ' ज्ञानप्रकाशां'त नुकताच प्रसिद्ध झाला आहे. तांब्यांच्या कवितेंत जसा एक प्रकारचा ' झपाटा ' असतो, तसाच तो या लेखांतहि आहे. या दृष्टीनें हा लेख वाचनीय आहे.

मराठी भाषा, चिजा बनवायला नालायक नाहीं, हें तांब्यांनीं या लेखांत स्वच्छ सांगून टाकलें आहे, व याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. मात्र, हिंदी वगैरे परभाषांतील चिजा मुळांतील सर्व सौंदर्य कायम ठेवून मराठींत आणणें दुर्घट आहे, असें जें त्यांनीं विधान केलें आहे, तें एकांतिक आहे, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. हें विधान सिद्ध करण्यासाठीं तांब्यांनीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं मुळांतच सदोष आहेत. दुर्गा रागांतील " देवि भजो " या चिजेचें मराठीकरण साधत नाहीं, हें दाखविण्यासाठीं तांब्यांनीं स्वतःची ' जन म्हणति सांवळी ' ही कविता नमूद केली आहे, हें पाहून त्यांच्या अतिरिक्त स्वयंकेंद्रितपणाबद्दल हंसूंच कोसळतें ! कुठें " जन म्हणति " ही अर्थप्रधान कविता व कुठें " देवि भजो " ही स्वरप्रधान बांधीव चीज ! चिजेसारखी चीज वठावयाला राग व ताल यांचें धोरण तर सांभाळलेंच पाहिजे, पण शिवाय, बडोद्याच्या संगीतविभागाच्या सभेंत, अध्यक्ष श्री. विनायकबुवा पटवर्धन यांनीं म्हटल्या-प्रमाणें, " काव्यांतील शब्दाला स्वरांची मुरड कोठें घ्यावयास पाहिजे " हें

समजून घेऊन मुळांतील लघुगुरुक्रमहि यावच्छक्य कायम ठेवायला हवा. तांब्यांच्या सदर गीतांत हा निर्बंध पाळला आहे काय? मग अशा सदोष पद्याच्या आधारें एवढा महत्त्वाचा प्रश्न निकालांत काढण्याचें हें धाडस कां? खाडिलकरांच्या पदांना काव्यदृष्ट्या कुणी कितीहि नाक मुरडो, मूळ चिजेंतील सौंदर्य बरेंचसें कायम ठेवण्याच्या दृष्टीनें मात्र त्यांच्या अनेक पदांचें कौतुकच केलें पाहिजे.

तांब्यांनीं उल्लेखिलेल्या " स्तव करा रे " या दुसऱ्या रचनेंतहि मूळ फार्शी तराण्याची बहार न येण्याची कारणमीमांसा वरील प्रमाणेंच देतां येईल. शिवाय फार्शींत " तैमूरलंगी " शब्दप्रयोग करण्याची मुभा असल्यामुळे कित्येकदां तीतील रचनेंत विशेषच खुमारी येते, ही फार्शीची प्रकृतिभिन्नताहि दृष्टीआड करतां येत नाहीं. परंतु चिजांचें महत्त्व शब्दसौंदर्यापेक्षां स्वरसौंदर्यावरच जास्त अवलंबून असल्यानें फार्शी ( अगर हिंदी ) चिजांच्या मानानें मराठींतील सदृश चिजा, केवळ या प्रकृतिभिन्नतेस्तव अगदींच रद्दड ठरतील, असें खचित म्हणतां येत नाहीं.

बाकी, हिंदी–फार्शी चिजांची नक्कल करण्यापेक्षां स्वतंत्र मराठी चिजा तयार होणेंच अधिक श्रेयस्कर आहे, हें तांब्यांचें म्हणणें कुणासहि मान्य होण्याजोगें आहे. आणि अशा चिजांचा प्रसार होण्यासाठीं त्या गाणारा तानसेनासारखा भूगंधर्व महाराष्ट्रांत निर्माण व्हावयास पाहिजे, हेंहि त्यांचें विधान रास्तच आहे.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक २

## १३ " कैदाशिणीचें कोडें ! "

विख्यात तत्त्वज्ञ प्रो. **रामभाऊ रानडे** यांनीं अलीकडे 'Mysticism in Maharashtra' नामक एक ग्रंथ प्रसिद्ध केल्याचें पुष्कळांस विदित असेल. प्रो. रामभाऊ रानडे यांच्यासारखा पहिल्या प्रतीचा विद्वान् व महाराष्ट्रीय संतांसारखा विषय—असा अपूर्व योग येऊनहि या ग्रंथांकडे महाराष्ट्रीयांनीं द्यावें तसें लक्ष दिलेलें दिसत नाहीं !

प्रस्तुत ग्रंथविषयाचें महत्त्व, साधारता, भाषाशैली वगैरे बहुतेक सर्व, गुणांत ' ए वन् ' आहे, हें निराळें सांगणें नकोच. प्रो. रामभाऊंसारखा आंतरराष्ट्रीय योग्यता प्राप्त झालेला महापंडित या ग्रंथाचा जनक आहे, ही एकच गोष्ट त्याचें महत्त्व दिग्दर्शित करण्यास पुरेशी आहे, हें सर्व खरें; परंतु या ग्रंथांतील एक प्रकार मात्र माझ्यासारख्या अश्रद्धास खटकल्यावांचून रहात नाहीं ! प्रो. रामभाऊंनीं, सदर ग्रंथांत, जगांतील व विशेषतः महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या दिव्य अनुभवांचें श्रद्धायुक्त वर्णन करून त्यांचा पर्यायानें पाठपुरावाहि केलेला आहे; याबद्दल, हे साधुसंत व रामभाऊ यांजविषयीं पूर्ण आदर ठेवूनही, साशंकताच प्रदर्शित करावीशी वाटते ! उदाहरणार्थ, कित्येकांना म्हणे दिव्य गंधाचा वास येई , कित्येकांना ' अनाहत नाद, ' ऐकूं येई, तर कित्येकांना दिव्य तेज दृग्गोचर होई ! या संतांचे हे खरोखरीचे अनुभव होते, कीं त्यांना असे कांहीं भास होत असत, असा प्रश्न माझ्यासारख्यापुढें उभा राहतो ! एखादा फटकळ तर हे सर्व विकृत मनाचे खेळ होत, असेंहि म्हणावयाचा ! फार काय सांगावें, क्वचित् तो याहीपुढें जाऊन या संतमंडळीवर असत्यकथनाचा सुद्धां आरोप करायचा ! ! मला अर्थात्च तसें कांहींहि करावयाचें नाहीं. ज्ञानदेवासारख्या महाविभूतीला ' लबाड ' असें कोणत्या तोंडानें म्हणावें ? बरें, त्यांच्या अशा अनुभवावर विश्वास ठेवावा, तर तेंहि मनाला पटत नाहीं ! तात्पर्य, हें एक ' कैदाशिणीचें कोडें 'च उत्पन्न झालें आहे.

*　　*　　*

प्रो. रामभाऊंच्या प्रस्तुत ग्रंथाबद्दल दुसरे थोर तत्त्वज्ञ प्रो. वामनराव जोशी यांचें फारसें अनुकूल मत नसल्याचें मला एका 'कर्णपिशाच्चा'-कडून कळलें आहे. गेल्या १० जानेवारीला पुण्यास वाडिया कॉलेजांत प्रो. वामनराव यांनी 'विवाहसंस्था व नवमतवाद' या विषयावर जें भाषण केलें, त्यांत विषयांतराचा दोष पत्करूनहि त्यांनीं ज्ञानेश्वर, वर्डस्वर्थ व न्या. मू. रानडे यांच्या गूढवादाबद्दल मतभेद दर्शविला आहे, त्यावरून देखील वरील बातमीस पुष्टीच मिळते. या भाषणांत वामनरावजींनीं प्रो. रानडे यांचा नामनिर्देश न करतां न्या. मू. रानडे यांचा –दुसऱ्या रानड्यांचा–उल्लेख केला असला, तथापि त्यांचीं Mysticism in Maharashtra या ग्रंथाबद्दलचीं मतें लक्षांत घेतां त्यांच्या बोलण्याचा रोंख कशाकडे होता, हें सहज सांगतां येतें. सदर ग्रंथाची तत्त्वज्ञानाच्या, विशेषतः मानसशास्त्राच्या दृष्टीनें, एखाद्या लेखांत सविस्तर चर्चा करून त्यांच्या लेखनाची 'भूक' लागलेल्या वाचकांना एक चमचमीत मेजवानी देण्याचें श्रेय प्रो. वामनराव घेतील काय ?

* * *

## १४ कॅलिबनच कॅलिबन

नुकत्याच निघालेल्या 'महाराष्ट्रशारदा' या मासिकाच्या प्रथमांकांत झेंडूच्या फुलांतील 'आम्ही कोण' हें विडंबनकाव्य निराळ्या पद्धतीनें देऊन त्यांत विडंबनकाव्यप्रकाराचे आचार्य खुद्द केशवकुमार यांजपासून तों थेट सिनेमा नटीपर्यंत अनेकांस एका दावणींत गोवलें आहे ! त्यांतील कांहीं 'साहित्यझब्बूं'चे दिग्दर्शित केलेले स्वभावविशेष अत्यंत मार्मिक आहेत, यांत शंका नाहीं; परंतु अशा प्रकारचा वैयक्तिक हल्ला करणें कितपत उचित आहे हाच मुख्य प्रश्न आहे ! यापूर्वीचीं कित्येक विडंबनकाव्यें थालीपिठासारखी 'खुसखुशीत' असून त्यांनीं कांहीं साहित्यिकांच्या त्याज्य लकबा नष्ट करण्याचें पुण्य संपादिलें आहे, हें अर्थात् मीहि कबूल करतों. परंतु 'टेंपेस्ट' नाटकांत ज्याप्रमाणें कॅलिबन हा मिरांडेजवळ तिजपासून त्या जादूच्या बेटावर 'कॅलिबनच कॅलिबन करून' सोडण्याची ओंगाळवाणी कल्पना बोलतो,

त्याप्रमाणें अलीकडील तरुण कवींनीं मराठी वाङ्मयांत विडंबनकाव्यांचा सुळसुळाट करण्याचीच जणुं शपथ घेतल्याचें दिसतें ! सदभिरुचीचें आसन स्थिर राहण्यासाठीं, अशा काव्यप्रकाराच्या निर्मितीस पायबंद घालणें अतिशय अवश्य झालें आहे, असें मला वाटतें.

* * *

## १५ खांडेकर, कोट्या व फुरसें !

श्री. वि. स. खांडेकर व कोट्या यांची इतकी समव्याप्ति झालेली आहे कीं, खांडेकर = कोट्या असें समीकरण मांडावयाला देखील हरकत नाहीं ! आणि अलीकडे, बडोद्याच्या कथाविभागपरिषदेच्या भाषणांत त्यांनीच म्हटल्याप्रमाणें, फुरशाकडून चावून घेण्याची त्यांना ‘ दुष्ट खोड ’ लागली असल्यामुळें तर त्यांच्या लेखनांत कोट्यांप्रमाणेंच सर्पदंशाचा निर्देशहि सांप्रत अपरिहार्य झाला आहे. मात्र हा उल्लेख वारंवार येणें जितकें अयोग्य वाटतें, त्यापेक्षांहि त्यांच्या कांहीं कोट्या कित्येकदां जास्त अयोग्य वाटतात. उदाहरणार्थ, उपरोक्त बडोद्याच्या भाषणांत ते एका जागीं म्हणतात, “घरांत परका पुरुष आला कीं, पत्नीनें मागचें दार गांठलेंच म्हणून समजावें. आलेल्या पाहुण्याला घरधनीण लपंडावानें आपल्याशीं खेळत आहे कीं काय, असा संशय सुद्धां यायचा ! ” यांतील ध्वनी किती ‘ अवाच्य ’ आहे, हें स्पष्ट करून सांगायला नकोच ! अशी कोटी करण्याचा मोह श्री. खांडेकर यांच्या-सारख्या कसलेल्या लेखकालाहि, आंवरतां येऊं नये, हें आश्चर्य नव्हे काय ?

* * *

## १६ अपसिद्धांतांचा पॅसिफिक महासागर !

मराठी वाङ्मयाच्या ज्या अनेक उणीवा आहेत, त्यांत श्रेष्ठ टीकाकारांचा अभाव ही फारच मोठी उणीव आहे. आपल्याकडे टीकाकार म्हणून जे लोक मिरवतात, ते प्रायः ‘ निराश ग्रंथकार’च आहेत ! यामुळें मराठी टीकावाङ्मय म्हणजे अपसिद्धांतांचा पॅसिफिक महासागरच बनला आहे ! याचें एक ताजें उदाहरण देतों. प्रो. वामनराव जोशी यांच्या

लेखनांत सत्य व सौंदर्य हीं हातांत हात घालून हिंडतांना कशीं दृष्टीस पडतात, हें निदान ' रागिणी ' व ' विचारविलास ' यांच्या वाचकांना तरी नव्यानें सांगावयाला नको.परंतु नुकताच एका नामांकित वर्तमानपत्रांत वामनरावजींच्या " इंदु काळे व सरला भोळे " या कादंबरीवर अभिप्राय आला आहे. त्यांत त्यांच्या लेखनांत सौंदर्याचा प्रायः अभाव असतो, असें सरसकट विधान ठोकून देण्यांत आलें आहे ! सदर अभिप्रायलेखक हे टीकाकार म्हणून गाजलेले आहेत हें लक्षांत घेतलें, म्हणजे महाराष्ट्रांतील टीकाकारांचें महत्त्वमापन सहज करतां येतें ! खरेंच आहे. वामनरावजींच्या लेखनांत सर्वसामान्य वाचकांना न कळणारे जाडेजाडे संस्कृत शब्द नाहींत, निरर्थक अनुप्रास नाहींत, गैरलागू उपमा –उत्प्रेक्षा– दृष्टांत नाहींत, मग त्यांच्या लेखनांत सौंदर्यगुण उतरावे तरी कसे ?

प्रो. वामनराव यांच्या सर्व कृतींत मला ' विचारविलास ' ग्रंथ सर्वोत्कृष्ट वाटतो. विशेषतः " ज्ञान हें विष कां अमृत " हा लेख तर Revelationच म्हटला पाहिजे. परंतु दुर्दैवानें प्रस्तुत ग्रंथ महाराष्ट्रांत उपेक्षिला जात आहे, आणि याचें मुख्य कारण हेंच कीं, खऱ्या टीकात्मक दृष्टीचा आमच्यांत अजून अभावच आहे. मग त्याचीं कारणें कांहींहि असोत.

*  *  *

## 17 " Et tu Brute "

हिंदींतील एक प्रमुख मासिक ' विश्वमित्र ' याच्या जानेवारी '३५ च्या अंकांत ' गांधींच्या तत्त्वज्ञानांत कलेचें स्वरूप व साधना ' या नांवाचा एक वाचनीय लेख आला आहे. त्यांत प्रसंगानुरोधानें म. गांधी यांचा, ' सर्वश्रेष्ठ वंगीय नाटककार ' द्विजेंद्रलाल राय यांचे प्रख्यात संगीतनिपुण पुत्र **दिलीपकुमार राय** यांजशीं झालेला, संवाद उद्धृत करण्यांत आला आहे. त्यामध्यें **दिलीपकुमार** म्हणतात, ' कला जीवनापेक्षां श्रेष्ठ आहे, असें मी मानीत नाहीं.' तसेंच, रवींद्रनाथांच्या शांतिनिकेतनमधील दुसरे एक कलाविद् **रामचन्द्रन्** यांचा कांहीं वर्षांपूर्वी गांधींशीं असाच एक संवाद झाला होता, तोही सदर लेखांत अंशतः देण्यांत आला आहे.

**रामचंद्रन्** यांच्याहि मतें कला ही जीवनापेक्षां उच्चतर ठरत नाही. या उभय कलावंतांचा हा अभिप्राय वाचून " कलेसाठीं कला " असा टाहो फोडणाऱ्या आमच्याकडील " कलावाद्यां "वर " Et tu Brute " ! असें म्हणण्याची पाळी येणार, यांत शंका नाहीं !

* * *

## १८ राजवाड्यांचा धातुकोश

कै. राजवाडे यांचा धातुकोश छापून प्रसिद्ध करण्याची खटपट धुळ्याचे शंकरराव देव प्रभृति गृहस्थ करीत आहेत. परंतु पुण्याचे मोडकशास्त्री यांनीं हा कोश प्रकाशित करण्यांत येऊं नये, अशी जोराची चळवळ चालविली असून त्यांनीं बऱ्याच बड्याबड्या धेंडांची एतद्विषयक अनुकूलताहि संपादन केली आहे ! सर्वांत मौज ही कीं, कोशविषयाशीं ' बादरायण संबंधा '-इतकासुद्धां संबंध नसलेले लोकहि या वादांत अनाहूतपणें तोंड खुपशीत आहेत ! याची कल्पना १८ जानेवारीच्या ' ज्ञानप्रकाशां 'तील एका ' कवि-भूषणां 'च्या पत्रावरून चांगली येते. मी राजवाड्यांचा—नव्हे, कुणाचाच—' भगत ' नाहीं. एवढेंच नव्हे, तर राजवाड्यांत, थोरल्या भांडारकरांचा बिनचूकपणा ( Exactness ) नसल्यामुळें त्यांचें संशोधनकार्य हिणकस झालें आहे, अशाच मताचा मी आहें. हेंच पहा ना. ' राधामाधवविलासचं '’च्या प्रस्तावनेंत क्षत्रिय असलेल्या शालिवाहनांना ' शालि ' म्हणजे भात या एकाच शब्दावरून राजवाडे बिनदिक्कत ब्राह्मण ठरवितात ! अशा तऱ्हेचे हास्यास्पद प्रकार त्यांच्या लिखाणांत जागोजाग आढळतात. परंतु तेवढ्या-वरून ' त्यांचे ग्रंथ मुद्रणाच्यासुद्धां लायकीचे नाहींत, ' असें म्हणणें हा त्यांना शुद्ध अन्याय करणें होय. राजवाड्यांच्या धातुकोशांत अनेक चुका असतील, पण चुका कोणत्या ग्रंथांत नसतात ? खुद्द मोडकशास्त्र्यांचें 'अंतरंगदर्शन' पूर्णपणें प्रमादरहित आहे, असें त्यांचे ते तरी म्हणूं शकतात काय ? मग राजवाड्यांचा कोश प्रसिद्धच होऊं नये, असा हट्टाहास कां ? फार तर, ज्यांना ज्यांना हा ग्रंथ टाकाऊ वाटतो, त्यांनीं त्यांनीं त्याचे शेअर्स अगर प्रत घेऊं नये, म्हणजे झालें ! बरें, या कोशापायीं देशाच्या पुष्कळ

पैशांचा चुराडा होणार, म्हणून मोडकशास्त्री वगैरेंना हळहळ वाटत असेल म्हणावें, तर शंकरराव देवांनीं जांबेला समर्थमंदिराप्रीत्यर्थ तीस चाळीस हजारांची प्रचंड रक्कम अक्षरशः मातींत घातली, त्यावेळीं या विरोधकांची देशहिताची कळकळ कुठें निजली होती, असा प्रश्न साहजिकच पुढें उभा राहतो ! बहुधा, अशा धर्मकार्यांत ( ? ) खर्च केल्यानें देशाचें कोट कल्याणच होईल, असा त्यांचा 'देवभोळा' विश्वास असावा ! ! असो.

सांगण्याचा मुद्दा हा कीं, राजवाडे यांच्यांत कित्येक दोष असले, तरी पण ते एक अतिशय प्रतिभासंपन्न लेखक होते, हेंहि कबूल केलेंच पाहिजे. तशांत आज ते विद्यमान नसल्यामुळें तर या मृत ग्रंथकारशिरोमणीच्या अपुऱ्या इच्छा पूर्ण करण्यास यथाशक्ति हातभार लावण्याची—निदान अडथळा न करण्याची तरी—जबाबदारी सर्वच वाङ्मयभक्तांवर येऊन पडते यामुळें रा. सा. चाफेकर यांनीं, बडोद्याच्या भाषणांत, या विरोधकांचा जसा निषेध केला तसाच तो इतरांनींहि केला पाहिजे.

* * *

## १९ विज्ञानबोध

कै. माधवरावजी रानडे यांच्या पुण्यस्मृतिदिनप्रसंगीं वरील ग्रंथ त्यांना अर्पण झाल्याचें आतांपर्यंत पुष्कळांनीं वाचलेंच असेल. कै. माधवरावजींच्या विविधपैलू प्रज्ञेबरोबरच त्यांच्या अंगीं असणारी लोकसंग्रहप्रवृत्ति लक्षांत घेतां वरील प्रकारचा—बऱ्याच विद्वानांनीं परिश्रमपूर्वक तयार केलेला—स्मारक ग्रंथ त्यांना अर्पण व्हावा, हा गोष्ट मराठीच्या अभिमान्यांना केव्हांही आनंददायक वाटेल, यांत शंका नाहीं. महाराष्ट्रांत विद्वान् नाहींत असें नाहीं; पण पैशाच्या अभावीं किंवा परिस्थितीमुळें त्यांच्याकडून राष्ट्रविधायक कामगिरी व्हावी तशी होत नाहीं. अशा परिस्थितींत श्री. माट्यांनीं उमेदीनें एवढें कार्य अंगावर घेऊन बऱ्याच शास्त्रविशारदांचे प्रयत्न संकलित केले व विज्ञानबोध काढला, हें त्यांना केव्हांहि भूषणावहच आहे. डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशानंतर झालेल्या अशा या महाप्रयत्नाबद्दल महाराष्ट्र त्यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदनच करील.

अशा तऱ्हेचा ग्रंथ संपूर्ण निर्दोष करणें सोपें नाही. त्यांतून मराठींत असे प्रयत्न फारच कमी असल्यानें त्यांत अनेक दोष राहण्याचा संभव बराच अधिक. अशा वेळीं असल्या प्रयत्नाचें महत्त्व जाणून त्यावर विधायक टीका करण्याऐवजीं सर्वज्ञतेचा आव आणून ' न जाणें न नेणें ' अशा हेकेखोर वृत्तीनें केलेली त्या ग्रंथाची टवाळी पाहिली कीं, महाराष्ट्राच्या मत्सरी स्वभावाची व दिवसानुदिवस वाढत चाललेल्या ' कंपूशाही ' टीका-प्रवृत्तीची साक्ष पटते, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक ३

## २० महाराष्ट्रानें बुद्धास केलेला अन्याय !

हिंदींतील बौद्धधर्मीय महापंडित त्रिपिटकाचार्य राहूल सांकृत्यायन यांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलेलें " मज्झिमनिकाय " या पाली ग्रंथाचें हिंदी भाषांतर परवां माझ्या पाहण्यांत आलें. तें वाचून गौतम बुद्ध व मराठी भाषा यांजविषयीं अनेक विचारतरंग माझ्या अंतःकरणांत उद्‍भूत झाले !

गौतम बुद्ध अगर त्याचा बौद्धधर्म यांच्याबद्दल सुधारलेल्या जगांत किती आदर वसत आहे, हें पाश्चिमात्यांचें त्याजविषयींचें लिखाण अवलोकिलें असतां कोणाच्याहि सहज लक्ष्यांत येईल. फार काय सांगावें, हिंदुस्थानाविषयीं गौरकाय देशांत सहानुभूति उत्पन्न व्हावयाला हिमालय, उपनिषदें, ताजमहाल, वगैरे ज्या चार–पांच गोष्टी: कारणीभूत होतात, त्यांत बुद्ध व त्याचें महान् तत्त्वज्ञान यांचा प्रामुख्यानें समावेश केला पाहिजे ! कारण बुद्धाचीं कित्येक तत्त्वें इतकीं त्रिकालाबाधित आहेत कीं, सध्यांच्या नवयुगांतदेखील तीं सर्वमान्य व्हावींत ! आणि त्याच्या भूतदयेच्या व अहिंसेच्या दिव्य संदेशापुढें कट्टरांतील कट्टर नवमतवादीसुद्धां मस्तक नम्र केल्याशिवाय राहणार नाहीं !

परंतु या सर्वश्रेष्ठ धर्मसंस्थापकाची व त्याच्या धर्माची मराठी भाषेनें कितपत बूज राखली ? प्रो. धर्मानंद कोसंबी, प्रो. चिं. वि. जोशी, कै. केळुसकर प्रभृति मूठभर ग्रंथकार वगळल्यास, बुद्ध व बौद्धधर्म यांची आमच्या लेखकांनीं प्रायः उपेक्षाच केलेली आढळेल ! इंग्रजींत बुद्धाचीं चरित्रें असतांहि डॉ. हरिसिंग गौरसारख्या सुधारकाग्रणीस स्वतःचें वाङ्मयपुष्प त्याच्या चरणीं अर्पण केल्यावांचून समाधान होत नाहीं, तर आमच्या मराठी विद्वानांना मात्र एकहि सर्वमान्य बुद्धचरित्र निर्माण करण्याची बुद्धि होत नाहीं !

उलटपक्षीं त्या महाविभूतीची निंदा करण्याकडेच पुष्कळांची प्रवृत्ति दिसते. " इतिहास व ऐतिहासिक " यांत कै. गो. का. चांदोरकर यांनीं बुद्धावर किती हिडीस लेख छापले होते हें प्रसिद्धच आहे. त्याच लेखांचा

अनुवाद ‘ ज्ञानकोशांत’तहि करण्यांत आला आहे ! मुसलमानांनीं आकाश-पाताळ एक केल्यामुळें ‘ ज्ञानकोश ’कारांनीं महंमदपैगंबरावरचा मजकूर रद्द केला, परंतु बुद्धावरचा त्याच जातीचा मजकूर त्यांनीं रद्द केल्याचें निदान मला तरी ठाऊक नाही ! अजूनहि कित्येक सनातनी लेखक कै. चांदोरकरांची परंपरा चालवीत असलेले दृष्टीस पडतातच !

* * *

## २१ प्रो. पटवर्धनांस उत्तर

प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं ‘ प्रतिभे’च्या गेल्या अंकांत ‘ रामशास्त्री न्यायच करा ’ या मथळ्याखालीं एक खुलासा छापला आहे. त्यांत केशवकुमारांवर आपण मात्सर्याचा आरोप केला नाहीं, असा ते निर्वाळा देतात. त्यांच्या मनांत कदाचित् तसें नसेलहि; परंतु त्यांचे शब्द निराळीच ग्वाही देतात, त्याची वाट काय ? माझ्या अल्पबुद्धीनें ‘ यश डोळ्यांवर येणें ’ याचा अर्थ ‘ यश डोळ्यांत खुपणे ’ असाच होतो, आणि मत्सराशिवाय दुसऱ्याचें यश डोळ्यांत खुपते काय, याचा वाचकांनींच निर्णय द्यावा ! प्रोफेसरमजकुरांनीं असा गैरसमज करणारा शब्दप्रयोग वापरला नसता, तर मात्सर्याचा आपल्या स्फुटांत उल्लेख करण्याची मला तरी काय गरज होती ?

प्रो. माधवराव आणखी लिहितात–“ माझ्या कवितेंत इतर शब्दांच्या संख्येच्या मानानें फार्शी शब्द अतिरिक्त होते काय, हाच प्रश्न वादग्रस्त आहे.” हें विधान वाचून मी तरी हतबुद्धच झालों !! “ अल्लाहु अक्बर ” ( प्रथमावृत्ति ) सारख्या कवितांतहि फार्शी शब्दांचें प्रमाण कमीच आहे, अं ? कदाचित् फार्शी शब्दांप्रमाणेंच जुने मराठी व अपरिचित संस्कृत शब्द आपण सडकून वापरले असून त्यांच्या अपेक्षेनें फार्शी शब्दांची संख्या फार मोठी नाहीं, असा माधवरावांच्या म्हणण्याचा आशय असल्यास नकळे ! परंतु तसें समजलें तरी त्यांच्या कवितेंत दुर्बोध फार्शी शब्द अतिरिक्त नव्हते, असें खचित म्हणतां येत नाहीं ! शिवाय, अपरिचित फार्शी शब्द वापरणें जितकें गर्ह्य आहे, तितकेंच जुनाट मराठी व

कठिण संस्कृत शब्द वापरणेंहि गर्ह्यच आहे. कारण पद्य काय, अगर गद्य काय, दोन्हीहि चालू भाषेंतच लिहावयाला पाहिजेत, हें माधवरावांसारख्या श्रेष्ठ गद्य-पद्यलेखकांस तरी इतर कोणी सांगावयाला नको !

याच खुलाशांत माझ्या लिहिण्यामुळें कलागती लागण्याचा संभव आहे, असा इशाराहि प्रो. माधवराव देतात ! हा इशारा वस्तुस्थितीस पुष्कळच धरून आहे, हें मीहि मान्य करतों. कारण स्वतः माधवरावांसारखा एखाद-दुसरा सन्मान्य अपवाद वगळल्यास आमच्या धुरंधर साहित्यिकांत परमतसहिष्णुतेचा आत्यंतिक अभाव आहे ! परंतु केवळ तात्त्विक स्वरूपाचा मतभेदहि खुल्या दिलानें ऐकून न घेण्याइतकी नाजुक प्रकृति आमच्या साहित्यिकांनीं ठेवणें योग्य आहे काय, व त्यांच्याखातर इतरांना आपलीं प्रामाणिक मतेंहि दडपून टाकणें इष्ट आहे काय, हाच मुख्य प्रश्न आहे !

* * *

## २२ हिंदींतहि तोच प्रकार !

थोरांमोठ्यांविषयीं मतभेद दर्शविल्यास ते स्वतः व त्यांजपेक्षांहि त्यांचा 'वेताळगण' तसा मतभेद प्रगट करणाऱ्यांवर व्यक्तिद्वेष, इत्यादि दोषांचा कसा आरोप करतात, याचीं आपल्याकडील कांहीं उदाहरणें वाचकांस आठवत असतीलच ! या प्रकारास हिंदी भाषेंत तर अलिकडे नुसता ऊतच आला आहे ! दुलारेलाल भार्गव नामक एका हिंदी कवीनें 'दुलारे-दोहावलि' नांवाचें काव्य नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. हिंदींतील विख्यात प्राचीन कवि बिहारी याच्या 'बिहारीसतसई'च्या धर्तीवर हा ग्रंथ रचलेला असून श्लिष्टता हें त्याचें वैशिष्ट्य आहे. यामुळें एकेका दोह्याचे सहासहासुद्धां अर्थ करण्यांत येतात. असलें हरदासी पद्धतीचें काव्य आजच्या अभिरुचीस अनुसरून नाहीं, हें स्पष्टच आहे. आणि हाच अभिप्राय 'विशालभारत' मासिकाचे संपादक बनारसीदास चतुर्वेदी यांनीं एका लेखांत व्यक्त केला. झालें ! तेवढ्यावरून मांत्रिकानें भुतें उठवावीं, तद्वत् दुलारेलाल भार्गवाचा भगतगण चेकाळला व त्यानें चतुर्वेदीजींवर नाहीं-नाहीं ते आरोप करण्याचा धडाका

चालविला आहे ! लेखनस्वातंत्र्याला सरकारपेक्षांहि लोकांचाच किती तीव्र विरोध होतो, याचें हें उत्कृष्ट उदाहरण होय !

* * *

## २३ बंगाली चित्रकला

औंधचे रा. दाभाडे यांनीं ' भारतीय चित्रकला ' हें पुस्तक प्रसिद्ध करून मराठी भाषेंत या विषयावर प्रथमच ग्रंथरचना करण्याचें श्रेय घेतलें आहे व त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. मात्र हें पुस्तक यापेक्षांहि सविस्तर असावयाला पाहिजे होतें.

चित्रकलेंत बंगाली चित्रकारांनीं स्वतःचा संप्रदाय (School) निर्माण केला असल्याचें जगजाहीरच आहे. या संप्रदायाबद्दल कुणाचा कितीहि मतभेद असो, कल्पकता व सूचकता ( Suggestiveness ), हे या संप्रदायाचे अनन्यसाधारण गुण कोणालाच नाकारतां येणार नाहींत ! एकच उदाहरण देतों. चॅतर्जींच्या ' Picture Album ' मध्यें " Call of the Forest " नांवाचें एक चित्र आहे. सदर चित्रांत एक हरिण झाडाशीं बांधलेलें असून तेथून कांहींशा अंतरावर असणाऱ्या अरण्याकडे तें कान टवकारून अतिशय अधीरतेनें पाहात आहे, असें दाखविलें आहे. अर्थात् सूचकतेच्या दृष्टीनें हें चित्र किती बहारीचें वाटतें, हें मर्मज्ञांस निराळें सांगण्याचें कारण नाहीं. रवींद्रनाथांच्या व्यंग्य-प्रधान गीतांपासून जशा प्रकारचा उच्च आनंद प्राप्त होतो, तसाच तो अशा कित्येक चित्रांपासूनहि होतो.

परंतु महाराष्ट्रांत बंगाली चित्रकलेविषयीं सामान्यतः तुच्छबुद्धीच दिसून येते ! साहजिकच आहे. भडक रंगांत बायकांचे गोरेगोमटे चेहेरे रेखाटणें, हेंच जेथें चित्रकलासर्वस्व समजण्यांत येतें, तेथें कल्पकता, सूचकता, वगैरे उच्चतम गुणांची कदर असणार तरी कशी ?

* * *

## २४ सरदेसाई–" सरकार " यांची कामगिरी

रियासतकार नानासाहेब सरदेसाई यांचा " पेशवे दप्तरांतील इंग्रजी लेखांचें संशोधन" हा लेख 'लोकशिक्षणा'च्या जानेवारी १९३५ च्या बृहदंकांत प्रसिद्ध

झाला आहे. त्यावरून पेशवे दप्तरांतील इंग्रजी कागदपत्रें सर जदुनाथ सरकार यांच्या संपादकत्वाखालीं ग्रंथरूपानें लौकरच प्रकाशित होणार असल्याचें कळतें. पेशवे दप्तरांतील मराठी विभागाप्रमाणें हा इंग्रजी विभागहि मुंबई सरकारच्याच कृपेनें उजेडांत यावयाचा आहे. याबद्दल " सर " सरकार व मुंबई सरकार या उभय " सरकारां "चे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

खुद्द नानासाहेब सरदेसाई यांनीं एवढ्या उतार वयांतहि मराठी विभागाचे तब्बल पंचेचाळीस खंड संपादित करून छापल्याचें सर्वत्रांस विदित झालेंच आहे. नानासाहेबांची ही कामगिरी इतकी लोकोत्तर आहे कीं, महाराष्ट्रानें तिजबद्दल त्यांचा जाहीर रीत्या सन्मान केला पाहिजे ! तसेंच या मराठी खंडाप्रीत्यर्थ मुंबई सरकारला इतका प्रचंड खर्च करावयाला लावण्याचें श्रेय प्रामुख्यानें सर जदुनाथांकडे जात असल्यामुळें त्यांचाहि असाच सत्कार होणें जरूरीचें आहे.

* * *

## २५ मराठी मासिकांचें संकुचित स्वरूप

चालू वर्षी मराठी मासिकांना तुफान भरती आली आहे ! मासिक काढणें हें आर्थिक दृष्ट्या धाडसाचेंच असल्यामुळें त्यांतील उणीवांचा पाढा वाचीत बसण्यांत फारसें औचित्य नाहीं. " शेळी जाते जिवानिशीं नि खाणार म्हणतो वातड ! " ही म्हण सर्वश्रुतच आहे. तथापि एका न्यूनाकडे अंगुलिनिर्देश करणें अत्यावश्यक वाटतें.

मराठी मासिकें एरव्हीं वाचनीय असतात, परंतु त्यांत आंतर-राष्ट्रीय, निदान अखिल भारतीय तरी, महत्त्वाचा मजकूर अत्यल्प येत असल्यामुळें परप्रांतीयांना त्यांजविषयीं विशेष जिव्हाळा वाटत नाहीं. तेंच बंगालींतील ' प्रवासी ' सारखीं कांहीं मासिकें पहा, त्यांत महाराष्ट्रीयांना देखील वेधून घेणारा असा व्यापक स्वरूपाचा कांहींना कांहीं मजकूर हा प्रत्यहीं असावयाचाच ! या मासिकाचे, व्यापकता आणण्याचे जे अनेक उपाय आहेत त्यांपैकीं एक उपाय असा आहे कीं, युरोप-अमेरिका वगैरे परस्थलीं कारणपरत्वें गेलेल्या स्वबांधवांकडून जागतिक महत्त्वाच्या प्रचलित प्रश्नांवर सदर मासिकाचे

चालक मुद्दाम लेख लिहवून घेतात. त्यामुळें त्या त्या मासिकाच्या तेवढ्या भागाला एकप्रकारें आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त होतें. असा प्रयत्न मराठी मासिकांनीं केल्याचें क्वचित्‌च दृष्टोत्पत्तीस येईल ! महाराष्ट्रांतले गृहस्थ इतर देशांत थोडेथोडके जात नाहींत; त्यांजकडून अशा प्रकारचे लेख आमच्या मासिकांनीं कां मागवूं नयेत ?

* * *

## २६ " मुक्तछंद " शब्दाचा घोंटाळा

'सह्याद्री 'च्या फेब्रुवारीच्या अंकांत रा. सहस्रबुद्धे यांचा मुक्तछंदावर एक लेख आला आहे. यापूर्वी ' प्रतिभे 'तहि श्री. वा. ना. देशपांडे व आ. रा. देशपांडे यांचे एतद्विषयक लेख येऊन गेले आहेत. 'मुक्तछंदा'च्या युक्तायुक्ततेचा अंतिम निर्णय काळच देईल. तूर्त एवढेंच सांगावेंसें वाटतें कीं, श्री. वा. ना. देशपांडे ' मुक्तछंद ' हा शब्द Blank Verse या अर्थी वापरतात, तर तोच शब्द श्री. आ. रा. देशपांडे हे ' Free Verse ' या अर्थानें उपयोगांत आणतात; यामुळें सर्वसामान्य वाचकांना अतिशय घोंटाळा होतो ! या उभय देशपांड्यांनीं आपसांत तडजोड करून सदर शब्द एकाच अर्थानें वापरल्यास त्यांच्या प्रतिपादनास अधिक शास्त्रीय स्वरूप येईल.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक ४

## २७ कथात्मक काव्य

"ज्ञानमंदिरा"च्या प्रथमांकांत प्रो. मा. दा. आळतेकर यांचा "आत्मनिवेदनपर काव्य"–शीर्षकाचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. सदर लेखांत परवृत्तिपर (objective) काव्याची म्हणजेच पर्यायानें कथात्मक काव्याची प्रो. आळतेकर यांनीं अप्रत्यक्षपणें तरफदारी केली आहे. ती विचारी वाचकांस योग्यच वाटेल.

सध्यां मराठी वाङ्मयांत अनेक अपसिद्धांत खोलवर रुजले गेले आहेत. कथात्मक काव्य स्ववृत्तिपर (subjective) काव्यापेक्षां नेहमींच कमी प्रतीचें असतें, हा त्यापैकींच एक अपसिद्धांत होय. स्ववृत्तिपर काव्याचें महत्त्व कोणींच नाकबूल करीत नाहीं; परंतु त्यावरून कथात्मक काव्य हीन दर्जाचें कसें ठरतें? तथापि कितीतरी आधुनिक कवि हीच समजूत हृदयाशीं बाळगून असलेले दृष्टीस पडतात! मराठींत दीर्घकाव्यांची निपज अत्यल्प होण्याचीं जीं अनेक कारणें आहेत, त्यांत – कित्येक कवींच्या बाबतींत तरी – याहि कारणांची गणना केली पाहिजे!

कथात्मक काव्य एकजात हिणकस ठरविल्यास कसा अनवस्था प्रसंग ओढवतो तो पहा: जगांतील ठळकठळक महाकाव्यें कथात्मकच आहेत. हा काव्यप्रकार त्याज्य मानल्यास एखाद्या आधुनिक कवीची दहा–पांच ओळींची टुंकी कविता व्यास–वाल्मिकी व होमर–व्हर्जिल या महाकवींच्या कृतीपेक्षां देखील श्रेष्ठतर ठरविण्याची पाळी येणार नाहीं काय?

वस्तुतः भावगीत असो, कथात्मक काव्य असो, कीं इतर कोणता काव्यप्रकार असो, तो मुळांतच टाकाऊ असा प्रायः नसतोच. कुशल काव्यकाराच्या हातीं पडला, तर कोणताहि काव्यप्रकार सरसच उतरेल. तेंच सोनें हातांत पडूनही त्याची माती करणारे सुद्धां कांहींजण भेटतात! परंतु आमच्याकडे अशी व्यापक बुद्धि न ठेवतां आग्रही लोकच जास्त आढळतात, व त्यामुळें अनेकांचा नाहक बुद्धिभेद होतो!

कथानक न घेतां दीर्घकाव्याची रचना केल्यास ती नीरस उतरण्याचा बराच संभव असतो. याचीं उदाहरणें इंग्रजी वाङ्मयांत कैक दृष्टीस पडतात! वर्डस्वर्थचें ' Excursion ' किती गद्यमय झालें आहे, हें त्या काव्याच्या वाचकांस सांगावयाला नकोच ! फार लांब कशाला, माजी राजकवि रॉबर्ट ब्रिजेस यांचें एवढें नाणावलेलें ' Testament of Beauty ' हें दीर्घ काव्य वाचल्यानंतर ' हें काव्य कीं पद्यमय निबंध ' असा प्रश्न माझ्यासारख्यापुढें उभा ठाकल्यावांचून राहिला नाहीं ! अर्थात् कथात्मक नसलेलीं ' In Memorium ' सारखीं कांहीं दीर्घ काव्येंहि अतिशय सुंदर वठलीं आहेत; हें मीहि कबूल करतों. परंतु अशा काव्यांना अपवादभूतच गणलें पाहिजे, व तीं सरस वठण्याचीं कारणें देखील निराळींच आहेत !

* * *

## २८ रवींद्रांची ' पूजारीण '

कथात्मक काव्य छोटेखानी असलें तरी प्रसंगोपात्त चांगल्या चांगल्या-भावगीतांनाहि कसें खालीं पाहावयाला लावतें, त्याचा अनुभव घ्यावयाचा असल्यास रवींद्रनाथांचा बंगालींतील ' कथा ओ काहिनी' हा संग्रह चाळावा. त्यांतील ' पूजारीण ' नामक काव्याचा येथें भावानुवाद देतों. मात्र मुळांतील सौंदर्याचा भाव अनुवादांत शतांशानेंहि आढळणार नाहीं, एवढें सुचवून ठेवणें अगत्याचें वाटतें.

### पू जा री ण

राजा **बिंबिसार** यानें बुद्धाला नमन करून त्याच्या चरणांचे नखकण मागितले. ते त्यानें आपल्या प्रासादकाननांत निक्षेपित करून त्यांवर शिल्पकलेचें सारच असा अद्‌भुत शिलामय स्तूप उभारला ! संध्याकाळीं शुभ्र वस्त्रें परिधान करून राजवधू व राजबाला त्या स्थळीं परडींत फुलें भरून येत व स्तूपाच्या मुळाशीं सोन्याच्या तबकांत सोन्याचे दिवे लावून ठेवीत !

**अजातशत्रु** राजा झाल्यानंतर त्यानें आपल्या बापाचा धर्म रक्ताच्या पुरांत पार वाहवून लाविला आणि यज्ञवेदींत बौद्धग्रंथांच्या आहुति दिल्या !

राजवाड्यांतील स्त्रियांना अजातशत्रु म्हणाला, " वेद, ब्राह्मण व राजे यांचें संरक्षण करा. त्यांना पूजनीय मानणारें कुणीं राहिलें नाहीं. तरी हें नीट लक्ष्यांत ठेवा, नाहींतर भयंकर आपत्तींत पडाल ! "

शारदीय दिन मावळूं लागला होता. प्रासादांतील **श्रीमती** नामक दासीनें पवित्र जलानें स्नान केलें, तबकांत फुलें व नीरांजनें ठेविलीं, आणि महाराणीकडे जाऊन तिजपुढें अधोमुख होऊन ती निःस्तब्ध उभी राहिली. भीतीनें अंग थरारून महाराणी म्हणाली, " बुद्धाची पूजा करणारास मरणाचें मोल द्यावें लागेल, ही अजातशत्रूची आज्ञा, मूढे, तूं विसरलीस कीं काय ?'

श्रीमती हळूच तेथून निजटून राजस्नुषा **अमिता** हिच्या महालांत गेली. स्वर्णदर्पणासमोर बसून ती आपल्या दीर्घ कुंतलांची वेणी घालीत होती व भांगांत शेंदूर भरीत होती. श्रीमतीला पाहतांच अमितेचा हात थरथर कांपूं लागला व भांगांतील सिंदूररेषा वांकडी आली ! ती उद्गारली, "हे अबोधे ! कोण हें तुझें साहस ! जा, जा, नीघ; कुणी पाहील तर विषम विपत्तींत पडशील !"

मावळत्या सूर्याचे किरण गवाक्षांतून आंत येत असतां राजकन्या **शुक्ला** ही आपल्या मंदिरांत एक काव्य–कथा वाचण्यांत मग्न झाली होती. किंकिणींचा आवाज ऐकतांच ती चपापली. तिनें दाराकडे पाहिलें व श्रीमती दिसतांच हातांतलें पुस्तक खालीं ठेवून ती धांवतच तिजकडे गेली. तिच्या कानांत ती पुटपुटली, " तुला राजाज्ञा विदित नाहीं काय ? मग मृत्युमुखांत अशी जाणूनबुजून उडी कां घेतेस ? "

हातांतील पूजेचें तबक तसेंच घेऊन श्रीमती दारोदार फिरली, व उच्चरवानें म्हणाली, " हे पुरवासिनींनों ! प्रभूचा पूजासमय जवळ आला आहे ! "–हें ऐकून कित्येकजणी दारें लावून बसल्या, तर कित्येकजणीं तिला शिव्याशाप देऊं लागल्या !

प्रासादसौधावरील मावळत्या सूर्याचीं किरणें अजिबात लुप्त झालीं, रस्ते अंधःकारविलीन होऊन जनहीन झाले व सर्वत्र नीरवता पसरली. प्राचीन राजमंदिरांत सायंकाळच्या आरतीच्या घंटा घणघण वाजूं लागल्या. शारदीय-

रात्रीच्या घनतिमिरांत असंख्य तारका तळपूं लागल्या. शृंगनाद झाला. बंदीजनांनीं संध्यासंगीत सुरूं केलें. " मंत्रणासभा समाप्त झाली ! "— असें द्वारपालानें पुकारलें. अशा वेळीं प्रासादकाननांत स्तूप—पद—मूळाशीं लांबलचक दीपमालिका पाहून राजवाड्याचा पहारेकरी चकित झाला ! तो तरवार उपसून स्तूपाकडे धांवतच गेला व म्हणाला, " हे दुर्मति ! जणुं स्वतःच्या मरणासाठींच आरती करणारी अशी तूं कोण ? " मंजुळ स्वरांत उत्तर आलें, " मी श्रीमती—भगवान् बुद्धाची दासी ! "

त्या दिवशीं तेथील शुभ्रपाषाणफलक रक्तानें न्हाऊन निघाले !—त्या दिवशीं शारदीय रात्रीच्या प्रशांत वेळीं प्रासादकाननामध्यें स्तूपाच्या पायथ्याशीं उरल्यासुरल्या दीपांच्या ज्योतीहि क्षणार्धांत मावळल्या गेल्या !

* * *

## २९ पानिपतप्रकरणाची नवी बाजू

हिंदींतील "सरस्वती" मासिकाच्या फेब्रुवारी १९३५च्या अंकांत मराठींतील श्रेष्ठ इतिहासकार रा. गो. स. सरदेसाई व हिंदीतील श्रेष्ठ इतिहासकार श्री. जयचंद्र विद्यालंकार यांचा पानिपतप्रकरणाबाबत झालेला पत्रव्यवहार सारांशरूपानें प्रकाशित झाला आहे. त्यांत मराठ्यांना पंजाबांतील शीख लोकांची कशी मदत मिळूं शकली असती व तिच्या योगानें पानिपत-प्रकरणाचा कसा निराळाच शेवट होण्याची शक्यता होती, यावर श्री. जयचंद्र विद्यालंकार यांनीं नवाच प्रकाश पाडला आहे. पानिपतच्या संग्रामापूर्वी अहमदशहा अब्दाली व शीख यांचे सात-आठ वेळां अटीतटीचे सामने झाले होते व त्या प्रत्येक खेपेला शीखांनीं आपलें लोकोत्तर शौर्य प्रगट केलें होतें ! तसेंच, पानिपतचें घनघोर युद्ध प्रत्यक्ष सुरूं असतांना अंबाला व फिरोजपूर यांच्या आसपासच्या प्रदेशांत आपलीं ठाणीं बसवून शीखांनीं अहमदशहाचा त्याच्या मातृभूमींशीं संबंध तोडून टाकला होता. या उभय गोष्टी जमेस घेतां सदाशिरावभाऊनें चातुर्यानें संधान बांधलें असतें, तर शीख लोक मराठ्यांच्या बाजूनें होण्याचा फार संभव होता. आणि पाठीमागून शीख व पुढून मराठे असे दोन्ही बाजूंनीं अहमदशहावर घसरले

असते, तर अहमदशहाचें कबरस्थान कदाचित् हिंदुस्थानांतच बांधलें गेलें असतें, असाहि तर्क करण्यास जागा आहे !

परंतु पानिपतावर मराठींत जें लिखाण प्रसिद्ध झालें आहे त्यांत या प्रश्नाकडे कोणीच लक्ष्य दिलेलें दिसत नाहीं ! किंबहुना, शीखांच्या तत्कालीन प्रभावी अस्तित्वाचीहि कोणाला दखलगिरी असल्याचें दृग्गोचर होत नाहीं ! अठराव्या शतकांत मराठ्यांखेरीज दुसरी कोणतीहि सत्ता हिंदुस्थानांत बलवान् नव्हती, ही प्रांताभिनिवेशजन्य कल्पनाच वरील उपेक्षेस कारणीभूत झाली आहे, अशी सरदेसाई यांचीं एतद्विषयक मीमांसा आहे, आणि ती, प्रांजळपणें विचार केल्यास, बव्हंशीं पटणारी अशीच आहे. कारण खुद्द पानिपतप्रकरणींच गोविंदपंत बुंदेल्यांवरून कऱ्हाडे–कोकणस्थ वाद कसा माजला होता, हें अभ्यासकांस निराळें सांगावयाला नकोच. तात्त्विक स्वरूपाच्या चर्चेंतहि उमटणारी आमची संकुचित बुद्धि कधीं व्यापक होणार, कळत नाहीं !

* * *

## ३० कांहीं नवे अर्थ

मराठी भाषेंत अलिकडे कित्येक शब्दप्रयोगांना नवे अर्थ चिकटूं पहात आहेत. त्यांपैकीं कांहीं वानगीदाखल पुढें दिले आहेत. यशवंतराव दात्यांनीं त्यांचा जरूर तर 'शब्दकोशां'त उपयोग करून घ्यावा.

१. **विडंबनकाव्य लिहिणें** = कुचेष्टेची हौस प्रतिष्ठितपणें फेडून घेणें !

२. **ग्रंथपरीक्षण करणें** = मित्राचे गुण व शत्रूचे दोष फुगवून दाखविण्याची 'सोनेरी' संधि साधणें !

३. **वाङ्मयचौर्याचा आरोप करणें** = दुसऱ्याची कृति आपल्या आंवाक्याबाहेर आहे, असें आढळल्यास ती परपुष्टतेच्या खऱ्याखोट्या आरोपाच्या द्वारें हाणून पाडणें.

४. **विद्वत्ता प्रदर्शित करणें** = सर्व लिखाण अवतरणांनीं लिडबिडून टाकणें !

५. **नवीन सिद्धांत प्रस्थापित करणें** = जें स्वतःस साधत नाहीं तें मूळांतच टाकाऊ आहे, असा डांगोरा पिटणें !

६. **तात्त्विक स्वरूपाचा मतभेद दर्शविणें** = ज्या व्यक्तीविषयीं मतभेद दर्शविला असेल, तिच्याबद्दल मत्सरभाव प्रगट करण्यांत आला, असें समजलें जाणें !

७. **खुलासा करणें** = टोपण नांवानें स्वतःच अगर एखाद्या पित्त्याकरवीं शिमगा साजरा करणें !

* * *

## ३१ संतवाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टि

'प्रतिभे'च्या १ फेब्रुवारीच्या अंकांत प्रो. रानडे यांच्या ' Mysticism in Maharashtra , या ग्रंथाविषयीं मीं कांहीं मजकूर लिहिला होता. प्रो. रानडे यांची या ग्रंथांतील संतवाङ्मयाकडे पाहण्याची दृष्टि ' श्रद्धायुक्त ' असली तथापि ती पुष्कळच ' डोळस'हि आहे. परंतु गतवर्षी प्रसिद्ध झालेल्या ' ज्ञानेश्वरदर्शना'चे दोन खंड चाळून पाहिल्यास आमच्या भाबडे-पणाची मजल कोठवर जाऊं शकते, याचा अनुभव येतो ! विज्ञानशास्त्राची पदवी असलेल्या एका गृहस्थांनें तर ज्ञानेश्वराला मार्कोनीप्रभृतींचे मोठमोठे सिद्धांतहि विदित होते, असा ' जांवईशोध ' लावला आहे ! अशा प्रकारच्या लेखनानें आपण स्वतः व ते बिचारे साधुसंतहि हास्यास्पद होनात, याची चांगल्या-चांगल्या सुशिक्षितांनासुद्धां जाणीव नसावी, हें महदाश्चर्य होय !

—**प्रतिभा,** वर्ष ३, अंक ५

## ३२ टीकावाङ्मयाचा उथळपणा

मराठींतील टीकावाङ्मय कांहीं अपवाद वगळल्यास प्रायः उथळ व सदोष असेंच असतें. कै. श्री. कृ. कोल्हटकर यांचें 'तोतयाचें बंड' व 'रागिणी व तिचीं भावंडें' हे टीकालेख किंवा प्रो. वा. म. जोशी यांचें 'दुटप्पी कीं दुहेरी' या कादंबरीचें परीक्षण यासारखें पहिल्या दर्ज्याचें लिखाण मराठींत उंबराच्या फुलासारखें दुर्मिळ झालें आहे. सदोष टीकापद्धतीचीं पुढें दोन उदाहरणें दिलीं आहेत.

काव्याविषयीं मराठींत जें अल्पस्वल्प विवेचन आढळतें, त्यांपैकीं बहुतेकांत एक अपसिद्धांत डोकावत असतो. भावनावेगांत कवि सांपडला म्हणजे तो काव्यनिर्मिति करतो, हा तो अपसिद्धांत होय ! मानसशास्त्राची ज्याला थोडी तरी तोंडओळख आहे, त्याला या विधानाचें हसूं आल्याखेरीज राहणार नाहीं ! वरील सिद्धांताचा व्यत्यास करून पाहा, म्हणजे त्याची हास्यास्पदता अधिक स्पष्ट होईल. काव्यनिर्मिति करावयाची असल्यास स्वतः कवीच्या अंतःकरणांत भावनोद्रेक झाला पाहिजे, किंवा झालेल्या भावनोद्रेकाच्या तापलेल्या तव्यावर कवित्वाची पोळी त्यानें लगेच भाजून घेतली पाहिजे, असा तो व्यत्यास होईल. परंतु तो खरा मानल्यास पत्नीचा चिरविरह झालेल्या कवीवर तिचें और्ध्वदेहिक तसेंच थोपवून धरून उत्कृष्ट विलापिका साधण्यासाठीं स्लेट-पाटी धुंडाळून ताबडतोब शोकगीत रचण्याची आपत्ति कोसळणार नाहीं काय ? खरी गोष्ट अशी आहे कीं, हृदयांतील भावना भर वेगांत असतांना काव्य सुचणेंच शक्य नाहीं. पूर्वानुभूत भावना कालांतरानें आठवून व ती पुनः पुन्हां मनांत घोळत ठेवूनच कवि काव्यरचना करीत असतो. टेनिसननें आपला प्राणप्रिय मित्र आर्थर हॅलॅम याचा अत्यंत दुःखदायक मृत्यु झाल्यानंतर एक नव्हे, दोन नव्हे, तर तब्बल सतरा वर्षे उलटून गेल्यावर 'In Memorium' पुरें केलें, याचें झालें तरी हेंच मर्म होय ! परंतु आमचे टीकाकार असल्या गोष्टींकडे लक्ष्य देतील तेव्हां ना ! !

गडकऱ्यांनीं ' भावबंधनां' त इंदु-बिंदूच्या कुरूपतेवरून विनोद साधला आहे, याबद्दलहि अशीच मासलेवाईक टीका करण्यांत येते ! काय म्हणे, तर इंदु-बिंदूची कुचेष्टा केल्यानें त्यांना निर्मिणाऱ्या परमेश्वराची कुचेष्टा होते ! जेथें-तेथें हें परमेश्वराचें उंटाचें पिल्लूं घुसडून देण्याची आमची करामत अपूर्व खरीच ! !

कै. श्री. कृ. कोल्हटकर हे, खासगी बोलण्यांत, इंदुबिंदूच्या उपरोक्त विनोदास, सौंदर्यशास्त्रदृष्ट्या फार मार्मिकपणानें, दोषपूर्ण ठरवीत असत. तें असें : विख्यात जर्मन लेखक लेसिंग याचा ' Laokoon ' नामक एक ग्रंथ आहे. लाओकूनचा जो जगप्रसिद्ध ग्रीक पुतळा आहे, तो उपलक्षणादाखल घेऊन लेसिंगनें सदर ग्रंथांत कलामीमांसा केली आहे. जिला ' Plastic Art ' असें म्हणतात ( ' Plastic Art ' ला ' दृष्टिगोचर कला ' असा चालचलाऊ मराठी प्रतिशब्द आपण योजूं या. ) तींत कुरूपता-दिग्दर्शन हें रसिकचित्तास ' सप्तशल्यवत् ' होतें. कवितेंत कुरूप व्यक्तीचें वर्णन केल्यास तें मात्र तितकेसें बोंचत नाहीं. कारण तें वर्णन शब्दा-शब्दानें वाचकांच्या मनांत उतरत असल्यामुळें वर्ण्य व्यक्तीच्या कौरूप्याचा ठसा साकल्यानें त्याच्या हृदयफलकावर उमटत नाहीं. तेंच कुरूप व्यक्तीचा पुतळा पाहिल्यास तो ठसा एकदम उठून प्रेक्षकांच्या सौंदर्यबुद्धीच्या जिव्हारींच घाव बसतो ! लेसिंगच्या विवेचनाचें धोडक्यांत असें सार आहे. आतां, मूर्तिकलेसारखीच नाटक हीहि ' दृष्टिगोचर कला 'च असल्यामुळें इंदु-बिंदूच्या त्या भयानक मूर्ति समोर रंगभूमीवर पाहून रसिकांस वैताग उत्पन्न होतो. या कारणामुळें गडकऱ्यांनीं ' भावबंधनां'त इंदु-बिंदूना आणलें, हें त्यांचें कृत्य सदोष ठरतें. मात्र ' भावबंधन ' हें दृश्यकाव्य न समजतां श्राव्यकाव्य समजल्यास गडकऱ्यांचें हें कृत्य समर्थनीयच ठरेल. आणि प्रस्तुत नाटक करणारी ' बलवंत संगीत मंडळी ' सध्यां नामशेष झाली आहे, हें ध्यानांत घेतल्यास तूर्त तरी ' भावबंधन ' हें श्राव्यकाव्यच मानावें लागतें व मग त्याची ही सदोषताहि आपोआपच नष्ट होते !

आतां, या सौंदर्यशास्त्रीय प्रतिपादनांत तो " पुराण पुरुष " परमेश्वर कोठें येतो, हें वाचकांनींच सांगावें !

*　　　*　　　*

## ३२ काव्य व इंग्रजी नांवें

नुकतेंच मीं नवीनचंद्र सेन यांचें " पलाशीर युद्ध " नांवाचें बंगालींतील एक नामांकित महाकाव्य पुनः एकवार वाचावयाला घेतलें होतें. तें वाचून मराठी काव्य व व्यक्ति, वगैरेची इंग्रजी नांवें यांविषयीं माझ्या मनांत बरेच विचार उद्‌भूत झाले. कारण सदर महाकाव्यांत नवीन-बाबूंनीं अनेक इंग्रजी नांवें कथानुरोधानें गोंविलीं आहेत व याबाबत बंगाली विद्वानांनीं खंडन-मंडनपर चर्चेचे दोन-दोन हात परस्परांशीं यापूर्वींच केलेलेहि आहेत !

आपल्याकडे इंग्रजी शब्दांपासून काव्यदेवतेला सामान्यतः दूर ठेवण्यांत येतें. देवघरांत शांपेनची बाटली नेणें सनातन्यांच्या मतानें जितकें गर्ह्य आहे, तितकेंच काव्यांत इंग्रजी शब्द वापरणें मराठींत गर्ह्य समजतात ! एका दृष्टीनें हें योग्यहि आहे. कारण तसें केलें नसतें तर शिवकालीन मराठी भाषा जशी फार्शी शब्दांनीं, तशी सांप्रतची मराठी भाषा इंग्रजी शब्दांनीं डागळली गेली असती. सर्वसामान्य इंग्रजी शब्दांचें ठीक आहे; परंतु इंग्रजींतील ( व इतर युरोपीय भाषांतील ) व्यक्ति, स्थल, वगैरेंच्या नांवांचा, अथवा थोडक्यांत सांगावयाचें तर, विशेषनामांचा देखील असाच विटाळ मानावा कीं काय, हा प्रश्नच आहे.

मराठी काव्यांत युरोपीय विशेषनामांचा, फारसा नसला तरी तुरळक-तुरळक, उपयोग केल्याचें क्वचित् दृष्टोत्पत्तीस येतें. मोगरे यांनीं रिपन प्रभृतीं-वरील कवितांत असा उपयोग केला आहे. रे. टिळकांनींहि प्रसंगोपात्त मोगऱ्यांचें अनुकरण केलेलें आहे. या सर्वांपेक्षां युरोपीय विशेषनामें वापरल्याचें मोठें उदाहरण म्हटलें म्हणजे रा. हवालदार यांचें ' इलियड 'चे कविताबद्ध भाषांतर हें होय. ॲकिलीज,ॲगॅमेम्मन इत्यादि नांवें मराठी वृत्तांत

बसविलेल्लीं पाहून मिस्किल स्मित करणारे वाचक पुष्कळांनीं पाहिले असतील ! परंतु पूर्वग्रह बाजूस सारून विचार केल्यास हा प्रकार अपरिहार्य व म्हणून प्रसंगीं आवश्यक वाटल्यावांचून रहाणार नाहीं. 'इलियड'सारख्या काव्याच्या अनुवादांत मूळ नांवें उपयोगांत आणावयाचीं नाहींत, तर काय त्यांचें 'हर्बर्ट स्पेन्सर'चें 'हरभट पेंडसे' यासारखें भाषांतर करावयाचें ?– कीं, 'मूले कुठारः' या न्यायानें असले विषयच अजिबात वगळावयाचे ?

परंतु असल्या विषयांतील सौन्दर्य ज्यांना कळलें व पटलें आहे, ते असे विषयच टाळावे, असें खचित म्हणणार नाहींत. शिवाय वैचित्र्याच्या दृष्टीनेंहि अशा प्रकारचे विषय वगळणें हितपरिणामी होणार नाहीं. मुसलमानी विशेषनामें संवयीनें ज्याप्रमाणें आपणाला आतां काव्यांत चालतात, तशींच इंग्रजी वगैरे भाषांतीलहि नांवें कालेंकरून चालतील यांत शंका नाहीं. 'पलाशीर युद्धा'दिकांमुळें बंगाली लोकांना नाहींत का शेवटीं अशीं नांवें खपूं लागलीं ?

*　　　　*　　　　*

## ३४ भारतीयांचें इंग्रजी लेखन

कांहीं दिवसांपूर्वी सौ. सरोजनी नायडू यांनी एका भाषणांत इंग्रजी भाषेची यथेच्छ स्तुति करून हिंदी लोकांनीं तींत लेखन–भाषण करावे, असें पर्यायानें सुचविलें ! इंग्रजी भाषेच्या सामर्थ्याविषयीं व समृद्धीविषयीं वादच नाहीं. भारतीयांना नवीन विचारांचें पाणी पिण्यास साधनीभूत असा इंग्रजी भाषा हा एकमेव चांदीचा पेला आहे, हें कोणीच नाकबूल करीत नाहीं, व तेवढ्यापुरता त्या भाषेचा कृतज्ञतापूर्वक उपयोग करून घ्यावयालाच पाहिजे. तसेंच, हिंदी भाषेच्या मस्तकावर राष्ट्रभाषेचा रत्नखचित मुकुट विराजमान होईपर्यंत व्यवहारसौकर्यासाठीं इंग्रजीचाच अवलंब केला पाहिजे, हेंहि निर्विवादच आहे. परंतु म्हणून भारतीय लेखकांनीं इंग्रजींतच लेखन करावें, असें प्रतिपादणें मात्र बिलकूल रास्त होणार नाहीं ! भारतीयांची इंग्रजी ही ग्रंथभाषा न होऊं शकण्याचें सर्वांत बलवत्तर कारण हें आहे कीं,

त्या भाषेवर भारतीयांनीं केवढेंहि प्रभुत्व संपादन केलें, तरी त्यांत त्यांना मिल्टन–टेनिसन अगर कार्लाइल–रस्किन यांच्या तोडीचें यश कदापि लाभणार नाही ! रवींद्रनाथ टागोर यांच्या इंग्रजींतील 'गीतांजली'चे अँड्रयूज़प्रभृति त्यांचे 'गण' भाषादृष्ट्या 'बायबलशीं' सादृश्य दाखवीत असतात, परंतु भाविक हिंदूच्या दृष्टीनें तुळस व सब्जा यांत जो फरक तोच चिकित्सक वाचकांस 'बायबल' व गीतांजलि' यांच्या इंग्रजींत दिसून येईल ! रवींद्रनाथ राहोत, परंतु ज्या सरोजिनींनीं इंग्रजीवर एवढीं स्तुतिपुष्पें उधळली, त्यांच्याच कवितांनीं इंग्रजी वाङ्मयांत कितपत महत्त्वाची भर पडली ? एलिझाबेथ ब्रौनिंगसारख्या श्रेष्ठ आंग्ल कवयित्रीच्या मालिकेंत आपणास स्थान मिळेल, असें त्यांच्या त्या तरी म्हणूं शकतील काय ? मग इंग्रजीचा हा अनाठायीं पुळका कां ?

इंग्रज विद्वानांच्या मतें भारतीयांतील श्रेष्ठतम साहित्यिकांची इंग्रजी लेखक या नात्यानें काय पायरी लागते, हें पाहावयाचें असल्यास थॉमसन-साहेबांचें रवींद्रनाथांवरील पुस्तक पाहावें. शुद्धतेच्या दृष्टीनें रवींद्रबाबूंच्या इंग्रजींत उपपद, अव्यय वगैरेच्या कशा गमतीदार चुका होतात, हें त्यांत त्यांनी छान दाखविलें आहे ! महाराष्ट्रांतील इंग्रजी फर्डे लिहिणारे जे न्या. मू. रानडे त्यांचेहि असेच प्रमाद घडत असत, हें सर्वश्रुतच आहे ! थोरामोठ्यांचा जर हा प्रकार तर पोराबाळांविषयीं काय बोलावें ?

*　　　　*　　　　*

## ३५ हिंदी भाषेची थोरवी

वर हिंदुस्थानची भावी राष्ट्रभाषा या नात्यानें हिंदी भाषेचा निर्देश केलेला आहे, तो 'प्रतिभे'च्या कित्येक वाचकांस न आवडण्याचा संभव आहे. कारण राष्ट्रभाषा होण्याच्या लायकीचें हिंदीचें वाङ्मय नाहीं, असा महाराष्ट्रीयांपैकीं पुष्कळांचा समज असल्याचें मला ठाऊक आहे. परंतु हिंदी साहित्यावर गरुडदृष्टि फिरविल्यास ही समजूत भ्रममूलक असल्याचें प्रत्ययास येईल.

हिंदींतील ललितवाङ्मयाकडे पाहिलें असतां फक्त नाट्य सोडून तें इतर कोणत्याहि भारतीय भाषेंतील साहित्याशीं मुकाबला करूं शकणारें आहे, असेंच दिसेल. प्रेमचंदाच्या योग्यतेचा कादंबरीकार शरच्चंद्र चट्टोपाध्याय वगळल्यास उभ्या हिंदुस्थानांत अन्य कोण आहे ? लघुकथांच्या बाबतींतहि निदान मराठीला तरी हिंदीसमोर मानच खालीं घालावी लागेल ! खुद्द प्रेमचंदाखेरीज सुदर्शन, जैनेंद्रकुमार इत्यादि जे लघुकथालेखक हिंदींत झाले आहेत, त्यांच्या तोडीचे लघुकथालेखक मराठींत कोण आहेत बरें ? कवींची विचारपूस केली तरी सुमित्रानंदन पंत, महादेवी वर्मा, ‘ प्रसाद ’, ‘निराला’ ही मंडळी मनांत आदर उत्पन्न केल्याशिवाय राहत नाहीं ! हिंदींत नाटकें मात्र वरच्या दर्ज्याचीं झालीं नाहीत, हें तिचें वैगुण्य कबूल करणें भाग आहे.

गंभीर वाङ्मयाचें अवलोकन करतांहि हिंदीची मातब्बरीच कळून येते. मराठींत चिं. वि. वैद्य, गो. स. सरदेसाई हे जसे श्रेष्ठ इतिहासकार आहेत, तसेच ते हिंदींतहि पण आढळतात. गौरीशंकर हिराशंकर ओझा, विश्वनाथ रेउ, जयचंद विद्यालंकार वगैरेंची इतिहासविषयक कामगिरी कोणास ठाऊक नाहीं ? व ती अव्वल प्रतीची नाहीं असें कोण म्हणेल ? निबंधादि इतर वाङ्मयशाखाहि अशाच फुलांफळांनीं डंवरलेल्या आहेत !

आणि हिंदींतील नियतकालिकांचा विचार केल्यास हिंदुस्थानांतील कोणाहि परभाषीयाची छातीच दडपून जाईल ! ‘ प्रताप ’सारखीं पत्रें व ‘ सरस्वती विश्वमित्र ’ सारखीं मासिकें अंतरंग व बाह्यांग या दोन्ही बाबतींत अनेक इंग्रजी नियतकालिकांपेक्षांहि वरचढच ठरतील !

—ही सर्व प्रगति हिंदी भाषेनें अवघ्या पंधरा–वीस वर्षांत केली आहे. ती खरोखर अद्‌भुतच नाहीं काय ? आणि या जोमानें ती पुढेंहि चालू राहिल्यास ( चालू राहील अशीच एकंदरीनें परिस्थिति आहे ! ) हिंदी भाषेपुढें राष्ट्रभाषा म्हणून लवून मुजरा करावयाला कोणालाहि कमीपणा वाटण्याचें मुळींच कारण रहाणार नाहीं !

कित्येक बंगाली लोकांनीं आपल्या दुरतिक्रम प्रांताभिनिवेशास अनुसरून राष्ट्रभाषेचा मान हिंदीऐवजी बंगालीस मिळावा, अशी प्रगट-अप्रगट चळवळ चालविली आहे व तिला कांहीं महाराष्ट्रीयहि हातभार लावीत आहेत ! परंतु बंगालीपेक्षां जास्त असलेली हिंदीची सुलभता व प्रसार पाहिला असतां ही चळवळ अंतीं फोलच ठरणार, अशी खात्री पटल्याखेरीज कशी राहील ?

* * *

## ३६ खोटा स्वाभिमान !

रा. माडखोलकर यांच्या ' भंगलेलें देऊळ ' या नवीन कादंबरीवर १५ फेब्रुवारीच्या ' ज्ञानप्रकाशां'त अभिप्राय प्रसिद्ध झाला आहे. त्यांत पुढील भाग आला आहे:—

" बॅ. अनिरुद्ध, परदेशांतील स्वतंत्र वातावरण व तेथील पुढारी आणि हिंदुस्थानांतील वातावरण व हिंदी पुढारी यांसंबंधीं म्हणतो कीं, त्यांचे ते लॉईड जॉर्ज, क्लेमांसो व हिंडेनबुर्ग बघितले म्हणजे आपले टिळक, गोखले न् फेरोजशहा खुजे वाटतात त्यांच्यापुढें ! (पा. ७३) परदेशांतील परिस्थिति व हिंदुस्थानांतील परिस्थिति यांमध्यें साम्य नसल्यानें तेथील पुढाऱ्यांची हिंदी पुढाऱ्यांशीं तुलना करणें योग्य नाही. वर उल्लेखिलेल्या हिंदी पुढाऱ्यांनीं आपापल्या कालांत महान् कामगिरी करून ठेविली आहे...तेव्हां त्यांच्या नांवांचा तुलनेकरितां कां होईना, पण अशा रीतीनें उल्लेख करणें बरोबर नाहीं, असेंच कोणीही देशाभिमानी मनुष्य म्हणेल !! "

केवळ देशाभिमानाच्या दृष्टीनें पाहिलें तर ' ज्ञानप्रकाशां 'तील प्रतिपादन योग्य ठरेल. परंतु सत्यनिष्ठापूर्वक बोलावयाचें असल्यास रा. माडखोलकर यांच्या बॅ. अनिरुद्धाचें म्हणणेंच अधिक वस्तुस्थितिनिदर्शक आहे असें म्हटल्यावांचून इलाज नाहीं. आणि त्यामुळें उपरोक्त हिंदी पुढाऱ्यांविषयीं अनादर व्यक्त होतो असेंहि समजण्याचें कारण नाहीं.

' ज्ञानप्रकाशा 'च्याच जातीचा देशाभिमान मनांत धरून एका गृहस्थानें मागें एका मासिकांत नेपोलियनपेक्षां शिवाजीला श्रेष्ठतर ठरविलें होतें ! खरें

पाहतां या गृहस्थाइतकाच प्रत्येक महाराष्ट्रीयालाहि शिवाजी वंद्यच आहे; परंतु म्हणून त्याची अवास्तव स्तुति करावयाची कीं काय? स्वतःचे वडिल कितीहि आदरणीय असले, तरी पण ते म. गांधींपेक्षांहि थोर आहेत असें म्हणणें वेडेपणाचेंच होणार नाहीं काय? शिवाजी अतिशय मोठी विभूति होती हें खरें व नेपोलियनपेक्षां तो जास्त चारित्र्यवान् होता, हेंही खरें. तथापि नेपोलियनच्या तोडीची त्याची राजकारणांतील प्रतिभा डोळे दिपविणारी होती कीं काय, हा प्रश्न मतभेदातीत खचित नाहीं!

—**प्रतिभा,** वर्ष ३, अंक ६

## ३७ टोपण नांवाचें प्रयोजन

‘ प्रतिभें’तून चालू वर्षी वाचकांच्या भेटीस मी येऊं लागल्यापासून अनेकजण नाकावरचे चष्मे कपाळावर चढवून मजकडे टंवकारून पाहूं लागले आहेत ! त्यांत कित्येक स्वतःच टोपणनांव घेणारे आहेत ही विशेष मौजेची गोष्ट होय ! सबब टोपणनांवाच्या प्रयोजनाचा थोडक्यांत विचार करूं.

२. ‘ टोपणनांव ’ हा शब्द उच्चारला कीं, त्या नांवानें छापलेलें लिखाण टीकात्मकच असावें, अशी सकृद्दर्शनीं कल्पना होते. तथापि ललितवाङ्मयालाहि टोपणनांवाचें वावडें नाहीं, असें शोधाअंतीं कळून येईल. इंग्रजी वाङ्मयांत ‘ जुनिअस्’सारखा विषारी टीकालेख लिहिणारा लेखक आढळतो, तद्वत्च ‘ जॉर्ज ईलियट् ’ हें पुरुषी टोपणनांव घेणारी कादंबरी–लेखिकाहि दृष्टीस पडते. अगदीं अलिकडील आंग्लसाहित्य पाहिलें तरी टोपणनांवानें प्रसिद्ध होणारें लिखाण त्यांत थोडें–थोडकें अवलोकनांत येणार नाहीं ! लघुकथा लेखकांपैकीं ओ’ हेन्री, कवींपैकीं ‘A. E.’ किंवा निबंधकारांपैकीं ‘Alpha of the Plough’ हीं नांवें काय दर्शवितात ? मराठींतील ललितवाङ्मयांत सुद्धां ‘ धनुर्धारी ’ पासून तों थेट ‘ विभावरी शिरूरकरां’पर्यंत टोपणनांवांचा उपयोग वारंवार करण्यांत आल्याचें प्रत्ययास येतें. टीकावाङ्मयांत तर टोपणनांव हें तोंडीं लावण्यासारखेंच झालें आहे !

३. लेखक टोपणनांव घेतात त्याचे अनेक हेतु असतात. त्यांपैकीं कांहीं सोदाहरण पुढें दिले आहेतः—

कित्येक लेखक केवळ टूम म्हणून टोपणनांव वापरतात ! उर्दू वाङ्मयांत ही पद्धत अतिशय रूढ आहे, आणि हिंदीनें ती उर्दूपासूनच उचलली. परंतु या दोन्ही भाषांत टोपणनांवें वापरतांना कमालीचा हास्यास्पद प्रकार घडतो. मासल्यासाठीं “ विश्वंभर शर्मा ‘कौशिक’ ” हें नांव पहा. त्यांत प्रथम संपूर्ण नांव देऊन पुढें टोपणनांव घातलेलें पाहून कोणाला मनापासून हंसं

येणार नाहीं ? मराठींतील ‘ जननीजनकज ’ वगैरे टोपणनांवें निराळ्या अर्थानें अशींच हास्यास्पद वाटतात !

कांहीं लेखक आपल्या प्रिय वस्तूचें स्मृतिचित्र म्हणून टोपणनांव उपयोगांत आणतात. ‘ गोविंदाग्रज ’ हें बंधूंचें व ‘ शणै गोंयबाब ’ हें मातृभूमीचें स्मरण कायम रहावें, म्हणून घेतलेलें नांव आहे, हें स्पष्ट आहे.

‘ Bee ’ सारखे कित्येक प्रसिद्धिपराङ्मुखतेमुळें टोपणनांवाच्या ‘बुंथीं’त दडून बसतात !

केव्हां केव्हां पूर्ण नांवानें प्रकाशित केलेल्या लिखाणाची व्यक्तिनिरपेक्ष योग्यायोग्यता ठरली जात नाहीं. यामुळें पुष्कळांना टोपणनांवाची कांस धरण्याचा मोह होतो. रवींद्रनाथांचीच गोष्ट घ्या ना. आपल्या कवितांचें योग्य चीज होत नाहींसें पाहून रविबाबूंनीं एकदां ‘ भानुसिंह ’ या सहीनें कांहीं कविता छापल्या. त्या वाचून एक गृहस्थ इतके खूष झाले कीं त्यांनीं त्यावर समालोचन लिहून ‘ डॉक्टरेट ’ची प्राप्ति केली ! तेंच या कविता रविबाबूंच्या नांवानें प्रसिद्ध झाल्या असत्या, तर सदर गृहस्थानें त्यांजकडे ढुंकून देखील पाहिलें नसतें !

कित्येक वेळीं विशिष्ट सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळेंहि टोपणनांवाचा बुरखा घ्यावा लागतो. मोरमकरांच्या आग्रहामुळें कां होईना, श्री. कृ. कोल्हटकर यांना ‘सुदामा’ हें नांव स्वीकारणें आवश्यक झालें ! ‘केशवसुत’ ( दुसरे ) व ‘जातिहृदय’ हीं राजकीय परिस्थितीमुळें घ्यावीं लागलेलीं टोपणनांवें होत !

स्वतः नामानिराळें राहून दुसऱ्यावर निंदेचा चिखल प्रथावितां यावा, एतदर्थ टोपणनांवाचा आश्रय घेण्याची प्रथा सर्वपरिचितच आहे. तेव्हां अंगुलिनिर्देशापलिकडे तिजविषयीं अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

विशिष्ट मतप्रचार हाहि टोपणनांवाचा एक उद्देश होऊं शकतो. विशेषतः मराठीसारख्या ज्या भाषेंत अप्रिय पण सत्य गोष्ट सांगितलेली खपत नाहीं, तींत बरेच वेळां टोपणनांव घेणें अपरिहार्य असतें. आपल्याकडे खऱ्या नांवानें कांहीं निर्भीड चर्चा केल्यास वादाचा मूळ प्रश्न बाजूस राहून त्या

लेखकाच्याच उखाळ्या–पाखाळ्या कशा निघतात, हें नव्यानें सांगावयाला नकोच. यामुळें ज्याला प्रचारकार्य करावयाचें आहे, त्याला प्रसिद्धीची इच्छा दाबून टाकून टोपणनांव घेतल्याखेरीज गत्यंतरच उरत नाहीं. ‘ विभावरी शिरूरकर ’ प्रभृति टोपणनांव घेणाऱ्या व्यक्तींकडे याच दृष्टीनें पाहिलें पाहिजे.

४. स्वतः मी टोपणनांव स्वीकारलें तें वरील हेतूनेंच. मराठींतील लेखकांची बड्या–बड्या नांवांनीं दडपून जाण्याची प्रवृत्ति न्याहाळली, कंपूशाही व तज्जन्य ‘ लाथांचा गोंधळ ’ अवलोकिला, म्हणजे या सर्वांविषयीं तिऱ्हाइतानें आपल्या मनांतले विचार कोणाचीहि भीड–मुरवत न धरतां बोलून टाकण्याची वेळ आली आहे, असें वाटल्यावांचून खचित रहात नाहीं. हें कार्य मजपेक्षां ज्यास्त लायक अशा इसमानें स्वतःकडे घेतलें असतें, तर तें हवेंच होतें. परंतु जोंपर्यंत तसा कोणी पुढे येत नाही, तोंपर्यंत आपण तरी त्या दिशेनें प्रयत्न करावा, असें वाटून मी ही ‘ पाइकी ’ आपल्याकडे घेतली आहे. अर्थात् माझ्या खऱ्या नांवानेंहि मला ही कामगिरी करतां आली असती, नाहीं असें नाहीं. परंतु तसें केलें असतें, तर वादविषय उपेक्षिला जाऊन व्यक्तिविशेषावरच वाचकांचें लक्ष्य खिळलें गेलें असतें; व ही गोष्ट कार्यसिद्धीच्या दृष्टीनें इष्ट नसल्यामुळें केवळ नाइलाज म्हणूनच मला टोपणनांवाचा अंगिकार करावा लागला !

५. आतां, मनुष्य हा जाणूनबुजून स्खलनशीलच असल्यामुळें मजकडून प्रमाद घडत नसतील, किंवा क्वचित् कोणास नेणतेपणानें अन्याय होत नसेल, असें मीहि म्हणत नाहीं. परंतु यामुळें माझ्या मूळ हेतूस बाध कसा येईल?

‘ प्रतिभे ’च्या सूज्ञ वाचकांस हा खुलासा पटेल व ते माझ्या लिखाणाकडे वरील दृष्टीनेंच पाहतील, अशी आशा आहे.

—**प्रतिभा,** वर्ष ३, विशेषांक

## ३८ ‘ प्राचीन महाराष्ट्र ’

डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या ‘ प्राचीन महाराष्ट्र ’ या संकल्पित ग्रंथाचा ‘ शातवाहनपर्व ’ हा खंड नुकताच प्रसिद्ध झाला. अतिशय महत्त्वाच्या विषयावरचा, व त्यांतहि डॉ. केतकर यांच्यासारख्या महापंडिताच्या लेखणींतून उतरलेला—असें या खंडाचें द्विविध महत्त्व असूनहि तो प्रकाशित होतांना जाहीर समारंभ झाला नाहीं, किंवा त्या खंडाच्या स्तुतीनें वर्तमानपत्रांचे रकानेहि विशेष भरून निघाले नाहींत ! नाहीं म्हणावयाला, खुद्द डॉ. केतकर यांनीं तन्निमित्त भोजनसमारंभ घडवून आणून सत्तर—ऐशीं लोकांना आमंत्रण केलें होतें; पण त्यांपैकीं जेमतेम वीस लोकांनीं उपस्थित राहण्याचें सौजन्य दाखविलें !

याप्रमाणें या ग्रंथाचा गाजावाजा झाला नसला, तथापि म्हणून त्याचें महत्त्व कमी होतें, अशांतला बिलकूल भाग नाहीं. त्यांत कुरुयुद्धापासून शकारंभापर्यंतचा इतिहास, महत्त्वाचे अनेक बारीकसारीक तपशील देऊन, साधार ग्रथित केला आहे. त्यामध्यें नरसिंहप्रभृतींचीं महाराष्ट्रावरील आक्रमणें यांसारखी राजकीय माहिती आली आहे, तद्वत्‌च ‘मगां’चा वृत्तांत यासारखी समाजविषयक माहितीहि भरपूर आली आहे. खंडांत बऱ्याच जागीं बृहत्कथेंतील कथा आल्या असल्यामुळें त्यांतील प्रतिपादनास साधारतेबरोबरच रंजकत्वहि आलें आहे. शिवाय त्यांत अशोकादिकांचे मूळ लेख व एकंदर ६३ चित्रें आलीं असल्यामुळें त्याची उपयुक्तता त्रिगुणित झाली आहे. तात्पर्य, हा खंड डॉ. केतकर यांच्या लौकिकास साजेसाच उतरला आहे. त्यांच्या ‘ ज्ञानकोशा ’चे पहिले जे पांच प्रस्तावना खंड आहेत, त्यांच्या तोडीचा हा ग्रंथ आहे, एवढें सांगितलें म्हणजे त्याची निराळी शिफारस करण्याचें कारण नाहीं.

या ग्रंथाचे आणखी असेच चार पांच खंड निघावयाचे आहेत. त्यांचा हस्तलेख तयार करावयाचें काम सतत चालू आहे, व अव्वल दर्जाचीं साधनें

मिळविण्यासाठीं विलायतेस जाण्याचाहि डॉक्टरसाहेबांचा बेत आहे. हें सर्व कार्य तडीस जाण्यासाठीं जनतेच्या सक्रीय सहानुभूतीची फार जरूरी आहे. या संपूर्ण ग्रंथाची आगाऊ वर्गणी फक्त रु. २४॥ आहे. ती भरून या महान् ज्ञानसत्रास हातभार लावणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

* * *

## ३९ वाङ्मय व चारित्र्य

नागपूरचे प्रो. वा. वि. मिराशी यांनीं 'कालिदास' नांवाचें एक पुस्तक तेथील 'नवभारतमाले'तर्फे नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. आपल्या मुंबई–पुण्याच्या बाजूला प्रो. मिराशी विशेष प्रसिद्ध नसले, तरी महाराष्ट्रांतील अव्वल दर्जाच्या संशोधकांत त्यांची पायरी फार वरची लागते. संशोधना-सारख्या गंभीर विषयांतील योग्यता व प्रसिद्धि यांचें प्रमाण सहसा सम नसून व्यस्तच असतें, हें लक्ष्यांत घेतल्यास, प्रोफेसर मजकूर अजून इकडे नाणावले नाहींत, याबद्दल आश्चर्य वाटावयास नको. प्रस्तुत 'कालिदास' ग्रंथ प्रोफेसर मिराशी यांच्या विद्वत्तेस साजेसाच उतरला आहे, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं.

अशा या सुंदर ग्रंथांत कांहीं सदोष विधानें डोकावतांना दिसतात. एकच उदाहरण देतों. पृष्ठ ७८ वर प्रो. मिराशी म्हणतात, "मनुष्य कितीहि विद्वान्, शास्त्रज्ञ व कलानिपुण असला, तरी त्याचें चारित्र्य शुद्ध नसेल तर त्याच्या हातून उच्च प्रतीचें वाङ्मय निर्माण होणें शक्य नाहीं." वस्तुतः हें विधान प्रो. मिराशी यांच्यासारख्या समतोल संशोधकास शोभण्याजोगें नाहीं! मनुष्य चारित्र्यवान् असल्यास चांगलें, याबद्दल वाद नाहीं; परंतु त्यावरून वाङ्मयनिर्मितीस चारित्र्याचीच सर्वांत जास्त आवश्यकता आहे, हें कसें सिद्ध होतें? उलटपक्षीं, मोठमोठ्या वाङ्मयसेवकांचा इतिहास पाहिल्यास त्यांच्यांत चारित्र्याचा पूर्ण अभाव होता, असेंच दिसून येईल! जर्मन महाकवि गटे याची या फुलावरून त्या फुलावर उडून जाण्याची फुलपांखरी वृत्ति चारित्र्याची निदर्शक आहे काय? पण म्हणून त्याला 'Faust' हें नाट्यबद्ध महाकाव्य नीटसें साधलें नाहीं, असें थोडेंच आहे?

बायरन–शेले यांच्यासारख्या ‘ चंगी–भंगी ’ कवींविषयीं तर बोलावयासच नको ! बायरन–शेले तर राहोतच, पण एवढा मोठा अध्यात्मप्रवण म्हणविणारा वर्डस्वर्थ, त्याचा तरी शेवटीं काय प्रकार झाला ? स्वतःच्या जिवंतपणीं, एवढेंच नव्हे, तर अगदीं काल–परवांपर्यंत, वर्डस्वर्थ हा महान् चारित्र्यवान् होता, असेंच समजलें जाई ! पण एका स्त्रीशीं त्याचा अनैतिक संबंध होता, व तिजपासून त्यास मूलहि झालें होतें, असें आतां मुद्दयापुराव्यानिशीं सिद्ध झालें आहे ! म्हणजे कांहीं वाङ्मयसेवक उघडउघड अनीतिवान् असतात, व कांहीं झांकलेले असतात, एवढाच त्यांच्यांत फरक ! ! ! वर्डस्वर्थसारखाच न्यूमनचाहि प्रकार आहे. ज्याचें ‘ Lead kindly light ’ हें स्तोत्र वाचून नास्तिकाचेहि डोळे भरून यावे, व ज्याच्या त्या गीतावर महात्माजींसारखी महाविभूतिहि बालंबाल खूष असावी, तो न्यूमन –‘बिशप’ म्हणजे धर्माधिकारी असणारा तो न्यूमन – भलभलते चाळे करणारा असावा, ही एकच गोष्ट प्रो. मिराशी यांचें उपरोक्त विधान निखालस चुकीचें आहे, हें सिद्ध करण्यास पुरेशी नाहीं काय ? हिंदुस्थानांतील नव्या–जुन्या वाङ्मयसेवकांचींहि अशीं कैक उदाहरणें सांगतां येतील.

तात्पर्य, एखाद्याची व्यक्ति या नात्यानें महति वाढण्यास चारित्र्य कारणीभूत होत असलें, तथापि वाङ्मयनिर्मितीशीं त्याचा अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. विद्वत्ता, बुद्धिमत्ता व कल्पकता याच तीन प्रमुख गुणांच्या खांबावर वाङ्मयाचा तिखांबी तंबू उभारला जातो.

*   *   *

## ४० वाङ्मय व स्वातंत्र्य

वरील अपसिद्धांतासारखाच आणखीहि एक अपसिद्धांत नेहमीं लिहिला बोलला जातो. स्वातंत्र्य असल्याखेरीज श्रेष्ठ प्रतीचें वाङ्मय निर्माण होत नाहीं, हा तो अपसिद्धान्त होय. प्रत्येक देशाला प्राणिमात्रास जशी हवा, तद्वत् स्वातंत्र्य अत्यावश्यक असतें व स्वातंत्र्यानें त्या देशाच्या सर्वांगीण भरभराटीस मदत होते, याविषयीं कुणाचाच मतभेद होणार नाहीं.

" सर्वांगीण भरभराटी"च्या पोटी वाङ्मयहि अर्थात् आलेंच. पण वाङ्मयाची भरभराट होणें म्हणजे पहिल्या प्रतीचे प्रतिभासंपन्न वागीश्वर जन्मास येणें असें खास नव्हे. स्वातंत्र्य असो, वा पारतंत्र्य असो, प्रतिभासंपन्न पुरुष हे क्वचित्च निर्माण व्हावयाचे. स्वातंत्र्य असल्यास त्या पुरुषाचा मार्ग बराचसा सुलभ होईल, व पारतंत्र्य असल्यास तो तसा सुलभ होणार नाही, एवढाच त्यांत भेद. बाकी, स्वातंत्र्य झालें तरी त्यामुळें प्रतिभासंपन्न व्यक्तींचें सदासर्वकाळ पेंव फुटणार आहे, अशांतला बिलकुल भाग नाहीं. इंग्लंड शतकानुशतकें स्वतंत्र असूनहि तेथें शेक्स्पीयर एकदांच कां अवतीर्ण झाला ? दर शतकांत नवा नवा ' शेक्स्पीयर ' जन्माला कां आला नाहीं ? यावरूनहि स्वातंत्र्यानें प्रतिभासंपन्न पुरुष नव्यानें निर्माण होत नाहींत, हेंच निष्पन्न होत नाहीं काय ?

आपल्याकडे प्राचीनकाळीं तुकारामादि कवि व अर्वाचीन काळीं टागोरप्रभृति कवि पारतंत्र्यांतच उत्पन्न झाले आहेत. पारतंत्र्यामुळे त्यांच्या प्रतिभाविहंगमास दोन्ही पंख पसरून दिगंतरीं उड्डाण घ्यावयास अडथळा झाला, असें दिसत नाहीं. पारतंत्र्य असूनहि तुकाराम जन्मास यावा, व शिवाजीपासून दुसऱ्या बाजीरावापर्यंत स्वातंत्र्य असतांना सुद्धां त्या अवधींत तुकारामाच्या तोलाचा एकहि कवि होऊं नये, हें कशाचें गमक आहे बरें ? ( येथें कोणास मोरोपंतांची आठवण होईल; पण, मोरोपंत केवढाहि मोठा ' भाषाप्रभु ' असला, तथापि तो तुकारामाच्या तोडीचा कवि कदापि ठरूं शकत नाहीं, हें मत कट्टर पंतभक्तांस मान्य न झालें, तरी निःपक्षपाती रसिकांस मान्य झाल्यावांचून राहणार नाहीं ! )

पारतंत्र्य हें जसें परकीयांपासून प्राप्त होतें, तसेंच तें स्वकीयांपासूनहि प्राप्त होतें. दुसऱ्या प्रकारचें उदाहरण म्हणून टॉलस्टॉयच्या वेळच्या रशियाकडे बोट दाखवितां येईल. टॉलस्टॉयच्या वेळीं रशियाचीं राज्यसूत्रें झारच्या हातीं होतीं, व झार हा जन्मजात रशियनच होता. परंतु जितका जुलूम परकीयांच्या अमदानींत होत नाहीं, तितका झारच्या अमदानींत होत होता. म्हणजे, त्यावेळीं रशियांत एक प्रकारचें पारतंत्र्यच होतें ! पण अशा

पारतंत्र्यांतहि टॉलस्टॉयसारखा जगांतील एक सर्वश्रेष्ठ साहित्यिक होऊन गेला, ही गोष्टहि आपल्या वरील प्रतिपादनास पुष्टिकारक अशीच आहे !

*　　　*　　　*

## ४१ हिंदी साहित्यसंमेलन

गेल्या महिन्यांत इंदूर येथें म. गांधी यांच्या अध्यक्षत्वाखालीं हिंदी साहित्यसंमेलन पार पडलें. गांधीजींच्या विभूतिमत्त्वामुळें या अधिवेशनास साहजिकच अखिल भारतीय महत्त्व येऊन हिंदी ही राष्ट्रभाषा होण्यास पात्र आहे कीं काय, या प्रश्नाचा पुनः एकवार जोरानें ऊहापोह होऊं लागला आहे !

येथील टाइम्ससारखीं अँग्लोइंडियन पत्रें हिंदी व उर्दू यांचा झगडा उत्पन्न करून हिंदीइतकीच उर्दू हीहि राष्ट्रभाषा होण्यास लायक आहे, असें प्रतिपादूं लागलीं आहेत ! त्यांच्या या उर्दू-प्रेमाचें काय मर्म आहे, हें न कळण्याइतके लोक आतां दुधखुळे राहिले नाहींत ! परंतु हीं पत्रें भासवितात, त्याप्रमाणें या प्रश्नाकडे केवळ ' देशभक्ती 'च्या दृष्टीनें पहावयाचें नसून पात्रतेच्या व सोयीच्याहि दृष्टीनें पहावयाचें आहे.

एखादी भाषा राष्ट्रभाषा होण्यासाठीं दुसऱ्या कोणत्याहि भाषेपेक्षां तिचा प्रसार अधिक असला पाहिजे, हें उघड आहे. या कसोटीला उर्दूपेक्षां हिंदीच जास्त उतरते. हिंदी ही ज्यांची मातृभाषा आहे, असे सुमारें दहा-अकरा कोटि लोक आहेत. शिवाय बंगाली, मराठी, गुजराथी व पंजाबी या भाषा बोलणाऱ्यांना ती सहजासहजीं कळते, तें निराळेंच. म्हणजे अजमासें पंचवीस कोटि लोकांना हिंदी भाषा सौकर्यानें कळूं शकते, असें म्हणतां येईल. उर्दूचा एवढा प्रसार आहे काय ? नसल्यास मग तिचा हा पुळका कां ?

नाहीं म्हणावयाला, कृष्णानदीच्या खालील प्रदेशांत हिंदी समजली जात नाहीं. पण उर्दू देखील तिकडे ' ग्रीक-लॅटिन ' सारखीच आहे ! तेव्हां याहि बाबतींत हिंदीवर उर्दू मात करूं शकत नाहीं. खेरीज अलीकडे

मद्रास इलाख्यांत हिंदीप्रचार करण्याचा यत्न सुरू असून त्याला बरेंच यशहि येत आहे.

आणि तसेंच पाहिलें, तर हिंदी व उर्दू यांत वैषम्यापेक्षां साम्यच जास्त आहे, असें दिसून येईल. त्यांत ठळक भेद आहे, तो हाच कीं, हिंदींत संस्कृत शब्दांचा व उर्दूंत अरबी–फार्शी शब्दांचा, भरणा अधिक असतो. परंतु त्यांतील हेंहि अंतर तडजोडीनें भरून काढतां येईल. नागरीप्रचारणी सभेसारखी संस्था हिंदींतून मुसलमानी शब्दांचें अजिबात उच्चाटन करावयास पाहते, तर सर महंमद इक्बालसारखे साहित्यिक उर्दू भाषा सुद्धां फिकीच वाटल्यामुळें शुद्ध फार्शीचा अंगिकार करतात! या दोन ध्रुवांचें मीलन होण्यासाठीं संस्कृत व अरबी–फार्शी यांचा अभिनिवेश सोडून देऊन हिंदी भाषेंत त्या सर्वांमधील सोपे व रूढ शब्द सारख्याच उत्साहानें वापरले पाहिजेत. असें केल्यास आज ना उद्यां तरी ती भाषा सर्वमान्य झाल्यावांचून खात्रीनें रहाणार नाहीं. सध्यांची ‘खडी बोली’ पुष्कळशी याच स्वरूपाची आहे, ही समाधानाची गोष्ट आहे.

राहिली बाब लिपीची. त्याविषयीं असें म्हणतां येईल कीं, तूर्त लिपी वैकल्पिक ठेवावी. म्हणजे देवनागरी व अरबी या दोन्ही लिपींत हिंदी भाषा लिहिली जावी. उत्तरोक्त लिपीपेक्षां पूर्वोक्त लिपी ही केव्हांहि शास्त्रशुद्धच असल्यामुळें कालांतरानें तिलाहि मान्यता मिळण्याची शक्यता आहे. केमालपाशानें नाहीं कां अरबी लिपीला पदच्युत करून तिच्याजागीं रोमन लिपीची स्थापना केली? अरबी लिपीप्रमाणेंच रोमन लिपीपेक्षांहि उच्चार व लेखन यांच्या समव्याप्तीच्या गुणांत देवनागरी लिपी श्रेष्ठतरच ठरते. अर्थात् गुणाचें केव्हां ना केव्हां चीज झाल्यावांचून कसें राहील?

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक ८

## ४२ भाषा कशी असावी ?

रा. भास्करराव जाधव यांनीं चारपांच वर्षांपूर्वी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहाल्याच्या वार्षिकोत्सवप्रसंगीं एक विचारप्रवर्तक निबंध वाचला होता. त्यांत त्यांनीं मराठी लेखकांच्या काठिन्ययुक्त भाषाशैलीबद्दल तक्रार केली होती. ही तक्रार त्यावेळीं जितकी खरी होती, तितकीच ती आजहि खरी आहे, असें अलीकडील बऱ्याचशा प्रकाशनावरून स्थूलमानानें विधान करण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

काठिन्य हें द्विविध असतें. विषयाच्या गहनत्वामुळें उद्भवलेलें व दुर्बोध शब्दयोजनेमुळें उद्भवलेलें. रा. जाधव यांची तक्रार दुसऱ्या प्रकारच्या काठिन्याबद्दल आहे, हें उघड आहे. आतां, गहन विषय हा गहन शब्दांतच मांडला पाहिजे, असा कांहीं कायदा नाहीं, पण शास्त्रीय विषयांत पुष्कळ वेळां पारिभाषिक शब्दांचा उपयोग करणें अपरिहार्य असतें, एवढें खरें. परंतु " अ–शास्त्रीय " विषयहि बोजड भाषेंत मांडावयाचा, ही कुठली तऱ्हा ? नाटक–कादंबरी–काव्य यांसारखे ललितवाङ्मयप्रकारहि जड जड शब्दांच्या अजस्र भाराखालीं दडपले जातांना पाहिले, म्हणजे रसिकांची छाती दडपून गेल्याखेरीज रहात नाहीं.

बोजड भाषाशैलीचीं अनेक कारणें असतात, त्यांतील कांहीं अशीं:— ( १ ) संस्कृतावर प्रभुत्व व तज्जन्य प्रेम असणें. ( २ ) "शब्द थोडे–अर्थ फार " अशी कांक्षा धरणें. ( ३ ) कलादृष्टि " निर्मळ " नसणें. ( ४ ) विचार–दारिद्र्य असणें व तें अगडबंब शब्दयोजनेनें झांकूं पहाणें. ( ५ ) पदवी वा विद्वत्ता नसल्याचा " न्यूनगंड " ( Inferiority complex ) असणें. इ० इ० यांतील फक्त दुसरें कारण तेवढेंच थोडेंफार समर्थनीय आहे, असें म्हणतां येईल. पण त्यांतहि अतिरेक न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे.

कठिण शब्दांना " सावरकरी " धर्तीच्या गुंतागुंतीच्या वाक्यरचनेची जोड मिळाली, म्हणजे वाचकांची पुरीं शंभर वर्षेंच भरली ! मग ईश्वरच त्यांचें काय रक्षण करील तें करो !

दुर्बोध भाषा लिहिण्यांत कोल्हटकरसंप्रदायाला आद्यस्थान द्यावयास पाहिजे ! कै. तात्यासाहेब कोल्हटकरांच्या निबंधाची भाषा कठिण आहे, यांत कांहींच आश्चर्य नाहीं. परंतु त्यांच्या नाटकांतील देखील तशीच भाषा असावी, हें चमत्कारिकच नव्हे काय ? बखरी–पोवाडे–लावण्या यांचा आपला अभ्यास नसल्यामुळें आपणांस सुंदर भाषा साधली नाहीं, असें तात्यासाहेब म्हणत असत. त्यांची ही भावना खोटी ठरविण्यासाठींच कीं काय, गडकऱ्यांनीं आपल्या काव्य–नाटकांतून जुन्या शब्दांची नुसती ' श्रावणझड ' सुरू केली ! म्हणजे प्राचीन मराठीचा अभ्यास नव्हता, म्हणून कोल्हटकरांची भाषा बोजड ठरली, तर प्राचीन मराठीचा विशेष अभ्यास होता, म्हणून गडकऱ्यांची भाषा बोजड उतरली ! रा. माडखोलकर व खांडेकर या कोल्हटकरांच्या दुसऱ्या शिष्यांनीं खुद्द गुरुजींचेंच धोरण चालू ठेविलें. विशेषतः माडखोलकरांनीं तर ' शिष्यादिच्छेत्पराजयम् ' या वचनाची पूर्णपणें सार्थता पटविली आहे, असे गुरूची ' दुटप्पी कीं दुहेरी ' व शिष्याची ' मुक्तात्मा ' कादंबरी, तौलनिक दृष्ट्या, वाचतां म्हणणें भाग पडतें !

कवितेंत पंडित–कवि वगळल्यास गडकरी व ' Bee ' यांची भाषा काठिन्ययुक्त असते. गडकरी जुने मराठी शब्द वापरीत, पण अपरिचित संस्कृत शब्द मात्र फारसे वापरीत नसत. " Bee " यांच्या कवितेंत या उभयतांचीहि खिचडी झाली आहे ! काव्यदृष्ट्या " Bee "ची कृति कितीहि रमणीय असली, तथापि ती भाषादृष्ट्या अनुकरणीय खास ठरत नाही.

फार्शी शब्दांच्या उपयोगामुळें माधव ज्यूलियन् यांची कविता याच वर्गांत मोडते. अलीकडे त्यांच्या रचनेंत बदल झाला आहे, हे सुचिन्ह होय.

अर्थात् दैनिक पण उत्तम भाषा लिहिणारे लेखक–कवि देखील महाराष्ट्रांत थोडेथोडके नाहींत. निबंधांत न. चिं. केळकर, कादंबरींत प्रो. फडके,

नाटकांत वरेरकर व काव्यांत तांबे यांची भाषा आदर्शभूत असते, असें म्हणाक्यास हरकत नाहीं. कित्येकांना गद्यांत दैनिक भाषा चालते, पण पद्यांत मात्र ती मुळींच चालत नाहीं. कां?–तर म्हणे, "Bee" प्रभृतीप्रमाणें "संस्कृतप्राकृतमिश्रित" भाषा असल्याखेरीज भाषेला अभिजातपणाची (Classical) कळा येत नाहीं! वस्तुतः आभिजात्य हें भाषेवर जितकें अवलंबून असतें, त्याहिपेक्षां जास्त तें विषयाची उदात्तता, विचारविकाराची सखोलता, कल्पनेची भव्यता, रचनेचें प्रवाहित्व, वगैरे गुणांवर अवलंबून असते, हें लक्षांत घेतल्यास वरील विधानाचा पोकळपणा तेव्हांच दिसून येईल.

प्रो. फडके यांच्या "प्रतिभासाधना"ची चेष्टा करण्याची सध्यां "फॅशन"च पडली आहे! पण गहन व निरस विषय सुगम व रसाळ कसा करतां येतो, याचा हा ग्रंथ म्हणजे मराठींतला एक सर्वश्रेष्ठ नमुनाच होय!

* * *

## ४३ 'पेशवेकालीन नीतिमत्ता'

"सह्याद्रि" [१–४] मासिकांत रा. वा. कृ. भावे यांनीं या विषयावर एक लेख लिहिला आहे. त्यांत पेशवाईतील स्त्री–पुरुषांच्या वैयक्तिक व सामाजिक नीतिमत्तेची इतकी स्तुति केली आहे कीं, सत्ययुग म्हणतात तें हेंच, असें कुणासहि वाटल्यावांचून रहाणार नाहीं! वस्तुतः पेशवाई असो वा आंग्लाई असो, नीतिमान् माणसांचें प्रमाण हें सर्वदा मर्यादितच असावयाचें. पेशवाईत स्वराज्य होतें, म्हणून तेव्हां पुरुष तेवढे राम व स्त्रिया तेवढ्या सीता बनल्या होत्या, असें थोडेंच आहे? उलटपक्षीं पेशवेदप्तराचे खंड चाळून पाहिल्यास पेशवाईतहि नीतिभ्रष्ट व्यक्तींची बिलकूल कमतरता नव्हती, असें स्वच्छ दिसून येतें! असें असतां रा. भावे आपल्या लेखांत फक्त प्रकाशमय तेवढीच बाजू दाखवितात याचा अर्थ काय? ही काय ऐतिहासिक दृष्टि कीं हें सत्यप्रेम? बहुधा "विविधवृत्ता"च्या या

वर्षीच्या खासअंकांत रा. रा. नाडकर्णी यांचा " पेशवाईतील समाजस्थिति " नांवाचा जो वाचनीय लेख प्रसिद्ध झाला आहे तो खोडून काढण्यासाठींच भाव्यांनीं हा लेख लिहिलेला असावा ! रा. नाडकर्णी यांनीं, महादजी शिंद्याचा, एका मातबराची मुलगी पळविण्याचा कसा बेत होता, ब्राह्मणांत बटकिणी ठेवण्याची कशी चाल होती, भावे उपनांवाच्या एका ब्राह्मणानें कुणबीण समजून चांभारीणच कशी ठेविली होती, इत्यादि माहिती साधार दिलेली आहे. ती पुराणमताभिमानी भाव्यांस कशी खपावी ? त्यांनीं झटपट सदर लेख खरडून याच्या उलट त्यावेळी नीतिदृष्ट्या सर्वत्र "आलबेल" होतें, असा अभिप्राय ठोकून दिला ! नाडकर्ण्यांनी पेशवाईतील एका भाव्याचा अनाचार उघडकीस आणावा व आंग्लाईतील दुसऱ्या भाव्यानें तो पर्यायानें असिद्ध ठरविण्याचा. आधारशून्य कां होईना, प्रयत्न करावा, हा योगायोग अपूर्व खराच !! " मराठे व इंग्रज " हें उत्कृष्ट ऐतिहासिक पुस्तक लिहिणाऱ्या केळकरांच्या परंपरेंत वाढलेल्या भाव्यांत ऐतिहासिक दृष्टीचा पूर्णपणे अभाव असावा, हें दुर्दैव होय !

*　　　*　　　*

## ४४ पुनः एकदां " गीतारहस्य ! "

मराठी साहित्यक्षेत्रांत कंपूशाही, सांप्रदायिकता, इत्यादि अनिष्ट प्रवृत्तींचा कसा बुजबुजाट झाला आहे, याचा ताजा नमुना पहावयाचा असल्यास पुण्याच्या "वसंतव्याख्यानमालें"त "केसरी"चे रा. शिखरे यांनीं ता. ४ ला दिलेल्या व्याख्यानाचा ७ मेच्या " ज्ञानप्रकाशां "तील अहवाल वाचावा. या व्याख्यानांत शिखरे म्हणाले, " पुस्तकांच्या संख्येबरोबर त्यांचा कसहि वाढला. 'गीतारहस्य' हा एकच ग्रंथ त्याची साक्ष देईल. चांगला ग्रंथ या कालांत दुसरा झाला नाहीं. मात्र हें पटण्यास कोणाचा पूर्वग्रह झालेला नसला पाहिजे आणि त्याचें डोकें ठिकाणावर असलें पाहिजे. ' मराठी भाषेची घटना ' या पुस्तकांत ' गीतारहस्या'वर केलेली टीका पाहिल्यानंतर लेखकानें ' गीतारहस्य ' वाचलें, कीं दामल्यांचें ' व्याकरण ' वाचलें, की ' अंकलिपी ' वाचली, असा प्रश्न मनांत उभा रहातो ! " टिळकांच्या

"केसरी"चे शिखरे सहसंपादक आहेत, तेव्हां त्यांनी "गीतारहस्या"ची तोंडभर स्तुति करावी, हें ठीकच आहे. पण त्यासाठीं बिचाऱ्या रामभाऊ जोशांना तोंडभर चावा घेण्याची काय जरूर? शिखऱ्यांचेंच अनुकरण करून "शिखऱ्यांनी कँटप्रभृतींचे ग्रंथ वाचले, कीं "मराठ्यां"तील जाहिराती वाचल्या, कीं "केसरीं"तील गृह्यसंस्कार वाचले"–असा प्रश्न दुसऱ्याला करतां येणार नाहीं, असें खास नाहीं !

त्याच सभेंत अध्यक्षपदावरून प्रो. वा. म. जोशी यांनीं पुढील उद्गार काढले, "आजच्या व्याख्यात्यांनी 'गीतारहस्या'ची फार स्तुति केली. पण 'गीतारहस्यां'त मूलगामी विचारच नाहींत. त्यांत पुष्कळ गोष्टी मुळीं गृहीतच धरल्या आहेत !" शिखऱ्यांचा वरील अभिप्राय व प्रो. जोशांसारख्या तज्ज्ञांचें हें मत यांत कशाचा स्वीकार करावयाचा, हें निःपक्षपाती वाचकांनी ठरवावे.

"गीतारहस्य" हा उत्तमांपैकीं ग्रंथ आहे, याबद्दल वाद नाहीं. पण त्याची अतिरिक्त स्तुति करण्यांत येते, तिजमुळें जनतेपुढे भलताच आदर्श ठेवला जातो. "गीतारहस्या"नंतर मराठींत श्रेष्ठ प्रतीचा तत्त्वज्ञानपर ग्रंथ आला नाहीं, याचा बराचसा दोष अशा अतिशयोक्त स्तुतीकडेच जातो ! सध्यां "गीतारहस्या"नें उडविलेली धूळ शांत झालेली आहे. तसेंच टिळक गत होऊन एक तपावर अवधि लोटून गेला असल्यामुळे या ग्रंथाचा रास्त दर्जा ठरविण्यास त्यांचें विभूतिमत्त्वहि आज आड येण्याचा संभव नाहीं. अशा स्थितींत प्रो. गो. चिं. भाटे, प्रो. वा. म. जोशीप्रभृति स्वतंत्र विचाराच्या तज्ज्ञांकडून या ग्रंथावर मतें मागवून तीं प्रसिद्ध करावयास हवींत. "गीतारहस्या"चीं हिंदी वगैरे भाषांतहि भाषांतरें झालीं असल्यामुळें त्या त्या भाषेतील विद्वानांकडूनहि "गीतारहस्या"नें जगाच्या विचारसंपत्तींत नवीन भर घातली काय?–या व तदनुषंगिक इतर प्रश्नांवर मतें मागविलीं पाहिजेत.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक ९

## ४५ कोल्हटकरस्मृति

साहित्याचार्य तात्यासाहेब कोल्हटकर यांना दिवंगत होऊन उद्यां बरोबर एक वर्ष होतें. तात्यासाहेबांच्या निधनानें महाराष्ट्रांतील केवढा मोठा साहित्यिक नाहींसा झाला आहे, हें नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं आपणाला स्वत्वाची जाणीव करून दिली, हरिभाऊ आपट्यांनीं वास्तववादी कथावाङ्मयाची गोडी लावून दिली, तद्वत् तात्यासाहेबांनीं आपणाला कलादृष्टि आणून दिली. ही त्यांची कामगिरी इतकी अनन्यसाधारण आहे कीं, चिपळूणकर–आपटे यांच्याप्रमाणें कोल्हटकरांचें नांव अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत अजरामर होऊन राहील ! उच्च दर्जाचा विनोद, विद्युल्लतेप्रमाणें चमकणाऱ्या कोट्या, सुंदर उपमा, उत्प्रेक्षा व अद्‌भुत–रम्यता ( Romanticism ) हे तात्यासाहेबांचे आत्मीय गुण त्यांच्या कलादृष्टीचेच द्योतक आहेत. गडकरी, वरेरकरप्रभृति नामवंत साहित्यिक तात्यासाहेबांच्या शिष्यत्वाची अभिमानानें बिरुदें मिरवीत व मिरवतात, ही एकच गोष्ट त्यांच्या श्रेष्ठतेची पुरेपूर साक्ष पटवील ! श्री. न. चिं. केळकर व प्रो. वा. म. जोशी हे ' दोन तात्या ' वगळल्यास ह्या तिसऱ्या तात्यांच्या तोलाचा अष्टपैलू ललितवाङ्मयलेखक मराठींत विरळाच सांपडेल, असें म्हटलें तरी चालेल. अर्थात् तात्यासाहेबांच्या लिखाणांत दोष नाहींत. असें नाहीं; पण त्यांचा विचार करण्याचा हा प्रसंग खचित नव्हे.

तात्यासाहेबांच्या अप्रसिद्ध लिखाणांत त्यांचें ' आत्मवृत्त ' व ' मायाविवाह ' हें नाटक यांचा समावेश होतो. पूर्वोक्त ' आत्मवृत्ता 'चा बराच मोठा भाग या वर्षी 'प्रतिभे'तून क्रमशः प्रसिद्ध झाला असून उद्यां तें त्यांच्या प्रथम श्राद्धतिथीनिमित्त संपूर्ण पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे. मराठींत कर्वे–देवधर–पावगी–कौशांबी प्रभृति अत्यल्प गृहस्थांचीं आत्मचरित्रें सोडल्यास अशा प्रकारच्या वाङ्मयाचा प्रायः दुष्काळच आहे. यामुळें, कोल्हटकरांच्या आत्मवृत्तांत जरी खरे कोल्हटकर आपल्यास पाहावयास

मिळत नाहींत तरी, हें आत्मवृत्त वाचकांस जितकें मनोरंजक तितकेंच उद्बोधकहि वाटल्यावांचून राहणार नाहीं. त्यांचें ' मायाविवाह ' हें नाटकहि लौकरच उजेडांत यावयास पाहिजे.

*   *   *

## ४६ गोमंतक-साहित्य-संमेलन

गोमंतक-साहित्य-संमेलनाचें पहिलें अधिवेशन रा. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षत्वाखालीं ता. ११ व १२ मे रोजीं मडगांव येथें यशस्वितेनें पार पडलें. गोमंतकांत अलीकडे महाराष्ट्र-भाषाप्रेमाची व तज्जन्य वाङ्मयनिर्मितीची जी स्पृहणीय भरती आल्यासारखी दिसते, तिचें प्रस्तुत संमेलनासारखे प्रसंग हें मूर्तचिन्हच होय ! गोमंतकांत पोर्तुगीज भाषेचा वरपगडा असतांहि व तत्रस्थ कांहीं साहित्य-सेवक कोंकणी भाषेचा जोरानें पुरस्कार करीत असतांहि तिकडील तरुण पिढीनें मराठीलाच मानाचा नारळ द्यावा, याबद्दल प्रत्येक महाराष्ट्रीयास सानंद अभिमान वाटेल, यांत शंका नाहीं. तसेंच, या अधिवेशनाचें अध्यक्षपद रा. खांडेकर यांच्यासारख्या तरुण साहित्यिकास देऊनहि गोमंतकीयांनीं औचित्यच प्रदर्शित केलें आहे. अशा समारंभांतील हे स्थान बहुधा निर्मळ ललितवाङ्मयाच्या निर्मात्यास देण्यांत येत नाहीं, व तरुणांस तर तें खपुष्पासारखें दुष्प्राप्य समजण्यांत येतें ! ही विचित्र प्रथा मोडून टाकण्याचें श्रेय घेतल्याबद्दल गोमंतकांतील साहित्यभक्त अभिनंदनास पात्र आहेत.

रा. खांडेकर यांच्या भाषणाच्या पूर्वार्धांत गोमंतकाला धरून कांहीं मजकूर आला असून उत्तरार्धांत ललितवाङ्मयाची थोडी तात्त्विक चर्चा आलेली आहे. ललितलेखक हा सृष्टीकडे कलादृष्टीनें पाहतो; परंतु त्याच्या कलाकृतींत सौंदर्याबरोबरच सत्याचीहि योग्य बूज राखली जाते, हा मुद्दा त्यांनीं उत्तरार्धांत मांडलेला आहे. ' कलेसाठीं कला ' या अर्थशून्य हांकाटीचें खांडेकरांनीं या भाषणांत पर्यायानें खंडन केलें आहे, तें नवशिक्या लेखकांस मार्गदर्शक होईल, यांत शंका नाहीं. त्यांच्या भाषणांत कांहींच नावीन्य नव्हतें, हें त्यांचें वैगुण्य दिग्दर्शित करायला हवें. खांडेकरांचें लिखाण त्यांच्या परिणत प्रज्ञेबरोबर साधें व सखोल होण्याची त्यांच्या

वाचकांची अपेक्षा असते, ही गोष्ट त्यांच्या नजरेस आणून देण्याची मी परवानगी घेतों.

* * *

## ४७ गडकरी व अत्रे

पुण्याला ९ मे रोजीं रे. टिळक यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रि. अत्रे यांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं गडकऱ्यांना दुय्यम अगर तिसऱ्या दर्जाचे कवि ठरविणाऱ्या एका 'शहाण्या'ला चिमटे घेतले आहेत! अत्रे हे गडकऱ्यांचे पट्टशिष्य असल्यामुळें या विधानानें त्यांची गुरुभक्ति दुखविली जावी, हें साहजिकच आहे. पण निःपक्षपातीपणानें पाहिल्यास सदर विधान सत्यपूर्णच वाटणार नाहीं काय? गडकरीच कशाला, बहुतेक सारेच मराठी कवि जगांतील सर्वश्रेष्ठ कवींच्या अपेक्षेनें दुसऱ्या अगर तिसऱ्या दर्जाचे उरतात. मग एखाद्यानें हें सत्य — कितीहि कटु वाटलें तरी — बोलून दाखविल्यास त्याबद्दल त्याचीच मस्करी करण्यांत अर्थ काय?

अर्थात् गडकऱ्यांनीं उत्कृष्ट कविता अजिबात निर्माण केल्या नाहींत असे कुणींच म्हणत नाहीं. 'प्रेम आणि मरण' ही कविता जोंवर मराठी भाषेंत कायम राहील, तोंवर गडकऱ्यांचा 'कवि' या पदवीवरचा हक्क कदापि नष्ट होणार नाहीं! तथापि अशा मूठभर कवितांनीं ते जगांतील मोठमोठ्या महाकवींशीं टक्कर कशी देणार?

गडकऱ्यांची 'प्रेम आणि मरण' ही कविता अनैसर्गिक असून तिजपेक्षां माधव ज्यूलियन यांची 'संगमोत्सुक डोह' कविता अधिक नैसर्गिक आहे, असें म्हणणारे कांहीं लोक भेटतात. पण कवितेला तर्कशुद्धतेची रुक्ष कसोटी लावून कसें चालेल? 'संगमोत्सुक डोहांत' एक डोह नदीसाठीं तळमळतो, असें दाखविलें आहे. पण डोह हा नदीपासून बनतो, म्हणजे एक प्रकारें तिचा तो पुत्रच असतो, हें ध्यानांत घेतल्यास ही कवितासुद्धां अनैसर्गिकच वाटणार नाहीं काय? पण कवितेला मुळीं अशा तऱ्हेचा निकष लावावयाचाच नसतो!

* * *

## ४८ माणुसकीचें सार्वजनिक विडंबन

पुण्याच्या ' वसंतव्याख्यानमालें 'त ' पावित्र्यविडंबन ' या विषयावर बोलतांना श्री. कृष्णराव मराठे यांनीं माणुसकीचें जें विडंबन केलें, त्याचें पौरोहित्य करतांना विज्ञानविशारद श्री. माटे यांनीं जी मत्सरी, हीन व निंद्य मनोवृत्ति प्रगट केली, तिचा पूर्णत्वानें निषेध करण्यास भाषेंतील शब्द कमी पडतील. ' सुदाम्याचे पोहे ' कांडतांना कै. श्री. कृ. कोल्हटकर यांनीं सनातन्यांना जे मुसळाचे चारदोन तडाके दिले, त्यांतील एक माट्यांच्या मेंदूला बसल्यामुळेंच बहुधा त्यांनीं पुढील 'अवाच्य' उद्गार काढले असावे— " कोल्हटकरांनीं गणपतीची चेष्टा केली, पण गणपतीनेंही त्यांचा कांहीं कमी सूड घेतला नाहीं. एवढे बडे सुधारक कोल्हटकर, पण वार्धक्यामध्यें जीभ वांकडी पडली असतांही बोबड्या शब्दांन मरेपर्यंत तोंडानें रामनाम घेत होते. ही गोष्ट ज्यांना ठाऊक असेल, त्यांना गणपतीनें सूड उगविला, ही गोष्ट पटल्याशिवाय राहाणार नाहीं." परमेश्वर परम दयाळू असतांहि सूड घेण्याची इच्छा दर्शवितो, ती भक्तांच्या सूडबुद्धीनें प्रेरित होऊनच कीं काय ? सूडबुद्धीचें हें हिडिस स्वरूप पुण्यांत अर्थात्‌च नवीन नाहीं. सन १८९१ सालीं संमतिवयोवादाच्या धुळवडींत, शनिवारवाड्यासमोर भाषण करतांना, कै. श्रीधर गणेश जिनसीवाले यांनीं प्रि. आगरकर यांना उद्देशून ' अरे, तोफेचा गोळा हवा कशाला ? एक काठी फेकली तर सहन होणार नाहीं ! आधींच दमा झाला आहे. एक बुक्का देखील सहन होणार नाहीं ! '—असे जे उद्गार काढले होते त्यांची आठवण या प्रसंगीं होते. आपल्याला एक सच्छिष्य लाभला, याबद्दल कै. जिनसीवाले यांचा आत्मा आतां अत्यानंदानें स्फुरत असेल ! या सभेंत निषिद्ध वाङ्मयाला आळा घालण्याबद्दल माट्यांनीं जी योजना पुढें मांडली, किंवा तेथील वक्त्यांनीं पावित्र्याच्या व्याख्येची जी ओढाताण केली, तिचा परामर्ष पुढें केव्हां तरी घेतां येईल. ही सभा म्हणजे माणुसकीचें एक सार्वजनिक विडंबन होतें, यापेक्षां तिचें दुसरें समर्पक वर्णन करतां येत नाहीं, एवढेंच तूर्त म्हणतों.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १०

## ४९ नाट्यकलेचें पुनरुज्जीवन

पुणें येथें २५ व २६ मे रोजीं नाट्यसंमेलनाचें अधिवेशन रा. गोविंदराव टेंबे यांच्या अध्यक्षत्वाखालीं पार पडलें. गेल्या दोन तीन वर्षांत मोठमोठ्या नाटक-कंपन्या नष्ट होऊन नाट्यकलेवर प्रेतकळा आली आहे. ती पुनरुज्जीवित कशी होईल, हीच तिच्या चहात्यांस एवढ्यांत चिंता लागली आहे; आणि त्या चिंतेचीच छाया संमेलनाध्यक्षांचें भाषण व पसार झालेले कांहीं ठराव यांवर पडलेली दिसते !

नाट्यकलेचें पुनरुज्जीवन व्हावयाचें तर, नवीन तंत्रास व अभिरुचीस अनुसरून नाट्यलेखन झालें पाहिजे, आणि नाट्यप्रयोगहि बोलपटासारखे आकर्षक पण त्याहून पृथगात्म व्हावयास पाहिजेत. या द्विविध सुधारणा झाल्याखेरीज मृत्युपंथास लागलेल्या नाट्यकलेच्या कलेवरांत प्राणज्योतीचें निर्लेप स्फुरण होणें शक्य नाहीं !

नाट्यलेखनांत " आजतागायतपणा " आणण्याचा प्रयत्न मराठींत बऱ्याच जुन्या काळापासून होत आहे. वरेरकरांच्या " तुरुंगाच्या दारांत " या नाटकानें नव-नाट्य-लेखनाचें शिंग पहिल्या प्रथम फुंकलें. तोच उपक्रम वरेरकरांनीं आजपर्यंत मधूनमधून कां होईना, पण चालू ठेवला आहे. इतरहि नाटककार ह्या दिशेनें कमी अधिक प्रयत्न करतांना दिसतात. परंतु त्यांपैकीं एकासहि यश येऊं नये, याचें कारण काय ? वरेरकर सोडले तर या लोकांत श्रेष्ठ प्रतीचा नाटककार असा कुणीच नव्हता व नाहीं. अर्थात् त्यांना अपयश यावें, हें साहजिकच आहे. आतां, खुद्द वरेरकरांनाच यश न येण्याचें हें कारण आहे कीं, त्यांच्या या नवीन धर्तीच्या नाटकांत सखोलता व उत्कटता फार कमी प्रमाणांत आली ! "आंधळ्याची शाळा" हें नाटक रूपांतरित असतांहि त्याला वरेरकरांच्या कोणत्याहि नवीन धर्तीच्या नाटकांपेक्षां जास्त लोकप्रियता मिळावी, याचें झालें तरी हेंच मर्म होय. तात्पर्य, नवीन तंत्राचा अंगीकार करून जनमनावर पकड बसविणारा

भाग्यशाली नाटककार तरुण पिढींतूनच पुढें आल्यावांचून नव-नाट्य-लेखनाचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटणार नाहीं!

नाट्यप्रयोगांत सुद्धां पुष्कळच सुधारणा व्हावयास पाहिजेत. स्त्रियांचीं कामें स्त्रियांनी करणें ही त्यांतील पहिली सुधारणा होय. पुष्कळ लोक या गोष्टीचा व्यर्थ बाऊ करतात. बोलपटांत स्त्रियांनी काम केल्याबद्दल त्यांनीं फारसा बोभाटा केल्याचें ऐकूं येत नाहीं; पण नाटकांत स्त्रियांनीं काम केल्यास मात्र त्यांना "आर्यसंस्कृति" रसातळास गेल्याचा भास होतो! तथापि ज्यांना नाट्यकलेचें खरोखरच पुनरुज्जीवन करावयाचें आहे, त्यांनीं अशा ओरडीकडे दुर्लक्ष्यच केलें पाहिजे. बोलपटांतून स्त्रियांचीं कामें स्त्रियांनींच केलेलीं पाहाण्याची संवय झालेल्या प्रेक्षकांना वयस्क झालेले 'बाप्ये' देखील चोळी-लुगडें नेसून रंगभूमीवर आलेले पाहणें इतःपर बिलकूल खपणार नाहीं!

रंगभूमीवरील संगीतहि निराळ्या वळणावर जाणें जरूरीचें आहे. कोणत्याहि कलेचें नावीन्य हें प्रमुख अंग असतें, आणि नाविन्याखेरीज ती कला हृदयंगम वठणें दुर्घट असतें. हाच न्याय संगीतासहि लागू करावयास हवा. किर्लोस्करांनीं रंगभूमीवर लावण्या-पदें आणलीं, तीं त्या वेळीं अभिनव असल्यामुळें लगेच लोकप्रियहि झालीं. पण तेंच तें चर्वितचर्वण इष्ट न वाटल्यामुळें कोल्हटकरांनीं पारशी पद्धतीच्या कांहीं चाली आणल्या, व त्याहि त्यांच्या नाविन्यामुळें लोकादरास पात्र झाल्या. पुढें "मानापमान" नाटकापासून भास्करबुवा बखले प्रभृतींच्या मदतीनें खाडिलकरांनीं गायकी वळणाच्या चाली रंगभूमीवर आणल्या, व त्यांनाहि प्रामुख्यानें, त्याच म्हणजे नाविन्याच्या गुणामुळें, रसिकमान्यता प्राप्त झाली. गेलीं २०-२५ वर्षें हीच संगीतपद्धति मराठी रंगभूमीवर वरचष्मा गाजवीत आहे. अर्थात् तींत थोडाबहुत पालट होण्याची वेळ आतां आली नाहीं काय? "चंडीदास" बोलपटामुळें भावानुसारी संगीताचें महत्त्व प्रगतिप्रिय रसिकांस पटूं लागलें आहे. आणि मराठी बोलपट व मराठी नाटकें यांत त्याचा उपयोग करून पाहाण्याची आवश्यकता त्यांस तीव्रतेनें वाटूं लागली आहे. तेव्हां हाहि प्रयोग जरूर करून पाहाण्याजोगा आहे, असें ठरत नाहीं काय?

सारांश, अनेक दृष्टींनीं जोराची व टिकाऊ स्वरूपाची सुधारणा झाल्याशिवाय नाट्यकलेचें पुनरुज्जीवन होणें अशक्य आहे, ही गोष्ट तिचे पुरस्कर्ते जितक्या लौकर उमगतील, तितकें तें फलदृष्ट्या अधिक हितपरिणामी होणार आहे.

* * *

## ५० चिपळूणकर, आगरकर व कोल्हटकर

"प्रतिभे"च्या गेल्या अंकांत रा. वरेरकर यांच्या "मराठी नाटकाचे जनक" या लेखाचा आरंभींचा भाग प्रसिद्ध झाला आहे. कै. कोल्हटकरांना चिपळूणकरांचें वाङ्मय मनापासून आवडत नव्हतें, अशा अर्थाचें त्यांत त्यांनीं विधान केलें असून आगरकरांचें वाङ्मय मात्र त्यांना रुचत होतें, असेंहि त्यांनीं पर्यायानें सूचित केलें आहे. ज्यांचा कोल्हटकरांशी प्रत्यक्ष परिचय होता, त्यांना वरेरकरांचीं हीं दोन्ही विधानें निराधार असल्याचें विदित असेलच. प्रातःस्मरणीय समाजसुधारक या नात्यानें कोल्हटकरांना आगरकर कितीहि प्रिय असले, तथापि त्यांचें वाङ्मय मात्र त्यांना मुळींच आवडत नव्हतें, व ही गोष्ट ते खाजगी भाषणांत स्पष्टपणें बोलूनहि दाखवीत. उलटपक्षी, चिपळूणकरांच्या उथळपणाची पुरेपूर जाणीव असूनहि "निबंध-माले"च्या लेखन-सौन्दर्यामुळें तिजवर त्यांची बहाल मर्जी असे. कोल्हटकर हे केवढेहि मोठे सुधारणावादी असले, तरी ते प्रथम सौन्दर्योपासक होते व नंतर सुधारणावादी होते. यामुळें प्रत्यक्ष शत्रूच्याहि कृतींत सौंदर्य आढळल्यास ते त्याचा जयजयकार करण्यास मागेंपुढें पहात नसत. हा त्यांचा स्वभावविशेष ध्यानांत घेतल्यास त्यांच्यासारख्या सुधारक रानडे-भक्तास "निबंधमाला" एवढी प्रिय कां असावी, याची बरोबर उपपत्ति लागेल.

मात्र चिपळूणकरांचा अतिरिक्त बोलबाला होण्याबाबत वरेरकरांनीं तक्रार केली आहे, ती अंशतः रास्त आहे. टिळकसंप्रदायासारखा प्रभावशाली संप्रदाय चिपळूणकरांना एकप्रकारें गुरुस्थानीं मानूं लागल्यामुळें सर्वसाधारण जनसमाजांत त्यांना साहजिकच पूज्यबुद्धीनें लेखण्यांत येऊं लागलें. आणि, खरें पहातां न्यायमूर्ति रानडे यांच्यासारखा अष्टपैलु बुद्धीचा महापुरुषहि हिंदुस्थानावरील इंग्रजी राज्य हा परमेश्वरी संकेत आहे, अशी भाषा

ज्यावेळीं बोलत होता, त्यावेळीं चिपळूणकरांनीं देशाभिमानाचा नंदादीप सारखा तेवत ठेवला, ही त्यांची कामगिरी सर्वथैव स्पृहणीय आहे; आणि टिळकसंप्रदाय चिपळूणकरांना मुजरा करावयास उद्युक्त झाला, तो त्यांच्या गुणांमुळेंच. परंतु या गुणांबरोबरच चिपळूणकरांच्या दोषांचेंहि जेव्हां समर्थन करण्यांत येतें, तेव्हां मात्र त्रयस्थांस विषाद वाटल्याखेरीज राहात नाहीं. चिपळूणकरांचा ठळक दोष उथळपणा हा होय. एकच उदाहरण द्यावयाचें तर, त्यांनी मोरोपंतांच्या "केकावली"ची केलेली तरफदारी पाहा. न्या. मू. रानड्यांनी म्हटल्याप्रमाणें "केकावली" हें खरोखरच हृदयस्पर्शी काव्य नव्हे. तथापि चिपळूणकर त्याची केवढ्या हिरीरीनें महति गातात! आणि, चिपळूणकरांच्या या अभिप्रायापेक्षांहि प्रो. बनहट्टी यांच्यासारखे विद्वान् "द्विविध दर्शनां"त त्या अभिप्रायाची पाठराखी करतात, तो प्रकार तर जास्तच खेदजनक आहे! प्रो. बनहट्टी यांच्यापेक्षां रा. माडखोलकर यांची "द्विविध दर्शनां"तील भूमिका अधिक समतोलपणाची आहे, व त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

* * *

## ५१ पुनः एकदां माटेप्रकरण

मागील खेपेस पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंत रा. माटे यांनीं कोल्हटकरां-बद्दल काढलेल्या पराकाष्टेच्या हीन उद्गारांचा मला तीव्रतेनें समाचार घ्यावा लागला होता. त्यावर माट्यांनीं 'ज्ञानप्रकाशां'त एक खुलासा छापून स्वतःचें लंगडें समर्थन केलें आहे! कोल्हटकरांना शारीरिक व्यथा जडली, ती गणपतीनें त्यांना केलेली शिक्षा होय, असें आपण म्हटलें नव्हतें; तर त्यांच्या विडंबनबुद्धीचें त्यानें भजनबुद्धींत परिवर्तन करून त्यांस पर्यायानें शिक्षा केली, असें आपण म्हटलें, अशी माटे हे 'नवलाची पर' सांगतात! माट्यांची ही उघडउघड 'पाछेबुद्धि बामणिया' दिसते! खेरीज त्यांच्या या खुलाशावरूनहि त्यांनीं कोल्हटकरांच्या व्याधीचा निर्देश केल्याचें व तिचा सदभिरुचि व संभाविती यांना सोडून उपयोग केल्याचें सिद्ध होतच आहे!

दुसऱ्यांच्या सदभिरुचीची व संभावितांची चौकशी करणाऱ्या माट्यांनीं देखील तोच कित्ता गिरवावा, ही 'परोपदेशे पांडित्या'ची कमालच नव्हे काय ?

गणपतीसारख्या काल्पनिक देवता, त्याची कोणी थट्टा केल्यास त्याला याप्रमाणें शिक्षा करतात, या गोष्टीवर माट्यांचा खरोखरच विश्वास आहे काय, असा त्यांना येथे प्रश्न करतां येईल. तसेंच, महंमद गिझनीनें सोमनाथाच्या मस्तकावर गदा घातली, किंवा मिस मेयोनें महादेवाची अश्लील पूर्वपीठिका दाखविली, याबद्दल त्या कैलासनाथानें या दोघांचें तृतीय नेत्राग्नीनें भस्म कां केलें नाहीं ? कीं विनोदी लेखापेक्षां हे दोन्ही अपराध गौण होते ? कीं हिंदूंचे देव आपल्या भक्तांप्रमाणेंच 'घरच्या म्हातारीचे काळ' व बलिष्ठ परधर्मीयांपुढें गोगलगाय आहेत ?—असे आणखीहि कांहीं प्रश्न माट्यांना विचारतां येतील.

या खुलाशांत माट्यांनी आणखी एक गैरलागू मुद्दा उपस्थित केला आहे. आपल्या कवितेचें अत्रे विडंबन करतील, म्हणून अत्र्यांच्या विडंबनकाव्यास कोल्हटकरांनी प्रतिकूलता दर्शविली, हा तो मुद्दा होय ! पुण्याच्या साहित्यसंमेलनांत कोल्हटकरांनीं अत्र्यांच्या कांहीं विडंबनकाव्यांस विरोध केला होता, हें खरें आहे; परंतु त्यांत कित्येक कवींची व्यक्तिविषयक निंदा केलेली आहे, अशी त्यांची समजूत करून देण्यांत आल्यामुळेंच त्यांनी तो विरोध केला होता. माटे सांगतात तद्वत् स्वतःच्या कृतीच्या विडंबनाच्या भीतीमुळें नव्हे ! माट्यांना हा खरा प्रकार ठाऊक नसेल, असें नाहीं; पण वाटेल त्या प्रकाराचा वाटेल तसा अर्थ करण्यांत गुंतलेलें त्यांचे डोकें सत्यासत्याची चाड धरील तेव्हां ना ?

'प्रतिभे'च्या तोतया रामशास्त्र्याची व बिनचवकस संपादकत्वाची आपण मुळीच फिकीर करीत नाहीं, असें माटे आढ्यतेनें सांगतात ! 'प्रतिभे'त माट्यांचा परिचय झाला होता, तेव्हां संपादकाविषयीं व मीं मागें 'विज्ञानबोधा'विषयीं स्तुतिपर स्फुट लिहिलें होतें, तेव्हां मजविषयीं त्यांची हीच भावना होती काय, याचाहि त्यांनीं खुलासा केला असता, तर बरें झालें असतें.

वरील खुलाशामधील ता. क. मध्ये पावित्र्यविडंबकांना करावयाच्या शिक्षेसंबंधां आपण जें बोल्लों होतो, त्याचें स्पष्टीकरण पुढें केव्हां तरी करूं. असें माटे म्हणतात. अर्थात् त्यांच्या स्पष्टीकरणानंतरच या बावत लिहिणें सोयीचें होईल. तूर्त एवढेंच सांगता कीं, माटे हे सुसंस्कृत गृहस्थ असावे, अशी माझी कल्पना होती; पण ती त्यांनीं पार नाहींशी केली आहे !

* * *

## ५२ संशोधक व संकलनकार

रियासतकार सरदेसाई यांचा ता. २८ मे रोजीं पुण्यास जाहीर सन्मान झाला, त्याला अनुलक्षून माझा एक मित्र म्हणाला, " काय हो ! सरदेसाई हे केवळ संकलनकार ! सरकारी मदतीनें छापलेलें " पेशवे दप्तर " उणें केलें, म्हणजे त्यांचें संशोधन शून्यच रहातें ! मग त्यांचा हा वडिवार कां ? " पुण्यांतील इतिहासक्षेत्रांत काम करणाऱ्या वहुतेकांची रियासतकारांवद्दल माझ्या या मित्रासारखीच भावना आहे, व ते ती वेळीं अवेळीं बोलतहि आले आहेत !

आपल्याकडे भलेंबुरें कसलेंहि चिटोरें उजेडांत आणणाऱ्याला ' संशोधक ' ही संज्ञा प्रायः देण्यांत येते ! संशोधकांतील " मुनिचतुष्टय " म्हणून गाजलेले गेलेले जे मोने–राजवाडे–खरे–पारसनीस, त्यांच्यांत आदर्श संशोधन व विशेषतः संपादन खरे यांनींच केलें आहे. आणि, सर्वांत अस्ताव्यस्त संपादन जर कुणी केलें असेल, तर तें " संशोधकाग्रणी " मानल्या गेलेल्या राजवाड्यांनीं ! या सर्वांनी प्रकाशित केलेल्या कागदपत्रांची नीट संगति लावून व इतरत्र उपलब्ध झालेली माहिती जमेस धरून क्रमवार इतिहास लिहिणें हें " येरागबाळा "चे काम नव्हे ! नुसतीं पांचपन्नास पत्रें कशीं तरी मुद्रित करण्यापेक्षां असा इतिहास लिहिणें हें जास्त बुद्धिमत्तेचें, चिकित्सकपणाचें व चिकाटीचें काम आहे. रियासतकारांखेरीज इतरांस हें काम झेंपलें नाहीं, या एकाच गोष्टीवरून त्याची कष्टसाध्यता निदर्शनास येते. तरीहि त्यांना " संकलनकार " म्हणून हिणविण्यास हे गुरुघंटाळ तयारच !

## रामशास्त्री

संकलन करणें हें वाटतें तितकें सोपें नाहीं, याचीं उदाहरणें म्हणून प्रो. द. वा. पोतदार व रा. शं. श्री. देव यांचीं नांवें पुढें करतां येतील. प्रो. पोतदार यांच्या हाताशीं भा. इ. सं. मंडळासारखी प्रचंड संस्था गेलीं किती तरी वर्षें आहे! पण दुसऱ्याच्या पुस्तकांस "पुरस्कार" जोडण्यापलीकडे त्यांच्या हातून फारसें लेखनकार्य झालें नाहीं! रा. देव हे रामदासी वाङ्मयांत एवढे मुरलेले, पण त्यांनीं रामदासाचें एखादेंहि चरित्र अद्यापि छापूं नये, हें कशाचें द्योतक आहे? आणि, पुढें मागें त्यांनीं तें छापलें, तरी तें अंधश्रद्धेनेंच बरबटलेलें असणार, त्यांत रियासतकारांची चिकित्सक बुद्धि अत्यल्पच आढळणार, हेंहि सांगावयास नकोच!

अर्थात प्रो. पोतदार मंडळाची चिटणिशी करतात, किंवा रा. देव रामदासी वाङ्मयाचा संग्रह करतात, हें त्यांचें कार्य कमी महत्त्वाचें आहे, असें मात्र मला मुळींच सुचवावयाचें नाहीं. संकलनात्मक इतिहास-लेखनाला तुच्छ समजण्यांत येतें, तें यथार्थ नाहीं, हें दाखविण्याकरतांच वरील कटु सत्य सांगावें लागलें आहे.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक ११

## ५३ पुण्याची इतिहास परिषद

पुण्याची अखिल भारतीय आधुनिक इतिहास-परिषद डॉ. शफत अहमदखान यांच्या अध्यक्षत्वाखालीं अत्यंत यशस्वितेनें पार पडली. ज्या परिषदेचे अध्यक्ष व स्वागताध्यक्ष अनुक्रमें डॉ. खान व भोरचे अधिपति होते, जिचें उद्‌घाटन मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड ब्रेबोर्न यांनीं केलें, आणि जींत हिंदुस्थानसरकार, प्रांतिक सरकारें, विश्वविद्यालयें व ठिकठिकाणचीं इतिहासमंडळें यांचें सहकार्य एकत्रित झालें होतें, ती परिषद यशस्वी न होती तरच आश्चर्य ! भा. इ. सं. मंडळाचे प्रो. पोतदारप्रमुख कार्यकर्ते या यशाबद्दल सर्वांच्या अभिनंदनास पात्र आहेत.

उद्‌घाटन प्रसंगीं केलेल्या आपल्या भाषणांत लॉर्ड ब्रेबोर्न यांनीं राजवाडे-प्रभृति महाराष्ट्रीय संशोधकांचा गौरव केला, त्याबद्दल समाधान व्यक्त केल्यावांचून राहवत नाहीं. राजवाडे वगैरेंना त्यांच्या जिवंतपणीं सरकारमान्यता तर राहोच, परंतु युनिव्हर्सिटीमान्यताहि लाभली नव्हती, हें लक्ष्यांत घेतां त्यांच्या मृत्यूनंतर कां होईना, पण प्रत्यक्ष गव्हर्नरसाहेबांनीं त्यांचें गुणगान गावें, ही गोष्ट प्रत्येक महाराष्ट्रीयास आनंददायक अशीच झाली !

डॉ. खान यांचें भाषण फार पाल्हाळिक, परंतु खऱ्याखुऱ्या ऐतिहासिक दृष्टीस धरून असेंच झालें. **इतिहासलेखन हें देश, धर्म व जात यांच्या अभिनिवेशानें डागळलें जाऊं नये,** हा त्यांनीं केलेला उपदेश प्रत्येक इतिहास-लेखकानें हृत्फलकावर कोरून ठेवण्याजोगा आहे. या भाषणावरून डॉ. खान हे एक व्यापक दृष्टीचे सुसंस्कृत विद्वान् आहेत याची मनोमय साक्ष पटते, यांत संशय नाहीं.

या परिषदेंतील विशेष आकर्षक भाग म्हटला म्हणजे ऐतिहासिक वस्तूंचें प्रदर्शन हा होय. या प्रदर्शनांत बहुमूल्य चित्रें, नाणीं, कागदपत्र, हत्यारें, पोषाख, वगैरे ठेवण्यांत आले होते. '१७९२ मधील मराठी साम्राज्य'

हें गव्हर्मेंट हाउसमधील चित्र या प्रदर्शनांत पहिल्यानेंच ठेवण्यांत आलें होतें, ही विशेष उल्लेखनीय बाब आहे. परिषदेंत वाचलेले निबंधहि डॉ. खान यांनीं म्हटल्याप्रमाणें, युरोपीय इतिहासकारांनाहि शोभतील, एवढ्या दर्जाचे होते. तात्पर्य, ही परिषद हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स् कमिशनच्या तोडीची झाली, याविषयीं कोणाचाहि मतभेद होणार नाहीं.

*　　　*　　　*

## ५४ लेखनप्रगति कां खुंटते ?

इतिहास-परिषदेपूर्वी कांहीं दिवस पुण्याला चौथे शारदोपासक संमेलन रा. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. त्या प्रसंगीं त्यांनीं जें भाषण केलें, त्यांत गोमंतक-साहित्य-संमेलनामध्यें स्वतः त्यांनींच केलेल्या भाषणापेक्षां नवीन असें फारसें कांहींच नव्हतें ! यामुळे किंचित् अतिशयोक्तीनें, गोमंतक-साहित्य-संमेलनांतील आपल्या भाषणाचीं पानें फाडून तींच खांडेकरांनीं पुण्याच्या शारदोपासक संमेलनांत वाचून दाखविलीं. असेंहि म्हणावयास हरकत नाहीं ! मात्र या भाषणांत मराठी लेखकांची लेखनप्रगति थोडेंसें यश मिळतांच पुढें कां खुंटते, आणि शॉ, गॉर्की प्रभृतींच्या लिखाणाच्या तोलाचें लिखाण मराठींत निर्माण कां होत नाहीं, याची त्यांनीं केलेली मीमांसा जितकी विदारक, तितकीच उद्बोधकहि आहे, हें कबूल करणें भाग आहे. मराठी लेखक अल्पस्वल्प यश मिळतांच त्यांना 'निर्वीरमुर्वीतलम्' असें होतें, त्यांचा जागतिक वाङ्मयाचा सखोल अभ्यास नसतो व त्यांच्यांत कठोर आत्मपरीक्षणाची उणीव असते, हीं तीन कारणें या प्रकाराच्या मुळाशीं आहेत, असें खांडेकर सांगतात, आणि त्यांची ही चिकित्सा रास्त आहे, असाच वाचकांचाहि अभिप्राय पडेल. विशेषतः 'उल्का', 'ऊनपाऊस' 'दंवबिंदु' हीं पुस्तकें वाचणाऱ्यांना तर खांडेकरांची ही कार्यकारणमीमांसा अतिशयच मार्मिक वाटेल. परंतु या पुस्तकाच्या खुद्द कर्त्याला मात्र त्याची ही मीमांसा पटते किंवा कसें, हाच काय तो वादाचा मुख्य प्रश्न आहे.

*　　　*　　　*

## ५५ पिंजारलेल्या मिशांचा भयंकर चेहरा !

'प्रतिभासाधन'वादांत प्रसिद्धीस (?) आलेले रा. रा. प्र. कानिटकर यांनीं 'ज्ञानप्रकाश'च्या ३१ मेच्या अंकांत रा. खांडेकर यांजवर एक गंभीर स्वरूपाचा आरोप केलेला आहे. 'किर्लोस्कर' व 'मनोहर' मासिकांच्या मेच्या अंकांतील 'ओ' हेन्रींचें मत' व 'कढीभात' या लघुकथांत खांडेकरांनीं सुविख्यात लघुकथालेखक रा. य. गो. जोशी यांच्या कांहीं लघुकथांचें विडंबन केलें आहे, एवढेंच नव्हे. तर खुद्द जोशी यांचें **'पिंजारलेल्या मिशांचा भयंकर चेहरा'** अशा हीन शब्दांत वर्णन केलें आहे, असें कानिटकर यांचें म्हणणें आहे ! खांडेकरांनी जोश्यांच्या लघुकथांचें विडंबन केलें असले, तर त्याबद्दल फारशी तक्रार करण्याचें कारण नाहीं; परंतु 'पिंजारलेल्या मिशांचा भयंकर चेहरा' हें वर्णन जर त्यांनी खरोखरच जोश्यांना उद्देशून केलें असेल, तर मात्र त्याबद्दल खांडेकरांचा जेवढा निषेध करावा तेवढा थोडाच आहे ! परंतु त्यांच्यासारख्या सहृदय गृहस्थाची इतकी घसरगुंडी होईल, यावर माझा विश्वास बसत नाहीं. यामुळें हें वर्णन त्यांनी जोश्यांना अनुलक्षून केलें नसावें, असेंच मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होते.

मात्र, जोशी हे खांडेकरांच्या तोडीचे लघुकथालेखक आहेत, असा कानिटकरांनीं उपर्युक्त तक्रारींत जो ध्वनि काढला आहे, तो मला सर्वस्वी मान्य आहे. किंबहुना असले तर जोशी हे खांडेकरांपेक्षां कांकणभर जास्त सरसच लघुकथालेखक आहेत, असेंहि मी म्हणूं शकेन. घरगुती प्रसंगांवर, घरगुती भाषेंत रसाळ लघुकथा लिहिणें यांत जोश्यांचा केवळ हातखंडा आहे. उलटपक्षीं, कृत्रिमतेमुळें खांडेकरांच्या लघुकथा क्वचित् बुद्धीला डोलवूं शकल्या, तरी त्या हृदयाला खास हालवूं शकत नाहींत ! आणि अलीकडे फार लिहिण्याच्या हव्यासामुळें तर त्यांच्या लिखाणांतील नावीन्य जणुं संन्यास घेऊन गिरिकंदरांत जाऊन दडलें आहे ! आतां जोश्यांच्या

लघुकथांत ' तंत्र ' कमी असतें, हें खरें; तथापि हें वैगुण्य ते सरसतेनें पुष्कळ अंशीं भरून काढतात, हेंहि तितकेंच खरें आहे.

*　　　　*　　　　*

## ५६ माधव ज्यूलियनचें स्थान

'केसरी'च्या ७ जूनच्या अंकांत ' मराठी काव्य व वाचकांची अभिरुचि ' या विषयावर एक वाचनीय लेख आला असून त्यांत केशवसुतांनंतरचे क्रांतिकारक कवि अशा शब्दांनी माधवज्यूलियन् यांचा उल्लेख केला आहे, आणि त्यांच्या कवितेची गुणांच्या मानानें चहा होऊं नये, याबद्दल खेदहि प्रदर्शित केला आहे.

' अन् 'चा उपयोग, बोजड भाषाशैली, कांहींशी कृत्रिमता, वगैरे दोष माधवज्यूलियनच्या कवितेंत डोकावतात; पण त्यांच्या ' स्वप्नरंजना 'ची अलीकडे प्रकाशित झालेल्या काव्यसंग्रहांत फार वरची पायरी लागते, यांत मुळींच शंका नाहीं. कोणत्याहि वस्तूची वास्तविक योग्यता तुलनेनें जास्त स्पष्ट होत असल्यामुळें ' स्वप्नरंजना 'च्या किंचित् आगेंमागें प्रसिद्ध झालेल्या यशवंतांच्या ' यशोगंधा 'शीं त्याची तुलना करून पहावी. म्हणजे पूर्वोक्त संग्रहाचे यथार्थ महत्त्वमापन होईल.

वस्तुतः ' यशोगंध ' म्हणजे दुसरें–तिसरें कांहीं नसून ' यशोधना 'चा पिटुकला अवतारच होय ! निःपक्षपाती वाचकाला 'यशोधना'हून 'यशोगंधां'त नवें असें प्रायः कांहींहि आढळणार नाहीं ! तेच ते विचार–विकार, तीच ती रचनापद्धति व आलटून पालटून येणाऱ्या त्याच त्या चाली – या पलीकडे त्यांत विशेष तें काय आहे ? परंतु आमच्या टीकाकारांनीं चढत्या सुरांत त्यांचीं अतिशयोक्त स्तुतिस्तोत्रेंच गाईलीं ! पण 'स्वप्नरंजना'च्या वांट्याला मात्र त्याच्या निम्म्यानेंहि स्तुति आली नाहीं ! यावरून मराठींतले हे टीकाकार एक तर सिद्धसाधक तरी असले पाहिजेत, किंवा निदान, Bee म्हणतात तद्वत्, ' विशाल मणिगोटे ' तरी असले पाहिजेत ! अर्थात् ' यशोगंधां 'त काव्यगुणांचा खडखडीत दुष्काळ आहे, असें नव्हे ! परंतु ' स्वप्नरंजना 'च्या अपेक्षेनें

हा संग्रह फिकाच वाटतो, हें अगदीं निःसंशय. तथापि ही वस्तुस्थिति कितीकांनीं बोलून दाखविली ?

'केसरी'तील वरील लेखांत म्हटल्याप्रमाणें काव्यदोषापेक्षां काव्यगायन-पराङ्मुखतेमुळेंच माधवज्यूलियन हे मागें पडले. त्यांचा 'संगमोत्सुक डोह' ही भावरम्य कविता गोविंदराव जोशी यांनी गाईली नसती, तर तिची सध्यां होत आहे तितकी तरी स्तुति झाली असती किंवा नाहीं, याची जबरदस्त शंकाच आहे.

* * *

## ५७ रोलाँची काव्याची व्याख्या

या ठिकाणी रोमाँ रोलाँ यांनीं, 'जॉन ख्रिस्तोफर' या नोबेल प्राइझ मिळालेल्या आपल्या विश्वविख्यात कादंबरींत एका जागीं, नमूद केलेली काव्याची व्याख्या मला आठवते. **ज्याची मोहिनी परभाषेंतील रूपांतरांतहि कायमच राहते, तेंच अव्वल दर्जाचें काव्य होय**, अशा अर्थाची रोमाँ रोलाँची ती व्याख्या आहे. ही व्याख्या वाचून केवळ गोड गळ्यामुळें अगर केवळ झगझगीत भाषाशैलीमुळें 'कवि' पदवीवर हक्क सांगणाऱ्या आपल्याकडील पद्यकारांची एकच धांदल उडेल ! परंतु जगांतील थोर थोर वागीश्वरांची काव्यकृति नजरेपुढें आणल्यास रोमाँ रोलाँ यांची काव्याची उपरिनिर्दिष्ट व्याख्या अत्यंत समर्पक असल्याचेंच आढळून येईल. उदाहरणादाखल जर्मन महाकवि गटे यांचें 'फाउस्ट' हें नाट्यकाव्य घ्या. या नाट्यकाव्याचें इंग्रजी भाषांतर वाचतांना हें 'भाषांतर' आहे, असें कुठेंच वाटत नाहीं, भाषाभेदामुळें मुळांतील काव्यसौंदर्याच्या तरल छटा लोपल्या असतील, असाहि भास होत नाहीं. अर्थात् या सर्व करामतीचें श्रेय भाषांतरकाराकडे जातें, याबद्दल वाद नाहीं. तथापि मूळ जर्मन कृतींत भाषापद्धति व रचनाशैली शिथिलच असल्याचें तज्ज्ञ सांगतात; यामुळें इंग्रजी भाषांतरकाराची जबाबदारी पुष्कळच कमी झाली, ही वस्तुस्थितिहि विसरतां कामा नये. शिवाय 'फाउस्ट' मधील

काव्यगुण इतके श्रेष्ठ आहेत कीं, त्यांतील भाषा वगैरे मुळांत कितीहि सफाईदार असती, व या नाट्यकाव्याचा इंग्रजी भाषांतरकार कितीहि गबाळ असता, तरी हें नाट्य-काव्य मुळांत न वाचलेल्या वाचकांना त्याचे इंग्रजी भाषांतर सुंदरच वाटलें असतें !

रवींद्रनाथांच्या इंग्रजी 'गीतांजली'विषयीं असेंच सांगतां येईल. बंगाली 'गीतांजलि' भाषासौंदर्यानें नटली आहे, व तींतल्या चालींची बहार कांहीं निराळीच आहे ! तरी देखील इंग्रजी 'गीतांजलि'–गद्यांत असलेली 'गीतांजली'– सरसच वाटते !

मराठींतील किती काव्यांचा असा अनुभव येऊं शकेल ?

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १२

## ५८ हिमालयाएवढ्या चुका !

इंदूरच्या गेल्या हिंदी साहित्य-संमेलनाचे पडसाद नियतकालिकांतून अजूनहि घुमत आहेत ! "सरस्वती" या विख्यात हिंदी मासिकाच्या जूनच्या अंकांत म. गांधी यांच्या अध्यक्षीय भाषणावर संपादकांनीं सणसणीत कोरडे उडविले आहेत ! शिवाजीला उद्देशून लिहिलेल्या 'शिवाबावनी' या भूषणच्या काव्यांत "मोंगल बादशहांविषयीं भल्याबुऱ्या गोष्टी" असल्यामुळें हें काव्य विद्यार्थ्यांना शिकवूं नये, असे गांधींनीं उद्गार काढले! हें विधान त्यांनीं एका मुसलमान मित्राच्या सांगण्यावरून व तेंहि मूळ काव्य न वाचतांच केलें, ही विशेष गंमतीची गोष्ट आहे !

हिंदु-मुसलमान यांच्यांत तेढ वाढविणें राष्ट्रहितदृष्ट्या इष्ट नाहीं, याबद्दल मतभेद होण्याचें कारण नाहीं. परंतु जुन्या ऐतिहासिक व्यक्तींच्या लिखाणांत एकमेकांविषयीं द्वेषभाव प्रगट करण्यांत आलेला असला तर तो आपण कसा नष्ट करूं शकणार ? "शिवबावनीं"त औरंगजेबाविषयीं कित्येक अनुदार उल्लेख असतील, पण मुसलमानांच्या ग्रंथांतहि शिवाजी-सारख्याविषयीं तसेच उल्लेख नसतात काय ? शिवाजीला "डोंगरी उंदीर" म्हटल्याचें कांहीं स्थलीं आढळतें, किंवा तो वारल्यावर "काफिर नरकाला गेला !" असे "मांट-शाही" उद्गार काढण्यांत आल्याचें क्वचित् दृष्टोत्पत्तीस येतें, हें कशाचें निदर्शक आहे ?

गांधींच्या भाषणांत याखेरीज आणखीहि अनेक "हिमालयाएवढ्या चुका" आहेत. त्यांतील एका महत्त्वाच्या चुकीकडे कोणाचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. ती चूक अशी — तेलगू, तामिळ, वगैरे द्राविडभाषा संस्कृतोत्पन्न आहेत, असें एक विचित्र विधान गांधींनीं केलें ! आणि त्याचाच अनुवाद त्यांचे पट्टशिष्य रा. काकासाहेब कालेलकर यांनीं लिपीपरिषदेच्या अध्यक्षीय भाषणांत केला ! भाषाशास्त्रज्ञांच्या मतें द्राविड भाषा "ट्युरेनियन" भाषांच्या गटांत समाविष्ट होतात, व संस्कृत ही तर स्वच्छ "आर्योद्भव" भाषा आहे. अर्थात् गांधींचें हें विधान भ्रामक आहे, हें उघड दिसतें !

साहित्याशीं अर्थाअर्थी कांहींच संबंध नसलेल्या व्यक्तीला साहित्य-संमेलनाध्यक्ष करण्यांत जी " हिमालयाएवढी चूक " करण्यांत आली, तिच्या उदरीं वरील " हिमालयाएवढ्या चुका " याव्या, यांत नवल तें कोणतें ? आपल्याकडे राजकीय पुढारी हे " सर्वज्ञ " असल्याची जी सर्वसामान्य समजूत आहे, ती ज्या दिवशीं नेस्तनाबूद होईल, तो सुदिन म्हटला पाहिजे !

राजकीय पुढाऱ्याला सर्वज्ञ मानल्यानें कसा बोजवारा उडतो, याचा अनुभव ग्वाल्हेर संमेलनानें आपणांलाहि आणून दिलाच आहे.

* * *

## ५९ देवनागरी लिपी

इंदूरच्या हिंदी संमेलनापासून लिपी-परिषदेचे अध्यक्ष रा. कालेलकर, हिंदी, मराठी व गुजराथी या तीन भाषांची तरी एक लिपी व्हावी, म्हणजे १५ कोटी लोक एका मार्गानें जाणारे होतील, असा प्रयत्न करूं लागले आहेत, व त्यांचें एतद्विषयक एक पत्र २७ जूनच्या " ज्ञानप्रकाशां "त प्रसिद्धहि झालें आहे. हिंदी व मराठी या भाषा एकच म्हणजे देवनागरी लिपी वापरीत आहेतच. त्यांत फक्त ण, ल अशा चारदोन मातृकांचा किरकोळ फरक आहे एवढेंच. राहतां राहिली गुजराथी. गुजराथी ही गांधींची मातृभाषा असून गुजराथ प्रांतावर त्यांचें अतोनात वजनहि आहे. तेव्हां त्या प्रांताला देवनागरीचा स्वीकार करावयास त्यांनींच लावावें, म्हणजे या तीन भाषा एकाच लिपींत लिहिण्यांत येण्याचें सुखस्वप्न खरें ठरेल.

बंगालीलाहि देवनगरीचा स्वीकार करावयास हरकत नाहीं. परंतु बंगाली लोकांचा पराकाष्ठेचा उत्कट प्रांताभिनिवेश या गोष्टीस सहसा तयार होणार नाहीं ! " देवनागरी लिपी वापरूं लागा, " असें म्हटल्यास हे बंगाली बाबू " आमची लिपी ही खरीखुरी देवनागरी आहे, तेव्हां तुम्हीहि तीच वापरा ना कां ! " असें उत्तर देत असतात, यावरून काय तो बोध घ्यावा !

तें कांहीं असो, एक लिपीच्या या प्रयत्नास सहानुभूति दर्शविणें हें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें कर्तव्य आहे, व तें बजावण्यांत येईल, अशी आशा आहे.

* * *

## ६० कोल्हटकरांवरील हल्ले !

कै. कोल्हटकरांचे "आत्मवृत्त" प्रसिद्ध झाल्यापासून त्यांजवर अनेकांकडून अनेक हेतूंनीं हल्ले चढविले जात आहेत ! काय म्हणे, तर नाथमाधवांना अनुलक्षून त्यांनीं एकदां खाजगी बोलण्यांत "ते जसे पायानें, तसेंच डोक्यानेंहि अपंग आहेत"–अशी कोटि केली ! एक तर खाजगी बोलण्याच्या सत्यासत्यतेबद्दल शंका घेण्यास फार जागा असते. शिवाय, खाजगी बोलण्यांत मनुष्य तितकासा सावध नसल्यानें तो क्वचित् चांगल्या-वाईट गोष्टी बोलूनहि जातो ! त्यांना एवढें महत्त्व देऊन जाहीर सभेंत त्यांची वाच्यता करण्यांत काय स्वारस्य आहे ? अशी वाच्यता करणारे लोक तरी याप्रमाणें कधींच बोलत नाहीत, अशी ग्वाही त्यांना ते तरी देऊं शकतील काय ?

तसेंच, टिळकांना "लोकमान्य" म्हणणे कोल्हटकरांस रुचत नव्हतें, याबद्दलहि अकांडतांडव करण्यांत येतें ! परंतु कोल्हटकर हे जाणून बुजून टिळकांच्या प्रतिपक्षांत उठणारे–बसणारे असल्यामुळें त्यांना टिळकांस "लोकमान्य" म्हणणें न आवडणें साहजिक आहे. नेमस्तांत जसे टिळकांचे प्रतिपक्षीय होते, तसेच राष्ट्रीयांतहि गोखले प्रभृतींचे प्रतिपक्षीय होते. गोखले वारल्यानंतर एका राष्ट्रीय पुढाऱ्यानें 'Mr. Gokhale's death has stopped his demoralization !' असे कमालीचे हल्कटपणाचे उद्गार काढल्याचें मला माहित आहे ! तात्पर्य, त्यावेळीं दोन्ही हातांनीं टाळी वाजत होती. तेव्हां जुन्या वादाचें मढे उकरून काढण्यापेक्षां "**मेलेले मुडदे पुनः उकरण्यापेक्षां हयाताकडे**" या उक्तीचा अवलंब करणेंच श्रेयस्कर नव्हे काय ?

अर्थात् कोल्हटकरांच्या व्यक्तिदोषांचें मला समर्थन करावयाचें नाहीं. मी काय, किंवा "प्रतिभे"चे संपादक काय,–आम्हीं कोल्हटकरांच्या गुणांचे चहाते असलों, तरी त्यांच्या शिष्यशाखेंत समाविष्ट होणारे नाहीत. तथापि सन्माननीय मृतास अन्याय होऊं नये, एवढीच आमची इच्छा आहे.

* * *

## ६१ आमचे कवि व ब्रौनिंग

हिंदी " वीणा " मासिकाच्या जूनच्या अंकांत ब्रौनिंगवर एक मार्मिक लेख आला आहे. लेखकानें ब्रौनिंगच्या कवितेचें उत्कृष्ट विश्लेषण केलें आहे. ब्रौनिंग कोणतेंहि काव्य पाल्हाळिकपणें लिहीत नाहीं. तो थोडक्या शब्दांत अर्धेंमुर्धें चित्र रेखाटतो व चित्राचा बाकीचा भाग पुरा करण्याचें वाचकांवर सोंपवितो. यामुळें त्याच्या काव्याचें मर्म समजण्यास तशाच योग्यतेचा वाचक पाहिजे.—अशा अर्थाचें विवेचन करून लेखकानें " सौंदर्याचा पराकाष्ठा संयत उच्छ्वासांतच ( रचनेंत ) असते, " हा बहुमोल सिद्धांत ग्रथित केला आहे.

चारदोन कोवळे शब्द, ठगकेबाज चाल व विशेषतः गोड गळा म्हणजेच काव्यसर्वस्व होय, अशी समजूत असणार आमचे आधुनिक कवि ब्रौनिंगच्या कवितेचें हें वैशिष्ट्य वाचून " छे ! अगदींच नीरस कवि ! " असे उद्गार काढल्यावांचून खचित राहणार नाहीत ! !

* * *

## ६२ पुणें विरुद्ध प्रो. जोशी

बडोद्याचे विनोदी लेखक प्रो. चिं. वि. जोशी यांनी 'पुण्यांतील व बाहेरील साहित्यिकांचे संबंध ' या विषयावरील चर्चेत व परवांच्या 'प्रतिभे'तील ' पुणेकर साहित्यिकांविषयी ' या लेखांत पुण्याचे नियतकालिककर्ते व व साहित्यिक पुण्याबाहेरच्या साहित्यिकांना हाणून पाडण्याचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न करतात, असा आक्षेप घेतला आहे ! आपलें हें म्हणणें सिद्ध करतांना प्रो. जोशी ह्यांनीं कांहीं हास्यास्पद विधानें केलीं ! काय म्हणे, तर ' ब्रह्मकुमारी ' नाटकाचे कर्ते पुणेकर असल्यामुळें पुण्याच्या कांहीं नियतकालिकांत त्या नाटकाची स्तुति आली ! मूळचे वऱ्हाडांतील, पण हल्लीं सांगलीस असलेले, ' ब्रह्मकुमारी'कर्ते रा. बेडेकर यांना आपण पुणेकर असल्याची जाणीव प्रो. जोशी यांच्या भाषणानेंच पहिल्या प्रथम होईल, यांत संशय नाहीं ! तसेंच प्रो. फडके हे कोल्हापूरचे म्हणून त्यांच्या

'प्रतिभासाधना'चे धिंडवडे निघाले असेंहि आणखी एक विचित्र विधान प्रो. जोशी यांनीं केलें आहे. 'प्रतिभासाधना'वर उठविण्यांत आलेली झोड गैर होती असेंच माझेंहि मत आहे. पण तिच्या मुळाशीं पुण्याबाहेरील साहित्यिकांना झोडपून काढण्याची प्रवृत्ति होती, ही उपपत्ति मात्र मला मान्य नाहीं. 'पुणें विरुद्ध जग' ही खोटी आरोळी प्रथम वरेरकरांनीं उठविली. याच आरोळीचे पडसाद, प्रो. जोशी यांच्यासारख्या समंजस लेखकांनींहि घुमवावे, ही दुर्दैवाची गोष्ट होय !

'प्रतिभे'तलि लेखामुळे प्रो. जोशी यांनी आपली बाजू अधिकच बिकट करून ठेविली आहे. त्या लेखांत त्यांनीं आपल्या कटाक्षाचें कार्यक्षेत्र मर्यादित केलें असलें, किंवा पुण्याच्या चर्चेतील अभिनिवेश त्यांत कायम राखला असला तरी त्यांतील विधानें मात्र अधिक भुसभुशीत करून ठेविली. आणि याच कारणानें त्यांची बाजू अर्धकच्ची झाली आहे. जीं विधानें मुळांतच तर्काच्या कसोटीस उतरणें कठिण त्यांचे मंडण नुसत्या अभिनिवेशानें कसें होणार ?

अर्थात् पुण्यांतील साहित्यिकांत कंपूशाही, मत्सर, इत्यादि विकार नाहींत, असें नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं पुणेकर पुण्याबाहेरच्या लोकांना तुच्छ समजतात, हेंहि कांहीं खोटें नाहीं. पण सरसकट सारेच पुणेकर अशा संकुचित बुद्धीचे असतात, असें म्हणणें सत्यास धरून कसें होईल? ह्याबद्दलची जाणीव स्वतः जोशी यांसहि होत असल्याचें 'प्रतिभे'तील परवांच्या लेखावरून वाटतें. आपण केलेली ओरड थोडी अधिक झाली, या जाणिवेनेंच कीं काय, त्यांनी शेवटीं पुण्याबद्दल स्वतःला वाटत असलेलें 'माहेरप्रेम' व्यक्त केलें आहे.

अर्थात् हें 'माहेरप्रेम' व्यक्त केल्याबद्दल कोणालाहि आनंदच वाटेल. परंतु तें व्यक्त करतांना वऱ्हाडी व सोलापूरकर मंडळींना कोपरखळी मारण्याचें काय कारण होतें ? प्रो. जोशी यांचें हें वैयक्तिक गाऱ्हाणें पुणेकरांनीं दूर केले तर इतर मराठी प्रांतांविरुद्ध पुणेकरांच्या कटांत [ तो असल्यास— तो आहे असें प्रो. जोश्यांना अर्थातच वाटतें ] सामील होण्यास प्रो. जोशी

यांची हरकत नाहीं, असाच त्याचा अर्थ होत नाही काय? निदान तिऱ्हाइतांचा तरी असाच ग्रह होतो.

साहित्यपत्रिकेच्या संपादनाबाबत ' उमीचंदचा ' दृष्टांत देऊन प्रो. जोशी यांनीं स्वतःवर बरीच मोठी जवाबदारी ओढवून घेतली आहे. पण त्याबद्दलचा खुलासा महाराष्ट्रसाहित्य-परिषदेकडून अधिकृतरीत्या होणेंच अधिक सयुक्तिक.

या एकंदर प्रकरणाचा साकल्यानें विचार करूं लागलें म्हणजे शारदोपासक संमेलनांतील चर्चा व प्रो. जोशी यांचा 'प्रतिभे'तील लेख – दोन्ही अगदींच अनाठायीं आहेत असा ग्रह झाल्यावांचून राहत नाही. रा. अत्रे यांनीं सदर चर्चेतील भाषणांत म्हटल्याप्रमाणें, खुद्द पुण्यांतच साहित्यिकांचे निरनिराळे गट आहेत, व ते परस्परांवर दुगाण्या झाडण्यांत मोक्ष मानतात, हा एकच मुद्दा प्रो. जोशी प्रभृति आक्षेपकांचा पुण्यावरील सदर आरोप खोडून टाकण्यास पुरेसा नाहीं काय?

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १२

## ६३ साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद

या वर्षी इंदूर येथें भरणाऱ्या साहित्यसंमेलनांचें अध्यक्षस्थान कोणास द्यावें, याविषयीं ' भवति न भवति ' होऊं लागली आहे.: अशा वेळीं ज्या तरुण साहित्यिकांचें ' प्रतिभा ' हें मुखपत्र गणलें जातें, त्यांच्या मनांतले मुके भाव ' प्रतिभे 'तून बोलके करणें हें मी आपलें कर्तव्यकर्म समजतों.

आजपर्यंत संमेलनाध्यक्षाचा मान प्रायः वयोवृद्धांनाच मिळत आला आहे. अर्थात् ते या मानास पात्र नव्हते, असें मला सुचवावयाचें नाहीं. तसेंच, वृद्धत्वाबद्दल मला अनादर आहे, असेंहि समजावयाचें नाहीं. वृद्धत्वामुळें व विशेषतः नवीन सांगण्यासारखें असें जवळ कांहींहि नसल्यामुळें त्यांना अध्यक्षस्थान दिल्यानें वाङ्मयप्रगतीचें पाऊल फारसें पुढें पडलें नाहीं, एवढेंच मला सांगावयाचें आहे. एखादा साहित्यिक वयानें वृद्ध असेल, पण त्याजजवळ उपयुक्त गुणहि असेल, तर तो या मानास सर्वतोपरी लायक ठरेल, हें उघड आहे. पण असा योग सहसा जुळून येत नाहीं, हीच तर ' ग्यानबाची मेख ' आहे ! निष्क्रियता आल्यानंतर संमेलनाध्यक्ष होण्याची संधि मिळाल्यास त्या अध्यक्षापासून जसा इतरांस, तसाच त्याचा त्यालासुद्धां बिलकूल फायदा होत नाहीं ! ऐन उमेदींत त्याला हें पद प्राप्त झालें असतें, तर त्याच्या वाङ्मयसेवेच्या वृक्षास जास्त नवी पालवी फुटली असती व तो वृक्ष फळाफुलांनीं आणखी बहरून आला असता, हें निःसंशय. परंतु हा वृक्ष जवळजवळ पूर्णपणें वठला आहे, अशा स्थितींत त्यावर कितीहि जलसिंचन केलें, तरी त्याचा काय उपयोग ?

यामुळें ज्याची उमेद अजून जशीची तशी शाबूत आहे, साहित्यविषयक नवे नवे प्रयोग करून पाहण्याची जो कांक्षा बाळगतो आणि तद्वारां उदयोन्मुख लेखकांस जो स्फूर्तिप्रद होऊं शकतो, अशाच साहित्यिकाच्या गळ्यांत इतःपर

अध्यक्षत्वाची माळ पडावयास पाहिजे. आतां, त्यायोगें सरदेसाई, तांबे या चारदोन सन्माननीयांस अन्याय घडेल, हें खरें; पण अवांछनीय अध्यक्ष नेमल्यामुळें तरुण पिढीस वर्षानुवर्ष जो अन्याय घडत आहे, त्याच्या मानानें मूठभर व्यक्तींस घडणारा हा अन्याय कांहींच नव्हे! सरदेसाई–तांबेच केवळ नव्हत, तर कै. पावगी यांच्यासारख्या आणखीहि अनेक वयोवृद्धांना यापूर्वीं कळत–नकळत अन्याय घडलेला आहे! त्यांचें परिमार्जन कोठें केलें गेलें? आणि, तें करणार तरी कसें?

आतां, वरील कसोटीस उतरेल असा अध्यक्ष शोधावयाचा झाल्यास **बॅ. सावरकर, प्रो. ना. सी. फडके व प्रो. माधवराव पटवर्धन** यांचीं नांवें पहिल्याप्रथम डोळ्यांपुढें येतील, हें उघड आहे. बॅ. सावरकर यांच्या योग्यतेबद्दल अधिक लिहिण्याचें कारणच नाहीं. ती केवळ स्वयंसिद्धि आहे. प्रो. फडके यांची साहित्यसेवा झटकन् नजरेसमोर येते. तसेंच, रत्नाकर मासिकाची संस्थापना आणि त्याचें पुढील यश यांचेंहि बरेंचसें श्रेय प्रो. फडके यांनाच आहे. प्रो. फडके यांची चौरंग वाङ्मयसेवा, संगीत, बोलपट वगैरेमुळें अभिजात बनलेली त्यांची कलादृष्टि, त्यांचें प्रभावी वक्तृत्व व दुर्दमनीय चढाडी या त्यांच्या बहुविध गुणांमुळें या वर्षी संमेलनाध्यक्ष व्हावयास तेच सर्वथैव लायक ठरतात. ‘प्रतिभासाधन’ वादापासून त्यांची टवाळी करण्याचा कित्येकांनीं विडा उचललेला असला, तथापि त्यामुळें त्यांच्या उज्ज्वल वाङ्मयसेवेस लवमात्र बाधा येत नाहीं. वाङ्मयांत त्यांनीं कोणाला ‘गुरु’ केलें नाहीं, किंवा स्वतःला ‘गुरु’ म्हणूं दिलें नाहीं. भोंवती उपग्रहांचें लटांबर न जमवितां त्यांनीं आपल्या केवळ वैशिष्ट्याच्या बळावर सध्यांचें विलोभनीय यश संपादिलें आहे. प्रो. माधवराव पटवर्धन यांचें यशहि कौतुकास्पद असेंच ठरतें. महाराष्ट्राचे ते अत्यंत आवडते कवि तर आहेतच; पण त्यांची विद्वत्ता, त्यांची संशोधक व अभ्यासू वृत्ति, मराठी भाषेचें वैभव वाढविण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न इत्यादि कारणांमुळे महाराष्ट्रीयांस त्यांच्याबद्दल केवळ आदरच नव्हे, तर प्रेमहि वाटत असतें. शिवाय, प्रो. पटवर्धन यांनीं महाराष्ट्रीय व पर्शियन संस्कृतीतील दळणवळण

वाढविण्याचे बहुमोल प्रयत्न केलेले आहेत. अशा या थोर साहित्यिकांस इंदूरकरांनीं अध्यक्षत्वाचा मान दिल्यास ती गोष्ट तरुण साहित्यिकांचा आत्मविश्वास दृढ होण्यास साह्यभूत झाल्यावांचून खचित राहणार नाही.

अर्थात् बॅ. सावरकर, प्रो. फडके किंवा प्रो. पटवर्धन या व्यक्ती-बद्दल माझा फारसा आग्रह नाहीं. वरील विचारसरणी मांडतांना त्या ओघांत त्यांचीं नांवें प्रथम दर्शनींच पुढें आल्यानें तीं येथें सुचविलीं आहेत एवढेंच. तसेंच, कित्येक साहित्यिकब्रुव व विशेषतः 'साहित्यपरिषदे'सारखी प्रतिगामी निष्क्रिय संस्था बॅ. सावरकर, प्रो. फडके किंवा प्रो. पटवर्धन यांच्या नांवास सहजा-सहजी मान्यता देणार नाहीं, हेंहि मी ओळखून आहें. तरी देखील तरुण साहित्यिकांचें मनोगत प्रगट करणें हें 'प्रतिभे'चें आद्य कर्तव्य आहे. याबाबत 'प्रतिभे'नें प्रसिद्ध-अप्रसिद्ध अशा साहित्यभक्तांशीं एवढ्यांत जो पत्रव्यवहार केला आहे, त्यांतूनहि हाच स्पष्ट सूर निघतो. त्यांपैकीं कांहीं जणांनीं सरदेसाई-तांबे यांचीं नांवे सुचविलीं आहेत, पण त्याच्या मुळाशीं सावरकर-फडके-पटवर्धन यांचीं नांवें 'साहित्य-परिषदे'ला पचणार नाहीं, हीच गूढ भीति आहे! ती नसती तर त्यांनीं तरुण अध्यक्षाचेंच नांव खात्रीनें सुचविलें असतें, असें त्यांच्या पत्रव्यवहारावरून निःसंदिग्धपणें निदर्शनास येतें.

*　　*　　*

## ६४ मराठी वाङ्मयाचा इतिहास

रा. पांगारकर यांनीं 'मराठी वाङ्मयाचा इतिहास,' खंड १ ला, हा ग्रंथ कांहीं वर्षांपूर्वी प्रसिद्ध केला असून त्याचे इतर खंडहि लिहून तयार आहेत. त्यांच्या मुद्रणार्थ त्यांनीं द्रव्ययाचना केली असून ती सफल होवो, असेंच कोणीहि इच्छील.

आजपर्यंत या विषयावर एकून तीन ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. पहिला भावे-कृत 'महाराष्ट्रसारस्वत,' दुसरा भिडेकृत 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' व तिसरा पांगारकरकृत उपर्युक्त ग्रंथ. हे सर्व ग्रंथ वाचूनहि मराठी वाङ्मयाचा आदर्शभूत इतिहास लिहिला जाण्यास अजूनहि अवकाश आहे, असेच उद्गार

मुखावाटे बाहेर पडतात ! भाव्यांत पांगारकरांपेक्षां चिकित्सकपणा जास्त असला, तरीपण तो याहूनहि अधिक प्रमाणांत असावयास पाहिजे होता. शिवाय, डॉ. केतकर यांनीं तक्रार केल्याप्रमाणें, भावे आपल्या विधानांना आधार देत नसल्यामुळें, त्यांच्या लेखनाचें मोल कमी होतें. कै. बा. अ. भिडे यांचा ग्रंथ फार त्रोटक व माहितीच्या दृष्टीनें अपुरा झाला आहे. आणि, चिकित्सकबुद्धि व प्रमाणबद्धता यांची तर पांगारकरांना कल्पनाहि असलेली दिसत नाहीं !

भावे–भिडे–पांगारकर यांचा यापेक्षांहि ठळक दोष हा कीं, त्यांचा भाषाशास्त्राशीं मुळीच परिचय नव्हता व नाहीं ! त्यांच्या ग्रंथांना भाषाशास्त्राच्या अध्ययनाची पार्श्वभूमि मिळाली असती, तर त्या ग्रंथांचें स्वरूप आमूलाग्र वेगळें झालें असतें ! भाषाशास्त्राचें ज्ञान भाषिक इतिहासाप्रमाणें वाङ्मयीन इतिहासांतहि उपकारक ठरतें, ही गोष्ट निदान प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासापुरती तरी निर्विवाद खरी आहे. प्रो. गो. चिं. भाटे हेहि असाच एक इतिहास लिहीत असून त्या प्रीत्यर्थ त्यांनीं विलायतची यात्राहि केल्याचें समजतें. पण त्यांच्या ग्रंथांतहि हेंच वैगुण्य राहणार कीं काय, अशी भीति वाटते !

अशा प्रकारचा आदर्शभूत ग्रंथ लिहिण्यास सर्व दृष्टींनी लायक असे लेखक रा. कृ. पां. कुळकर्णी हे आहेत. आणि ते त्या दिशेनें प्रयत्न करीत असल्याचेंहि ऐकिवांत आहे. तें खरें असल्यास मराठींतील एक फार मोठी उणीव भरून निघणार. अशी आशा केल्यास ती खास अनाठायीं ठरणार नाहीं.

*　　　*　　　*

## ६५ दूषण ?–छे, ‘ भूषण ’ च !

म. गांधी यांनीं हिंदी साहित्यसंमेलनांत भूषण कवीचा अप्रत्यक्ष उल्लेख केल्यापासून हिंदी भाषेंत भूषणाच्या योग्यायोग्यतेची चर्चा जोरानें सुरू झाली आहे ! तींत त्याच्या मुसलमानद्वेषाचा ( ? ) उल्लेख येतोच, पण कवि या

नात्यानें तो खरोखरच श्रेष्ठ आहे की कनिष्ठ, याचाहि ऊहापोह होत आहे ! ' सरस्वती'च्या जुलैच्या अंकांत ' भूषणचें दूषण ' या मथळ्याखाली एक लेख आला असून भूषण हा प्रासादिक कवि नव्हे, असें सिद्ध करण्याचा त्यांत प्रयत्न केला आहे. भूषणचा काळ हा अलंकारप्राचुर्याचा होता. यामुळें त्याच्या रचनेंत अलंकारांचें वैपुल्य असणें साहजिक आहे. भावगीताच्या या युगांत अशा प्रकारची रचना कमी प्रतीची समजली जाते, हें खरें; परंतु आजचे आदर्श तीनशें वर्षांपूर्वींच्या कवीच्या कृतीस लावून त्यावरून त्या कृतीची सरसनीरसता ठरविणें योग्य आहे काय ? कारण, केवढाहि प्रतिभावान् कवि असला, तरी त्याचें काव्य यावच्चंद्रदिवाकरौ ताजेंच वाटेल, असें बिलकूल नाही. कालिदास, मिल्टन यांच्यासारख्या महाकवींचें काव्यग्रंथ देखील आज जुन्या पद्धतीचे ( Old-fashioned ) वाटतात; मग बिचाऱ्या भूषणाची काय कथा ? तेव्हां आजचीं वजनें-मापें जुन्या कवीच्या कृतीला लावून पहाण्याऐवजीं खुद्द त्याच्याच काळांतील वजनें-मापें तिला लावून त्यावरून तिचें मोल ठरविणे हेंच अधिक समंजसपणाचें नव्हे काय ?

*　　　*　　　*

## ६६ खांडेकरांचें लंगडें आत्मसमर्थन !

भूषणाच्या वेळी हिंदींत अलंकारप्राचुर्य जेवढें होतें, तेवढेंच तें आज मराठी भाषेंतहि आढळून येतें. एवढेंच नव्हे, तर त्याची ओढूनताणून तरफदारी देखील करण्यांत येते ! अलंकारप्रचुर लेखनपद्धतीचे महाराष्ट्रांतील कोल्हटकरांनंतरचे अध्वर्यु रा. खांडेकर यांचेंच उदाहरण घ्या. कांहीं दिवसांपूर्वीं पुण्यास भरलेल्या नाथमाधवदिनाच्या सभेंत रा. खांडेकर यांनीं भाषण करून अलीकडील तरुणतरुणींची अभिरुचि अलंकारप्राचुर्याकडे झुकली असल्यामुळें ' मागणी तसा पुरवठा ' या नात्यानें अलंकारिक भाषा लिहिण्यांत येते, अशा अर्थाचे त्यांनीं उद्गार काढले, व नामनिर्देश न करतां पण उघड उघड स्वतःचेंच समर्थन केलें ! परंतु तें किती पोकळ आहे, हें विचारान्तीं कोणासहि दिसून येईल ! अलीकडील तरुणतरुणींस अलंकारप्राचुर्य

आवडतें की काय, हाच मुळीं अतिशय वादग्रस्त प्रश्न आहे ! आणि त्यांस ते आवडतें, असें गृहित धरलें, तरी 'मागणी तसा पुरवठा' या बाजारी तत्त्वाचा पुरस्कार करणें हें खांडेकरांसारख्या श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या लेखकास कितपत शोभतें ? नवशिक्या लेखकाचें असलें कृत्य एक वेळ क्षम्य तरी ठरेल ! पण ज्यांनी आपल्या लोकप्रियतेचा उपयोग वाचकांच्या अभिरुचीस नवें व इष्ट वळण लावण्याकडे करावयाचा, तेच जर 'मागणी तसा पुरवठा' या मंत्राचा जप करूं लागले, तर लोकाभिरुचि व तदाश्रित वाङ्मय यांत सुधारणा होण्याचा संभवच रहाणार नाही ! बाकी, आपण 'मागणी तसा पुरवठा' या तत्त्वाचे पुरस्कर्ते आहों, हें खांडेकरांनी पर्यायानें कां होईना, पण कबूल केलें, हे एका दृष्टीनें उत्तमच झालें.

हैद्राबादच्या संमेलनांतील अध्यक्षीय भाषणांत डॉ. केतकर यांनी याच तत्त्वाचें प्रतिपादन केलें होतें ! पण तें 'कलेसाठी कला की जीवनासाठी कला' अशा प्रकारची जंगी चर्चा करणाऱ्या 'कलावादी' व 'जीवनवादी' लेखकांस बिलकुल रुचलें नाही ! डॉ. केतकर हे जाणूनबुजून सरळसरळ व्यवहारी गृहस्थ आहेत ! त्यांनी असलें मतप्रतिपादन करावें, हे साहजिकच आहे ! पण खांडेकरांनीहि, त्यांचाच अनुवाद केल्याबद्दल, वरील 'कलावादी' व 'जीवनवादी' काय म्हणतात, हेंच आतां पहावयाचें आहे !

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १४

## ६७ वाङ्मयांतील बुवाबाजी !

आपल्याकडे बुवाबाजीचे प्रस्थ धर्मकारणातच आहे, असे नसून समाजकारण व राजकारण यांतहि ते दृष्टोत्पत्तीस येते. फार काय सांगावे वाङ्मयांतसुद्धां हे उंटाचे पिल्लूं थेट चुलीपर्यंत शिरले आहे ! विष्णुशास्त्री चिपळूणकर, राजवाडे, केशवसुत, गडकरी प्रभृति लेखक व कवि हे वाङ्मयांतील 'बुवा'च होत ! मराठींतील सर्वांत बडे 'बुवा' उर्फ महंत तात्यासाहेब कोल्हटकर हे झाले ! गडकऱ्यांच्या 'प्रेमसंन्यास' नाटकापासून कोल्हटकरांना 'गुरु' म्हणण्याची 'फॅशन'च पडली ! वरेरकर, माडखोलकर, खांडेकर वगैरे खंद्या लेखकांना सुद्धां कोल्हटकरांच्या शिष्यत्वाची बिरुदें मिरविण्यांत मोठें भूषण वाटतें ! त्यांच्या व्यतिरिक्त या शिष्यपरंपरेतला जो 'चिल्लर खुर्दा' आहे, त्याला तर गणतीच नाहीं !

गडकऱ्यांनीं कोल्हटकरांचे शिष्यत्व पत्करणें हे एका अर्थी साहजिक, नव्हे, अपरिहार्य होते ! गडकऱ्यांचीं नाटकें अगर विनोदी लेख ही दुसरें-तिसरें कांहीं नसून कोल्हटकरांच्या नाटकांचीं व विनोदी लेखांचीं कमी-अधिक प्रमाणांत प्रतिबिम्बेंच होत ! या कमालीच्या उसनवारीला उदात्त स्वरूप देण्यासाठीं कोल्हटकरांचे शिष्यत्व जाहीर करण्यावांचून दुसरा कोणता उपाय होता ? पण गडकऱ्यांना जी वस्तु औषध म्हणून घ्यावी लागली, ती वरेरकरादि लेखक कारण नसतां सुपारीच्या खांडाप्रमाणे मजेने चघळीत आहेत, हे पाहून हंसूं आल्यावांचून रहात नाहीं ! कोल्हटकर व वरेरकर हे दोघेहि नाटककार आहेत, यापलीकडे त्यांत कसलेंहि साम्य नाहीं. वरेरकरांचीं नाटकें हीं सर्वस्वीं स्वयंस्फूर्त आहेत, ही गोष्ट त्यांना अत्यंत भूषणावह अशीच आहे. असें असतां त्यांनीं हे शिष्यत्वाचें नसतें 'नाटक' कां करावें ? कोल्हटकरांच्या इतर 'शिष्यवरां'विषयींहि थोड्याफार फरकानें असेंच म्हणतां येईल.

मात्र या सर्वांत गडकऱ्यांची शिष्यत्वाची कल्पना विशेषच तऱ्हेवाईक होती ! कोल्हटकर हे एकटे गुरु करून त्यांचे भागलें नाहीं ! त्यांनीं

गद्यविभागाचें गुरुपद कोल्हटकरांकडे दिलें; पण पद्यविभागाचें गुरुपद आणखी कोणाकडे तरी देणें जरुरीचें होतें. तो मान त्यांनी केशवसुतांना दिला! कोल्हटकरांना गुरु करणें हे त्यांना वर सांगितल्याप्रमाणें अपरिहार्य होतें. पण तेवढ्यामुळे त्यांना नवेनवे गुरु करण्याची जणूं खोडच लागली! तिचाच परिणाम पद्यविभागाचें गुरुपद केशवसुतांकडे देण्यांत झाला! गडकऱ्यांनी कादंबऱ्या, लघुकथा, निबंध वगैरे अन्य वाङ्मयप्रकारांचा हव्यास घेतला असता, तर त्या प्रत्येक प्रकाराबरोबर त्यांच्या गुरूंची संख्याहि फुगत गेली असती, असा तर्क केल्यास तो खचित वावगा ठरणार नाही!

बरें, बुवाबाजीच्या या पुरस्कर्त्यांचें स्वतः दुसऱ्याचें शिष्यत्व पत्करून समाधान होत असेल म्हणावें, तर तसेंहि दिसत नाही! आपल्याप्रमाणेंच ते इतरांनाहि कोणत्या तरी गुरूच्या शिष्यवर्गांत बसवावयास पाहतात! याचें मासलेवाईक उदाहरण माडखोलकरांचें देतां येईल. त्यांनी आपल्या 'कविपंचकां'त Bee यांना केशवसुतांच्या शिष्यत्वाची छाटी लेवविली आहे! या बाबतींत Bee यांचें काय म्हणणें आहे, हे त्यांच्या 'प्रतिभे'च्या १२ जुलैच्या अंकांतील पत्रावरून आतां ध्वनित होत आहे.

अर्थात् वाङ्मयांत पूर्वसूरींचें ऋण होत नसतें, किंवा ते मान्य करावयाचें नसतें, असा माझ्या प्रतिपादनाचा इत्यर्थ नाही. ऋण योग्य प्रसंगी जरूर मान्य करावें; पण त्याचा बुवाबाजीचें स्तोम माजविणें हा प्रशस्त मार्ग नाही, एवढाच माझा कटाक्ष आहे. धार्मिक बाबतींतल्याप्रमाणें ही वाङ्मयांतील बुवाबाजीहि अत्यंत गर्ह्य असून ती मानसिक दास्याची—वातावरणांत उंच फडफडणारी—साक्षात् विजयपताकाच आहे! निदान नवोदित साहित्यिकांनी तरी तिच्या खालीं जमा होण्याची परप्रत्ययनेयबुद्धि प्रगट करूं नये!

* * *

## ६८ ख्रिस्तवासी कविवर्य 'ए. ई.'

'ए. ई.' या टोपण नांवानें जगद्विख्यात असलेले आयरिश कवि जॉर्ज विल्यम रसेल हे नुकतेच ख्रिस्तवासी झाल्याचें वृत्त वर्तमानपत्रांवरून सर्वत्रांस

विदित झालेंच आहे. रसेल हे राजकारणी व समाजसेवक होते, तसेंच ते कांहीं नियतकालिकांचे संपादकहि होते. अध्यात्मप्रवणता व तदनुसार आचरण हें त्यांचें वैशिष्ट्य होतें, व तेंच त्यांच्या कवितांनहि ठळकपणानें उमटलें आहे. विशेषतः भारतीय तत्त्वज्ञानाविषयीं त्यांना विशेष आदर होता, व तो त्यांच्या ' Krishna ' वगैरे कवितांवरून सुव्यक्त होतो.

रसेल यांचे हे स्वभावविशेष लक्ष्यांत घेतले, म्हणजे त्यांच्या कवितेंत विचारविकारांची सखोलता उत्कटतेनें वास करते, हें निराळे सांगण्याचें कारण नाहीं. ते कट्टे सौंदर्योपासक होते, पण त्यांचे सौंदर्यप्रेम पार्थिव नसून अध्यात्माच्या सुवर्णवर्णानें रंजित झालेलें होतें! प्रियतमेच्या सौंदर्यापुढें ते विनम्र होत, पण त्यांच्या मुळाशीं क्षुद्र वासना नसत, तर तें सौंदर्य ईश्वरी सौंदर्याचा अंश आहे, अशी अत्युच्च भावना असे. किंबहुना आपला प्रेमभाग प्रियतमेपुरता मर्यादित न राहतां तो अखिल मानवजातीला व्यापून राहवयास पाहिजे, अशीच त्यांची मनीषा होती; आणि ती त्यांच्या 'Love' नामक अत्युत्कृष्ट भावगीतांत प्रगट झालेली आहे. सदर गीतांतील

When the deep star-chant of
  the Seraphs I hear in the mystical airs,
May I capture one tone of their joy
  for the sad ones discrowned in the night

यांसारख्या चरणांवरून वरील विधानाची सत्यता पटेल.

रसेल यांच्या मृत्यूविषयीं दुःख प्रदर्शित करण्यासाठीं आपल्याकडे एखाद-दुसरी सभा भरविण्यांत आल्याचें वृत्तपत्रांवरून कळतें. तींत बहुतेक वक्त्यांनीं त्यांच्या कवितेंतील अंतर्मुखतेची मुक्तकंठानें प्रशंसाच केली! आणि ती यथार्थहि पण होती. तथापि, अशीच अंतर्मुखता किंवा विचार-विकारांची सखोलता आधुनिक मराठी कवितेंतहि यावयास पाहिजे, असें कोणीहि प्रतिपादन केल्याचें आढळत नाहीं! एवढेंच नव्हे, तर त्या दिशेनें कोणा मराठी कवीनें प्रयत्न केल्यास त्याच्या काव्यकृतीची महाराष्ट्रांत प्रायः उपेक्षाच केली जाते! याचा परिणाम साहजिकच असा झाला आहे कीं अलीकडील बहुतेक सारी मराठी कविता पराकाष्ठेची उथळ बनली आहे!

सध्यांच्या मराठी कवितेला व कवींना हिंदुस्थानाबाहेर तर राहोच, पण खुद्द हिंदुस्थानांतहि जो मान राहिलेला नाहीं, त्याच्या बुडाशीं हा उथळ-पणाच आहे ! परभाषेतील कवींच्या गंभीरतेची तारीफ करावयाची, पण स्वभाषेतील कवींनी तोच कित्ता गिरविल्यास त्यांना मात्र हाणून पाडावयाचे, ही आमच्या टीकाकारांची आत्मघातकी प्रवृत्ति नष्ट झाल्याखेरीज आधुनिक मराठी कविता अंतर्मुख होणार नाहीं व ती तशी अंतर्मुख झाल्याखेरीज तिला चिरकालीनत्वहि प्राप्त होणार नाहीं !

* * *

## ६९ मुनशी-प्रेमचंदांचा स्तुत्य उपक्रम

येथील गुजराथी साहित्यिक पुढारी श्री. कन्हयालाल मुनशी व विख्यात हिंदी कथालेखक प्रेमचंद यांनी मराठी, गुजराथी, बंगाली इत्यादी भाषातील उत्कृष्ट वाङमयाचे हिंदींत भाषांतर करून भारतीय भाषांची साहित्यसेवा हिंदीद्वारां जगापुढे आणण्याची योजना तयार केली आहे. तदनुसार प्रेमचंदांचा 'हंस' बदलणार असून त्यांतून ही भाषांतरे प्रसिद्ध होणार आहेत. त्यांत अर्थातच मराठींतीलहि वाङमय राहील. ही योजना यशस्वी होण्यासाठीं प्रेमचंदांना ती ती भाषा अवगत असणाऱ्या हिंदी लेखकांचे सहकार्यहि संपादिले आहे.

याबाबत एक सूचना करणे अत्यावश्यक आहे. 'माझे घोडे जाऊं दे पुढे' या नीतीने अवलंबन करणारे कांहीं साहित्यिकब्रुव हिंदींत भाषांतर होण्यासाठीं आपल्याच मल्याबुच्या लिखाणाची वर्णी लावतील व त्यामुळे इतर संकोची वृत्तीचे पण लायक साहित्यिक मात्र नाहक मागे पडतील ! कंपूशाहीच्या या दुष्ट परिणामापासून बचावण्याची खबरदारी मराठीकरतां नेमलेल्या भाषांतरकारांनी जरूर घ्यावयास पाहिजे. खुद्द प्रेमचंदहि याबाबत जागरूक राहतील अशी आशा आहे.

अंतर्गत गुणांची उणीव अगडबंब भाषा व कोट्यांच्या कोल्हाटी उड्या यांनीं भरून काढणाऱ्या आमच्या लेखकांचे वाङमय कसास लागण्याचा हा 'बाका' प्रसंग उद्भवला आहे, यांत शंका नाहीं !

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १५

## ७० उथळपणाची तरफदारी !

पत्रिकेच्या नव्या अंकांत रा. ना. म. भिडे यांचे ' यशोगन्धा 'चें परीक्षण आले आहे. त्यांत त्यांनीं या संग्रहांतील, 'मानस', 'शैवालानें आच्छादिलेला विहार ' वगैरे कवितांच्या गूढतेबद्दल ( ! ) तक्रार केली आहे ! ती वाचून हृदयसागरावर अनेक विचारोर्मि हेलावूं लागतात.

वस्तुतः ' यशोगन्धां 'त ज्या थोड्या उत्कृष्ट कविता आहे, त्यांत उपरोक्त कवितांना अग्रस्थान द्यावयास पाहिजे. या कविता रूपकात्मक आहेत व त्यांतील रूपकें स्पष्ट अशींच आहेत. असें असतां या कविता रा. भिडे यांच्यासारख्या विद्वान् टीकाकारास ' अस्वाभाविक ' व ' गूढ ' वाटाव्या, हें महदाश्चर्य होय ! भिड्यांचा हा लेख वाचल्यावर फार जुन्या काळीं ' गुह्यात्–गुह्यतरम् ' अशा ' गीतांजली 'ची मुक्तकंठानें स्तुति गाणारे ना. म. भिडे व 'यशोगन्धा'चें परीक्षण लिहिणारे ना. म. भिडे हे एकच कीं काय, असाहि संदेह उत्पन्न होईल ! आधुनिक मराठी कवितेंत जरा कुठें रूपक वा ध्वनि वापरला. किंवा विचार–विकारांची सखोलता आणली की, आमचे टीकाकार कसा गिल्ला करायला लागतात, याचें हें उत्तम उदाहरण आहे !

एवढ्या–तेवढ्या रूपकानें बिचकणाऱ्या मराठींतील टीकाकारांपुढे मेटरलिंकची 'Blue Bird' व यीट्सची 'The Land of Heart's Desire' ही कृति ठेवल्यास ती त्यांना तुतानखामेनच्या कबरस्थानांतील इष्टका–लेखांप्रमाणेंच अगम्य वाटायला पाहिजे, हें उघड आहे ! तसें त्यांना मनांतून अवश्य वाटतहि असेल; पण तें उघड बोलून दाखविण्याची सोय कुठे आहे ? कारण, मेटरलिंक–यीट्स प्रभृति महाकवींची नाचक्की केल्यास पदरीं अरसिकपणा आल्यावांचून कसा राहील ? तो येऊं देण्याइतके आमचे टीकाकार ' बथ्थड ' थोडेच आहेत ? यामुळे परदेशीय थोरामोठ्यांच्या क्लिष्टांतील क्लिष्ट रचनेलाहि उचलून धरायचें, पण मराठींत कुणी रूपकयोजना केली तरी त्याला झोडपून काढायचें, असें मजेशीर दुटप्पी धोरण आमच्या

टीकाकारांनीं स्वीकारलें आहे! आधुनिक कवितेचा उथळपणा हें त्या धोरणाच्या विषवल्लीला आलेलें एक अत्यंत जहरी फल होय!

अर्थात् वर 'गीतांजलि', मेटरलिंक, यीट्स् हीं नांवें आलीं, यावरून मी गूढगुंजनाचा पुरस्कार करतो, असें समजायचें नाही. काव्यांत व काव्याप्रमाणेंच इतर ललितवाङ्मयांतहि गूढगुंजन असो वा नसो, पण त्यांत जीवितविषयक विचार–विकारांची सखोलता ही मात्र अवश्य असायला पाहिजे. रोमाँ रोलाँ यांची 'जॉन ख्रिस्तोफर' ही कादंबरी तंत्रदृष्ट्या अतिशय विस्कळित असतांहि जगांतील पहिल्या प्रतीच्या ग्रंथांत तिची गणना होते, याचें हेंच कारण नव्हे काय? परंतु ही 'अंतरींची खूण' आमचे वाङ्मय–निर्माते, विशेषतः आमचे 'सुप्रसिद्ध विद्वान् टीकाकार' केव्हां ओळखणार?

* * *

## ७१ गडकरी व प्रो. माधवराव पटवर्धन

'प्रतिभे'च्या २६ जुलैच्या अंकांत प्रो. माधवराव पटवर्धन, 'गोविंदाग्रजांची कविता' या लेखामध्यें गडकऱ्यांच्या 'प्रेम आणि मरण' या कवितेविषयीं लिहितात, "ज्याला कळ्या येतात पण त्या फुलत नाहीत, वादळांत ज्याचें पानहि हलत नाही, परंतु वीज पडून दुभंगून कोसळून पडतांना मात्र ज्याच्या कळ्या फुलतात, कायमच्या खुलतात, असा वृक्ष निरंकुश कल्पनेच्याच सृष्टींत आढळेल." प्रो. पटवर्धन हे स्वतः थोर कवि व अत्यंत रसिक टीकाकारहि आहेत. परंतु 'प्रेम आणि मरण' ही कविता त्यांना रुचत नसल्याचें प्रसिद्धच असल्यामुळें त्यांनीं तिजवर असा आक्षेप घ्यावा, हें साहजिकच आहे.

या आक्षेपांत काव्यामध्ये सत्याचें प्रमाण कितपत असावे, असा तात्त्विक प्रश्न प्रो. पटवर्धन यांनी अप्रत्यक्षपणे उत्पन्न केला आहे. निर्भेळ सत्य हे काव्याचें अधिष्ठान होऊं शकत असल्यास तें कुणाला नको आहे, असें नाही; परंतु निर्भेळ सत्याचा अवलंब केल्यास त्या काव्याची काव्यमयता प्रायः नष्ट होण्याचा–निदान पुष्कळच कमी होण्याचा–विशेष संभव असतो. म्हणूनच कल्पनेचें साह्य घेणें कवींना अपरिहार्य होतें. मात्र कवि हा कल्पनेच्या

अंतराळांत कितीहि उंच जाऊं पहात असला, तरी त्याचे पाय खाली सत्याच्या भूमीवर बळकट रोवले जायला पाहिजेत, ही गोष्ट मलाहि मान्य आहे. नाहींतर त्याची ती कल्पना म्हणजे शुद्ध 'कल्पनाच' ठरायची! याप्रमाणें सत्य व कल्पना यांचें यथायोग्य मिश्रण केल्यास तें कोणत्याहि काव्यांत उपयोगांत आणायला हरकत असूं नये. किंबहुना, काव्यसृष्टींत निर्भेळ सत्यापेक्षां सत्य व कल्पना यांचे मिश्रणच अधिक उपकारक ठरेल, असेंहि म्हणायला हरकत नाहीं. निराळ्या शब्दांत सांगायचें तर, सत्य हें काव्याचें अधिष्ठान नसून सत्याभास हें त्याचें अधिष्ठान असतें, असा निष्कर्ष निघतो.

आतां, हीच कसोटी 'प्रेम आणि मरण' या कवितेस लावून पाहिल्यास काय आढळेल? या कवितेंत तीतील झाडाच्या कळ्या फुलत नाहींत, पण वीज पडून तें झाड दुभंगून पडतांना मात्र त्या कळ्या फुलतात, असें म्हटलेलें आहे, तो केवळ कल्पनाविलास होय, हे खरें आहे. तथापि, या कल्पनाविलासालाहि सत्याचा आधार आहेच. तो असा की, या झाडाला कळ्याच येतात, असे कवीनें म्हटले आहे. त्याला कळ्यांऐवजी छत्र्या येतात किंवा टोप्या येतात, असें जर त्यानें म्हटलें असतें, तर ती मात्र शुद्ध 'थापेबाजीच' झाली असती! परंतु, तसें कवि म्हणत नसल्यानें त्यानें या कवितेंत सत्य व कल्पना यांचें योग्य मिश्रण केले आहे, व तें सर्वथैव समर्थनीयच आहे, असें मानणें भाग आहे.

प्रो. पटवर्धनांना हे ठाऊक नसेल, असे थोडेंच आहे! परंतु सर्व फुलांतील रस चाखणारा भ्रमर चांफ्याला मात्र वर्ज्य समजतो, तसे प्रोफेसरसाहेबांचें 'प्रेम आणि मरण' या कवितेबाबत झालेलें दिसतें. वस्तुतः गडकऱ्यांच्या ज्या सर्वोत्तम कविता आहेत, तींत या कवितेची गणना होते. एवढेंच नव्हे, तर मराठींतील दहा श्रेष्ठतम कविता निवडायच्या झाल्या, तर त्यांत या कवितेचा समावेश अवश्य करावा लागेल!

* * *

## ७२ महाकवि न्हानालाल यांचें भाषण

गुर्जर–महाकवि न्हानालाल यांचें येथील ' प्रेमभक्तिमंडळा'तर्फे साहित्यपर भाषण झालें, त्यांत त्यांनी फ्रेंच व गुजराती वाङ्मय यांचा तौलनिक आढावा घेतला. वाङ्मयाचे वस्तुवाद व भावनावाद असे दोन विभाग होतात. फ्रेंच-मध्यें भावनावादा–( Romantic School )चा उदय १८३० मध्यें झाला. व्हिक्टर ह्यूगो हा त्याचा सर्वश्रेष्ठ पुरस्कर्ता होता. एका फ्रेंच–साहित्याच्या इतिहासकाराने म्हटल्याप्रमाणे सूर्यापासून जसे किरण तसे ह्यूगोच्या लेखणीतून शब्द निघत होते – इतकें त्याचे शब्दसृष्टीवर प्रभुत्व होते ! ' शाकुंतल ' ' मेघदूत ' ' कादंबरी ' हीं या भावनावादाचीं अपत्यें होत. १८८७ मध्ये गुजरातीत ' सरस्वतीचंद्र ' या सर्वोत्तम कादंबरीच्या जन्माबरोबर भावनावादाचाहि जन्म झाला. व्यापकता, गंभीरता व अर्थ-गौरव हे तीन फ्रेंच भावनावादाचे प्रमुख गुण होते, तसेच ते गुजराती भावना वादाचेहि आहेत. १८८० नंतर फ्रेंचमध्यें ध्वनिकाव्याचा (Symbolism चा) प्रचार सुरू झाला. भारतीय वाङ्मयांत तो पूर्वीचाच होता. पण त्याचे पुनरुज्जीवन गुजरातीमध्यें खुद्द न्हानालाल यांच्या ' वसंतोत्सव ' या काव्यानें केलें.— याप्रमाणें न्हानालालांच्या भाषणाचा सारांश असून तो त्यांच्याच शब्दांत येथे ग्रथित केला आहे.

न्हानालालांचा सरस परिचय प्रो. रा. ब. आठवले यांनीं ' प्रतिभे 'च्या खास अंकांत करून दिलेलाच आहे. त्यावरून त्यांच्या 'रासगीता'सारख्या रम्य काव्यकृतींचा आस्वाद घेण्याची लालसा मराठी वाचकांत उत्पन्न झाली आहे. ती ' प्रतिभे 'च्या द्वारें पूर्ण करावी, अशी प्रोफेसरसाहेबांस माझी प्रेमभावपूर्वक सूचना आहे.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १६

## ७३ खांडेकर आणि मी

गेल्या अंकांत ' प्रतिभेचा एक वाचक ' या सहीनिशीं ' रामशास्त्री आणि खांडेकर' या मथळ्याचें जें पत्र प्रसिद्ध झालें आहे, त्याला कबूल केल्याप्रमाणें आज उत्तर द्यावयाचें आहे. या लेखकानें मजवर ' खांडेकर–फोबिया'चा आरोप केलेला आहे ! कंपूशाहीवाल्यांची ही नित्याचीच ' जुगत ' आहे ! एखादा टीकाकार निर्भिडतेनें लिहीत असला, म्हणजे त्यांजविषयीं 'फोबिया ! फोबिया ! '–असा गिल्ला करून त्याच्या लिखाणाला लोकांच्या दृष्टीनें हीनत्व आणण्याची या कंपूशाहीवाल्यांना खोडच जडलेली आहे ! पण त्यांचा डाव न कळण्याइतके निदान ' प्रतिभे'चे वाचक तरी खचित खुळचट नाहींत !

खांडेकर काय, गडकरी काय, अगर अन्य मराठी लेखक काय, यांच्या संबंधींचा माझा दृष्टिकोनच या पत्रलेखकाला कळलेला नाहीं, अथवा कळून घेणें सोईचें वाटलें नाहीं ! केवळ मराठीपुरतें पाहिल्यास हे लेखक श्रेष्ठ ठरतात, हें मलाहि अमान्य नाहीं. परंतु अशी संकुचित बुद्धि न ठेवतां जागतिक वाङ्मयांत मराठी वाङ्मयाला मानाचें स्थान मिळालें पाहिजे, अशी व्यापक कांक्षा माझ्या मनांत वास करीत असते; आणि त्याच दृष्टीनें या थोर साहित्यिकांविषयीं मला प्रसंगोपात्त कटु लिहावें लागतें ! खांडेकरांची कामगिरी मला अविदित कशी असेल ? त्यांचें चौरस लेखन, त्यांची अपूर्व कल्पकता आणि त्यांचा दांडगा उद्योग यांबद्दल मलाहि फार आदर वाटतो. तथापि, या गुणांच्या मानानें त्यांचें वाङ्मय उतरावें तितकें भरीव उतरलेलें नाहीं, असें माझें प्रांजळ मत आहे. तें मी व्यक्त केल्यास मी खांडेकरांचा द्वेष्टा कसा ठरतो ? अलंकारप्राचुर्याचा जबर सोस, बहुलेखनाची अनावर हांव वगैरे दोष कमी झाल्यास खांडेकरांच्या लेखनाला यापेक्षांहि ज्यास्त मोल चढेल, आणि जागतिक वाङ्मयांत कोनाकोपऱ्यामध्यें कां होईना, पण निदान उभें राहण्यापुरती पात्रता मराठी वाङ्मयाला येईल, असें मला अजूनहि वाटतें ! पण ' पुष्पसंगे मातीस वास लागे ' या न्यायानें स्वतःचें

महत्त्व वाढविण्यासाठीं खांडेकरांच्या भोंवतीं गर्दी करून त्यांचीं अवास्तव स्तुतिस्तोत्रें गाणारे व त्या कोलाहलांत माझ्यासारख्याचें स्पष्ट बोलणें बुडवून टाकूं पहाणारे कंपूशाहीवाले ऐकतील तेव्हां ना! उलटपक्षीं, या पत्रलेखकासारखे लोक जागतिक वाङ्मयाची अपेक्षाच कां करतां, अशी गडकऱ्यांवरून मला पृच्छा करीत आहेत! बा पत्रलेखका! जागतिक वाङ्मय धुडकावून लावून फक्त मराठीच्याच चार भिंतीच्या आंत पाहिलें, तर खांडेकर हे बडे साहित्यिक ठरतीलच; पण तूं सुद्धां त्यांच्या पंक्तीला खात्रीनें बसशील!

या पत्रलेखकांनीं आपल्या पत्रांत शॉ, वेल्स, शेले, ब्राउनिंग इ. मोठमोठी मंडळी आणलेली आहे! या सर्वांचे ग्रंथ त्यांनी खरोखरच वाचले असल्यास त्यांच्या तोडीचें खांडेकरांचें साहित्य आहे काय, असा मी त्यांस प्रश्न करतों! पूर्वोक्त सर्व लेखकांचें वाङ्मय वाचूनहि या पत्रलेखकांना खांडेकर त्यांच्याच तोलाचे लेखक आहेत, असें मनःपूर्वक वाटत असल्यास मग त्यांच्या अंधश्रद्धेची कमालच म्हटली पाहिजे! निदान वेळीअवेळीं मार्क्स, 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो,' भांडवलशाही इत्यादि शब्द मुखांवाटे बाहेर काढणारांस तरी अशी अंधश्रद्धा शोभणार नाहीं?

अंधश्रद्धेमुळेच 'जागतिक वाङ्मयांत भर घालण्याजोगें खांडेकरांचें लिखाण महत्त्वपूर्ण आहे काय?–' या माझ्या गर्भित मुख्य प्रश्नाला सदर पत्रलेखकानें बगल दिली आहे, आणि किरकोळ स्वरूपाच्या मुद्यांवरच वाक्पाटव केलेलें आहे! १७ मेच्या 'प्रतिभे'त खांडेकरांच्या भाषेला मीं बोजड म्हटलें आहे खरें; पण त्यांची भाषा अलंकारप्राचुर्यामुळे बोजड झाली आहे, असें मी त्या स्फुटांत कोठेंहि म्हटलेलें नाहीं! खांडेकरांच्या भाषेला दुर्बोध ठरवितांना माझ्या डोळ्यांपुढें हरिभाऊ आपटे प्रभृति कादंबरीकारांची भाषा होती, हें उघड आहे. तथापि तें ध्यानांत न घेतां भाषेंतील अलंकारप्राचुर्य व दुर्बोधत्व यांतील फरकहि मला कळला नाहीं, असें हे पत्रलेखक मोठ्या प्रौढीनें सांगतात! पण तो त्यांचा शुद्ध लाडिकपणा होय!

या पत्रलेखकमजकुरांनीं खांडेकरांच्या अतिशय हास्यास्पद अलंकार-प्राचुर्याची देखील तरफदारी केली आहे! हे लेखक "कम्युनिस्ट मॅनिफेस्टो"चें कारण नसतांहि आपल्या पत्रांत अवतरण देतात, त्यावरून ते माझ्यासारखे

टोपणनांव घेतलेले, पण जरा ' शब्दबंबाळ ' नवमतवादी दिसतात. मजूर वगैरे पददलितांविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या त्यांच्यासारख्या छुप्या साम्यवाद्याने केवळ पंडितोचित अशा अलंकारप्राचुर्याचा " उदो उदो " करावा, हा " वदतो व्याघाता "चा कळसच होय !

खुद्द खांडेकरांनीं पुण्याच्या एका भाषणांत आपल्या अलंकारप्राचुर्याचे कसेंबसें समर्थन केलें होते, व या पत्रलेखकांनींहि आपल्या परात्पर गुरूच्याच सुरांत सूर मिळविला आहे ! काय म्हणे, तर पाश्चिमात्य वाङ्मयाच्या वाचनानें महाराष्ट्रीय तरुण-तरुणींची अभिरुचि अलंकारप्राचुर्याकडे वळली व म्हणून खांडेकरांनीं त्याची कांस धरली ! पण ही मखलाशी बिलकूल पटणारी नाही. शॉ प्रभृतींचे लेखन निरलंकृत नाही, हें कबूल. तथापि तें खांडेकरांच्या लिखाणाप्रमाणें अलंकारांनीं बरबटलेलें आहे, असा हे पत्रलेखक जो ध्वनि काढतात, तो वस्तुस्थितिनिदर्शक वाटत नाहीं ! आणि तो तसा आहे, असें क्षणभर मानलें, तरी खांडेकरांनीं वरील लेखकांच्या सदोष लकबीचेंहि अनुकरण करावें, हा कोठला न्याय ? शिवाय, तरुण-तरुणींस अलंकारप्राचुर्य हवें, हें म्हणणेंहि अतिव्याप्तच ठरेल ! यावर, त्यांना जर तें रुचत नाहीं, तर त्यांच्यांत खांडेकर एवढे प्रिय कां, असें हे पत्रलेखक विचारतात ! पण त्याचें उत्तर असें : खांडेकर हे निदान मराठींत श्रेष्ठ लेखकांत गणले जातात, हें मीं वर सांगितलेंच आहे. त्यांच्या योग्यतेचे कथालेखक मराठींत अत्यल्प असल्यामुळें महाराष्ट्रीय तरुण-तरुणींना त्यांचें वाङ्मय आवडून घेणें भाग पडतें. परंतु त्यावरून त्यांना त्यांचें अलंकारप्राचुर्यहि मनापासून आवडतें असें अनुमान करणें बरोबर होणार नाहीं.

खरी गोष्ट अशी आहे कीं, खांडेकरांनी कै. श्री. कृ. कोल्हटकरांच्या ग्रंथांवरून अलंकारप्राचुर्याची लकब उचलली. कारण तें त्यांच्या लिखाणांत फार पूर्वीपासून दृष्टोत्पत्तीस येतें. परंतु बहुधा विस्मरणामुळेंच ते आपलें या बाबतींतलें गुरुपद कोल्हटकरांकडे स्पष्टपणें न देतां अप्रत्यक्षपणें कां होईना, पण पाश्चिमात्य ग्रंथकारांकडे देऊं पाहत असावेत आणि, हे पत्रलेखकहि त्यांच्याच हाताला हात लावून ' मम ' म्हणत आहेत !

खांडेकरांची गोमन्तक व पुणे येथील साहित्यसंमेलनांतील भाषणें नावीन्य-युक्त होतीं, असा प्रस्तुत पत्रलेखक निर्वाळा देतात ! नावीन्य हें कुणास कुठें आढळेल, याचा मुळीच नियम नसतो ! तशांत कट्टर 'भगता'स तर ते वाटेल तेथें दिसून येईल ! तेव्हां त्याचें हे समाधान हिरावून घेणारा मी कोण ? त्याच-प्रमाणें, गोमान्तक, पुणें वगैरे ठिकाणीं खांडेकरांना अध्यक्षपद देण्यांत आलें, यावरून त्यांचे साहित्यक्षेत्रांतील उच्च स्थान निश्चित होत आहे, असेंहि हे पत्र-लेखक सांगतात ! अध्यक्षस्थान लाभणें हीच जर साहित्यसेवेची खरी कसोटी असेल, तर करंदीकर–किबे–अणे हे प्रत्यक्ष महाराष्ट्रसाहित्यसंमेलनाचे अध्यक्ष निवडले गेले होते, यावरून त्यांची साहित्यसेवा [ ! ! ! ] खांडेकरांच्या साहित्यसेवेपेक्षां सुद्धां श्रेष्ठतर समजावी लागेल ! त्याला या पत्रलेखकांची तयारी आहे काय ?

या खेरीज या पत्रलेखकांनीं न्यायप्रियता, तर्कशुद्धता, चिकित्सक बुद्धी इ० गुणांचा माझ्यांत अभाव आहे, असें म्हटलें असून पर्यायानें ते गुण स्वतःमध्यें असल्याचें ध्वनित केलें आहे. परंतु या बाबत त्यांच्या या आत्मविश्वासाबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यापलीकडे मला कांहीहि म्हणावयाचें नाहीं !

* * *

## ७३ औंधकरांचें औदार्य

औंधचे सुविद्य अधिपति श्री. बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांना महाराष्ट्र-साहित्यपरिषदेला तीन हजार रुपये व पुण्याची जागा दिल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें आहे. परिषदेला स्वतःच्या इमारतीची अत्यंत जरूरी असल्यामुळे श्रीमंतांच्या या देणगीनें इमारतीचा प्रश्न सुटण्यास बरीच मदत होणार आहे. या दृष्टीनें त्यांच्या या देणगीबद्दल त्यांचें अभिनंदन करावयास पाहिजे.

मात्र या देणगीचा मोबदला म्हणून श्रीमंतांना इंदूरच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद जर कोणी देतों म्हणेल, तर तें इष्ट होणार नाहीं. संमेलनाध्यक्ष साहित्यिक असावयास पाहिजे. श्रीमंतांचें ऋण फेडावयाचेंच असेल, तर त्याचे दुसरे अनेक मार्ग आहेत. त्यासाठीं त्यांना अध्यक्षाच्या खुर्चीवर बसविलेच पाहिजे, असें कांहीं नाहीं !

—**प्रतिभा,** वर्ष ३, अंक १७

## ७५ सयाजीराव अध्यक्ष

इंदूरच्या येत्या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद गुर्जराधिपति श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांना देण्यांत येणार असल्याचें वृत्त वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें आहे ! श्रीमंत सयाजीरावांनी या मानाचा स्वीकार केला कीं नाही, हेंहि लवकरच जाहीर होईल !

या बातमीने तरुण साहित्यिकांची तर निराशा झालीच; पण इतरहि साहित्यभक्तांची तशीच निराशा झाली असेल यांत शंका नाही ! व्यक्तिशः श्रीमंत सयाजीरावांबद्दल तरुण साहित्यिकांना देखील प्रेमादरच वाटतो. उभ्या हिंदुस्थानांत बरेचसे प्रगतिप्रिय नृपाल जर कुणी असतील, तर ते श्री. सयाजीरावच होत याविषयीं बिलकूल मतभेद होणार नाही ! तशांत असा आदर्श नरपति महाराष्ट्रीय असावा, ही वस्तुस्थिति तर आपणां सर्वांना अत्यंत अभिमानास्पद अशीच आहे ! तसेच, श्रीमंतसरकारांनी मराठी-भाषाभिवृद्धीसाठी वेळोवेळा जे औदार्य प्रगट केलें आहे त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं त्यांना एकदां संमेलनाध्यक्ष करावें, असें कुणी सुचविल्यास तेंहि विशेष अयथार्थ होणार नाही, असा अभिप्राय सुद्धां एकपरी प्रगट करतां येईल. आणि त्याप्रमाणे कोल्हापुरच्या संमेलनप्रसंगीं त्यांची निवड देखील झाली होती. आतां ते अन्य कारणामुळे प्रत्यक्ष हजर राहूं शकले नाहीत. ही गोष्ट निराळी ! असे असतांना त्यांना हा मान आणखी एकवार देण्यांत काय औचित्य आहे, हे समजणे खरोखरच कठिण आहे !

कोणत्या कां कारणाने होईना, पण एवढ्यांत साहित्यसंमेलनाला संस्थानांचीच हवा विशेष मानवत असल्याचें दिसत आहे ! यामुळे राजेरजवाडे, सरदारदरकदार व बडेबडे सरकारी नोकर व पेन्शनर यांच्याच हातांत प्रत्यक्षाप्रत्यक्ष संमेलनाची सूत्रें गेलीं आहेत ! अर्थात संमेलनांतून हे लोक वगळले जावे, असें कुणीच म्हणत नाही. पण त्यांच्या वरचष्म्यामुळे त्यांतील तेजस्वीपणा लुप्त होत आहे, हे निर्विवाद आहे. बडोद्याच्या गेल्या

अधिवेशनांतील सरकारजमा वाङ्मयावरच्या भाषणांवर प्रगट करण्यांत आलेल्या अभिप्रायांवरून ही बाब स्पष्ट होईल! साहित्यसंमेलन म्हणजे कॉंग्रेसचें अधिवेशन नव्हे, हें जितकें खरें आहे, तितकेंच तें 'नरेंद्रमंडळा'ची नाजुकसाजुक बैठक नव्हे, हेंहि खरेंच आहे !

साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान अव्वल दर्जाच्या साहित्यिकांखेरीज इतरांस न देण्याचा नियम आमचे वाङ्मयधुरीण केव्हां आचरणांत आणतील तो आणोत !

*　　　　*　　　　*

## ७६ वाङ्मयचौर्याचा आळ!

आजकाल वाङ्मयचौर्याचा आळ कुणावर कसा येईल, याला धरबंदच राहिलेला नाहीं ! हिंदी ' सरस्वति ' मासिकाच्या ऑगस्टच्या अंकांत त्या मासिकाचे एक संपादक श्री. नाथसिंह यांनीं सुप्रसिद्ध कथालेखक प्रेमचंद यांजवर वाङ्मयचौर्याचा आरोप केलेला आहे ! प्रेमचंदांनीं 'हंस' मासिकांत नुकतीच ' जीवन का शाप ' ही जी स्वरचित लघुकथा प्रकाशित केली आहे, ती त्यांनीं आपल्या ' उलझन ' नामक कादंबरीवरून कांहींशा फेरफाराने घेतली, असें श्री. नाथसिंह यांचें म्हणणें आहे ! या मताच्या पुष्टीकरणार्थ त्यांनीं त्या उभयतांतील कांहीं साम्यस्थलें दाखविण्याचाहि प्रयत्न केला आहे !

कोणत्याहि दोन लेखकांच्या कृतींत प्रसंगोपात्त जीं साम्यस्थलें आढळून येतात, त्यांच्या मुळाशीं पुढील तीनपैकीं एखादें कारण असूं शकतें. एकतर पुष्कळ वेळां अशीं साम्यस्थलें अगदींच आपाततः येतात. ज्याअर्थी मनुष्याचा स्वभाव, त्याच्या आशा–आकांक्षा, त्यांचीं सुखदुःखें वगैरेचें स्वरूप प्रायः एकसारखेंच असतें, त्याअर्थी एकाच देशांतील व एकाच कालांतील नव्हत, तर भिन्न देशांतील व भिन्न कालांतील सुद्धां दोन लेखकांत सादृश्य दृग्गोचर झाल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कांहींच कारण नाहीं! परंतु ही उपपत्ति विसरून जाण्याकडेच बहुतेक सर्व ' वाङ्मय–फौजदारां 'ची प्रवृत्ति असते ! दुसरें, कित्येक वेळां लेखकाच्या नकळतहि त्याच्या रचनेवर इतरांच्या कृतीची छाप पडलेली असते. आणि तिसरें उघड उघड

अनुकरणबुद्धीनें अगर नुसत्या लाटेबाजीकरतां लेखकवर्ग पूर्वीच्या ग्रंथांतून विचारऋण घेत असतो ! या तीन कारणांतील अखेरचीं दोन कारणें प्रेमचंदांच्या ' जीवन का शाप ' या लघुकथेबाबत सुतराम् संभवत नाहींत ! दुसरें कारण संभवण्यास त्या त्या ग्रंथाचा गाढ परिचय पाहिजे. नाथसिंहासारख्या नवोदित व त्यांतहि स्वनिंदक अशा कादंबरीकाराच्या कथेचीं प्रेमचंदांनीं पारायणांवर पारायणें केलीं असतील, हें शक्य तरी कसें आहे ? आणि, ' घृणाके प्रचारक प्रेमचंद ' या विषदिग्ध लेखाच्या कर्त्यांच्या पुस्तकाचें अनुकरण अथवा चोरी करण्याइतके तर प्रेमचंद खचितच नादान नाहींत ! तात्पर्य, त्यांच्या लघुकथेंतील साम्यस्थलांच्या बाबतींत फक्त पहिलेंच कारण संभवतें, हें स्पष्ट आहे !

प्रेमचंदांनीं आपल्या ' उलझन ' कादंबरींतील कथासूत्र तर घेतलेंच, पण तींतील व्यक्तिनामें सुद्धां उचललीं, असें नाथसिंह म्हणतात ! उदाहरणार्थ, ' उलझन ' मधील ' शीला ' या नांवाचें ' जीवन का शाप ' मधील 'शीरी' हें नांव स्वच्छ अनुकरण होय, असा नाथसिंह बहाणा करतात ! पण त्यांचा हा शुद्ध कांगावा आहे ! ' माधुरी ' मासिक वर्ष ७, भाग २, अंक ३ यांत प्रेमचंदांची ' पर्वत-यात्रा '-शीर्षक लघुकथा प्रसिद्ध झाली आहे. तींत ' शीरीं ' हें नांव आलेलें आहे ! तेव्हां, चोरीचाच आळ घ्यावयाचा, तर प्रेमचंदांनीं नाथसिंहांची चोरी केली, असें म्हणण्यापेक्षां नाथसिंहांनींच प्रेमचंदांची चोरी केली, असें म्हणणें सत्यास अधिक धरून होईल ! 'माधुरीं'-तील उपर्युक्त लघुकथेचा प्रेमचंदांस अनुकूल असा पुरावा आतांपर्यंत कोणत्याहि हिंदी नियतकालिकानें पुढें आणल्याचें निदान मला तरी ठाऊक नाहीं. परवां सहज ' माधुरी ' चीं फायलें चाळतांना हा प्रकार लक्ष्यांत आला, म्हणून तो येथें नमूद केला आहे, एवढेंच.

मराठींतील बहुसंख्य 'वाङ्मयफौजदार' नाथसिंहांच्याच जातीचे आहेत, हें मुद्दाम सांगावयास कशाला हवें ?

* * *



## ७७ अमृत कीं हलाहल ?

कुठेंहि पहा, अतिरिक्त स्तुति ही अमृत न ठरतां हलाहलच ठरते ! तिजमुळें स्तुतिविषयभूत लेखकाची प्रगति तर खुंटतेच; पण सर्वसामान्य वाचकांवरहि तिची विपरीत प्रतिक्रिया होऊन त्यांच्या मनांत त्या लेखकाबद्दल अप्रीति संचारूं लागते ! आणि, आपल्या 'दैवता'ला लोकप्रियतेच्या एव्हरेस्ट शिखरावर चढविण्याचा त्याच्या 'भगतां'चा डाव सपशेल फसतो ! परंतु स्तुतीचे ढोल बडविण्याच्या नादांत कंपूशाहीवाल्यांना या साध्या गोष्टीचेंहि भान राहत नाहीं, ही विशेष मौज आहे !

अलीकडील इंग्रज कवि रूपर्ट ब्रूक याचा हाच प्रकार झाला ! त्याचे लोकोत्तर सौंदर्य व कोंवळें वय आणि त्याच्या कवितेंतील तडफ — यांमुळें त्याची चढत्या मुरांत स्तुति होऊं लागली ! ती इतकी कीं अखेर तिचें पर्यवसान सरळ सरळ निंदेंत होऊं लागलें ! एक टीकाकार सांगतो, "Brooke like many another poet has suffered from over-praise. At the time of his death extravagant claims were made for him; and now the pendulum of opinion has swung too far in the opposite direction" लोकमताचा लंबक किती 'लहरी' असतो, याचा हा उत्तम दाखला होय !

* * *

## ७८ बालकवींची समग्र कविता

'स्मृति–चित्रें' या परम रमणीय ग्रंथाचे दोन खंड हातावेगळे करून श्रीमती लक्ष्मीबाई टिळक यांनीं आतां त्याच्या तिसऱ्या खंडास सुरुवात केली आहे. 'संजीवनी'च्या ५ सप्टेंबरच्या अंकांत कै. बालकवि ठोंबरे यांज-विषयीं मजकूर आला आहे, तो वाचून बालकवींच्या समग्र कवितासंग्रहा-बाबत घडलेल्या अक्षम्य अनावस्थेचें दुःखद स्मरण झाल्याखेरीज रहात नाहीं !

बालकवींची कविता यापूर्वी ग्रंथरूपानें रा. निफाडकर व रा. अधिकारी यांनीं निरनिराळी प्रसिद्ध केली आहे. पण यांपैकीं एकाहि संग्रहांत त्यांची

समग्र कविता समाविष्ट झालेली नाहीं ! त्यांतहि निफाडकरी आवृत्ति म्हणजे ' अजबखाना 'च होय ! ' नाथा 'च्या त्या विदूषकी टीपा, संपादकीयांतील ' रडारडी 'चा तो इतिहास इ० इ० गंमती पाहून वाचकांना निराळ्या अर्थानें ' **नाथा ! बहुत छळियलें !** '—असें म्हटल्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं ! ! त्या मानानें अधिकाऱ्यांची आवृत्ति पुष्कळच बरी !

चार—चौघे परग्रामस्थ जमले म्हणजे व विशेषतः सभा वगैरे असतांना तर बालकवींच्या आठवणीनें ' सार्वजनिक रोदना 'चें नाटक करणारे त्यांचे आणखीहि अनेक मित्र आहेत ! परंतु त्यांतील एकासहि बालकवि जाऊन सतरा—अठरा वर्षे लोटलीं असतांना देखील त्यांच्या समग्र कवितांची अधिकृत आवृत्ति काढण्याची बुद्धि होत नाहीं, हें त्यांचें मित्रप्रेम ( ! ) विलक्षण खरेंच !

विचिकित्सक प्रस्तावना, साधार चरित्र व जुनीं—नवीं पत्रें यांसह बालकवींची समग्र कविता संग्रहित करण्याची योजना तयार करणें हें त्यांचे मित्र म्हणविणारे व इतरहि काव्यरसिक यांचें आवश्यक कर्तव्य आहे.

—**प्रतिभा,** वर्ष ३, अंक १८

## ७९ नवमतवाद

अलीकडे नवमतवादाची चर्चा चांगलीच रंगूं लागली आहे, व तत्त्व-बोधाच्या दृष्टीनें ती इष्टहि आहे. या चर्चेंत जास्त वाचन केलेले तुम्ही कीं मी. मॅग्डूगल प्रभृतींचे ग्रंथ मुळांतून वाचून तुम्हांला कळले कीं मला, यांसारखे जे अप्रस्तुत मुद्दे उपस्थित होत आहेत. त्यांनीं मूळ वादविषयाचें विशदीकरण होत नसेल, तथापि त्या त्या प्रबंधांची रंजकता वाढते, एवढें खरें !

नवमतवादावर घेण्यांत येणाऱ्या आक्षेपांत पुढील " त्रिपुटी " प्रमुख आहे. ( १ ) नवमतवादाला राजकारणाचें वावडें आहे. ( २ ) नवमतवादी पाश्चिमात्यांचे बौद्धिक दास आहेत. ( ३ ) व नवमतवाद हा लैंगिक प्रश्नांपुरताच मर्यादित आहे – ही ती " त्रिपुटी " होय.

" राजकीय वाङ्मयावर सरकारचें कडक नियंत्रण " असल्यामुळें म्हणा, वैयक्तिक आवडी–निवडीमुळें म्हणा, किंवा इतर कांहीं कारणामुळें म्हणा, स्वतःस नवमतवादी म्हणण्यांत ज्यांस भूषण वाटतें, ते लोक राजकारणापेक्षां समाजकारण, धर्मकारण वगैरे प्रश्नांवरच सामान्यतः भर देतात, हें आक्षेपकांचें विधान मान्य करणें भाग आहे. यामुळें, साम्यवाद–राजकारण= नवमतवाद हें समीकरण या वर्गापुरतें तरी खरें ठरतें, यांत शंका नाहीं.

अर्थात् साम्यवादाच्या राजकीय अंगाचा निर्भयतेनें पुरस्कार करणारे लोक अजिबात नाहींत, असें मात्र नव्हे. तसेंच समाजकारण, धर्मकारण इ० बाबतींत त्यांचीं मतें वरील नवमतवाद्यांसारखींच असतात, हेंहि कांहीं खोटें नाहीं. तथापि या लोकांमुळें हे नवमतवादी देखील राजकारणाच्या आखाड्यांतलेच " उस्ताद " आहेत, असें कसें सिद्ध होईल ?

बाकी, समाजकारण, धर्मकारण वगैरे बाबींना धरून असलेला नवमतवाद उपेक्षणीय अगर त्याज्य आहे, असें मलाहि सुचवावयाचें नाहीं. किंबहुना आपल्या समाजाची सध्यांची विसकटलेली घडी नीट बसवावयास नवमत-वादाचाच बऱ्हंशानें अंगीकार करावयास पाहिजे, असें सुद्धां म्हणतां येईल.

दुसरा आक्षेप बौद्धिक दास्याचा. तो एका अर्थी कबूल करावयास हरकत नाही, व त्यांत कमीपणा वाटण्याचेंहि कारण नाहीं. नवमतवादी मार्क्स प्रभृतींचे बौद्धिक दास असतील तर सनातनी मन्वादिकांचे दास आहेत ! आज समाजाला मन्वादिकांच्या शिकवणुकीची गरज नसून मार्क्सप्रभृतींच्या शिकवणुकीची गरज आहे. तेव्हां, ज्या तत्त्वज्ञानाची बिलकुल जरुरी नाही, त्याचें दास्य पत्करण्यापेक्षां ज्या तत्त्वज्ञानाची आत्यंतिक आवश्यकता आहे, त्याचें दास्य स्वीकारणें हेंच श्रेयस्कर नव्हे काय ?

दुसऱ्या अर्थानें मात्र कांहीं तपशिलांबाबत तरी हें दास्य झुगारून द्यावयास पाहिजे, असें म्हणतां येईल. उदाहरणार्थ, साम्यवादी तत्त्वज्ञानांत परिस्थित्यनुरूप कां होईना, पण प्रायः मजुरांच्याच उन्नतीवर जोर देण्यांत येतो. ( हें विधान सदोष असल्याचें दाखविण्यासाठीं माझे कांहीं विद्वान् मित्र आरंभी उल्लेखिलेल्या कांहीं ग्रंथकारांचा ग्रंथसंभार मजपुढें आणून आदळतील, हें मी जाणून आहें, व तें जाणूनच मी उपरोक्त विधान करीत आहे ! ) हिंदुस्थानांतील आपल्या मुंबईसारख्या औद्योगिक शहरांत मजूरवर्गाचें प्राबल्य आहे, हें खरें, आणि त्यांच्या हक्कांसाठीं झगडणें प्राप्त आहे, हेंहि खरें; परंतु मूठभर शहरांव्यतिरिक्त लाखों खेड्यांतून राहणाऱ्या कोट्यवधि शेतकऱ्यांकडेहि लक्ष्य पुरवावयास नको काय ? मजुरांइतकीच त्यांचीहि विपन्न दशा नाहीं काय ? मजुरांच्या प्रश्नांहून त्यांचे प्रश्न निराळे नाहींत काय ? ते सोडविण्याचा प्रयत्न — निदान त्यांचें तात्त्विक दिग्दर्शन तरी कितपत होत आहे ?

आणखीहि कांही " कूटें " स्वतंत्र रीतीनेंच सोडवावयास पाहिजेत. साम्यवादाचें अंतिम पर्यवसान " डिक्टेटरशिप "मध्येंच होणार काय, अशी साधार भीति खुद्द रशियाच्या वर्तमान परिस्थितीवरूनच वाटूं लागते. " झोटिंगशाही " फॅसिझमची असली काय, व साम्यवादाची असली काय, झोटिंगशाही ती झोटिंगशाहीच ! प्रो. ब्रुक्स यांचा चालू वर्षी प्रकाशित झालेला Deliver Us from Dictators हा ग्रंथ व अन्य विद्वानांची

एतद्विषयक अशीच कृति निःपक्षपातीपणानें पाहिल्यास झोटिंगशाहीचें कृष्ण स्वरूप मनःफलकावर बिंबित झाल्याखेरीज राहाणार नाहीं! अशा स्थितींत मौनानें कां होईना, पण तिला संमति देणें कितपत हितपरिणामी होईल?

मार्क्सच्या " Labour Theory of Value " सारख्या कांही प्रमेयांना कित्येक नामवंत तज्ज्ञ प्रतिकूलता दर्शवितात, हेंहि त्याच्या शिकवणुकीकडे तत्त्वदृष्ट्या पाहतांना विचारांत घ्यावयास पाहिजे.

प्रस्तुत विषयाचा वरील सर्व बाजूंनीं कुणा नवमतवाद्यानें स्वतंत्र प्रज्ञेनें विचार केला असल्याचें निदान माझ्या तरी निदर्शनास आलेलें नाही. मग स्वतःच्या " वाचन–अध्ययन–निरीक्षण–वर्तना"ची " आत्मप्रत्यययुक्त अधिकारवाणीनें " कुणी कितीहि ग्वाही देवो!

राहतां राहिला अखेरचा आक्षेप. नवमतवाद हा लैंगिक प्रश्नांपुरताच मर्यादित आहे, एवढेंच नव्हे, तर त्यांत या प्रश्नांचा अगदींच " बेछूट " ऊहापोह केलेला असतो, असें आक्षेपकांचें म्हणणें आहे! कित्येकांचा प्रसंगोपात्त याच्या नेमका उलटहि आक्षेप असूं शकेल! हेंच पहा ना. "हिंदोळ्यावर" कादंबरींत आपला पति विनायकराव याच्या व्यसनाधीनतेमुळें अचला त्याचा त्याग करते, असें विभावरी शिरूरकर यांनी दाखविलें आहे. परंतु व्यसनाधीनतेऐवजीं लैंगिक आकर्षण न वाटल्यामुळें अचला पतित्याग करते, असें दाखविण्यांत आलें असतें, तर तो कदाचित् खराखुरा नवमतवाद झाला असता! गॉल्स्वर्दीच्या 'Forsyte Saga' मधील Irene ही याच कारणामुळें नवऱ्याशीं घटस्फोट करते!

शेवटीं हेंहि नमूद केलें पाहिजे कीं नवमतवादाच्या दृष्टीनें लैंगिक प्रश्नांकडे पाहणें म्हणजे " शृंगारराजा "चा जयजयकार करणें नव्हे! शिरूरकर यांची " हिंदोळ्यावर " कादंबरी व प्रो. फडके यांची " अटकेपार " कादंबरी यांत भेद आहे तो याच दृष्टिकोनाचा. प्रो. फडके यांच्या साहित्यसेवेबद्दल मला केवढाहि आदर असला व तो मी वेळोवेळीं प्रदर्शितहि करीत असलों, तथापि त्यांच्या कांहीं कादंबऱ्यांतील शृंगारिकता व बहुतेक सर्वच कादंबऱ्यांतील ध्येयशून्यता यांचें समर्थन मी करूं शकत नाही!

*   *   *

## ८० स्त्रियांचीं चित्रें !

नवमतवाद्यांची लैंगिक प्रश्नांकडे पाहण्याची दृष्टि व धंदेवाईकांची कामुकतेला आव्हान करणारी बाजारी दृष्टि यांतील फरक विसरल्यामुळें नवमतवादावर कित्येकदां मौजेचे आरोप करण्यांत येतात. विद्वद्वर्य प्रो. पां. वा. काणे यांच्या " धर्मशास्त्रविचारां"त " नवमतवाद्यांना थोडी सूचना " या मथळ्याखाली पुढील मजकूर आला आहे. " आजचे कांहीं नवमतवादी तरुण स्त्री–पुरुषांच्या सुंदर गोष्टी लिहितात व लोकांना वाचण्याची संवय लावतात ही गोष्ट चांगली आहे; पण तसें करतांना कांहीं मर्यादाहि ठेवणें अवश्य आहे. आज कोणत्याहि मासिकाकडे पाहिलें तरी त्यावर दर्शनी चित्र बहुधा स्त्रीचें असतें. " या विधानाचा व्यत्यास केल्यास " मनो-रंजना"दि मासिकं स्त्रीचे दर्शनी चित्र छापतात, एवढ्यावरून त्यांस नवमतवादी गणावे लागेल !

तथापि स्त्रियांच्या चित्रांनी नियतकालिकें व पुस्तकेंहि सजविण्याची प्रवृत्ति निषेधार्ह आहे, हा प्रो. काणे यांचा अभिप्राय सर्वसंमत होण्यासारखाच आहे. टारगट पत्रें व सटरफटर पुस्तकें तर राहोतच, पण प्रो. फडकेकृत " प्रतिभासाधन " व " बी "कृत " फुलांची ओंजळ " यांसारखीं गंभीर पुस्तकेंहि स्त्रियांच्या चित्रांच्या वेष्टणांपासून सुटूं नयेत, हा काय नवमतवाद, कलाप्रेम की शुद्ध बाजारीपणा ?

* * *

## ८१ भाषाशैली (Style)

लाहोरच्या विख्यात "शाहकार" नामक उर्दू मासिकांत "न–म–राशिक" यांचा शैलीसंबंधीं जो उद्बोधक लेख आला आहे, त्यांतील कांहीं भाग हिंदी " हंस " मासिकाच्या ऑगस्ट–सप्टेंबरच्या जोडअंकांत प्रसिद्ध झाला आहे.

कित्येक साहित्यिक नेहमींपेक्षां वेगळ्याच भाषाशैलीचा अवलंब कां करतात, याची या लेखकानें त्रिविध कारणें दिलीं आहेत. ( १ ) जुन्या लेखकांस अपरिचित अशी " भावमय अनुभूति " शब्दांत मांडतांना कांहीं

साहित्यिकांना स्वतंत्र शैली स्वीकारावी लागते. ( २ ) जगाकडे पाहण्याचा दृष्टिकोन भिन्न असल्यामुळें कांहीं साहित्यिक तदनुरूप शैलीची कांस धरतात. ( ३ ) आणि कांहीं जण तर केवळ छाप पाडण्यासाठींच ही " जुगत " करतात ? —याप्रमाणें उपपत्ति लावून हे लेखक म्हणतात, " जेव्हां एखाद्या कलाकारांत भाव—दारिद्य असतें, आणि जेव्हां तो जीवनापासून प्रेरणा व आदेश ग्रहण न करतां केवळ शब्दजालच विणूं लागतो, तेव्हां त्याच्या रचनेंत कृत्रिमता येते. शैलीचा संबंध लेखक व कवि यांच्या मनोभावांशीं जितका असतो, तितका भाषेशीं नसतो. "

इंग्रजी वाङ्मयांत मेकॉलेप्रभृति लेखक प्रामुख्यानें शैलीमुळेंच पुढे आले. परंतु त्यामुळेंच त्यांच्या लिहिण्यांत निर्जीवताहि कशी आली, याचें वर्णन मोर्लेसाहेबांनी मेकॉलेची कार्लाईलशी तुलना करून फार सुंदरतेनें केलें आहे ! मेकॉलेची शैली घासल्यापुसल्या पितळेच्या चकाकीसारखी व कार्लाईलची शैली धगधगणाऱ्या चैतन्यपूर्ण दीपज्योतीसारखी आहे, अशा अर्थाची मोर्लेसाहेबांनी, या प्रकरणीं, जी समर्पक उपमा दिली आहे, तिचें येथे स्मरण होतें !

" न—म राशिकां' च्या वरील तीन वर्गात आपलें स्थान कोणतें आहे, हें ज्यानें त्यानें आपल्या मनाशीं ठरवावें !

* * *

## ८२ राजा उदार झाला, हातीं भोपळा दिला

इंदूरच्या येत्या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान श्री. सयाजीराव महाराज गायकवाड यांना देण्याचा जो बूट निघाला आहे, त्याच्या बुडाशी बहुधा द्रव्याची अपेक्षा असावी, असा तर्क होतो. तो खरा असल्यास सदर अपेक्षा कितपत फलद्रूप होणार, याविषयीं मात्र संदेह उत्पन्न झाल्याखेरीज रहात नाहीं ! कारण, एका संस्थानिकाचा यापूर्वी असाच कटु अनुभव आलेला आहे. ते संस्थानिक मिरजचे अधिपति श्री. बाळासाहेब पटवर्धन हे होत. १९१५ मध्यें भरलेल्या आठव्या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान श्रीमंतांना रा. ब. पाध्ये प्रभृति तेव्हांच्या महाराष्ट्रसाहित्यपरिषदेच्या

चालकांनी आवर्जून दिलें होतें. कां ?—तर म्हणजे भलीभक्कम दक्षिणा उपलब्ध्यासाठीं ! परंतु अखेर मिरजकरांनीं शंभर रुपयांचीच रक्कम देऊन " राजा उदार झाला, हातीं भोपळा दिला " ही म्हण खरी केल्याचें सांगतात !

गुर्जराधिपतींच्या बाबतींतहि कमी–अधिक प्रमाणांत हाच अनुभव येणार नाहीं, याची शाश्वति काय ?

* * *

## ८३ साहित्य–परिषद मुग्ध कां ?

" प्रतिभे"च्या २३ ऑगस्टच्या अंकांत रा. रा. म. आठवले यांनीं " कै. भिड्यांच्या ग्रंथाची गळचेपी ? " या मथळ्याखालीं एक पत्र प्रसिद्ध केलें असून कै. बा. अ. भिडे यांच्या " मराठी वाङ्मयाचा इतिहास " या ग्रंथांत " साहित्य–परिषदे"च्या अधिकाऱ्यांनीं अनधिकृत फिरवाफिरव केली, असा त्यांजवर गंभीर आरोप केला आहे. भिड्यांचा ग्रंथ संपूर्ण असतां तो अपूर्णच छापला गेला, व त्यांत फरकहि पण करण्यांत आला, असे आठवल्यांचे दोन आरोप आहेत. हे आरोप " परिषदे"च्या अधिकाऱ्यांनीं खोडून काढल्याचें निदान माझ्या तरी अजून आढळांत आलेलें नाहीं. परंतु याप्रमाणें लोकांचा झालेला गैरसमज तसाच राहूं देणें " परिषदे"सारख्या संस्थेला हितावह आहे काय ? मग " परिषद " आपली मुग्धता केव्हां सोडणार ?

* * *

## ८४ मुंबई साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद

मुंबई साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाची माळ अखेर श्रीयुत वि. स. खांडेकर यांच्या गळ्यांत पडली हें पाहून मुंबईकर बऱ्याच साहित्यभक्तांचे जीव खालीं पडल्याशिवाय राहिले नाहींत. कारण, या बाबतींत, चर्चेच्या वेळीं, स्वागतमंडळानें दाखविलेल्या " भोजनोत्तर बेताल वृत्ति "वरून, आमच्यापैकीं एका साहित्यभक्तानें काढलेल्या उद्‌गारांप्रमाणें, अध्यक्षपद

खरोखरीच " साहित्यसेवेचा व साहित्य संमेलनाचा कांहीं संबंध नाहीं " अशा एखाद्या माननीयांच्या गळ्यांत पडतें की काय, अशी राहून राहून शंका येऊं लागली होती. पण अखेरीला इतका तोल जाऊं न देतां श्रीयुत खांडेकरांसारख्या एका प्रथितयश साहित्यसेवकाला निवडल्याबद्दल श्रीयुत खांडेकर, यांच्या बरोबर स्वागतमंडळाचेंहि मी मनःपूर्वक अभिनंदनच करतो.

*　　　*　　　*

## ८५ प्रो. पटवर्धनांचा सडेतोडपणा !

येथील एलिफन्स्टन् कॉलेज व रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्स या संस्थांच्या महाराष्ट्र–वाङ्मय–मंडळाच्या वार्षिक स्नेहसंमेलनाच्या वेळी प्रो. माधवराव पटवर्धन यांचें भाषाशुद्धीवर सडेतोड भाषण झालें. त्यांत त्यांनीं हैद्राबादचे सर अकबर हैदरी यांच्या एका आचरटपणाच्या विधानाला खरमरीत उत्तर दिले. पुण्याच्या मुस्लिम शिक्षण–परिषदेत, मराठींतील पेहेलवान, कुस्ती, पेंच हे प्रचलित शब्द मूळ उर्दू भाषेंतील असल्यामुळे इकडील लोकांना मल्लविद्या आम्हींच शिकविल्याचें त्यांवरून स्पष्ट होतें, असा बाष्कळ कोटिक्रम सर हैदरींनी केला होता. तो प्रो. पटवर्धन यांनीं प्रतिकोटि लढवून पार उडवून दिला आहे. पेहेलवान, कुस्ती, पेंच या उर्दू शब्दांवरून जर ही विद्या मराठ्यांना मुसलमानांनी शिकविली म्हणावयाचें, तर गुन्हेगार, खुनी, बदमाष, हेहि शब्द उर्दूच असल्यामुळें ही विद्यादेखील मराठ्यांना मुसलमानांनींच शिकविली, असें म्हणावें लागेल, असा प्रोफेसरसाहेबांनी निरुत्तर कोटिक्रम केला आहे !

मुसलमान हिंदुस्थानांत येण्यापूर्वींच्या संस्कृत ग्रंथांत ' मल्ल ' ' मल्लयुद्ध ' ' मल्लविद्या ' इ० शब्द सांपडतात, त्याअर्थीं ही विद्या मुसलमानांनीं हिंदुस्थानांत नव्यानें आणलेली नाही, हें परस्परच सिद्ध होत आहे.

*　　　*　　　*

## ८६ हेवादावाच नव्हे तर काय ?

परवां " भांडारकर–स्मारक–ग्रंथ " संदर्भासाठीं पुन्हां वाचीत असतांना त्यांतील एका लेखांत प्रो. वै. का. राजवाडे यांनीं भगवद्गीतेंतील चुका

काढलेल्या पाहून मी तरी " आइस्क्रीम "च बनलों ! छे, छे, छे ! व्यासासारख्या महर्षींच्या कृतींतील दोष दाखवावयाचे म्हणजे काय बात आहे ! बस्स, माझा तरी ठाम निश्चय झाला कीं, प्रो. राजवाडे यांचा व्यासाशीं कांहीतरी ' हेवादावा ' असला पाहिजे ! त्याखेरीज का त्यांनीं त्याच्या चुका काढल्या ? माझा असा अजमास आहे कीं, पांडवांच्या कालीं जन्मास येऊन स्वतःच महाभारत लिहिण्याची प्रोफेसरसाहेबांची इच्छा असली पाहिजे ! व ती व्यासानें विफल ठरविल्यामुळें त्याजवर त्यांचा रोष असला पाहिजे ! एरव्हीं उपर्युक्त मुनिवर्यांच्या ग्रंथाबद्दल " इतकें चिडून असंबद्ध व भरमसाट " लिहिण्याचें त्यांना काय कारण होते ?

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक १९

## ८७ 'जागतिक वाङ्मय व कंपूशाही'

मराठी वाङ्मय जागतिक वाङ्मयाच्या पदवीचें नाहीं, असें मी पुनःपुन्हां प्रगट-अप्रगट रीतीनें प्रतिपादीत आलों आहें. अलीकडे माझ्याच सारखें मतप्रदर्शन तुरळक होऊं लागलें आहे व उत्तरोत्तर तें अधिकाधिक होऊं लागेल अशी माझी खात्री आहे. "सह्याद्री"च्या आक्टोबरच्या अंकांतील "समीक्षकां"चा "मराठी वाङ्मयाचे महान् दोष" हा लेख, "ध्रुवा"च्या ऑगस्टच्या अंकांतील "अनामिकां"चा "महाराष्ट्र बुद्धिमान् आहे काय?" हा लेख, "विश्ववाणी"च्या ऑक्टोबरच्या अंकांतील "निवेदन" व "विश्वमंदिर" हे लेख आणि "विहंगमा"च्या सप्टेंबरच्या अंकांतील "संपादकीय" हा लेख पाहिला असतां वरील विधानाची सत्यता पटेल. पुण्या-मुंबईपासून नागपूरापर्यंतच्या अखिल महाराष्ट्रांत मी प्रगट केलेल्या विचारांसारखे विचार हळूहळू कसे व्यक्त होत आहेत, हें दाखविण्यासाठींच मी वर पहिलीं दोन मासिकें पुण्याचीं, तर दुसरीं दोन नागपूरचीं घेतलीं आहेत.

कंपूवाल्यांची सुद्धां सर्वसाधारण मराठी वाङ्मयाविषयीं कमीअधिक प्रमाणांत वरीलप्रमाणें समजूत असते. मात्र आपल्या "परम दैवता"चें लिखाण बाकीच्या मराठी वाङ्मयाइतकें रद्दड नसतें, अशी ते या समजुतीला मुरड घालीत असतात, एवढेंच! त्यांच्याशीं दोन हात करावे लागतात, ते याच पक्षपातामुळें!

"सह्याद्री"तील "समीक्षकां"चा लेख अतिशय सडेतोड आहे व त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. त्यांच्या लेखाचा प्रारंभच असा आहे: "सामान्यतः वाङ्मयाचा, पण विशेषतः परभाषीय वाङ्मयाचा, अभ्यास करीत असतांना मराठी वाङ्मयाला जागतिक संस्कृतिक्षेत्रांत मानाचें नाहीं तरी निदान नामाचें स्थानहि अजून कां प्राप्त होत नाहीं?......" या वाक्यांत "समीक्षकां"नीं "जागतिक संस्कृति" असा शब्दप्रयोग वापरला आहे, त्यावरून ते जागतिक संस्कृतीचा अभ्यास केला असल्याची बढाई

सांगतात, असा कांगावखोरपणाचा गिला केल्यावांचून कंपूवाले राहतील, असा निदान माझा तरी होरा वाहत नाहीं !

"समीक्षकां"नीं काव्य, टीका वगैरे ठळक ठळक वाङ्मयप्रकार दुय्यम दर्जाचे ठरविले आहेत, व त्यांचा हा अभिप्राय तिऱ्हाइतास संमत होण्यासारखाच आहे. ते लिहितात, "एका नामांकित कवीचा नवा काव्यग्रंथ" वाचतांना कुठल्याच पानावर स्थिरावें. किंवा कांहीं अगदीं हाताच्या बोटावर मोजण्याइतक्या कविता सोडून दिल्या तर एखादी तरी कविता संपूर्ण वाचावी, असें मला वाटलें नाहीं !" नवा काव्यग्रंथ छापलेले हे नामांकित कवि बहुधा "यशवंत"च असावेत, व त्यांचा हा नवा काव्यग्रंथ "यशोगंध" हाच असावा ! २८ जूनच्या "प्रतिभे"त "यशोगंधा"बद्दल मी असेंच लिहिलें होतें, तेव्हां कंपूवाल्यांना मिरचीची पूड उधळल्यासारखें झालें होतें ! "यशवंतां"ची प्रतिभा खरोखरच उज्ज्वल आहे. त्यांनीं चर्वितचर्वण सोडून काव्यदेवतेला नित्य नवीं लेणीं चढवावीं, अशी त्यांच्या चहात्यांची बलवत्तर इच्छा असते. ती त्यांनीं शब्दांत प्रगट केल्यास यशवंतांचा द्वेष केल्यासारखें कसें होतें ?

मराठींतील टीकावाङ्मयावर "समीक्षकां"नीं परभृततेचा छाप मारला आहे ! बहुसंख्य कंपूवाले हे स्वतःस टीकाकारच म्हणवीत असल्यामुळें हा परभृततेचा छाप वैष्णवांच्या तप्तमुद्रेसारखा त्यांना अंगार उडविणारा वाटेल ! "समीक्षकां"नीं "स्वतंत्र विचारानें तत्त्वें ठरवून जर मराठी टीकाकार लिहीत असतील, तर दुसऱ्या कोणत्याहि देशांतील वाङ्मय-टीकाकारांपेक्षां त्यांच्या लेखांत इंग्रजींत उतारे कां असावे ?"-असा प्रश्न करून तर टीकाकारांच्या काळजालाच हात घातला आहे ! बरें, परभृत असूनहि आमचें टीकावाङ्मय भरीव असेल म्हणावें, तर तसेंहि प्रायः दिसत नाहीं ! अपसिद्धांत व उथळपणा यांच्या भुंग्यांनीं तें जागोजाग पोखरून टाकलें आहे ! परंतु असें म्हणणाऱ्यांसच "शिष्ट", "सुतकी", "चिंतातुर जंतु" वगैरे शेलके शब्द लावतांना "वाचकांच्या सौजन्याचा आपण किती फायदा घेत आहोंत" याची या टीकाकारांना जाणीवहि असलेली दिसत नाहीं.

काव्य व टीका यांच्याप्रमाणेंच सरसकट मराठी वाङ्मयाबद्दलहि "समीक्षकां"नीं असेच निराशेचे उद्गार काढले आहेत! सबब, मराठींतील सर्वच वाङ्मयप्रकारांच्या सर्वच "समीक्षकां"ना "फोबिया" झाला आहे, असें अनुमान काढावयाचें की काय?

* * *

## ८८ ललितवाङ्मय व विद्वत्ता

लोकांचे विद्वत्तेसंबंधी एकंदरीनें चमत्कारिक ग्रह बनलेले आढळून येतात! सडकून बोजड लिहील त्यालाच सामान्यतः "विद्वान्" ही उपाधि मिळते! यामुळें ज्यांनीं फक्त ललितवाङ्मयनिर्मितिच केली, अशा लेखकांना या विशेषणापासून प्रायः वंचित ठेवण्यांत येतें! हा प्रकार आपल्याकडेच घडतो असें नाहीं, तर पाश्चिमात्यांतहि तो अनेकदां घडतो. सर ऑर्थर क्विलरकोच या विख्यात आंग्लसाहित्यिकाची अशीच गत झाली. सरसाहेब हे प्रथम कादंबरीलेखनावरच भर देत असत. क्वचित् ते काव्यलेखनाचें तोंडी लावणें उपयोगांत आणीत तेवढेंच. १९१२ मध्यें इंग्रजी साहित्याचे प्रोफेसर म्हणून त्यांची केंब्रिज युनिव्हर्सिटीनें जेव्हां नेमणूक केली, तेव्हां या "अविद्वान्" (?) कथालेखकाला ही पंडितासच शोभणारी जागा कशी काय देण्यांत आली, याचा पुष्कळांस अचंबा वाटला! आतां याच कादंबरीकारानें उत्तम टीकाकार म्हणून कीर्ति मिळविली, ही गोष्ट वेगळी! सरसाहेबांचा "द पोएट अ‍ॅज़् सिटीजन" हा टीकात्मक प्रबंध चालू वर्षी मॅकमिलन कंपनीनें प्रसिद्ध केला असून या ग्रंथाच्या परीक्षणलेखांत एका लेखकानें वरील प्रसंगाचा उडता उल्लेख केला आहे. ग्रंथांत अ‍ॅरिस्टॉटल्, क्रोचे प्रभृति नाणावलेल्या तत्त्वज्ञांशींहि सरसाहेबांनीं यशस्वी टक्कर दिलेली आहे, ही एकच गोष्ट त्यांच्या विद्वत्तेची साक्ष देण्यास पुरेशी आहे.

आपल्याकडे "आपण बुवा स्वतःच्या कवितेखेरीज बाकी कांहींहि वाचीत नाहीं!" असें सांगणारे कांही अल्पसंतुष्ट ललितवाङ्मयसेवक असले, तथापि सारेच इतके निर्लेप नसतात. खांडेकरादि कथालेखक, वरेरकरादि नाटककार अगर यशवंतादि कवि कदाचित् बोजड विद्वान् नसले, तरीपण

त्यांनीं आपापल्या वाङ्मयविषयाचें विस्तृत व मार्मिक अध्ययन केलेलें आहे, हें निर्विवाद आहे. परंतु या थोर साहित्यिकांसारख्याच दुसऱ्या एका थोर साहित्यिकाला ते केवळ कवि आहेत, त्यांनी शंभर नंबरी बोजड लेख खरडले नाहींत, अशा सबबीवर एका कॉलेजांत प्रोफेसर म्हणून नेमावयास प्रथम हरकत घेण्यांत आली होती, अशी बोलवा आहे.

विनोदी नाटककार रा. माधवराव जोशी यांचा एखाद्या प्रोफेसराचाहि नसेल इतका नाट्यवाङ्मयाचा आजतागायत अभ्यास आहे, हें कुणास सांगूनहि खरें वाटणार नाहीं.

*　　　*　　　*

## ८९ दोन ध्रुव

कित्येकदां दोन ध्रुवांसारखीं अगदीं परस्परविरुद्ध मतें प्रदर्शित करण्यांत येतात ! याचा एक ताजा मासला देतों. " चित्रा " साप्ताहिकाच्या द्वितीयांकांत रा. वि. ह. कुळकर्णी, एम्. ए. हे लिहितात, " फडक्यांना खांडेकरांनीं मागें सारलें, हें त्यांच्या " दोन ध्रुव " व " उल्का " या दोन कादंबऱ्यांनीं सिद्ध करून दाखविले आहे. मध्यंतरी पु. य. देशपांडे यांनी " बंधनाच्या पलीकडे " जाऊन तरुण वाचकवर्गाचें मन आपल्याकडे आढून घेतले होतें. पण त्यांचें लेखन मंदगतीनें होत असल्यामुळें त्यांना आपली लोकप्रियता ताजी ठेवतां आली नाहीं. "

उलटपक्षीं " लोकशिक्षणा "च्या सप्टेंबरच्या अंकांत रा. काकासाहेब कालेलकर यांनीं बहुलेखनाविषयीं नापसंतीच दर्शविली आहे ! ते म्हणतात, " इतर कादंबरीकार व वामनराव ( प्रो. वा. म. जोशी ) यांच्यामध्यें एक मोठा फरक दृष्टोत्पत्तीस येतो. कादंबरीकाराची एकदां कीर्ति झाली म्हणजे पैशाची टांकसाळ उघडण्याची त्याला बुद्धि होते आणि एकामागून एक कृति आतषबाजीप्रमाणें तो सोडीत असतो. "

या दोघां विद्वानांचे हे परस्परभिन्न अभिप्राय वाचल्यानंतर बहुलेखन इष्ट की अनिष्ट, याचा निवाडा करणें " इतरेजनां "स कठिणच जाणार आहे !

*　　　*　　　*

## ९० भवभूतीचें पद्मपूर सांपडलें !

कालिदासाच्या तोडीचा संस्कृत नाटककार भवभूति हा विदर्भांतील पद्मपूर येथील मूळ रहिवाशी होता, असें त्याच्या नाटकांवरून दिसतें. परंतु हें पद्मपूर नक्की कोणतें, याचा छडा अजूनपर्यंत कोणत्याहि यूरोपीय अगर भारतीय विद्वानास लागला नव्हता. **तो मान मध्यप्रांतांतील प्रसिद्ध संशोधक प्रो. मिराशी यांनीं अखेरीस मिळविला आहे.** नागपूरजवळच्या भंडारा जिल्ह्यांतील सध्यांचें पदमपूर हेंच भवभूतीचें पद्मपूर होय, असें "**इंडियन हिस्टॉरिकल** क्वारटर्ली"मधील एका लेखांत प्रोफेसरसाहेबांनीं साधार दाखवून दिलें आहे. या आंतरराष्ट्रीय महत्त्वाच्या शोधाबद्दल **प्रो. मिराशी** सर्वांच्या आदरास पात्र आहेत.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक २०

## ९१ इंदूरचें अध्यक्षपद

येत्या साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षाची निवडणूक होऊन परवां निकालहि जाहीर झाला. सावरकर, सरदेसाई, फडके, वरेरकर इ० सामान्य लेखकांची नांवें बाजूला पडून औंधचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली, हें बरें झालें. मी श्रीमंतांचें या मानाबद्दल अभिनंदन करतों

पंतप्रतिनिधींची ओळख महाराष्ट्रास नवीन नाहीं. औंध संस्थानची प्रगतिप्रियता, किर्लोस्करवाडीसारख्या कारखान्यांचा उत्कर्ष, चित्रकलेचा परामर्श, तरुणांच्या बलशालित्वाबद्दल ' साष्टांग ' खटपट, इत्यादि गोष्टींबद्दल श्रीमंतांची ख्याति आहे. आतां साहित्य हा त्यांचा प्रांत नव्हे, हें खरें. पण परप्रांतावरचें हें आक्रमण, एकतर, त्यांच्यासारख्या संस्थानिकांस भूषणास्पदच आहे व या विजिगीषेंत क्वचित् अन्यायाचा भाग असला, तरी त्याचें पाप त्यांना पदरच्या मानकऱ्यांवर ढकलतां येईल. कारण धन्याचें यश वाढावें, याच सदिच्छेनें त्यांनींहि झालें तरी हा ' अव्यापारेषु व्यापार ' केला आहे !

बाकी, तसें पाहिलें तर, प्रतिनिधींची निवड कोणाहि निःपक्षपाती त्रयस्थाला मान्य होईल अशीच आहे. या निवडणुकीबाबत साहित्य-परिषदेला औंध संस्थानाकडून पुणें येथें थोडीशी जागा मिळणार आहे, अशा वदन्तेचा उल्लेख मीं मागें केलाच होता. तो खरा असल्यास त्या जागे-बद्दलचे दस्तऐवज रीतसर झाल्याची बातमीहि साहित्य-परिषदेनें लौकरच प्रसिद्ध करावी, म्हणजे निवडणुकीच्या औचित्याबद्दल परिषदेच्या कार्यकारी-मंडळाप्रमाणेंच सर्वांचीहि हमखास खात्री पटेल. इतक्या उपरहि कांहीं " संशयात्मे " रहातील तर त्यांस दुराराध्य " नवमतवादी " म्हणून सोडून द्यावें, किंवा त्यांना पुढील गोष्टी सांगून पहाव्यात—

मराठीच्या प्रेमासाठीं रात्रंदिवस पोट बांधून राबणारे वरेरकर, सावरकर, सरदेसाई, खांडेकर इत्यादि सामान्य लेखक व प्रतिनिधि ह्यांच्यांत फार मोठें अंतर आहे. प्रोफेसर फडक्यांच्याप्रमाणें त्यांच्या हातून कधींहि वाङ्मयचौर्य घडलेलें नाहीं; कारण, त्यांनीं प्रतिभासाधनासारख्या ग्रंथलेखनाचा खटाटोप कधींहि केलेला नाहीं. रावसाहेब सरदेसायांसारखें त्यांनी मराठी दप्तरांच्या धुळीनें स्वतःचे अंग कधींहि मळवून घेतलेलें नाही; कारण, कै. राजवाड्यांनीं म्हटल्याप्रमाणें मराठ्यांच्या इतिहासाची कदर आमच्या संस्थानिकांपेक्षां पोटापाण्याच्या विवंचनेंत असणाऱ्या आमच्या दरिद्री लेखकांना असावी, हेंच जास्त युक्त आहे! तसेंच म्हटलें तर, यापुढें प्रतिनिधींच्या देणगीच्या जोरावरच साहित्यपत्रिकेंतून " रद्दींतील रत्नांचें संशोधन " दुप्पट जोमानें सुरू होणार आहे, ही श्रीमतांचीच कामगिरी नव्हे काय? त्यांची साहित्य-सेवा सरकारांतहि मान्य आहे आणि सावरकर यांच्यासारख्यांना राजमान्यतेचा शिरपेंच लाभलेला नाहीं हें वरवर पहाणारालाहि दिसून येण्यासारखे आहे. हा फरक काय कमी महत्त्वाचा? वरेरकरांसारखा नाटकसिनेमांच्या नादीं लागण्याचा थिल्लरपणा त्यांनीं केलेला नाहीं; कारण, त्यांनीं नाटकें लिहिलेलींच नाहींत. तरीपण मराठींतल्या एका " शंभर टक्के " विनोदी नाटकाच्या जन्माला त्यांची आठवणच स्फूर्तिप्रद झाली आहे, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. अशा प्रकारची दिव्यदृष्टि लाभल्यास प्रतिनिधींच्या अंगच्या अनेक गुणांची गुप्तगंगा सगळ्यांना दर्शन देती होईल, यांत मला मुळीच शंका वाटत नाही.

*　　*　　*

गेल्या दहा वर्षांत इतक्या वेळां संमेलन संस्थानांत भरलें. सर्व तऱ्हेचे इतमाम, मेजवान्या इत्यादि दृष्टींनी लेखक-वर्गाला संस्थानांचा मोह पडावा, यांत नवल नाहीं! पण संस्थानी परिस्थितीनें, ठराव, चर्चा वगैरे बाबतींत, संमेलनावर नसते निर्बंध पडल्याचा अनुभव आला आहे. त्यांतच कोणी सरदार म्हणून, कोणी श्रीमंत, कोणी राजकारणी मुत्सद्दी, कोणी संस्थानिक—अशा एकाहून एक वरचढ अध्यक्षांची निवडणूक; म्हणजे दंडाच्या काढण्यांत मुसक्यांची भर! ही स्थिति वाङ्मयाच्या वाढीच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट आहे, असें आमच्या लेखकांना अद्यापहि वाटत नाहीं काय? अशा वेळीं

घडाडीचा, व्यापक विचारांचा, कर्तबगार आणि लेखनतपस्येचे तेज पाठीशी असलेला अध्यक्ष आम्हांला कां निवडतां येऊं नये, या गोष्टीचा विचार करण्याची वेळ अजूनहि आली नाहीं काय? संमेलनाची घटना, तरुण साहित्यिकांच्या आकांक्षांची पद्धतशीर कुचंबणा, विशिष्ट गांव किंवा कंपू यांचा डोईजडपणा, याच गोष्टी सांप्रतच्या अनिष्ट स्थितीच्या मुळाशी आहेत आणि वेळीच सावध होऊन या जुलमाचा प्रतिकार करण्याची योजना तयार केली पाहिजे, एवढेच मी तूर्त सुचवून ठेवतो.

* * *

## ९२ कै. अण्णासाहेब किर्लोस्कर

उद्यां पुणे येथे किर्लोस्कर-सप्ताह सुरु होणार आहे अर्थात्च उद्यांपासून सात दिवस मराठी रंगभूमीचे अनेक चहाते आणि अभिमानी कै. अण्णासाहेबांच्या स्मृतिगौरवांत दंग होतील.

कांही वर्षांपूर्वी विलायतेत शेक्स्पीयरच्या स्मृतिदिनाचा असाच एक समारंभ झाला होता. स्ट्रॅटफर्ड ऑन् ॲव्हॉन येथाल त्याच्या स्मरणार्थ बांधलेल्या नाट्यगृहांत शेक्स्पीयरच्या कांही नाटकांचे खास प्रयोग व्हावयाचे होते. त्यासाठी इंग्रजी राष्ट्रीय जीवनांतली सर्व तऱ्हेची बडीबडी धेंडे एकत्रित झाली होती तिथेच विख्यात नाटककार, विक्षिप्तमूर्ति बर्नार्ड शॉ अनपेक्षित रीत्या उपस्थित झाले शेक्स्पीयरसंबधीची शॉची मते प्रसिद्ध असल्यामुळे पुष्कळांना त्यांच्या उपस्थितीचे साहजिकच कुतूहल वाटले. चेस्टरटन यांनी शॉचे स्वागत करून म्हटले, ‘तुम्ही आलांत फार छान झाले! Better a living dog than a dead lion!’

मराठी रंगभूमीच्या सिंहाची शिकार काळानें करून टाकलीच आहे. तिच्या अवशिष्ट वैभवाचे रक्षण करणारे ‘इमानी कुत्रे’ हि सध्यां डोळ्यांसमोर फारसे दिसत नाहींत!

किंबहुना, मुद्दाम राखून ठेवावें, असे मराठी रंगभूमीवर आणखी थोड्याच वर्षांत कांही शिल्लक राहील कीं नाही, असा प्रश्नच पडतो कै. अण्णा-

साहेबांची उद्यां पन्नासावी पुण्यतिथि. एवढ्या अवधींत संगीत नाटकांचा उदयास्त होऊनहि गेला. अनेक मंडळ्या निघाल्या, लाखों रुपयांची उलाढाल झाली, अनेकांचीं चरित्रें नाट्यविषयक कर्तृत्वानें उजवून गेलीं. पण शेवटीं खुद्द पुण्यासच कै. अण्णासाहेबांच्या स्मृतिनिमित्त बांधलेलें 'किर्लोस्कर' नाटकगृह बोलपटांच्या जमान्यांत ' नामशेष ' झालें. किर्लोस्करसप्ताहांत रंगभूमीचें गतवैभव कसें परत मिळेल याविषयीं अवश्य विचार झाला पाहिजे. तरच किर्लोस्करांचे ऋण फेडण्याचें श्रेय खरोखर मिळणार आहे.

*　　　*　　　*

## ९३ रंगभूमि व बोलपट

पण एक गोष्ट स्पष्टपणें लिहिली पाहिजे. रंगभूमीचा उद्धार म्हणजे बोलपटावर बहिष्कार नव्हे. आज या समजुतीनें पुष्कळांना पछाडलेलें दिसतें. या समजुतीतून एक अनिष्ट प्रवृत्ति उगम पावूं लागली आहे. रंगभूमीचा अभिमान धरावयाचा म्हणजे बोलपटांच्या जगाची सर्वतोपरी निंदा केलीच पाहिजे, अशी कित्येकांच्या मनाची प्रवृत्ति दिसते. पण ती कितपत योग्य आहे ? बोलपटांच्या जगांतलें वातावरण आज कांहीं दृष्टींनीं अनिष्ट असेल. पण नाटकांच्या जगांतील वातावरण तरी वेगळें आहे का ? ललितांची नाटकें झालीं, त्यांतून संगीत मंडळ्या निघाल्या; त्यांचा अंतर्गत इतिहास कितीसा स्पृहणीय आहे ? बोलपट ही नव्या युगाची कला आहे, आणि हिंदुस्थानांत आज ती बाल्यावस्थेंत असली तरी तिच्या पोटीं रंगभूमीचेंच कार्य अनेक पटींनीं चांगलें करण्याचें सामर्थ्य आहे, ही गोष्ट कशी विसरतां येईल ?

विशेषतः वाङ्मयसेवकांना बोलपटाचें जग जास्त जिव्हाळ्याचें व्हावयास पाहिजे. आधींच मराठी लेखकांना नर्मदा–तुंगेच्या मर्यादा अनुल्लंघनीय झाल्या आहेत. मराठी किंवा हिंदी साहित्यिकांची मराठी वाचकांना जितकी ओळख आहे तितकी महाराष्ट्राबाहेर मराठींतल्या ' नामवन्त, ' 'क्रांतिकारक' ' नवविचारप्रसू ' लेखकांचीहि आहे किंवा नाहीं, याची शंकाच आहे. तिकडे शरच्चंद्र चतर्जी, आगाहश्र काश्मिरी, मुन्शी प्रेमचंद यांच्यासारखे

लेखक धडाक्यानें सर्वदेशीय कीर्ति मिळवीत आहेत. आणि आमच्याकडे? आम्ही बहुधा बोलपटांच्या नांवानें बोटेंच मोडीत राहणार! आणि आमचे प्रतिभाशाली नामवन्त लेखक स्वतःच्याच कुढ्या क्षेत्रांत घोंटाळत राहणार! नाहीं म्हणावयाला, 'अमृतमंथन'चे लेखक प्रसिद्ध कादंबरीकार श्री. ना. ह. आपटे यांचें नांव या बाबतींत अपवादात्मक ठरणार, असें दिसतें. 'अमृतमंथन' ही बोलपटासाठीं सर्वस्वीं नवीन रचलेली कथा होती. त्यापेक्षां त्यांचीच एखादी पूर्वरचित कादंबरी चित्रित होती व तिला 'अमृतमंथन'चें यश मिळतें, तर मराठी वाङ्मयाचें यश सहजासहजीं 'अटकेपार' गेलें असतें.

—**प्रतिभा**, वर्ष ३, अंक २१

## ९४ मुंबई–साहित्य–संमेलन

इतकें दिवस गाजत असलेलें मुंबई व उपनगर मराठी साहित्यसंमेलन अखेर सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. खांडेकर यांच्या अध्यक्षत्वाखालीं उत्तम रीतीनें पार पडलें, याबद्दल कोणाहि मुंबईकरास आनंद व समाधानच वाटेल. वास्तविक साहित्याचें क्षेत्र म्हणजे लिंगवयजातिभेदातीत, केवळ गुणांवर अवलंबून; तथापि आमच्या दुर्दैवानें याहि क्षेत्रांत असल्या दुहीचें रण माजतें कीं काय, अशी शंका वाटूं लागली होती. एवढेंच नव्हे, कांहीं उपद्व्यापी लोकांनीं मुळांत बारीकशी पेटलेली ही ठिणगी वारा घालून अधिक फुलविण्याचा प्रयत्नहि केलेला अजून कित्येकांच्या स्मरणांतून गेला नसेल. तथापि अखेर स्वागत–मंडळाचे कुशल कर्णधार नामदार जाधव यांची समतोलवृत्ति व मुंबईकर साहित्यिकांची असंकुचित मनःप्रवृत्ति यांनीं तो सर्व प्रसंग अजिबात टाळून शेवट अत्यंत गोड झाला. हें खरोखर मुंबईकर साहित्यिकांस भूषणावह नाहीं, असें कोण म्हणेल?

* * *

## ९५ खांडेकरांचें भाषण

अध्यक्षांनीं आपल्या २६ पानी भाषणांत 'ललितवाङ्मय हेतुप्रधान असावें काय?' या एकच प्रश्नाचा उहापोह केला, व त्याचें होकारार्थी उत्तर देऊन शिवाय ही सहेतुकता साम्यवादाशीं समांतर असावी, असाहि अभिप्राय व्यक्त केला. रा. खांडेकर यांचीं हीं विधानें मला बव्हंशीं मान्य आहेत, हें आधींच सांगितलेलें बरें.

मात्र ललितवाङ्मय सहेतुक असावें, हा खांडेकरांचा प्रतिपाद्य मुद्दा अलिकडील काळांत तरी नवा नाहीं. त्याचें कमी अधिक विवेचन यापूर्वी इतरांनीं केलेलें आहे; एवढेंच नव्हे, तर खुद्द खांडेकरांनींहि या विषयाला मागें स्पर्श केलेला आहे! असें असतां त्यांनीं आपल्या भाषणाचीं सव्वीसचीं सव्वीस पानें या एकाच प्रश्नावर खर्ची घातलीं, याचें मजप्रमाणेंच पुष्कळांस

आश्चर्य वाटेल ! परंतु तोच तो मुद्दा पुनःपुन्हां मांडल्याने 'संशयात्म्या'चे उरलेसुरले संशय वितळून जाण्यास मदत होते, ही गोष्ट मलाहि कबूल आहे; व या दृष्टीनें खांडेकरांनी सदर प्रश्न आणखी एकवार चर्चिला, ही इष्टापत्तिच झाली, असें मी समजतो !

बाकी रा. खांडेकर यांची या भाषणांतील सर्वच मतें सर्वांनाच संमत होतील, असें खाचित नाहीं. विशेषतः ते स्वतः ललितवाङ्मयनिर्माते असल्यामुळें ललितवाङ्मयनिर्मात्यांचे दोष काढतांना खुद्द त्यांच्यावर फारच मोठी जबाबदारी येऊन पडते, हें विसरतां कामा नये. उदाहरणार्थ, प्रो. फडके, रा. पु. य. देशपांडे, वगैरेविषयी खांडेकरांनी "नव्या समाजसृष्टीचीं स्वप्नें त्यांना पडत नाहीत आणि जीं पडतात, त्यांचा अर्थ कुठलीहि स्वप्नकारिका करूं शकणार नाहीं"—असे उद्गार काढले आहेत. त्यांतील उत्तरार्ध अंशतः खांडेकरांच्याहि कथावाङ्मयाला लागू पडेल ! खांडेकरांच्या कथावाङ्मयांत फडके–देशपांडेप्रभृतींत नसलेली साम्यवादाची छटा उमटली आहे, हें स्पष्ट आहे; आणि याबद्दल ते अभिनंदनास पात्रहि आहेत. परंतु प्रेम, विवाह वगैरे बाबतींतील त्यांचाहि 'कल्पनावाद' अजून सुटलेला दिसत नाहीं; आणि एखाद्या कट्टर साम्यवादी 'भौतिकवाद्या'स हें लिखाण दाखविल्यास ते पाहून तो खात्रीनें नाकच मुरडील ! म्हणजे, उपरोक्त लेखकांनी "स्पष्टपणें विचारप्रदर्शन" केलेलें नाहीं, अशी जी तक्रार खांडेकरांनी केलेली आहे, तीच नेमकी साम्यवादापुरती त्यांच्याबद्दलहि इतरांस खाचित करतां येईल !

'बंधनाच्या पलीकडे' या कादंबरीविषयी रा. खांडेकर म्हणतात, "...प्रभाकर प्रथमतः समाजावर यथेच्छ तोंडसुख घेतो; पण भैनेशी लग्न लागल्यावर मग त्याला बंधनाच्या अलीकडल्या समाजाची आठवणच होत नाहीं !" खांडेकरांचें हें विधान सर्वस्वीं खरें आहे; परंतु ज्यावेळीं 'बंधनाच्या पलीकडे' ही कादंबरी लिहिली गेली, त्यावेळीं कित्येक लेखक प्रायः शाब्दिक कोट्यांतच घोंटाळत होते (व अजूनहि घोंटाळतात !) हेंहि तितकेंच खरें आहे !

ते कांही असो; हेतुप्रधान ललितवाङ्मयाची खांडेकरांनी आपल्या भाषणांत जोरदार तरफदारी केली आहे, आणि अहेतुकतेच्या म्हातारडीचें कंबरडें या भाषणरूपी वडग्यानें कायमचें मोडलें जाईल, अशी आशा करण्यास हरकत नाही!

* * *

## ९६ टॉलस्टॉयचें पुण्यस्मरण

जगद्विख्यात रशियन कादंबरीकार व तत्त्ववेत्ता टॉलस्टॉय हा निधन पावून गेल्या आठवड्यांत पंचवीस वर्षें झालीं. त्यानिमित्त त्याचें ठिकठिकाणी जाहीर पुण्यस्मरण करण्यांत आलें.

टॉलस्टॉय हा, कलेचें भरजरी महावस्त्र हेतुप्राधान्याच्या स्पर्शानें मळतें असे समजणारा, दांभिक साहित्यिक नव्हता. त्यामुळे त्याचे वहुतेक लिखाण सहेतुकतेच्या दीप्तीने उज्ज्वल झालेलें दिसेल! मात्र त्याच्या सहेतुकतेच्या मुळाशी त्यांचें जें तत्त्वज्ञान आहे, ते शास्त्रशुद्ध वाटत नाही. एकच उदाहरण द्यावयाचे तर, टॉलस्टॉयचा "Back to Nature" या अर्थाचा संदेश होता—म्हणजे यांत्रिक सुधारणेला तो प्रतिकूलच होता. परंतु, मार्क्स म्हणतो तद्वत्, यंत्रसामुग्री ही मूलतः त्याज्य नाही; तर ती अल्प-संख्याक भांडवलवाल्यांच्या हातीं असते, म्हणून ती अहितकारक होते. तेंच ती सर्व समाजाची केल्यास तिचे दुष्परिणाम अवश्य टळतील!

याप्रमाणें टॉलस्टॉयच्या विचारसरणीत अनेक दोष आहेत. तथापि, स्वतःच्या काळांतील तो एक क्रांतिकारकच लेखक होता, याबद्दल दुमत होण्याचें कारण नाही. यामुळें त्याजविषयीं कुणीहि झालें तरी "Tolstoy, with all they faults I love thee still!"—असेच प्रेमोद्गार काढील! "War and Peace" यासारखी त्याची कलाकृति आणि "What then must we do?" यासारखे त्याचे तात्त्विक प्रबंध आजहि वाचनीयच वाटतात!

* * *

## १७ गूढगुंजन व रूपक

२३ ऑगस्टच्या 'प्रतिभें'तील माझ्या 'उथळपणाची तरफदारी' या स्फुटाला गेल्या अंकांत रा. ना. म. भिडे यांनीं उत्तर दिलें आहे. त्याबाबत थोडा खुलासा करणें आवश्यक आहे.

यशवंतांच्या कांहीं रूपकात्मक कवितांविषयीं लिहितांना रवींद्रनाथ, यीट्स् व मेटरलिंक यांचा उल्लेख मी केला होता. त्यावरून यशवंतांच्या कवितेंत मला गूढगुंजनाचे पडसाद ऐकूं येतात, आणि रूपकात्मक व गूढगुंजनपर कवितांचे स्वरूप मी एकच समजतो, असा रा. भिडे यांचा समज झालेला दिसतो. पण तो बरोबर नाही. यशवंतांच्या रूपकात्मक कवितांबद्दल लिहितांना उपरोक्त तीन गूढगुंजनवादी कवींच्या काव्यकृतींचा मी निर्देश केला, याचें कारण एवढेंच कीं, या कवींच्या गूढगुंजनपर कविता इतर गूढगुंजनपर कवितांप्रमाणेंच बव्हंशीं रूपकात्मक आहेत. सारीच गूढगुंजनपर कविता रूपकात्मक असते, किंवा सारीच रूपकात्मक कविता गूढगुंजनपर असते, असें सदर स्फुटांत मी कुठेंच म्हटलेलें नाही. मात्र बहुसंख्य गूढगुंजनपर कविता रूपकात्मकच असतात, एवढें मी म्हणूं इच्छितों. आणि या समजुतीमुळेंच यशवंतांच्या रूपकात्मक कवितांची तरफदारी करतांना रूपकात्मक अतएव रूपकापुरत्या एकाच जातीच्या, म्हणून मी रवींद्रनाथ प्रभृतींच्या गूढगुंजनपर कवितांचा आधार दिला. "यशवंत कवीच्या हातून गूढगुंजनाची तार छेडली जाईल, ही गोष्ट मला स्वप्नांतही खरी वाटणारी नव्हे—" हे भिड्यांचें विधान निराळ्या अर्थानें मलाहि पूर्णपणें मान्य आहे.

रा. भिडे यांनीं आपल्या उत्तरांत कांहीं वादग्रस्त प्रश्नहि उपस्थित केले आहेत! मेटरलिंकच्या काव्यकृतींत "सृष्टीचा ताजेपणा व निर्व्याजता" हे गुण नाहींत, असें भिडे म्हणतात. "सृष्टीचा ताजेपणा व निर्व्याजता" म्हणजे काय, याची त्यांनीं फोड केली असती, तर त्यांच्या या विधानाची सत्यासत्यता पडताळून पाहतां आली असती. तसेंच, विद्यमान् आयरिश कविश्रेष्ठ यीट्स् यांच्या काव्यकृतींत "साधेपणा" नाहीं, असाहि आणखी

एक आक्षेप भिड्यांनी घेतलेला आहे ! साधेपणा हा गुण सापेक्ष आहे. ज्या यशवंतांची कविता रा. भिडे यांना इतकी साधी वाटते, त्यांची रुपकात्मकच नव्हत, तर अन्य रूपकहीन गीतेंहि एखाद्या नांगऱ्याला वाचून दाखविलीं, तर तो तीं ऐकून " **काइबी कळत न्हाय !** " असेच उद्गार काढील ! बरें, ज्या यीट्‌सच्या कविता " साध्या " नाहीत, अशी भिडे तक्रार करतात, त्याजविषयीं अनेक टीकाकारांनी अतिशय स्तुतिपूर्ण मजकूर लिहिलेला आहे ! एकजण म्हणतो,

" Mr. W. B. Yeats's poetry, with its gemlike clarity of image and its wistful music, is one of the major glories of modern literature. There is, indeed, no poet who can begin to compete with him on his own ground...His lyrical gift, his power of evoking fantasy and colour and poigant music, his use of clear hard symbols in verse that is fluid and fragile in its loveliness : These suffice to give him his unique place among poets. " सदर लेखकानें यीट्‌स्‌ची इतकी तारीफ केली आहे, त्या अर्थी त्याला एक तर यीट्‌स्‌ची काव्यकृति सहजासहजीं अगर अत्यल्प श्रमानें समजण्याइतकी साधी वाटत असली पाहिजे; किंवा निदान रा. भिडे अपेक्षा करतात तितका साधेपणा हा श्रेष्ठ काव्यकृतीचा आवश्यक गुण आहे, असें तरी हा लेखक समजत नसला पाहिजे ! यांपैकी कोणताहि पक्ष स्वीकारला, तरी आमचे टीकाकार उथळपणाची तरफदारी करतात, असें म्हटल्यावांचून गत्यंतर उरत नाहीं ! कारण भावदारिद्र्य व विचारदारिद्र्य टाळल्याखेरीज भिड्यांना हवी तशी आबालसुबोध कविता कशी निर्मितां येईल, याचा निर्णय सूज्ञांनींच करावा !

गूढगुंजनाचा अभाव म्हणजे उथळपणा नव्हे, असें रा. भिडे आपल्या उत्तराच्या मथळ्यांत म्हणतात. पण असा आग्रह माझ्या स्फुटांत मीं तरी कुठें धरला होता ?

—**प्रतिभा,** वर्ष ३, अंक २२

## ९८ ललितवाङ्मयांतील विद्वत्ता

प्रतिभेच्या ता. १८ ऑक्टोबरच्या अंकांत मोठमोठे ललितवाङ्मयनिर्माते निदान आपापल्या विषयाचें मार्मिक अध्ययन केलेले कसे असतात, याचें वयाण केलें. आतां उपलक्षणादाखल काव्यविषय घेऊन ललित-वाङ्मयांतून पुष्कळदां विद्वत्तेच्या सरस्वतीचा ओघ गुप्तपणानें कसा वाहत असतो, हें पाहूं.

काव्यामध्यें विद्वत्ता प्रस्फुट होण्याचे अनेक प्रकार आहेत. (१) शब्दयोजना (२) उपमादि अलंकार (३) विषयाची निवड (४) विषय मांडण्याची पद्धति – वगैरे त्यांतील ठळक प्रकार होत.

(१) शब्दयोजनेसाठीं रवींद्रनाथांची 'उर्वशी' ही विख्यात कविता घेऊं. या कवितेंतील ७ व्या कडव्याचा आरंभ

**ओई शुन दिशे दिशे तोमा लागिं काँदिछे क्रन्दसी**
**हे निष्ठूर बधिरा उर्वशि !**

असा आहे. आंतील 'क्रन्दसी' शब्द बंगालीलाच नव्हे, तर संस्कृत भाषेलाहि फारच थोडा परिचित आहे. एका वंगीय रसज्ञानें दाखविल्याप्रमाणें ऋग्वेदाच्या २, ६ व १० या मंडलांत हा शब्द आला असून 'आरडाओरड करीत झगडणारीं दोन सैन्यें' असा त्याचा मूळ अर्थ होतो. सायण भाष्यांत 'स्वर्ग व पृथ्वी' असाहि त्याचा दुसरा अर्थ दिलेला असून त्याच अर्थानें रवींद्रनाथांनीं हा शब्द वरील पंक्तींत वापरलेला आहे. या उपपत्तीवरून कवीच्या व्यासंगाची उत्कृष्ट साक्ष पटते.

(२) कविकुलगुरु कालिदासाच्या उपमादिकांवरून ज्योतिषशास्त्र, व्याकरण, आयुर्वेद इत्यादि विषयांचें त्याचें ज्ञान व्यक्त होतें, हें प्रसिद्धच आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर, 'रघुवंश,' सर्ग चौदावा, यांतील

अवैमि चैनामनघेति किंतु
लोकापवादो बलवान्मतो मे ।
छाया हि भूमेः शशिनो मलत्वे—
नारोपिता शुद्धिमतः प्रजाभिः ॥

हा श्लोक घेऊं. हा श्लोक रामाच्या भाषणांतील आहे. "सीता शुद्ध आहे, हें मी जाणतों. पण माझ्या दृष्टीनें लोकापवाद ही प्रबल वस्तु आहे. चंद्र वस्तुतः निष्कलंक आहे. पण ग्रहणाच्या वेळी त्याच्यावर पृथ्वीची जी सांवली पडते, तिलाच लोक कलंक असें म्हणतात ! सीतेचीहि तीच स्थिति आहे–" असा या श्लोकाचा भावार्थ आहे. त्यावरून कालिदासाला ग्रहणाचें खरेंखुरें कारण विदित होते, हें सिद्ध होतें.

( ३ ) विषयाची निवड करण्याच्या बाबतींतील विद्वत्तेचें अलीकडील सर्वांत मोठें उदाहरण म्हणून माजी राजकवि रॉबर्ट ब्रिजेस यांच्या 'The Testament of Beauty' या दीर्घकाव्याचा नामनिर्देश करतां येईल. या काव्याचा विषय इतका तत्त्वज्ञानप्रचुर आहे कीं, अविद्वान् कवीला तो मुळीं सुचलाच नसता ! या तात्त्विक दीर्घकाव्याच्या मथळ्यापासूनच कवीच्या बहुश्रुतपणास सुरुवात होते ! Testament शब्दावरून 'पवित्रशास्त्रा'–चा बोध होतोच; पण 'The Testament of Beauty' हा संपूर्ण शब्दप्रयोग सुचावयास Ralf Hodgon यांच्या Song of Honour या कवितेंतील

The song of Poets when they write
The testament of Beauty sprite

हे चरण कळत–नकळत कारणीभूत झाले आहेत, असें एक टीकाकार म्हणतो !

( ४ ) विषय मांडण्याच्या पद्धतीमधील विद्वत्ता ज्या अनेक गोष्टींवरून प्रगट होते, त्यांत संदर्भस्थलांस प्रमुख स्थान द्यावें लागेल. या बाबतींतहि रॉबर्ट ब्रिजेस यांच्या उपरोक्त रचनेचाच दाखला घ्यावयास हरकत नाहीं. या दीर्घकाव्यांतील संदर्भ त्या राजकवीच्या चौरस व्यासंगाचा चांगलाच

प्रत्यय आणून देतात. उदाहरणार्थ, दुसऱ्या 'पुस्तका'च्या आरंभीं 'Reason' वर रथीचें आणि 'Selfhood' व 'Breed' यांवर घोड्यांचें जें रूपक केलेले आहे, तें प्लेटोन्या 'Phaedrus' वरून किंचित् फेरफारानें घेतल्याचें स्वतः कवीनेंच सांगितलें आहे.

संदर्भवैपुल्यासाठी आपल्याकडील 'विरहतरंग' काव्यहि उल्लेख करण्याजोगें आहे.

वरील विवेचनावरून थोर थोर कवि जाडे विद्वान्हि असतात, हें स्पष्ट होईल.

*                    *                    *

## ९९ मराठी-वाङ्मयाचा इतिहास, खंड २ रा

रा. ल. रा. पांगारकर यांच्या 'मराठी-वाङ्मयाचा इतिहास' या ग्रंथाचा दुसरा खंड या वर्षी प्रकाशित झाला आहे. या खंडांत एकनाथ ते तुकाराम पर्यंतचा इतिहास आलेला आहे. २६ जुलैच्या 'प्रतिभें'त भाव्यांचे 'महाराष्ट्रसारस्वत,' भिड्यांचा 'मराठी-वाङ्मयाचा इतिहास' व खुद्द पांगारकरांचा प्रथम खंड यांजविषयीं "हे सर्व ग्रंथ वाचूनहि मराठी-वाङ्मयाचा आदर्शभूत इतिहास लिहिला जाण्यास अजूनहि अवकाश आहे-" असें विधान मीं केलें होतें, तेंच या दुसऱ्या खंडाविषयींहि करावेंसें वाटते. अर्थात् उपरोक्त विधान मीं मुख्यतः भाषाशास्त्राच्या अपेक्षेनें केलें होतें, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. तथापि पांगारकरांचें सध्यांचें वय, अभिरुचि वगैरे लक्ष्यांत घेतां त्यांजकडून निराळ्या दृष्टिकोनाची अपेक्षा करणें व्यर्थच आहे.

मात्र माहितीच्या दृष्टीनें हा खंड चांगलाच 'भरदार' झाला आहे, हें कबूल करावयास हवें. त्यांत पांगारकरांच्या स्वतःच्या संशोधनाचे कणहि जागोजाग विखुरलेले आढळतात. पांगारकरांना सर्वसामान्य वाचक संशोधक म्हणून ओळखीत नसले, तथापि त्यांनीं पुष्कळच वाङ्मयसंशोधन केलेलें आहे. या बाबतींत त्यांनीं स्वतःच "दुधाची साय दुधांतच जिरवून टाकावी

तद्वत्, मीं आपलें संशोधन स्वतंत्र रीत्या न मांडतां स्वकृत ग्रंथांतच जिरवून टाकलें आहे—" अशा अर्थाचे जे अत्यंत मार्मिक उद्गार एकदां काढले होते, ते अगदीं यथार्थ वाटतात. ( पांगारकरांच्या या सरस उपमेचीहि टवाळी करण्यांत आली होती ! )

एवढ्या उतार वयांत पांगारकरांनीं हा खंड काढला, व पुढील खंड काढण्याचीहि ते उमेद धरतात, यावरून त्यांची वाङ्मयप्रीति सुव्यक्त होते. २ आक्टोबर रोजीं पुण्याच्या ' शारदामंदिरा'नें पांगारकरांचा सन्मान केला होता, त्यावेळीं त्यांच्या अविरत वाङ्मयसेवेचें तरुण साहित्यिकांसहि महत्त्वच वाटतें, असें रा. निरंतर यांनीं म्हटलें होतें. त्याला मीहि दुजोरा देतों. भाषाशास्त्र, साम्यवादी इ० भिन्न भिन्न दृष्टींनी प्राचीन मराठी-वाङ्मयाचा इतिहास लिहिणाऱ्या भावी लेखकांना संदर्भग्रंथ म्हणून पांगारकरांचे हे व पुढीलहि खंड नेहमींच उपयुक्त वाटतील, यांत मुळींच शंका नाहीं.

**प्रतिभा**, वर्ष ३, अंक २३

# १०० कंपूशाहीचा दंभस्फोट

## कटुता असेल तर सत्याचीच

### (१) " छुपे रुस्तुम " रंगणांत आले !

चालू वर्षाचा हा अखेरचा अंक. कंपूवाल्यांस उत्तर देऊन कांहीं बाबींचा आज खुलासा करावयाचा आहे.

एवढ्यांत मजवर उडाविण्यांत आलेले कुत्सी गोळे असे—( १ ) " खांडेकरांचा ' प्रतिभे 'नें चालविलेला प्रतिष्ठित छळ "—निनांवी—'लोकमान्य' मुंबई. ( २ ) " ' प्रतिभे 'तील ' रामशास्त्री ' व जागतिक वाङ्मय " वि. ह. कुळकर्णी—किल्ता व ' महाराष्ट्र ' नागपूर. ( ३ ) " रामशास्त्र्यांचें विदूषकी वाङ्मय "—' प्रतिभेचा एक वाचक, ' ' चित्रा, ' मुंबई. ( ४ ) " वाङ्मयांतील कंपूशाही "—ग. त्र्यं. माडखोलकर—' ध्रुव, ' पुणें.

या लेखांवरून कंपूशाहीच्या अस्तित्वाबद्दल जशी खात्री होते, तद्वतच त्यांच्या कांहीं लेखकनामांवरून तिच्या " छुप्या रुस्तुमां " चीहि ओळख पटते ! इतक्या अल्पावधींत कंपूशाहीचा दंभस्फोट होईल, अशी कल्पना नव्हती !

* * *

### (२) व्यक्तिद्वेषाचा वृथारोप

कंपूशाहीवर हत्यार उचलावें लागतें, तें पुढील कारणांमुळें:—

( अ ) मराठी वाङ्मयांत तसे पुष्कळ कंपू आहेत. पण अलीकडे हा कंपू विशेषच डोईजड झाला आहे ! स्वजनस्तुति व परजननिंदा हीं दोन या कंपूशाहीचीं प्रमुख शस्त्रें होत. दुसऱ्या शस्त्राचा अवास्तव उपयोग ज्यांना " सार्वभौम " पद देण्याचें कंपूवाल्यांनीं ठरविलेलें दिसतें, ते रा. खांडेकरहि कळत–नकळत करतात, हें त्यांच्या मुंबई–साहित्य–संमेलनाच्या

भाषणावरून सिद्ध होत आहे ! यामुळें कंपूबाहेरच्या साहित्यिकांस अन्याय घडून, त्याचे अनिष्ट परिणाम सर्वसाधारण वाङ्मयावरहि होतात !

( आ ) सर्वाधिक गाजावाजामुळें जागतिक वाङ्मयाच्या अपेक्षेची सर्वाधिक जबाबदारी कंपूशाहीवरच येऊन पडते. न्यायाप्रमाणें कर्तबगारीच्या दृष्टीनेंहि फायदा व जबाबदारी यांचें प्रमाण व्यस्त न राहतां सम असावयास पाहिजे. पण अशी जबाबदारी पार पाडणें तर राहोच, पण ती ओळखणेंहि कंपूवाल्यांस सोयीचें नसल्यानें आमचीं वाङ्मयविषयक ध्येयें, आकांक्षा वगैरे " आपण व आपलें " यांपुरत्याच खुरटलेल्या राहिल्या आहेत !

( इ ) कंपूशाहीच्या भलत्या अभिनिवेशामुळें अगडबंब भाषापद्धति, अलंकारांचा फाजील सोस, यांसारख्या त्याज्य लकबींचीहि पाठराखी करण्यांत येते ! यामुळें लोकाभिरुचीस अतिशय वाईट वळण लागलें आहे.

( ई ) गुरु-शिष्य-परंपरा हेंहि या कंपूशाहीचें एक ठळक अंग आहे. धर्मकारणांतील डळमळूं लागलेली ' बुवाबाजी ' साहित्य-प्रांतावर आक्रमण करीत आहे, हा प्रकार खचित स्पृहणीय नाहीं !

या व अशाच इतर दुष्परिणामांमुळें कंपूशाहीवर हल्ला करणें अपरिहाय होतें. पण तसें करणारावरच शिष्टाचारातिक्रमाचा, एवढेंच नव्हे, तर व्यक्तिविषयक टीकेचाहि आळ घेण्यांत येतो ! दुसऱ्याच्या लेखनसंभारास, कधी निंदा करून, कधीं इतरांनी केलेल्या निंदेस प्रगट, अप्रगट पुष्टि देऊन, तर कधीं उपेक्षून सुरुंग लावल्याने जर शिष्टाचारातिक्रम होत नाहीं, तर तो तें कृत्य चव्हाट्यावर आणल्यानेंच कां व्हावा, हे समजणे कठीण आहे ! उत्तरोक्त आरोपहि असाच निर्मूल आहे. खरीखुरी व्यक्तिविषयक टीका पहावयाची असल्यास रा. माडखोलकर यांचा 'चित्रें'तील " बडे बाप आणि त्यांचे बेटे " हा लेख वाचावा. त्यांत त्यांनी अनेकांबरोबर या कंपूशाहीचे परात्पर गुरु कै. श्री. कृ. कोल्हटकर यांजवरहि ' भीरुता ' ' स्त्रीसौंदर्य-निरीक्षणाचें वेड ' ' अश्लील बोलण्याची प्रवृत्ति ' इ० गंभीर आरोप केले आहेत ! मीं कोल्हटकरांना ' बडे बुवा ' म्हटले तर माडखोलकरांना त्यांच्या आत्म्याची कोण चिंता पडली ! ( आरंभीचा लेख नं. ४ ) पण

आतां या शिष्योत्तमानेंच प्रत्यक्ष चारित्र्यावर शिंतोडे उडविल्यामुळें त्या आत्म्याची काय अवस्था होईल, ती होवो ! अशा धर्तीची व्यक्तिविषयक टीका माझ्या लिखाणांतून काढून दाखवा, असें कंपूवाल्यांस माझें आव्हान आहे ! तसेंच, मी टीका करतों तीहि अधिकृत व मुद्रित मजकुरावरच आधारलेली असते. आतां, कंपूवाल्यांना " कंपूवाले " म्हटल्यानेंच जर व्यक्तिविषयक टीका होत असेल, तर हा गुन्हा मी करीत असल्याचें समाधान कंपूवाल्यांना लाभूं द्यावयाला मी तयार आहे !

मला वाटतें, मी नामनिर्देशपूर्वक लिहीत असल्यामुळेंच व्यक्तिविषयक टीकेचा मजवर आळ घ्यावयास कंपूवाल्यांना जागा झाली. परंतु कंपूवाल्यांचें माप पूर्णपणें त्यांच्या पदरांत टाकावयाचें, तर नामनिर्देशपूर्वक लिहिल्या-खेरीज कसें चालेल ? तथापि यांतहि मी अवश्य तेथें शिष्टाचार पाळण्याचा यत्न करतोंच.

व्यक्तिविषयक टीकेचा आरोप गळून पडला, म्हणजे व्यक्तिद्वेषाचा आरोपहि सहजच गळून पडतो. व्यक्तिद्वेष शोधावयाचा असल्यास तो ' रामशास्त्र्या '-सारख्या तिऱ्हाइताच्या लिखाणांत शोधून सांपडेल कीं खांडेकरांसारख्या एका कथालेखकानें फडके–जोशी, देशपांडे यांसारख्या दुसऱ्या कथालेखकांवर केलेल्या गहजबांत सांपडेल, असेंहि कंपूवाल्यांस विचारतां येईल !

रा. खांडेकर यांजबद्दल मी (अ) 'अवेळीं' व (आ) प्रतिकूलच लिहितों, असा कंपूवाले नेहमी गिल्ला करतात ! पण तोहि सर्वथैव खोडसाळपणाचा आहे. (अ) वादावादीपूर्वी 'प्रतिभा' अंक ३; १०; १२; १४ यांतून खांडेकरांविषयीं एकुण पांच स्वतंत्र स्फुटें आलीं आहेत. खांडेकरांचीं त्यावेळीं झालेलीं चार भाषणें व त्यांजवर करण्यांत आलेला गंभीर आरोप यांचें निमित्त झालें, त्यांत मतभेदाचा भाग होता व खांडेकरांना मी टीका करण्याइतके मोठे समजतो, म्हणूनच हीं स्फुटें लिहिलीं गेलीं, हें उघड आहे. (आ) खांडेकरांविषयीं निव्वळ प्रतिकूलच लिहिल्याचा आरोप वृथा असल्याची साक्ष मागील ३, १०, १२, १५ व अलिकडील १९, २२ या अंकांतील त्यांजबद्दलच्या कमीअधिक स्तुतिपूर्ण उल्लेखांवरून पटेल.

* * *

## ( ३ ) तत्त्व कीं व्यक्ति ?

कंपूशाहीचें समर्थन करतांना शॉचा समाजसत्तावाद,* चेस्टरटनचा श्रद्धावाद इ० 'वादां'चा हवाला देऊन आपला कंपूहि असाच तत्त्वाधिष्ठित असल्याचें रा. माडखोलकर भासवितात ! (लेख नं. ४) पण याविषयींच तर जबरदस्त शंका आहे ! नाहीं म्हणावयाला, सध्यां कांहीं कंपूवाले साम्यवादाचा जयजयकार करूं लागले आहेत, हें खरें. परंतु हा कंपू तर फार पूर्वींपासून अस्तित्वांत आहे, व त्यावेळीं तरी त्याच्या खिशांत साम्यवादासारखें कसलेंहि नवें व प्रभावी तत्त्व नव्हतें ! शिवाय, साम्यवाद हेंच जर या कंपूचें बिरुद आहे, तर ज्यांच्या कवितेंत साम्यवादाचा सूक्ष्मातिसूक्ष्म पडसादहि अजूनपर्यंत उमटल्याचें 'इतरेजनां'स विदित नाहीं, असे यशवंत कवि या कंपूस स्वकीय कां वाटावे, हाहि प्रश्न पुढें उभा राहतो ! तात्पर्य, तात्त्विक अधिष्ठानाची सबब ही शुद्ध 'पश्चात्तापबुद्धी'च दिसते !

कंपूवाल्यांचे लिखाण तत्त्वनिष्ठ असतें की व्यक्तिनिष्ठ, या विषयीं संशय घेण्यास आणखी ज्या अनेक प्रकारांमुळे जागा होते, त्यांतील एका प्रकाराकडे अंगुलिनिर्देश करतों. तसें मी अगदीं नाखुषीनें व केवळ स्वमतस्पष्टीकरणार्थच करीत आहें. खेरीज, याहि प्रकरणांत अधिकृत व मुद्रित मजकूर हाच माझा आधार आहे. सदर प्रकार असाः—

प्रो. माधवराव पटवर्धन हे कांहीं म्हटलें तरी उत्कृष्ट लेखक ठरतात. पण टीकाकारांचे अग्रणी रा. माडखोलकर हे त्यांची कशी संभावना करतात ? सुमारें एका तपापूर्वी 'एक प्रकारची आवश्यकता' वाटल्यामुळें ( लायकीमुळें नव्हे ! ) प्रो. पटवर्धनांना माडखोलकरांनीं स्वतःपासून प्रसिद्धीचा फायदा मिळूं दिला, अशी "कवि श्री. यशवंत" या लेखांत तेच कबुली देतात !

---

* ज्या शॉला माडखोलकर समाजसत्तावादी मानतात, त्याजविषयीं रा. लालजी पेंडसे म्हणतात, "शॉ–वेल्स यांना समाजसत्तावादी मानण्याची प्रथा हिंदुस्थानांत पडली आहे. पण ती चुकीची होय." ('साहित्य आणि समाजजीवन' पा. ९१ ). या मतभेदांवरून पेंडशांपेक्षां माडखोलकरांची समाजसत्तावादाची कल्पना बरीच 'मवाळ' समजावयाची की काय ?

(" प्रतिभा " १२ ऑक्टो. १९३४ पहा.) अलीकडे ते त्यांना कसे ठिकठिकाणीं हाणून पाडतात, याचा बोध ' विरहतरंग, ' द्वितीयावृत्ति, यांतील प्रस्तावनेवरून होईल ! यावर असा प्रश्न उद्भवतो कीं, कांहीं वर्षांपूर्वी ज्या पटवर्धनांना उचलून धरण्याची माडखोलकरांना ' आवश्यकता ' वाटली त्यांनाच आतां खालीं खेंचण्याची ' आवश्यकता ' त्यांस कां वाटावी ? गेल्या तपांत पटवर्धनांची कांहींच प्रगति झाली नाहीं, हें या बदललेल्या दृष्टिकोनाचें कारण मानावयाचें कीं काय ? पण ' फार्शी–मराठी–कोश ' ' छंदोरचना, ' ' विरहतरंग, ' ' स्वप्नरंजन ' इ. ग्रंथांचे निःपक्षपाती वाचक तरी असें खास म्हणणार नाहीत ! मग खरें कारण काय ?

त्याच लेखांत प्रो. पटवर्धनांना प्रसिद्धीचा फायदा मिळत असतांना यशवंतांवर आपलें ' नितांत प्रेम ' असूनहि त्यांना तसा फायदा मिळाला नाहीं, याबद्दल रा. माडखोलकर रुखरुख व्यक्त करतात. आज ह्या उपेक्षेची ते सव्याज फेड करीत आहेत म्हणावयाचे ! या दोन घटनांमधील विरोध उद्बोधक आहे.

' पटवर्धन प्रकरणा 'ची पुनरावृत्ति यशवंत–खांडेकरादिकांबाबतींतहि पुढें कधीं घडणारच नाहीं, याची शाश्वति काय ? मग माडखोलकरांचे त्यांजबद्दलचें आजचें मत प्रमाण मानावयाचें, की उद्यांचें ? त्यांना नामवंत टीकाकार या नात्यानें मार्गदर्शक समजणाऱ्यांनी त्यांच्या मतें आदर्शभूत साहित्यिक म्हणून कोण समजावयाचे ? की ते लहरीप्रमाणें ज्यावेळीं ज्याची तारीफ करतील, त्यावेळीं त्याला तात्पुरतें आदर्शभूत मानावयाचें ? ही सर्व प्रश्नावलि बिकट तर खरीच !

वरील एकच प्रकार कंपूशाहीच्या तत्त्वनिष्ठेबद्दल व व्यक्तिनिरपेक्षतेबद्दल साधार शंका घेण्यास पुरेसा आहे !

* * *

## ( ४ ) साम्यवादाबद्दल साम्यवाद्यांचा अभिप्राय !

आपल्या ललितवाङ्मयास किंचित् फेरफारानें साम्यवादाचा स्पर्श व्हावयास पाहिजे, याबद्दल वाद नाहीं. पण असा तत्त्वस्पर्श हीच त्याची एकमेव

कसोटी नव्हे! ललितवाङ्मयाचें महत्त्वमापन अखेर प्रतिभागुणांवरूनच होणार. आणि, या दृष्टीनें फडकेप्रभृति साहित्यिक कंपूवाल्याशीं निदान तुल्यबल तरी खासच ठरतात! तथापि, हे विसरून फक्त साम्यवादाच्या अभावामुळें खुद्द रा. खांडेकर, या साहित्यिकांवर मुंबईच्या भाषणांत केवढ्या हिरिरीनें तुटून पडतात, हें पहाण्याजोगें आहे! खांडेकरांच्या अभिनिवेशावरून त्यांचा साम्यवाद अगदीं जिव्हाळ्याचा—शंभर नंबरी असेल, अशी एखाद्याची सहजच कल्पना होईल! परंतु ती फोल असल्याचें रा. लालजी पेंडसे या तिन्हाईत व कार्यकर्त्या साम्यवाद्याच्याच अभिप्रायावरून प्रत्ययास येतें. 'साहित्य आणि समाजजीवन' या खांडेकरांचीच प्रस्तावना असलेल्या आपल्या नव्या ग्रंथांत पेंडसे लिहितात, "वरील कलावंतांची (खांडेकर, माडखोलकर वगैरेंची) कला अधिक हेतुक्षम, समाजाभिमुख व सिद्धिकर व्हावयास अधिक उत्तानता व उत्कटता, बहुश्रुतता व उन्मेषता निरीक्षण व अभ्यास ही जास्त झाली पाहिजेत...हे लेखक आपापल्या घरकुलांत बसून मुचेल तें लिहीत असतात यामुळें त्यांच्या लेखनांत एक प्रकारचा एकांगीपणा व विचारपरिप्लुततेचा अभाव ही दिसून येतात... आमच्या बहुतेक लेखकांचे वैगुण्य हे आहे कीं, ते एका प्रकारच्या समाजांत व वातावरणांत वावरतात व दुसऱ्या प्रकारच्या भावना आपल्या कलाकृतींत रेखाटण्याचा प्रयत्न करीत असतात." या लेखकांच्या कट्ट्या शत्रूंर्नाहि यापेक्षां विदारक चिकित्सा करतां येणार नाही! पेंडशांच्या ग्रंथास खांडेकरांची प्रस्तावना नसती, तर कंपूवाल्यांनी त्यांजवर "खांडेकर-फोबिया"चा आरोप खात्रीनें केला असता!

अस्सल साम्यवादी वाङ्मय निर्माण होण्यास "एक अवश्य व अनिवार्य पायरी" म्हणून खांडेकरांदिकांच्या अशाहि लिखाणाची जरूरी आहेच. परंतु त्यांचा अभिनिवेश अप्रस्तुत आहे, एवढेच मला येथें दाखवावयाचे आहे.

* * *

## (५) जागतिक वाङ्मय व कंपूशाही

मराठी वाङ्मयाला जागतिक वाङ्मयाचा दर्जा प्राप्त होण्याची अपेक्षा मी केली त्या बाबतीतहि कंपूवाल्यांनीं व्यर्थ अकांडतांडव केलें आहे! ही अपेक्षा

मी फक्त खांडेकरांविषयींच करतो, अशी रा. माडखोलकर नवलकथा सांगतात! (लेख नं. ४) उलटपक्षीं; माझ्या एका स्फुटावरून (अंक १०) गडकऱ्यांविषयीं मी अशी अपेक्षा केल्याबद्दल "प्र. ए. वा." ("प्रतिभे"चा एक वाचक) मजवर डोळे. वटारतात! ('प्रतिभा' अंक १६) म्हणजे एकट्या खांडेकरांबद्दल मीं हा "धारवाडी कांटा" वापरल्याची माडखोलकरांची तक्रार 'प्र. ए. वा.' यांजकरवींच परभारें खोडली जाते!

आणि, फक्त खांडेकरांबद्दलच ही अपेक्षा केल्यानें त्यांस अन्याय केल्यासारखें कसें होतें? 'दोन ध्रुव' या मराठींतील एका सर्वोत्कृष्ट कादंबरीच्या जनकाविषयीं अशी अपेक्षा करावयाची नाहीं, तर ती करावयाची तरी कुणाविषयीं? "उगवत्या साहित्यिकांकडून असल्या उद्बोधक व प्रेरक साहित्याची मागणी करण्याचा बहुजनसमाजाचा हक्क आहे." या रा. लालजी पेंडशांच्या उद्गारांकडे माडखोलकरांनी लक्ष्य द्यावें.

जागतिक वाङ्मयाची मी अपेक्षा करतांच झाडून सारें जागतिक वाङ्मय अभ्यासिल्याच्या वढाईचा मजवर रा. वि. ह. कुळकर्णी आरोप करतात! (लेख नं. २) त्यांचीच "री" माडखोलकर व "प्र. ए. वा." ओढतात! माडखोलकरांनी तर 'विश्ववाङ्मयांत रुतलेला' अशीहि पदवी मला बहाल केली आहे! ("मौज," दिवाळी-अंक) पण मजऐवजीं 'महाराष्ट्रा'च्या अभिप्रायलेखकांस त्यांनीं ती दिल्यास माझ्यांत नसलेली न्यायबुद्धि त्यांच्यांत असल्याचें प्रत्यंतर तरी येईल! कारण, या अभिप्रायलेखकानें २६-८-३४ च्या 'महाराष्ट्रां'तील परीक्षणांत पुढील विधान केलें आहेः—"महाराष्ट्राच्याच काय, पण **जगाच्याहि काव्यवाङ्मयांत** भव्योदात्त कल्पनेचें शब्दचित्रच अशी, इतकी, ("जगन्नाथाच्या रथोत्सवा" इतकी) कल्पकतापूर्ण कविता आढळणार नाहीं." यावरून विश्ववाङ्मयांत खरा रुतलेला कोण, हें माडखोलकरांनींच सांगावें!

विशेष मौज ही कीं, खुद्द रा. खांडेकर यांनींहि अशी अपेक्षा केली आहे! (मुंबई-भाषण) तेव्हां खांडेकर व वरील अभिप्रायलेखक यांना

उपरोक्त वढाईचा दोष आमचे 'तत्त्वनिष्ठ' कंपूवाले चिकटवितात काय, हेंच आतां पहावयाचें आहे!

*　　　　*　　　　*

## (६) अलंकारादिकांची वकिली!

खांडेकरांच्या अतिरिक्त अलंकारप्राचुर्याची कंपूवाल्यांनीं जी वकिली केली आहे, तिजवरूनहि कंपूशाहीच्या व्यक्तिनिष्ठेचाच पुरावा मिळतो! "प्रतिभा" अंक २, यावरून अलंकारांचें योग्य महत्त्व मीहि जाणत असल्याचें स्पष्ट होतें. मात्र खाडिलकरांच्या लक्ष्मीधरासारखी 'अलंकार'-प्रियता नको, एवढेंच माझें म्हणणें आहे. यामुळेंच पुण्याच्या नाथमाधवदिनाच्या सभेंत "मागणी तसा पुरवठा" हें तत्त्व उच्चारून रा. खांडेकर यांनीं स्वतःच्या अलंकारप्राचुर्याचें पर्यायानें जें समर्थन केलें होतें, त्याविषयीं मला प्रतिकूल लिहावें लागलें. परंतु खांडेकर असें बोललेच नाहींत, असें कंपूवाले सांगतात, आणि त्याला आधार कशाचा देतात? तर त्यांच्या पुण्याच्याच, पण 'शारदोपासक' संमेलनाच्या भाषणाचा!! खांडेकरांचें नाथमाधवदिनाचें भाषण त्यावेळीं 'ज्ञानप्रकाशांत' आलें होतें, तें जिज्ञासूंनी पाहिल्यास त्यांस माझ्या म्हणण्याची सत्यता पटेल, आणि मी त्यांच्या 'नाथमाधवदिनाच्या' भाषणाबद्दल बोलत असतां कंपूवाले मात्र त्यांच्या 'शारदोपासक'-संमेलनाच्या भाषणाबद्दल बोलतात, त्याअर्थी खोडसाळ मी कीं कंपूवाले याचाहि त्यांस निर्णय करतां येईल!

खांडेकरांच्या "मागणी तसा पुरवठा" या तत्त्वाचें मंडन करतांना "प्र. ए. वा." यांनीं मार्क्सचें पुढील वचन उद्धृत केलें आहे:—

"The bourgeoisie has robbed of their haloes various occupations hitherto regarded with awe and veneration. Doctor, lawyer, priest, poet and scientist have become its wage-earners" ('प्रतिभा' १६)

परंतु खांडेकरांनीं अप्रत्यक्षपणें, पण स्वतःविषयीच वरील तत्त्व लावून दाखविलें असल्यामुळें त्यांच्या अलंकारप्राचुर्याची बाजू राखण्यास मार्क्सचें हें वचन मला पुरेसें वाटलें नाहीं, व म्हणून मी त्याच्यावर गैरलागूपणाचा

शिक्का मारला. त्यावर हें अवतरण कळण्याची माझी पात्रताच नाहीं, अशी " प्र. ए. वा. " खातरजमा देतात ! ( लेख नं. ३ ) अरेरे ! कंपूवाल्यां-वांचून इतरांस Communist Manifesto कळूंसुद्धां नये, हें देशाचें केवढें दुर्दैव ! !

धर्म, वाङ्मय वगैरे ' पवित्र ' वस्तूहि भांडवलशाहीच्या आर्थिक फेऱ्यांत—" मागणी तसा पुरवठा " या सारख्या अर्थशास्त्रीय नियमांच्या कचाट्यांत सांपडतात, ही मार्क्सची मीमांसा निःसंशय मूलगामी आहे. आणि, तदनुसार बाणभट्टादिकांच्याच नव्हे, तर खांडेकरांच्याहि यापूर्वीच्या अलंकारप्राचुर्याची तरफदारी करतां येईल ! परंतु एवढ्यांत त्यांनी सामाजिक, वगैरे बाबतींतील ' बंडखोरी'चा जो धोशा चालविला आहे, त्याजशीं मात्र अलंकारप्राचुर्याच्या दास्याचा इतःपर बिलकूल मेळ बसत नाहीं ! मार्क्स " ऐतिहासिक भौतिकवादा"च्या दृष्टीनें धर्म—वाङ्मयादींची वरीलसारखी उपपत्ति लावतो खरी, पण तिचा अर्थ असा खचित नव्हे कीं, सर्वांनीं सर्वच बाबतींत प्रवाहपतित व्हावें; मनुष्याला स्वतंत्र अशी इच्छाशक्ति असूंच नये,—त्यानें कसल्याहि रूढपद्धतीविरुद्ध ' बंड ' करूं नये, एवढेंच नव्हे, तर सामाजिक बाबींसारख्या मोठमोठ्या बाबतींत ' बंडखोरी ' उपदेश करणाऱ्या ' बंडणमिश्रा'नें देखील अलंकारप्राचुर्यासारख्या किरकोळ लकबीविरुद्धहि बंड उभारूं नये ! तसा तिचा अर्थ करणें म्हणजे मार्क्स ' निष्क्रिय परिस्थिति-वादी ' असल्याचा त्याजवर वृथा आळ घेणेंच होय !

मार्क्सवाद्यांचा मुकुटमणी लेनिन अलंकारादिकांस किती तुच्छ मानीत असे, हें पुढील अवतरणावरून दिसेल:—

" He ( Lenin ) passionately condemned all ' fine rhetoric ' and regarded it as a sign of intellectual weakness and a moral emptiness...Any high-flown sentences in his comrades called forth his angry rejection; a grand gesture roused the sharpest criticism and biting scorn; anything ' poetic ' or ' sublime ' incited him to furious outbursts of contempt. " ( The Mind and Face of Bolshevism, p. 33. )

लेनिनच्या अभिप्रायापेक्षांहि " मागणी तसा पुरवठा " याच महामंत्राला अधिक प्राधान्य द्यावयाचें असलें, तरीहि या प्रकरणीं माझ्याच वतीनें निवाडा व्हावयास पाहिजे. कारण, रा. लाड यांच्यासारख्या आय्. सी. एस्. पासून ( प्रतिभा ३, २१ ) तों रा. पेंडसे यांच्यासारख्या साम्यवाद्यांपर्यंत ( ' साहित्य आणि समाजजीवन ' पा. ८२–८३ ) अनेक रसिक विद्वान् साध्या–सरळ लिखाणाची ' मागणी ' करूं लागले आहेत. तिला अनुसरून तरी ' पुरवठा ' करूं लागाल कीं नाही ?

माडखोलकरांच्या ' अतीव ' बोजड भाषेसंबंधींहि असेंच म्हणतां येईल.

*　　　*　　　*

## ( ७ ) वाङ्मयांतील बुवाबाजी !

' प्रतिभेत ' ( १५ ) मी "वाङ्मयांतील बुवाबाजी" वर कोरडे उडविले, त्याबद्दलहि कंपूवाल्यांनी असाच वितंडवाद माजविला आहे ! कै. कोल्हटकरांविषयीं मला किती आदर वाटतो, याची ग्वाही माझीं अनेक स्फुटें देतील. तथापि त्यांच्या शिष्यांनी त्यांचे, त्यांच्या ' नातशिष्यां 'नी त्यांच्या शिष्यांचें, " गुरुमहाराज गुरू ! जय जय परब्रह्म सद्‌गुरू " असें भजन गात सुटावें, हें अगदीं गैर आहे ! या योगें अंधश्रद्धा बळावते, हें एक व कंपू उत्पन्न होतात, हे दुसरें,—असें द्विविध नुकसान होतें. निदान, प्रस्तुत कंपूशाहीची तरी आद्यजननी ही बुवाबाजीच होय !

*　　　*　　　*

## ( ८ ) अखेर

येथवर कंपूवाल्यांच्या ठळक आक्षेपांचें निरसन केलें. मात्र त्यांच्या ' विष्णुसहस्रनाम ' होण्याइतक्या संस्कृत–प्राकृत शिव्या–शापांना उत्तर देण्यास मी असमर्थ आहें !

वस्तुतः सरसकट कंपूशाहीला मी एवढ्यांत धारेवर धरणार नव्हतों. किंबहुना, पुढेंहि मी तसें कदाचित् कधींच केलें नसतें ! परंतु कंपूशाहीच्या परमदैवतांचे लेखनदोषहि दाखविलेले, अगर त्यांच्याशीं मतभेदहि दर्शविलेला

कंपूवाल्यांना सहन झाला नाहीं, आणि, त्यांनीं अद्वातद्वा लिहिण्यास सुरुवात केली! यामुळें मलाहि थोडेंबहुत लिहिणें भाग पडलें. बाकी, माझ्या टीकेपेक्षां कंपूवाल्यांच्या वितंडवादी लेखांनींच कंपूशाहीचा ज्यास्त दंभस्फोट झाला, ही वस्तुस्थिति येथें नमूद करून ठेवणें अवश्य आहे! तसेंच, कंपूवाले पुढेंहि जों जों असेंच करतील, तों तों त्यांची उरलीमुरली प्रतिष्ठाहि नष्ट होणार आहे, हेंहि त्यांनीं जरूर ध्यानांत घ्यावें!

कंपूशाहीविरुद्ध लिहिणें म्हणजे गांधीलमाशांचें मोहाळ उठविणेंच होय, याची मला प्रथमपासून जाणीव होती, आणि शेवटीं ती खरीहि ठरली! तथापि कसल्याहि टीकेनें विचलित होण्याइतका व स्वीकृत कार्यापासून ढळण्याइतका 'रामशास्त्री' 'कच्च्या दिलाचा' (लेख नं. १) नसल्यामुळेंच त्यानें हें धाडस केलें, हें कंपूवाल्यांच्या निदर्शनास मी आणूं इच्छितों!

अखेर, रा. खांडेकर यांजविषयी चार प्रांजळ शब्द लिहिल्याखेरीज हा लेख संपवितां येत नाहीं. क्षीण प्रकृति, प्रापंचिक अडचणी, इ० संकटांतून रा. खांडेकर यांनी इतकी भरदार साहित्यसेवा केली, याबद्दल मला नेहमींच प्रेमादर वाटतो. आणि, एका कंपूवाल्यानें (लेख नं. १) ज्यावेळीं त्यांच्या या अडचणींची मला आठवण करून दिली, त्यावेळीं मला खरोखरच कांहीं वेळ विचित्र वाटलें! वाङ्मयविषयक टीका अशा प्रकारच्या वैयक्तिक सुखदुःखाच्या जाणिवेपासून शक्य तों अलिप्त असावी, असें मी प्रथमपासून धोरण ठेवल्यामुळें खांडेकर काय, किंवा अन्य साहित्यिक काय, यांपैकीं कुणाच्याहि खाजगी अडचणींची मीं वाच्यता केली नाहीं. याचा अर्थ मला त्यांची कल्पना नसते, असा खास होत नाहीं. त्याचप्रमाणें, स्वप्रतिष्ठेसाठीं खांडेकरांनी आपण होऊन सध्यांच्या या कंपूशाहीचा आश्रय घेतला, असेंहि मला म्हणावयाचें नाहीं. उलट, 'प्रतिभा' अंक १७, यांत "पुष्पसंगें मातीस वास लागे" या न्यायानें स्वतःचें महत्त्व वाढविण्यासाठीं कंपूवाले खांडेकरांभोंवतीं गर्दी करतात, असेच उद्गार मी काढले आहेत! मात्र त्यांच्या कांहीं कृति नकळत कां होईना, पण कंपूशाहीस उपकारक होतात (जसें मुंबईच्या भाषणांतील फडके प्रभृतींवरील टीकेची पद्धति)

आणि त्यांनी आतां आपल्या ‘ वेताळगणा ’स आवरण्याची वेळ आली आहे, एवढें मला म्हणावेंसें वाटतें ! तसेंच खांडेकरांच्या कथासाहित्यक्षेत्रांतील योग्यतेसंबंधींहि मला कधींच शंका नव्हती. आज फडक्यांसारखे खांडेकरांशी तुल्यबळ असलेले कांहीं कांहीं लेखक मराठींत आहेत, हें खरें; पण उद्यां त्यांस गुंगारा देऊन खांडेकर पुढें सरकणार हें आनंददायक दृश्य खचित दिसणार आहे ! कारण फडक्यांची तरी कला लोकाभिमुख होण्याचीं चिन्हें अजूनहि दृष्टोत्पत्तीस येत नाहींत ! याच वेळीं जागतिक–निदान अखिल भारतीय–महत्त्वाकडे लक्ष देऊन खांडेकरांनीं प्रयत्न केल्यास दुधांत साखर पडल्यासारखें होणार आहे ! खांडेकरांच्या लेखनांत कला व जीवन यांचा आधींच प्रीतिसंगम झालेला असल्यामुळें कोट्या, अलंकार यांचें प्रमाण कमी करून विस्तारापेक्षां सखोलतेवर त्यांनीं भर दिल्यास त्यांच्या पुढील ललितकृतींना कमींत कमी अखिल भारतीय वाङ्मयाचा दर्जा प्राप्त होण्यास बिलकुल विलंब लागणार नाहीं ! तसें झाल्यास यच्चयावत् सर्व महाराष्ट्राकडून स्तुतिसुमनवर्षाव करून घेण्यास तेच अधिकारी ठरतील ! आणि, त्या पुष्पवृष्टींत ओंजळभर तरी फुलें निश्चितपणे ‘रामशास्त्र्यां’चीं असतील !

**प्रतिभा**, वर्ष ३, अंक २४

## १०१ साक्षात्कार लक्ष्मीचा, सरस्वतीचा नव्हे !

अखेर श्रीमंत ( आतां राजे ) बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांनीं इंदुरास संमेलनाध्यक्षाचा सोहळा उपभोगलाच ! महाराष्ट्र साहित्य-परिषदेने पुढाकार घेतल्यामुळेंच बाळासाहेब अध्यक्ष होऊं शकले हें तर खरेंच; परंतु, थोर थोर साहित्यसेवक व विशेषतः वजनदार वृत्तपत्रें यांच्या उघड उघड तोंडपुजेपणामुळें व ' मौनं संमतिलक्षणम् ' या स्वरूपाच्या मुग्धतेमुळें स्वतः बाळासाहेब हा मान स्वीकारण्यास संकोचले नाहीत, हेंहि तितकेंच खरें आहे ! या सर्वांनीं बाळासाहेबांना ' आपण या पदास अपात्र आहां ! '—असें खडखडीत वजावलें असतें, तर ते अध्यक्ष होण्यास धजले असते काय ? पुण्याच्या ' ज्ञानप्रकाश 'ला मेजर नायडूऐवजीं पतियाळचे युवराज हिंदी क्रिकेट टीमचे कॅप्टन झाल्याबद्दल सात्त्विक संताप येतो, व त्या भरांत तो डॉ. कांगा यांच्या राजिनाम्याचें समर्थनहि करतो ! परंतु वृद्धतरुण सर्व साहित्यकांचे हक्क मारून बाळासाहेब केवळ द्रव्याच्या जोरावर भलतेंच स्थान पटकावतात, याबद्दल मात्र ' ज्ञानप्रकाश'ला तिळभरहि वैषम्य वाटूं नये, एवढेंच नव्हे तर तो या बहादुरीबद्दल ( ! ) बाळासाहेबांची तोंडभर तारीफच करतो, याला तोंडपुजेपणा म्हणावयाचें नाहीं, तर दुसरें काय म्हणावयाचें !

राजे बाळासाहेब अध्यक्ष झाल्यामुळें संमेलनास जमलेल्या साहित्यभक्तांस सरस्वतीचा साक्षात्कार न घडतां लक्ष्मीचा साक्षात्कार मात्र खास घडला असला पाहिजे यांत शंका नाहीं.

* * *

## १०२ बाळासाहेबांचें भाषण

कारण, ज्यामुळें सरस्वतीचा साक्षात्कार घडावयाचा, तें बाळासाहेबांचें भाषण अगदींच निराशाजनक झालें ! राहतां राहिला त्यांचा व संमेलनास उपस्थित असलेल्या इतर राजपुरुषांचा दरबारी रुबाब ! त्यानें मात्र

प्रतिनिधी—प्रेक्षकांस सरस्वतीचा नसला तरी, निदान लक्ष्मीचा साक्षात्कार उत्तम रीतीनें घडला असावा! गरीब बिचारे दरिद्री साहित्यसेवक! विचारपरिप्लुत भाषण तर त्यांस कोठेंहि ऐकावयास मिळालें असतें! परंतु हे राजपुरुष व त्यांचा रुबाब त्यांस इतका सहजासहजीं दिसला असता काय? तेव्हां बाळासाहेबांनीं अध्यक्षपद स्वीकारलें, हें एकपरीनें फार चांगलें झालें! त्यामुळें बापड्या सरस्वतीपुत्रांच्या डोळ्यांचें पारणें तरी फिटलें!! एरवीं, बॅ. सावरकर किंवा रियासतकार सरदेसाई यांच्यासारख्यांना हें स्थान मिळाल्यानें हा लाभ थोडाच होणार होता?

राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांचें भाषण म्हणजे गारुड्याची पोतडीच होय! त्यांत काय नाहीं?—सारेंच कांहीं आहे! ललित व गंभीर वाङ्मय, धर्मशिक्षण, साक्षरताप्रसार, बेकारी, व्यायाम, चित्रकला, संगीतशास्त्र, नृत्यकला, वास्तुविद्या, वैद्यकशास्त्र, छे, छे, छे! या सर्व भडिमारांतूनहि सर्व प्रतिनिधी—प्रेक्षक सहीसलामत घरोघर जाऊन पोंचले, ही ‘ आई आदि-माते ’ची थोर कृपाच समजली पाहिजे!

* * *

## १०३ नावीन्य नाहींच, पण बिनचूकपणाहि नाहीं!

राजेसाहेबांच्या भाषणांत कसलेंहि नावीन्य नाहीं. अर्थात् त्याची इतरांनी नर राहोच, पण त्यांच्या चाहत्या साहित्य—परिषदेनें देखील अपेक्षा केली नसेल! मात्र त्यांच्या भाषणांत माहितीचा बिनचूकपणा असावा, अशी सर्व-साधारण अपेक्षा असणें शक्य आहे! पण, तीहि फोल ठरावी, हें दुर्दैव होय.

हेंच पहा ना — मोरोपंताबरोबर वामनपंडितासहि राजेसाहेबांनी व्याकरण-शुद्धतेबद्दल शिफारसपत्र दिलें आहे! परंतु, तें प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासकांस कितपत मान्य होईल, तें होवो! वामनपंडित हा व्याकरणशुद्धतेकडे बरेंचसें दुर्लक्ष करतो, अशीच बहुतेक विद्वानांची तक्रार आहे! परंतु राजेसाहेब ज्याअर्थी याच्या नेमकें उलट सांगतात, त्याअर्थी अलीकडे होऊं लागलेल्या वाङ्मयसंशोधनांतील ‘ क्रांती ’ला तेहि हातभार लावूं इच्छितात, असें अनुमान करावें लागतें!

अभिरुचीच्या बाबतींतहि पंतप्रतिनिधी असेच ‘ क्रांतिकारक ’ दिसतात ! कै. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांनंतर ज्या ‘ चांगल्या ’ कादंबऱ्या झाल्या, त्यांत पंतप्रतिनिधींनी रा. ना. ह. आपटे यांची ‘ सुखाचा मूलमंत्र ’ ही कादंबरी समाविष्ट केली आहे ! त्यांचें ‘ साष्टांग नमस्कार ’-विषयींचें ( हें अत्र्यांचें नाटक नव्हे ! ) प्रेम पाहिलें, म्हणजे ही कादंबरी त्यांना एवढी कां आवडावी, याचा कांहींसा बोध होतो !

ज्यांच्या ग्रंथांनीं ‘ मराठी भाषेला सौंदर्यसंपन्न ’ केलें, अशा लेखकांत कादंबरीकार म्हणून बाळासाहेबांनी रा. पुरोहित यांचा नामोल्लेख केला आहे ! कै. हरिभाऊ आपटे, प्रो. वा. म. जोशी. प्रो. फडके, रा. वि. स. खांडेकर प्रभृतींच्या तोडीचे पुरोहित नांवाचे एक कादंबरीकर मराठींत झाले आहेत, हा शोध सर्व भाषाभक्तांस अपूर्वच वाटेल ! पुरोहितांच्या कादंबऱ्यांत व्यायामविषयावर भर दिलेला नसूनहि बाळासाहेबांस त्या इतक्या रुचाव्या हे दहावे आश्चर्य होय !

‘ मराठी भाषेला सौंदर्यसंपन्न ’ करणाऱ्या ग्रंथांत ‘ गीतारहस्या ’चा निर्देश होतो, पण ‘ नीतिशास्त्रप्रवेशा ’चा होत नाहीं. हा ‘ पुरुषांचा धर्मभ्रम ’ असला, तथापि तो संमेलनाध्यक्षास तरी फारसा भूषणावह नाहीं ! तसेंच, या ग्रंथमालिकेंतून रा. वि. रा. शिंदे यांचा ‘ भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न ’ हा नावीन्यपूर्ण ग्रंथ निसटावा व प्रो. माटे यांचा ‘ अस्पृष्टांचा प्रश्न ’ हा कांहींसा अहवालवजा ग्रंथ मात्र तींत नमूद केला जावा, हहि निःसंशय आक्षेपार्ह आहे ! कवींच्या नांवनिशींत Bee व माधव हीं नांवे नसावीं या प्रकाराबद्दलहि असेंच म्हणतां येईल !

*　　*　　*

डॉ. केतकर मध्ययुगीन भारताचा इतिहास लिहीत आहेत, हें बाळासाहेबांचें विधान बुचकळ्यांत टाकणारें आहे ! डॉक्टरमजकूर प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासावर तूर्त परिश्रम करीत असल्याचें महशूर आहे. पण हा मध्ययुगीन भारताचा इतिहास कोणता ?— कीं प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासालाच मध्य-युगीन भारताचा इतिहास असें अभिधान द्यावयाचें ?

*　　*　　*

## १०४ समाजविषयक प्रश्न

हा झाला संमेलनाध्यक्षांच्या वाङ्मयपरामर्षांचा प्रकार. आतां, त्यांनीं कांहीं समाजविषयक प्रश्न आपल्या भाषणांत उपस्थित केले आहेत, त्यांचा थोडक्यांत विचार करूं.

बाळासाहेबांनी सुशिक्षितांच्या बेकारीसंबंधीं अल्पस्वल्प चर्चा केली असून तींत सुशिक्षितांवरच यथास्थित तोंडसुख घेतलें आहे ! ते म्हणतात, "एकट्याच्या पोटापाण्याचा प्रश्नसुद्धां जर सोडवितां येत नसेल, तर तें शिकलेलें भारुड विद्याच नव्हे ! तसलें अध्ययन केलेला माणूस 'सुशिक्षित'च नव्हे, असें आमचें ठाम मत आहे !" खुद्द बाळासाहेब बी. ए. म्हणजे 'सुशिक्षित'च आहेत. त्यांना बेकारीची झळ लागली नाहीं, याचें एकमेव कारण ते संस्थानिक आहेत, हेंच होय ! ते संस्थानिक नसते, व आजच्या काळांतले बी. ए. असते, तर मध्यांच्या 'सुशिक्षितांच्या बेकारीं'तून बहुधा तेहि सुटले नसते, आणि मग त्यांनीं सुशिक्षितांची वरीलप्रमाणें जी हृदयशून्य हेटाळणी केली आहे, ती खचित केली नसती ! वस्तुतः बेकारीचा दोष सुशिक्षितांकडे जातो, कीं प्रचलित राज्यव्यवस्था व विशेषतः समाजव्यवस्था यांकडे जातो, याचा निर्णय सूज्ञांनींच करावा !

यापेक्षांहि 'सुशिक्षितांची बेकारी' नष्ट करण्याचा बाळासाहेबांनीं जो उपाय सुचविला आहे तो तर विशेषच बहारीचा आहे ! ते सांगतात, "साहित्य–परिषदेनें......असलीं ( स्वावलंबन उत्पन्न करणारीं ) प्राथमिक शिक्षणाचीं क्रमिक पुस्तकें तयार करण्याची योजना हातीं घ्यावी...म्हणजे कांहीं काळानें 'सुशिक्षितांची बेकारी' हा शब्दसमूह ऐकूंसुद्धां येणार नाहीं." खरोखर, क्रमिक पुस्तकांनीं बेकारी नाहींशी करण्याची बाळासाहेबांची शक्कल कुणासहि थक्क करील, अशीच आहे ! त्यांच्या लाडक्या साहित्य–परिषदेनें त्यांचा हा उपदेश जरूर अंमलांत आणावा; म्हणजे, जें कोडें मोठमोठ्या पाश्चिमात्य राष्ट्रांनासुद्धां सुटलें नाहीं ते पंतप्रनिधींच्या सूचनेवरून किबे–चापेकर–पोतदार–वाडेकरांच्या साहित्य–परिषदेनें चुटकीसरशीं सोडविलें, अशी दिगंतीं कीर्ति तरी होईल ! आणि मग कवि माधव गाऊं लागतील—

**पाश्चात्यांवर ही मात विश्व होय विस्मयचकित !**

अखेरीस राजा व प्रजा, भांडवलवाले व मजूर, अगर श्रीमंत व गरीब यांच्यांतील द्वंद्व ‘ तेजस्वी ’ शिक्षणानें नष्ट करण्याची बाळासाहेब उमेद धरतात, तीहि अशीच मासलेवाईक आहे ! उद्यां वाघ व गाय किंवा मुंगूस व साप, यांच्यांत ऐक्य घडवून आणण्यासाठींहि बाळासाहेबांनीं हाच ‘ तेजस्वी ’ शिक्षणाचा उपाय सुचविल्यास त्यांत नवल वाटावयास नको !

खरें पाहतां बाळासाहेबांच्या भाषणाची इतकी सविस्तर छाननी करून त्याला नसतें महत्त्व देण्याचें तादृश प्रयोजन नव्हतें. परंतु, अपात्र व्यक्तीस भलतेंच पद दिल्यानें देणारा व घेणारा हे उभयतांहि कसे हास्यास्पद ठरतात हें दर्शविण्यासाठीं, आणि यापुढें तरी असा प्रकार पुनः न घडावा अशी ‘ धोक्याची सूचना ’ आणखी एकवार देण्यासाठीं एवढा प्रपंच करावा लागला आहे.

**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १

## १०५ वाङ्मयांत संप्रदाय असावेत काय ?

कंपूशाहीच्या दंभस्फोटापासून " वाङ्मयांत संप्रदाय असावेत काय ? " असा एक नवीनच प्रश्न उपस्थित झाला आहे, व त्याचें अनेकांनीं आपापल्या परीनें उत्तरहि दिलेलें आहे.

संप्रदाय हा तत्त्वनिष्ठ असतो, निदान असावयास पाहिजे, हें त्याचें स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे त्याचा निर्देश " कंपू " किंवा " कंपूशाही " या शब्दानें व्हावयास नको आहे, हें स्पष्ट होईल. कंपूशाही ही तत्त्वनिष्ठ नसून व्यक्तिनिष्ठ असते, हें आतां सिद्ध झालेंच आहे ! कांहीं लेखकांनीं — विशेषतः कांहीं कंपूवाल्यांनीं — तत्त्वनिष्ठ संप्रदायाचाहि "कंपू" याच शब्दानें उल्लेख केल्याचें आढळांत आल्यामुळें संप्रदाय व कंपू यांचा घोंटाळा न होण्यासाठीं हे दोन शब्द निरनिराळ्या अर्थानें वापरावयास हवेत, असा इषारा देणें आवश्यक झालें आहे.

शंभर नंबरी तत्त्वनिष्ठा किंवा व्यक्तिनिष्ठेचा ओझरताहि स्पर्श न झालेला संप्रदाय अस्तित्वांत असणें दुष्कर आहे, हें मलाहि मान्य आहे. स्वमतप्रतिपादन वगैरे करतांना कांहीं व्यक्ति, त्यांच्या कृति अगर त्यांचीं मतें यांची तरफदारी न करणें अपरिहार्य आहे. परंतु म्हणून ती तरफदारी कंपूशाहीच्या स्वकीयांच्या तरफदारीसारखी आंधळी असली पाहिजे, असें मात्र खास म्हणतां येत नाहीं. तसेंच, कांहीं कंपू स्वतःचा दंभस्फोट झाल्यानंतर, तर कांहीं दंभस्फोट होण्यापूर्वीपासून तत्त्वनिष्ठेचा आव आणतील. पण तो किती लटका असतो, हें सूक्ष्मपणें पाहणारांस तेव्हांच कळून येईल !

तत्त्वनिष्ठ संप्रदाय वाङ्मयांत जरूर हवेत. परंतु निदान ललितवाङ्मयाचा तरी अंतिम निकष विशिष्ट तत्त्व नसून " प्रतिभा " आहे, हा सिद्धान्त अशा संप्रदायांनीं अहर्निश दृष्टीसमोर ठेवावयास पाहिजे. एवढें " पथ्य " त्यांनीं संभाळलें, म्हणजे त्यांचें अस्तित्व त्या त्या वाङ्मयास उपकारक झाल्यावांचून खचित रहाणार नाहीं.

खराखुरा तत्त्वनिष्ठ संप्रदाय प्रतिस्पर्ध्याविषयीं किती उदारबुद्धि बाळगतो, याचा एक नमुना देण्याजोगा आहे. जी. के. चेस्टरटन व बर्नार्ड शॉ यांच्या " लेखणीच्या लढायां "ची सर्वांस माहिती आहेच. चेस्टरटन हे शॉवर प्रसंगीं तीक्ष्णापेक्षां तीक्ष्ण वाग्बाण सोडतात! तथापि, शॉंच्या लेखनगुणांविषयीं बोलतांना ते त्यांची इतकी स्तुति गातात कीं, कट्टर शॉवाद्याचीहि स्तुति तिजपुढें फिक्कीच वाटेल! प्रतिस्पर्ध्याबद्दल कंपूशाही अशी उदारबुद्धि कितपत बाळगते, याचा दाखला मराठी वाचकांस मिळालाच आहे!

तत्त्वनिष्ठा मागें पडून व्यक्तिनिष्ठा बोकाळली कीं, संप्रदायाच्या अमृताचें कंपूच्या हलाहलांत रूपांतर होतें. हा अनर्थ टाळण्याबाबत वाङ्मयहितेच्छू व तत्त्वनिष्ठ सांप्रदायिकांनीं सदैव जागरूक असावयास पाहिजे.

*        *        *

## १०६ " परप्रेरित " रसिकता!

गेल्या शतकांतील इंग्लंडमधील गोष्ट. रॉयल ॲकॅडमीमध्यें हॉल्मन हंट नामक कुशल चित्रकाराचें " The Light of the World " नांवाचें एक चित्र मांडण्यांत आलें होतें. चित्रांत शुभ्रवस्त्रधारी येशू ख्रिस्त दाखविलेला असून त्याच्या हातीं एक कंदील होता, व त्या कंदिलाचा प्रकाश एका घट्ट लावलेल्या दरवाजावर पडलेला होता. कंदिलाचा प्रकाश म्हणजे सदसद्विवेकबुद्धि व बंद दरवाजा म्हणजे मानवी आत्मा, असें रूपक चित्रकारानें योजिलें होतें. हें रूपक जितकें सुंदर होतें, त्यापेक्षांहि त्या चित्रांतील चित्रकाराची कला अधिक सुंदर होती. येशू ख्रिस्ताच्या मुखावरील अखिल मानवजातीसंबंधींचे दयेचे भाव अतिशय कौशल्यानें प्रस्फुट करण्यांत आले होते. आणि, त्याचे डोळे!—त्यांचें तर शब्दांनीं वर्णन करणेंच अशक्य! हे डोळे चित्रकारानें ख्रिश्चना रोझेटी हिच्या कारुण्यपूर्ण डोळ्यांवरून रेखाटले होते. चित्र काढलें जात असतांना ख्रिश्चना तेथें मुद्दाम येऊन बसे. असें हें अत्युत्कृष्ट चित्र रॉयल ॲकॅडमीमध्यें अनेक प्रेक्षक पाहून जाऊं लागले. पण त्यांपैकीं बहुतेकांस त्याचें सौंदर्य मुळीं प्रतीतच झालें नाहीं! कुणी चित्राकडे पाहून नाक मुरडीत, तर कुणी त्याची अजिबात

उपेक्षा करीत! अखेर रस्किनच्या पाहण्यांत हें चित्र आलें. तो तर तें पाहून थक्कच होऊन गेला! त्यानें "टाइम्स"मध्यें एक पत्र प्रसिद्ध करून त्या चित्राची मुक्तकंठानें स्तुति केली, आणि रस्किनच्या या स्तुतीमुळें ज्या महाभागांनी पूर्वी या चित्राची निंदा वा उपेक्षा केली होती, तेहि आतां त्याची तारीफ करूं लागले!

या चित्रासारखा प्रकार वाङ्मयांतहि घडतो. आणि मराठींत तर पुनः पुन्हां घडतो! एखादी पृथगात्म वाङ्मयकृति उजेडांत आल्यानंतर तिचे ताबडतोब यथायोग्य महत्त्वमापन झालें, असें आपल्याकडे क्वचित्‌च होतें. त्या वाङ्मयकृतीकडे जेव्हां कुणी जोरानें वाचकांचें लक्ष्य वेधील, तेव्हां कुठें त्यांना तिच्या अस्तित्वाची जाणीव होते! आणि मग मात्र ते तिचा सारखा 'उदो उदो' करूं लागतात! याचा प्रत्यय इतर अनेक साहित्यिकांप्रमाणे दोनहि 'विनायक' कवींच्या बाबतींत आलेला आहे. विनायकराव करंदीकर यांच्या "स्त्री आणि पुरुष" व "सुवास" या कवितांची अलीकडे नेहमी तारीफ करण्यांत येते व ती यथार्थहि आहे; तथापि रसिकवर्य कै. वा. ब. पटवर्धन यांनी विनायकांच्या कवितासंग्रहाच्या प्रस्तावनेंत या कवितांची सडकून स्तुति केल्यापासून ही तारीफ होऊं लागली आहे, हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे! विनायकराव सावरकरांच्या "कमला" काव्याबाबतहि अशीच "इतिहासाची पुनरावृत्ति" झाली. हें काव्य प्रथम १९२२ मध्यें प्रसिद्ध झालें. पण त्याला कै. पटवर्धनासारखा रसिक न मिळाल्यामुळें फारच थोड्या मर्मज्ञांखेरीज इतरांस त्याची खरी योग्यता ओळखतां आली नाहीं. १९३४ मध्यें सावरकरांचा "रानफुलें" संग्रह प्रकाशित झाल्यापासून मात्र कांहीं रसिक टीकाकारांच्या अभिप्रायामुळें या काव्याकडे जनतेचें लक्ष बरेचसें वेधलें गेलें, व आतां "**प्रतिभे**"च्या **सावरकर-अंका**-मुळें तें जास्त जोरानें वेधलें जात आहे. कै. श्री. कृ. कोल्हटकर खाजगी बोलण्यांत या काव्याविषयीं अनुकूल उद्गार काढीत. परंतु पुण्याच्या बाराव्या साहित्यसंमेलनांतील आपल्या अध्यक्षीय भाषणांत सावरकरांच्या भाषाशुद्धीबद्दल, रास्त कां होईना पण, प्रतिकूलता दर्शविण्याची त्यांना आठवण झाली, तथापि, त्यांच्या या काव्याचा मात्र नामोल्लेख करण्याचीहि

त्यांस आठवण राहिली नाही! कै. कोल्हटकरांसारख्या अत्यंत रसिक व निःपक्षपाती साहित्याचार्यांचा जेथें हा प्रकार, तेथें इतरांविषयीं काय बोलावें?

* * *

## १०७ ऋस्वरयुक्त व्यंजनें

प्रो. माधवराव पटवर्धन ऊर्फ कवि "माधव ज्यूलियन्" हे ऋस्वरयुक्त व्यंजनें जोडाक्षरांसारखीं वापरून त्यायोगें मागील अक्षरास गुरुत्व आणतात, याबद्दल एका टीकाकारानें नुकतीच तक्रार केलेली आहे, ती अगदीं बरोबर आहे. संस्कृतांत ही पद्धत विरळाच आढळते, आणि मराठींत तिजसंबंधीं धरसोड दिसून येत असली, तथापि ऋस्वरयुक्त व्यंजन जोडाक्षर मानण्यापेक्षां तें जोडाक्षर न मानण्याकडेच मराठीचा जास्त कल झुकतो असें विधान केल्यास तें फारसें चुकीचें होणार नाहीं. याची खूणच ही कीं, ऋस्वरयुक्त व्यंजन मराठींत जोडाक्षरासारखें वापरल्यास तें कानास चमत्कारिक अतएव कर्णकटु वाटल्यावांचून रहात नाहीं. उदाहरणार्थ, प्रो. पटवर्धन यांच्या "एक घाव" या मंदाक्रांतावृत्तांतील

**अन् अत्यन्त मृदु हृदय हें, हाय! कैसा उठावा?**

हा चरण घ्या. त्यांत "मृदु" हें अक्षर जोडाक्षर मानून "अत्यंत" शब्दांतील अंत्याक्षरास गुरुत्व आणलें आहे. त्यामुळें हा चरण किती कर्णकटु वाटतो, हें तो मनांतल्या मनांत न वाचतां चालींत मोठ्यानें म्हटल्यास कुणाच्याहि अनुभवास येईल. प्रोफेसरसाहेबांचा हा Mannerism म्हटला, तरी पण तो अनुकरणीय ठरत नाहीं, एवढें खरीक खरें?

* * *

## १०८ बुद्धदेव बोस

हिंदी "हंस" मासिकाच्या जानेवारी १९३६ च्या अंकांत बुद्धदेव बोस या नवोदित वंगीय कादंबरीकाराचा अल्प परिचय करून देणारा एक त्रोटक लेख प्रसिद्ध झाला आहे. बुद्धदेव बोस हे सत्तावीस-अठ्ठावीस वर्षांचे तरुण गृहस्थ असून त्यांनीं आतांपर्यंत आठदहा ललितकृति निर्माण केल्या आहेत.

" सानंदा " " ये दिन फूटबको कमल " "असूर्यम्पश्या" इत्यादि त्यांच्या कादंबऱ्यांनीं बंगाली वाङ्मयांत अतिशय खळबळ उडवून दिली आहे. बोसबाबूंच्या कादंबऱ्यांत घटना फार थोड्या असतात, तथापि सूक्ष्म मनोविश्लेषण व मनोज्ञ भाषाशैली यांनीं ते आपली कृति विलक्षण हृदयंगम करतात. स्त्री–पुरुषप्रेम हा त्यांच्या कादंबऱ्यांचा मुख्य वर्ण्यविषय आहे. कमालीच्या स्पष्टोक्तीमुळें बंगाली भाषेंतील अनेक ' कृष्णराव मराठ्यां 'नीं त्यांच्या कादंबऱ्यांविरुद्ध ' अश्लील ! '–अशी हांकाटी चालविली आहे ! ' सानंदा ' कादंबरीची नायिका एकाच वेळीं पांचसहा पुरुषांशीं प्रेम करीत असल्याचें दाखविलें आहे, या एकाच गोष्टीवरून वरीलप्रमाणे अश्लीलतेची ओरड कां होते, याचा कांहींना बोध होईल !

बुद्धदेव बोस हे अजून अगदींच तरुण आहेत. एवढ्या लहान वयांत जर त्यांनी सारें वंगीय साहित्य दणाणून सोडलें, तर वयोमानाबरोबर त्यांची प्रज्ञा जों जों परिणत होत जाईल, तों तों त्यांच्या ललितकृति एकापेक्षां एक सरस होत जातील, अशी खात्री बाळगल्यास ती अनाठायीं कशी म्हणतां येईल !

*  *  *

## १०९ नवमतवाद व प्रो. वा. म. जोशी

प्रो. वामनराव जोशी यांच्या, येथील " नवा मनु " पत्राच्या प्रथमांकांत छापलेल्या, "नवमतवादाविषयीं मला काय वाटतें ? " या लेखामुळें एवढ्यांत, वर्तमानपत्री जगामध्यें, एक छोटेंसें वादळ उत्पन्न झालें आहे.

प्रो. वामनरावजींनी या लेखांत " नवमतवाद " हा शब्द वापरूनहि त्याची निश्चित व्याख्या व व्याप्ति निःसंदिग्धपणानें नमूद केलेली नाहीं, हें त्यांत मोठेंच वैगुण्य राहिलेलें आहे. " नवमतवाद " या शब्दाच्या अर्थाबद्दल माजलेला " नाना मतांचा गलबला " पाहिला असतां अशी व्याख्या व व्याप्ति सांगणें किती आवश्यक होतें, याची साक्ष पटेल.

प्रोफेसरमजकुरांनीं सदर लेखांत प्रामुख्यानें दोन मुद्दे मांडले आहेत. एक व्यक्तिस्वातंत्र्याची महति. व दुसरा विवाहसंस्थेचें पावित्र्य. हे दोनहि

मुद्दे अतिशय वादग्रस्त आहेत, हें उघड आहे. तशांत प्रो. वामनरावजींनीं करावी तितकी साधकबाधक चर्चा विस्तारानें न केल्यामुळें त्यांच्या विवेचनावर त्यांस अन्याय न करतां खंडन-मंडनपर टीका करणें जरा कठिणच झालें आहे.

व्यक्तिस्वातंत्र्याची महति गातांना प्रो. वामनरावजींनीं खाजगी मालमत्ता नष्ट करण्याचा प्रश्न उदाहरणादाखल घेतलेला आहे. खाजगी मालमत्ता नष्ट करण्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्यास मोठाच धक्का बसतो, असा वामनरावजींचा आक्षेप आहे. परंतु समाजांतील आर्थिक विषमता जर नेस्तनाबूद करावयाची आहे, तर खाजगी मालमत्ता — अजिबाद नसली, तरी बऱ्याच मोठ्या प्रमाणांत — नष्ट न करून कसें चालेल, ही बिकट शंका पुढें उभी राहते! स्वतः वामनरावजींना आर्थिक विषमता चालते, पण व्यक्तिस्वातंत्र्य-नाश मात्र बिलकुल चालत नाहीं! अर्थात् साम्यवादाशीं त्यांचा मूलतःच मतभेद आहे, असें म्हटलें पाहिजे. त्यामुळें व विशेषतः ते सविस्तर मीमांसा करीत नसल्यामुळें त्यांना अन्याय न व्हावा एतदर्थ त्यांचें हें मत साम्यवादास मान्य होण्याजोगें नाहीं, एवढा उडता उल्लेख करून हा मुद्दा तूर्त अपुराच सोडावा लागतो.

विवाहसंस्थेच्या पावित्र्याचा वामनरावजींचा दुसरा मुद्दाहि याच कारणास्तव, असाच मतभेद दर्शवून, अर्धाकच्चा सोडून द्यावा लागतो. त्यांतच प्रो. र. धों. कर्वे यांनीं "नवा मनु" पत्राच्या द्वितीयांकांत वामनरावजींचा हा मुद्दा साधार खोडला असल्यामुळें त्यांच्या लेखाकडे बोट दाखविण्यापलिकडे या बाबतींत अधिक लिहिण्याचें प्रयोजनहि राहिलेलें नाहीं.

प्रो. वामनरावजी यांनी हा विषय साधकबाधक प्रमाणें देऊन पुनः एकवार विस्तारानें मांडावा, अशी त्यांना माझी आग्रहाची सूचना आहे. त्यामुळें त्यांच्या आक्षेपांचें नक्की स्वरूप साधार कळून येऊन त्यांचा खरेखोटेपणा नीट पडताळतां येईल. वामनरावजींचीं मतें कुणास न पटलीं, तरी त्यांची विद्वत्ता, वादविवादकौशल्य व लेखनगुण यांमुळें त्यांचा तो प्रबंध आदरणीयच होईल, ही वाचकांबरोबर खुद्द वामनरावजींनींहि खात्री बाळगावी.

* * *

## ११० रुडयार्ड किप्लिंग

विख्यात आंग्ल साहित्यिक रुडयार्ड किप्लिंग हे निधन पावल्यामुळें इंग्रजींतील अतिरिक्त स्तुति व अतिरिक्त निंदा वांट्यास आलेला एक सरस्वतीपुत्र नाहींसा झाला आहे.

किप्लिंग यांची पद्य व गद्य या उभयतांवर सारखीच हुकमत असे. रा. न. चिं. केळकर ज्याला "लौकिक पठणाचें अधिष्ठान" म्हणतात, तें किप्लिंगच्या गीतांना लाभलें होते. अर्थात् यावरून अर्वाचीन काळांतील ते सर्वश्रेष्ठ इंग्रजी कवि ठरतात, असें अनुमान मात्र करावयाचें नाहीं. विद्यमान् आयरिश कवि यीट्स् यांच्या मृदुमधुर भावगीतांची सर किप्लिंगच्या कवितांना कधींच आली नाही. तथापि गूढतेमुळें यीट्सची गीतें किप्लिंगच्या कवितांइतकीं लोकप्रियहि झाली नाहीत. हेंहि विसरतां कामा नये. यीट्स् हे "कवींचे कवि" झाले, पण किप्लिंग हे "जनतेचे कवि" झाले! कवींचा कवि होणें हें दुर्घट असतें, तथापि जनतेचा कवि होणें हें देखील वाटतें तितकें सोपें नाहीं.

गद्यांतहि किप्लिंग यांना अशीच लोकप्रियता मिळविली. १९०१ मध्ये प्रसिद्ध झालेली 'Kim' कादंबरी ही त्यांची सर्वोत्कृष्ट गद्यरचना होय. रॉबर्ट लिंडसारखे रसिक ही कादंबरी टाकाऊ समजतात व थॉमस हार्डीच्या कादंबऱ्यांच्या अपेक्षेनें ती तशी ठरतेहि. यामुळें व किप्लिंग यांना नोबेल प्राईझ मिळून हार्डीना तें न मिळाल्यामुळें एका टीकाकारानें तावातावानें हार्डी यांना वाङ्मयांतील 'सुवर्णकार' ही पदवी देऊन किप्लिंग यांना 'लोहकार' ही संज्ञा दिली होती!

पद्यांत काय, अगर गद्यांत काय, किप्लिंग यांच्या प्रतिभेचें उड्डाण ठरीव मर्यादेबाहेर कधींच गेलें नाहीं! त्यांना लाभलेल्या अतिरिक्त स्तुतीचें व अतिरिक्त निंदेचेंहि रहस्य याच गोष्टीत आहे. सर्वसामान्य वाचक फारसे उंच जाऊं शकत नसल्यामुळें त्यांना झेंपेल इतपतच वर गेल्यास ते त्या वाङ्मयकृतीचे बंदे गुलाम बनतात. आणि मग साहजिकच त्यांजकडून त्या

कृतीच्या जनकावर स्तुतीचा वर्षाव होऊं लागतो ! उलटपक्षीं, लेखनाबाबत उच्च अपेक्षा करणाऱ्या वाचकांस या स्तुतिस्तोत्रांचें आश्चर्य वाटून क्रियेस प्रतिक्रिया या नात्यानें ते त्या साहित्यिकावर व त्यांच्या वाङ्मयकृतींवर निंदेचा भडिमार करूं लागतात. किप्‌लिंगच्या वांट्यास अतिरिक्त निंदा व अतिरिक्त स्तुति ह्या दोनहि आल्या होतीं, असें सकृद्दर्शनीं विरोधाभासात्मक वाटणारें जें विधान प्रारंभीं केलें आहे, त्याची यथार्थता वाचकांस आतां पटेल.

किप्‌लिंग हे कट्टर साम्राज्यवादी होते, ही वस्तुस्थिति तुम्हांआम्हां हिंदवासीयांस खटकणारी अशी आहे हे खरें आहे, परंतु ललितवाङ्मयाच्या सृष्टींत अशा प्रकारच्या विशिष्ट मताभिनिवेशाकडे उदार दृष्टीनेंच पाहिलेलें बरें, असें मला वाटते.

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक २

## १११ फ्रॉइडचें आत्मचरित्र

मनोविश्लेषणशास्त्राचे जनक डॉ. सिग्मंड फ्रॉइड यांच्या ' An Autobiographical Study ' या आत्मचरित्रपर ग्रंथाची नुकतीच प्रकाशित झालेली आवृत्ति त्या शास्त्राच्या व डॉ. फ्रॉइड यांच्या चाहत्यांस आदरणीय वाटेल. या ग्रंथाचीं आरंभीचीं कांहीं पृष्ठें डॉ. फ्रॉइड यांनीं आपलें ज्यू घराणें, इ. स. १८५६ मधील आपला जन्म, विज्ञानादि विषयांचें आपलें अध्ययन, आपलें गृहसौख्य इत्यादि स्वविषयक हकीकतीस वाहिलीं असून उरलेलीं सर्व पृष्ठें मनोविश्लेषणशास्त्र आपण कां व कसें प्रस्थापित केलें, या चर्चेनें व्यापिलीं आहेत. निव्वळ खाजगी माहिती विस्तारानें मिळवूं इच्छिणाऱ्या वाचकांची या ग्रंथानें कांहींशी निराशा होईल खरी; तथापि शास्त्रजिज्ञासूंस सदर ग्रंथ म्हणजे बौद्धिक मेजवानीच वाटेल !

डॉ. फ्रॉइड यांनीं मनोविश्लेषणशास्त्राच्या प्रस्थापनेमुळें जगाच्या विचारांत विलक्षण क्रांति घडवून आणली आहे, हें त्यांच्या कट्टया शत्रूंसहि मान्य करावें लागेल. खुद्द डॉ. फ्रॉइड यांनाहि याची जाणीव आहे व ती त्यांनीं एकदां प्रगटहि केली होती ! ते म्हणाले होते कीं, मानवजातीच्या आत्मप्रीतीस ( Narcissism ला ) तीन शास्त्रीय शोधांनीं जबरदस्त धक्के बसले. पहिला शोध कोपर्निकसचा पृथ्वी व सूर्यमाला यांच्या परस्परसंबंधाचा, दुसरा शोध डार्विनचा मनुष्यजातीचा,आणि तिसरा शोध मनोविश्लेषणशास्त्राचा. हा शेवटचा शोध सांगतांना डॉ. फ्रॉइड यांनीं विनयामुळें स्वतःचा स्पष्ट नामनिर्देश केलेला नसला, तरी पण त्या शोधाचें सारें श्रेय त्यांजकडेच जातें, हें सर्वश्रुतच आहे.

डॉ. फ्रॉइड यांचा हा आत्मविश्वास अनाठायीं नसल्याची ग्वाही प्रत्येक विचारी व्यक्ति देईल.

फ्रॉइडचे ' कामवासने 'च्या Libido च्या सिद्धांतासारखे अनेक सिद्धांत क्रांतिकारक आहेत, हें निःसंशय आहे. परंतु त्यांचे सर्वच सिद्धांत अगर

मतें सर्वमान्य होण्याजोगीं नाहींत, हेंहि त्याचबरोबर ध्यानांत घ्यावयास पाहिजे. उदाहरणार्थ, ऐंद्रियकता ( Sensuality ) व लैंगिकता ( Sexuality ) यांची नेणतेपणानें कां होईना, पण समव्याप्ति मानल्यामुळें डॉ. फ्रॉइड यांनीं कांहीं सिद्धांतांबाबत मोठाच घोंटाळा माजविला आहे ! अर्थात् डॉ. फ्रॉइड हे कितीहि जाडे विचारवंत असले, तथापि त्यांच्या ग्रंथांचें अध्ययन अंधश्रद्धेनें न करतां डोळसपणानेंच केलें पाहिजे, हें स्पष्ट आहे. अलीकडे आपल्या वाङ्मयांत फ्रॉइडच्या ग्रंथांचा अभ्यास करण्यासंबंधींच्या उपदेशाची लाट उसळलेली आहे. अशा परिस्थितींत हा डोळसपणाचा इषारा देणे अत्यावश्यक आहे. डॉ. फ्रॉइड यांच्या मनोविश्लेषणशास्त्रावर मराठींत सोपपत्तिक ग्रंथ निर्माण होण्याची अतिशय जरूर आहे. रा. मोहरीर यांची ' विविधज्ञानविस्तारां 'तील एतद्विषयक लेखमाला व इतर किरकोळ प्रबंध वगळ्यास या विषयावर स्वतंत्र असें लेखन मराठींत फारसें झालेंच नाहीं, असे म्हटलें तरी चालेल. डॉ. लोंढे अगर प्रो. वाडेकर यांच्यासारखे विद्वान् ही कामगिरी अंगावर घेतील, तर त्यांचे मराठी वाचकांवर अगणित उपकार होतील.

* * *

## ११२ गाल्सवर्दीचें वैगुण्य

' Galsworthy's Greatness' हा मि. एल्. ए. जी. स्ट्रॉंग यांचा छोटेखानी निबंध एका इंग्रजी नियतकालिकांत नुकताच प्रकाशित झाला आहे. गाल्सवर्दी यांचें सर्वांत मोठें वैगुण्य म्हणजे त्यांची मर्यादित कल्पनाशक्ति हें होय, असें त्यांत मि. स्ट्रॉंग सांगतात. आणि या विधानाला आधार म्हणून ते गाल्सवर्दीचें " It may perhaps be as well to bear in mind that I am not a reformer-only a painter of pictures, a maker of things—**Imagined out of what I have seen and felt** "—हें वचन त्यांजवरच उलटवितात ! स्ट्रॉंगसाहेब म्हणतात कीं, अफाट कल्पनाशक्तीच्या अभावीं गाल्सवर्दी यांना पात्रें, प्रसंग वगैरेकरतां दररोजच्या घडामोडींवर विशेष

विसंबून राहावें लागे; आणि, वयोमानानुरूप भोंवतालच्या परिस्थितीवरील त्यांची पकड जों जों सुटूं लागली, तों तों त्यांच्या कादंबऱ्यांतील वास्तविकता कमी कमी होऊं लागली. त्यांच्या अखेरअखेरच्या कृतींतील तरुणी चालू काळांतील न वाटतां जुन्या वाटतात, याचे कारण स्ट्रँगसाहेबांच्या मतें हेंच होय.

हें व इतर वैगुण्ये असूनहि गाल्सवर्दी हे थोर ( Great ) साहित्यिक ठरतात, हें स्ट्रँगसाहेबांचे मत नमूद केलें पाहिजे. त्याचबरोबर, मिस्टर स्ट्रँग हे गाल्सवर्दी यांना अतिशय थोर साहित्यिक ( Supremely great writer ) म्हणून मानावयास तयार नाहींत, हे मुद्दां नमूद करणे आवश्यक आहे.

* * *

## ११३ बनहट्टींचें भाषण

इंदूरच्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनांतील साहित्यशाखेचे अध्यक्ष म्हणून प्रो. श्री. ना. बनहट्टी यांनी जें विचारप्रवर्तक भाषण केलें, ते आतां वर्तमान-पत्रांतून संपूर्ण प्रसिद्ध झाले आहे. संमेलनाध्यक्ष राजे बाळासाहेब पंतप्रतिनिधि यांच्या भाषणापेक्षां प्रो. बनहट्टी यांचे हे भाषण अनेक पटींनी उत्कृष्ट आहे—किंबहुना, या दोन भाषणांची तुलना करणेंच अप्रस्तुत आहे, एवढे म्हटलें म्हणजे त्याची निराळी तारीफ करण्याचे कारण नाहीं. अशा या सुंदर भाषणाची व्हावी तशी बूज होऊं नये, हे आमच्या उपेक्षाबुद्धीस साजेसेंच आहे.

प्रो. बनहट्टी यांनी आपल्या भाषणाच्या पूर्वार्धात साहित्यशाखेच्या बैठकींत वाचलेल्या व संमेलनांत सादर केलेल्या निबंधांचा विद्वत्ताप्रचुर परामर्ष घेतला असून उत्तरार्धात थोडी तात्त्विक चर्चा केली आहे. त्यांच्या चर्चेचे ( १ ) ललितेतर वाङ्मयाकडे लक्ष्य पुरविणे ( २ ) ते वाङ्मय सौंदर्यान्वित करणें ( ३ ) व ललितवाङ्मयानें तंत्रादिकांपेक्षां भरीवपणावर अधिक भर देणें – हे तीन मुख्य मुद्दे सर्वमान्य होण्याजोगेच आहेत, हें सांगावयास नकोच.

या तीन मुद्यांतील दुसरा मुद्दा विशेष महत्त्वाचा आहे. ललितेतर ऊर्फ गंभीर वाङ्मय रुक्ष न उतरतां सरस उतरलें पाहिजे, हें प्रोफेसरसाहेबांचें म्हणणें सर्व ललितेतर वाङ्मयनिर्मात्यांनी हृत्फलकावर कोरून ठेवण्यासारखें आहे. ज्योतिःशास्त्रांत कै. शं. बा. दीक्षित व इतिहासांत कै. खरेशास्त्री यांनीच काय तें आकर्षक लेखन केलें. बाकी सारें सहारा वाळवंटच ! सरस–नीरस लेखनाबाबत कै. टिळकांचें 'गीतारहस्य' व प्रो. वा. म. जोशी यांचे 'नीतिशास्त्रप्रवेश' याहि दोन पुस्तकांची तुलना करतां घेण्यासारखी आहे ! गिबन, बर्ग्सॉं प्रभृतींचे अनुकरण करून गंभीर वाङ्मयहि लेखनसौंदर्यानें नटविण्याची प्रथा मराठींत पडावयास पाहिजे.

हा एक मुद्दा जरी गंभीर वाङ्मयनिर्मात्याच्या मनावर ठसला, तरी प्रो. बनहट्टी यांच्या या भाषणाचें सार्थक झालें, असे होईल.

मात्र गंभीर किंवा ललितेतर वाङ्मय सौंदर्यसंपन्न करणे म्हणजे निव्वळ जाडेजाडे शब्द वापरणे अगर उपमा–उत्प्रेक्षांची खोगीरभरती करणे खास नव्हे, हें अनेकवार सांगून झालें असूनहि पुनः सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं.

* * *

## ११४ रोमाँ रोलाँ शतायु होवोत !

विश्वविख्यात साहित्यिक व ध्येयवादी रोमाँ रोलाँ यांचा वाढदिवस गेल्या २९ जानेवारीला जगांत अनेक ठिकाणी साजरा झाला. रोमाँ रोलाँ यांच्या जीवनरूपी शतदलकमलाच्या सत्तर पाकळ्या उमलल्या असल्या, तथापि आणखी कमीत कमी तीस पाकळ्या उमलत तोंपर्यंत तरी त्यांचा इहलोकी वास व्हावा, हीच सर्वांची मनीषा आहे.

रोमाँ रोलाँ हे ध्येयवादी तत्त्ववेत्ते म्हणून सर्वत्र नामांकित असले, तरीपण थोर साहित्यिक याच नात्यानें त्यांचें नांव पृथ्वीवर अजरामर राहील. 'Jean Christophore' 'Soul Enchanted' इत्यादि त्यांच्या वाङ्मयकृति म्हणजे कथावाङ्मयाचे पिरॅमिड्सच होत ! टॉलस्टॉय, ह्युगो, गॉर्कीप्रभृति जे अत्यल्प पहिल्या दर्जाचे कादंबरीकार जगांत होऊन गेले व आज आहेत,

त्यांच्या श्रेणींत रोमाँ रोलाँ यांना वरचें स्थान देण्यास खाष्टांतील खाष्ट टीकाकारहि खचित माघार घेणार नाहींत !

रोमाँ रोलाँ यांना हिंदुस्थानबद्दल किती जिव्हाळा वाटतो, याची साक्ष त्यांचीं गांधी, रामकृष्ण परमहंस वगैरेवरील पुस्तकें व प्रबंध देतील. गतवर्षी बाबू सुभाषचंद्र बोस यांना दिलेल्या मुलाखतींत रोमाँ रोलाँ यांनीं हिंदुस्थानच्या पारतंत्र्याबाबत किती जळजळीत उद्गार काढले होते, याची स्मृति ' मॉडर्न रिव्ह्यू 'च्या वाचकांस असेलच.

असा हा महान् कलावंत व हिंदुस्थानचा हितचिंतक शतायु होवो !

— **प्रतिभा,** वर्ष ४, अंक ३

## ११५ कलावंत व शास्त्रज्ञ

परवां चित्रकार ‘ रोरिक ’ यांच्या चित्रकलेवर एका ताज्या परप्रांतीय मासिकांत आलेला सचित्र लेख पाहून माझा एक मित्र उद्गारला, “ छे, छे ! यांतील कांहीं चित्रें बिलकुल कळत नाहींत बुवा ! हा लेखक चित्रकाराची एवढी भरमसाट स्तुति कां करतो, कळत नाहीं ! आपल्याला तरी हा चित्रकार फारसा ‘ बडा ’ वाटत नाहीं खास ! ”—इ० इ०

कलावंताबाबत असा अनुभव अनेकवार येतो. एखादी कलाकृति अनाकलनीय वाटली कीं, तिजवर प्रायः टाकाऊपणाचाच आळ घेण्यांत येतो ! या दृष्टीनें शास्त्रज्ञापेक्षां कलावंत हा कसा कमनशिबी ठरतो, हें बर्ट्रेन्ड रसेल यांनीं सुंदरतेनें दाखविलें आहे. ते म्हणतात, “ When the puplic cannot understand a picture or a poem, they conclude that it is a bad picture or a bad poem. When they cannot understand the theory of Relativity, they conclude (rightly) that their education has been insufficient. Consequently, Einstein is honoured while the best painters are left to starve in garrets, and Einstein is happy while the painters are unhappy ! ”

* * *

## ११६ कार्लाईलचा बापडा शेले !

महाकवि शेले याच्या काव्यरत्नांची बूज, केव्हां अनाकलनीयतेमुळें तर केव्हां अभिरुचिभेदामुळेंहि, त्याच्या जिवंतपणीं व तो मेल्यानंतर देखील अनेक वर्षें झाली नाहीं. कार्लाईल हा एवढा बुद्धिवान् व गट्टेचा रसिक चाहता, पण त्यालासुद्धां शेलेची अलौकिक प्रतिभा ओळखतां आली नाहीं ! शेलेच्या मृत्यूनंतर तीस वर्षांनीं रॉबर्ट ब्रौनिंगला लिहिलेल्या एका पत्रांत शेलेविषयीं कार्लाईलनें पुढील प्रमाणें तारे तोडले आहेत:—

" I am not sure but you would excommunicate me...if I told you all I thought of Shelly...weak in genius, weak in character...a poor, thin, spasmodic, hectic, shrill and pallid being...**Poor Shelly**, there is something void and Hades-like in the whole inner world of him, his universe is all vacant azure hung with a few frosty, mournful if beautiful stars..." ('The Work Promethean')

आतां कार्लाईलनें याप्रमाणें अधिक्षेपिलेला 'बापडा शेले' कालांतरानें काव्यरसिकांच्या गळ्यांतील ताईत होऊन बसला, ही गोष्ट वेगळी ! पण खुद्द कार्लाईलला मात्र त्याची योग्यता अजमावतां आली नाही, एवढें बरीक खरें ! कवि या नात्यानें शेलेला पुष्कळच वरचें स्थान देणारा मॅथ्यु अर्नोल्ड हा दुसरा रसिक साहित्यिक त्याला 'अभिजात' कवि समजण्यास तयार नव्हता, हें वरील ग्रंथांतच मॅथ्यु ऑर्नाल्डचें जें एक वचन उद्धृत केलें आहे, त्यावरून प्रत्ययास येतें. मॅथ्यु ऑर्नाल्ड कुरकुरतो कीं, " Shelly is not a classic whose various readings are to be noted with earnest attention !"

* * *

## ११७ अत्रे यांचें भाषण

बडोदें वाङ्मय परिषदेच्या चौथ्या अधिवेशनांतील अध्यक्षपदावरून प्रिं. प्र. के. अत्रे यांनी केलेल्या भाषणाची बरीच तारीफ झाली आहे, आणि ती बव्हंशीं योग्य होती, असेंच हें भाषण वाचून कुणाचेंहि मत होईल.

मराठी ललितवाङ्मय लोकाभिमुख व्हावयास पाहिजे, हा मुद्दा प्रिं. अत्रे यांनीं आपल्या भाषणांत तडफदारपणानें मांडला आहे. त्याचबरोबर साम्य-वादी वाङ्मय हेंच बावनकशी वाङ्मय होय, या एकांतिक विचारसरणीचा त्यांनीं धिःकारहि पण केला आहे ! अत्रे साम्यवादी नसल्याची साक्ष या भाषणावरून देखील पटते.

'जडजंबाली' भाषापद्धति व अलंकारप्राचुर्य यांविषयींहि प्रि. अत्रे यांनीं तीव्र नापसंति व्यक्त केली आहे. प्रो. पोतदार, रा. माडखोलकर, रा. खांडेकर

प्रभृति साहित्यिकांच्या लेखनगुणांचा योग्य तो गौरव करूनहि अपरिचित वा दुर्बोध शब्दयोजना अगर अलंकारांचा फाजील सोस हे त्यांचे दोष दाखविणें अत्र्यांना भागच पडलें. "सर्वसामान्य वाचकांना सहज कळेल अशा सरळ, स्पष्ट, डौलदार व ठसकेबाज लोकभाषेंतच व लेखनपद्धतींतच वाङ्मय निर्माण व्हावयाला पाहिजे...मराठी लिखाणांतील संस्कृत भाषेच्या निष्कारण अवडंबराचें बंड कमी व्हावयाला पाहिजे, तरच त्याविषयीं बहुजनांना आपुलकी वाटेल" हा प्रि. अत्रे यांनीं दिलेला इषारा बहुमोल आहे. गेलं वर्षभर बिचारा 'रामशास्त्री' यापेक्षां निराळें असें काय म्हणत होता! पण माझ्या कांहीं मित्रांनी त्याबद्दल केवढे अकांडतांडव चालविलें आहे पहा!

आदर्शभूत गद्यलेखक म्हणून रा. न. चिं. केळकर, रा. वरेरकर, प्रो. फडके वगैरे साहित्यिक व आदर्शभूत पद्यलेखक म्हणून चंद्रशेखर, तांबे, यशवंत, गिरीश वगैरे कवि यांचा प्रि. अत्रे यांनीं नामोल्लेख केला आहे, तो सर्वसंमत होण्यासारखाच आहे. अत्रे-वरेरकर यांची सर्वश्रुत 'विरोधभक्ति' लक्षांत घेतां अत्रे यांनीं आदर्शभूत गद्यलेखकांत वरेरकरांचा निर्देश करावा, ही गोष्ट त्यांच्या खिलाडू वृत्तीचीच द्योतक समजली पाहिजे. मात्र या लेखमालिकेंत प्रो. पोतदारांप्रमाणेंच जुने अथवा अपरिचित शब्द वापरणाऱ्या प्रो. माट्यांनाहि अत्रे बसवितात हें आश्चर्य होय.

'सावरकर नि पटवर्धन' यांच्या भाषाशुद्धीच्या निरर्थक चळवळीवर अत्रे यांनीं ओढलेले कोरडेहि सार्थच वाटतात. या चळवळीमुळें 'बोलपट' शब्दासारखे कांहीं सुंदर शब्द मराठींत निर्माण झाले असतील; पण एकंदरीनें ही चळवळ भाषाभिवृद्धीस हितावह ठरणारी नाहीं, असाच सूज्ञांचा तिजविषयीं अभिप्राय पडेल. बॅ. सावरकर व प्रो. माधवराव पटवर्धन यांची मिशनऱ्यांच्या भाषेपेक्षांहि हास्यास्पद वाटणारी भाषापद्धतीच त्यांच्या उद्योगाचा फोलपणा पटवून देण्यास पुरेशी आहे!

प्रि. अत्रे यांचें हें भाषण आहे यापेक्षां गंभीर स्वरूपाचें असतें तरीहि तें आकर्षक झालें असतें, एवढें मात्र अखेरीस म्हणावेंसें वाटतें.

* * *

## ११८ प्रो. वा. म. जोशी यांस उत्तर

'प्रतिभे'च्या १ फेब्रुवारीच्या अंकांतील 'नवमतवाद व प्रो. वा. म. जोशी' या स्फुटांत मी 'नवा मनु' अंक १, यांतील वामनरावजीच्या 'नवमतवादाविषयीं मला काय वाटतें?'—या विवाद्य लेखावरून पुढील विधान केलें होतें. "स्वतः वामनरावजींना आर्थिक विषमता चालते, पण व्यक्तिस्वातंत्र्यनाश मात्र बिलकुल चालत नाहीं."

यावर गेल्या अंकांतील 'मी आणि नवमतवाद' या खुलाशांत प्रो. वामनराव म्हणतात, "मला आर्थिक विषमता नको आहे, हें मी आपल्या लेखांत स्पष्टपणें म्हटलें असतां ती मला चालेल, असें भासवणें याला काय म्हणावयाचें? तसेच, व्यक्तिस्वातंत्र्यनाश मला बिलकूल चालत नाहीं, असें मी कोठे म्हटलें आहे?"

ता. १ फेब्रुवारीच्या 'प्रतिभें'त वर दिलेले उद्गार मी काढण्यास प्रोफेसरसाहेबांच्या 'नवामनू'मधील लेखांतील जीं वाक्यें कारणीभूत झालीं, तींच येथें उद्‌धृत करतों, म्हणजे मी त्यांचा बुद्धिपुरस्सर हेतुविपर्यास केला कीं काय, हें वाचकांना ठरविण्यास सोयीचें होईल. तीं वाक्यें अशीं:—"व्यक्तिस्वातंत्र्य ही इतकी बहुमोल चीज आहे कीं, तिचें रक्षण करण्याकरितां पुष्कळ गैरसोयी सोसायला मी तयार आहे. समाजांतील व्यक्तींचें स्वातंत्र्य मी हिरावून घेतों, पण त्याच्या मोबदल्यांत आम्ही आर्थिक विषमता काढून टाकतों आणि नंदनवनांतील या तऱ्हेच्या सुखसोयी मिळवून देतों, असें जर मला कोणी सांगितलें, तर **मी म्हणेन कीं आर्थिक विषमता व आर्थिक टंचाई मला पुरवतील, परंतु तुमच्या त्या नंदनवनांतील सुखसोयीकरितां समाजांतील व्यक्तींचें स्वातंत्र्य मी गहाण टाकण्यास तयार नाहीं.**" (जाड ठसा माझा) वामनरावजींनीं या मजकुराच्या पूर्वी अगर नंतर आर्थिक विषमतेबद्दल चार-दोन प्रतिकूल 'फिके' उद्गार काढलेले असले, तथापि वरील अवतरणाचें 'लढाऊ' स्वरूप ध्यानांत घेतां या स्फुटाच्या आरंभीं दिलेलें विधान

करण्यांत मीं त्यांना अन्याय केला आहे, असें मला वाटत नाहीं. तरी पण या विधानाबाबत त्यांनीं आतां जो निःसंदिग्ध खुलासा केला आहे, तो मी आनंदानें मान्य करतों.

* * *

## ११९ माडखोलकरांचा प्रश्न*

मागील अंकांत 'कला' मासिकांतील 'विरलेलें स्वप्न' नांवाच्या रा. माडखोलकर यांच्या ज्या लेखाचा उल्लेख आलेला आहे, त्यांत त्यांनीं अभावितपणें एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित केला आहे. आज त्याचा थोडक्यांत विचार करूं.

विभावरी शिरूरकर यांच्या 'विरलेलें स्वप्न' कादंबरींतील कांहीं भागाला त्याच्या राजकीय स्वरूपामुळें प्रकाशक रा. मोटे यांनीं कात्री लावली, आणि नाखुषीनें कां होईना, पण विभावरीबाईंना या प्रकारास संमति द्यावी लागली, ही गोष्ट या कादंबरीच्या वाचकांस विदित आहेच. या काटछाटीवरून रा. माडखोलकर यांनीं 'कलें'तील सदर लेखांत विभावरीबाई व मोटे यांजवर 'भीरुते'चा ऊर्फ भेकडपणाचा आरोप केला आहे! विभावरीबाईसंबंधीं एका ठिकाणीं "भीरुत्व हें स्त्रीसहज असल्यामुळें त्यांना शोभूनच दिसतं–" असें लिहून, माडखोलकरांनीं पळवाट करून ठेवली आहे खरी; परंतु याप्रमाणें लिहूनहि ज्याअर्थीं या लेखांत अखेरपर्यंत ते विभावरीबाईंना भेकडपणाबद्दल हिणवीतच राहतात, त्याअर्थीं त्यांची ही पळवाट सपाट मैदानांतून जात नसून खांचखळग्यांतूनच जाते, असें म्हणणे भाग आहे!

रा. मोट्यांनीं माडखोलकरांना कोणत्या रीतीनें आपला पराक्रम दाखवावा, म्हणजे त्यांना त्यांच्या पौरुषाची खात्री पटेल, हा या उभयतांमधला

---

* या स्फुटानें नियतकालिकांच्या जगांत केवढें वादळ निर्माण केलें, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच! जिज्ञासूंनीं १ एप्रिल १९३६ ची 'प्रतिभा' पहावी.

अतएव अगदीं खाजगी स्वरूपाचा संबंध असल्यामुळें त्याचा येथें ऊहापोह करण्याचें कांहींच कारण नाहीं !

अलीकडे माडखोलकरांना भेकडपणाबद्दल इतरांस हिणविण्याची जणूं खोडच जडलेली दिसते ! कारण, 'बडे बाप आणि त्यांचे ? बेटे,' ('त्यांचे' शब्दापुढील प्रश्नविराम कसली 'शास्त्रीय चिकित्सा' व्यक्त करतो बरें ?) या आपल्या गाजलेल्या 'जंगी' लेखांत त्यांनीं नेमका हाच आरोप आपले प्रत्यक्ष गुरु कै. कोल्हटकर व गुरुपत्र रा. बापूराव कोल्हटकर यांजवरहि केलेला आहे ! 'शास्त्रीय चिकित्से'च्या अगडबंब नांवाखालीं भेकडपणाबद्दल इतरांस हिणविण्याच्या माडखोलकरांच्या या प्रवृत्तीसंबंधीं त्यांच्याच पद्धतीनें व्यक्तिविषयक चर्चा करणें अशक्य थोडेंच आहे ? परंतु—!

रा. माडखोलकर यांनीं 'कलें'तील लेखांत कळत–नकळत उपस्थित केलेला प्रश्न स्थूल मानानें पुढील शब्दांत मांडतां येईल :—

**"राजकीय दडपणामुळें एखाद्या ग्रंथांतील मजकूर मुद्रणापूर्वीं लेखक–प्रकाशकांनीं गाळावा काय ?"**

या प्रश्नाचें उत्तरहि माडखोलकरांनी अभावितपणेंच देऊन ठेवलेलें आहे. तें उत्तर अर्थातच नकारार्थीं आहे !

परंतु वरील प्रश्नाचा दूरदृष्टीनें विचार केल्यास त्याचें उत्तर 'अस्ति' पक्षींच द्यावें लागेल, असें निदान मला तरी वाटतें. मग त्याला माडखोल-करांसारख्यांनीं 'भीरुता' ही संज्ञा लावली, तरी चिंता नाहीं ! कारण, एखाद्या पुस्तकांतील कायद्याखालीं येण्याचा संभव असलेला भाग तसाच कायम ठेवून तें सबंध पुस्तक इरेला घालणें व ठार होऊं देणें हें व्यवहाराच्याच नव्हे, तर कार्याच्याहि दृष्टीनें कितपत इष्ट आहे याचा सूज्ञांनीच निर्णय करावा. तेंच त्या पुस्तकांतील आक्षिप्त ठरूं पाहणारा भाग वगळून उर्वरित भागाचें मुद्रण केल्यास सदर पुस्तक कायद्याच्या कचाट्यांतून सुटून जीवंत राहाण्याची खात्री नसली, तरी पण अल्पस्वल्प शक्यता

तरी राहील, आणि वाचकवर्ग, पुस्तकच जप्त झाल्याने, तदंतर्गत विचारांस जो अजिबात मुकावयाचा, तो तसा मुकणार तरी नाहीं. अर्थातच ही सर्व काळजी घेऊनहि तो ग्रंथ सरकारी कायद्याच्या खंजिराला बळी पडणारच नाही, अशी शाश्वती कशी देतां येईल ?. तथापि, आपल्या परीनं थोडीफार काळजी ही घेतली पाहिजे, मग पुढें काय व्हावयाचें तें खुशाल होवो ! औषधोपचार करूनहि रोगी मरावयाचा तो मरतोच; पण मुळींच उपचार करावयाचे नाहींत, ही कुठली रीत ? आतां ज्या पुस्तकांतील शब्दान्‌शब्द ज्वलज्जहाल स्वरूपाचा असेल त्याच्या बाबतींत हा उपाय व्यर्थ आहे, हें उघड आहे. परंतु ‘ विरलेलें स्वप्न ’ ही कादंबरी तरी या वर्गांत समाविष्ट होऊं शकणारी नसल्यामुळें या जातीच्या ग्रंथांचा विचार या ठिकाणीं करणें अप्रस्तुतच होय.

येथें कुणी विचारील, “ होय, तुमचें म्हणणें तत्त्वतः कबूल आहे. परंतु ‘ विरलेलें स्वप्न ’ कादंबरींतील गाळलेला भाग खरोखरच कायद्याच्या कक्षेत येणारा होता काय ? ” शंका रास्त आहे. पण तिचें समाधान येणेंप्रमाणें करतां येतें. ही कादंबरी प्रसिद्ध करण्यापूर्वी तिचे प्रकाशक रा. मोटे यांनीं तज्ज्ञांचा कायदेशीर सल्ला घेतला होता, व त्या सल्ल्यामुळेंच त्यांना या कादंबरींतील वादविषय झालेला भाग गाळणें आवश्यक वाटलें. परंतु हा भाग गाळण्याइतका जहाल नव्हता, अशीच जवळ जवळ रा. माडखोलकर खातरजमा देतात ! त्यांचें पुढील वाक्य पहाः “ त्यांच्या ( विभावरीबाईच्या ) पुस्तकांतील, लैंगिक काय किंवा **राजकीय** काय, विचार हे कांहीं **इतके जहाल खास नाहींत** कीं, जे प्रगट करण्यासाठीं त्यांनीं टोपण नांवाचा बुरखा घ्यावा, विचारांत अबोधता येण्याइतकी मुरड घालावी अगर **त्यांच्या प्रकाशकांना त्यांच्या पुस्तकावर कात्रीचा प्रयोग करणें भाग पडावें.**”× याप्रमाणें खातरजमा देण्यास माडखोलकरांजवळ वस्तुतः काय पुरावा असेल तो असो. कारण ‘ विरलेलें स्वप्न ’ कादंबरींतील गाळलेला भाग त्यांच्या अवलोकनांत आला असणें दुर्घट आहे, अशीच निदान माझी तरी कल्पना आहे !

---

× सर्वच अवतरणांतील जाड ठसा माझा समजावा.

## रामशास्त्री

मराठी भाषेंतच केवळ नव्हे, तर इतरहि अनेक भाषांत राजकीय परिस्थितीमुळें मूळ मजकुरांत काटछाट करून प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांचीं अनेक उदाहरणें आढळतात. रा. माडखोलकर यांना इतरांचीं उदाहरणें दिल्यास कदाचित् तीं पटणार नाहींत. म्हणून आपण त्यांच्याच एका पुस्तकाचा दाखला घेऊं या. माडखोलकरांची 'मुक्तात्मा' ही पहिली कादंबरी सुविख्यातच आहे. या कादंबरींतील कांहीं भाग त्याच्या विशिष्ट राजकीय स्वरूपामुळे, प्रकाशकांच्या सांगण्यावरून, माडखोलकरांना बदलावा लागला, ही गोष्ट ऐकून पुष्कळांस ठाऊक आहे. ती खरी असल्यास 'विरलेलें स्वप्न' या कादंबरींतील कांहीं भागास कात्री लावल्याबद्दल विभावरी शिरूरकर व त्यांचे प्रकाशक मोटे यांना माडखोलकरांनीं 'भेकड' म्हणून कां हंसावें? या कादंबरींतील कांहीं भाग गाळला जाणें हा जर लेखिका व प्रकाशक यांच्या 'भीरुतेचा कलात्मक संयोग' (हा दिव्य शब्दप्रयोग माडखोलकरांचाच!) समजावयाचा, तर आपले प्रकाशक रा. मंगेशराव कुळकर्णी यांच्या सांगण्यावरून माडखोलकरांनीं 'मुक्तात्मा'मधील कांहीं भाग बदलण्यास तयार व्हावें, हा त्या दोघांच्या 'भीरुते'चा कसला 'संगम' मानावयाचा? अर्थात् माडखोलकरांना त्यांच्या या काटछाटीबद्दल मला बिलकूल हिणवावयाचें नाहीं. उलटपक्षीं, अशा काटाछाटीमुळें त्यांनीं मराठींतील एका राजकीय कादंबरीला तिच्या अपमृत्यूपासून वांचविण्याचें पुण्य जोडलें, या त्यांच्या व्यवहारचातुर्याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदनच करतों. परंतु, जी गोष्ट आपण स्वतः बिनदिक्कत करावयाची तीच दुसऱ्यानें अपरिहार्य कारणाकरतां केली असतां त्याला मात्र हंसत सुटावयाचें, ही त्यांची प्रवृत्ति अतिशय गर्ह्य आहे, हें दाखविण्यासाठींच मला हा प्रपंच नाईलाजानें करावा लागला आहे!

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक ४

## १२० प्लेटोची थोरवी

प्लेटोवरील एका अलीकडल्या ग्रंथाचा परिचय करून देतांना विख्यात तत्त्वज्ञ मिस्टर जोड यांनीं 'John O' London's Weekly'च्या ४ जानेवारीच्या अंकांत प्लेटोसंबंधीं एक मार्मिक लेख प्रसिद्ध केला आहे.

प्लेटो हा तत्त्वज्ञानी असल्यामुळें व तत्त्वज्ञानावरील प्रबंध प्रायः नीरस असतात, अशी सर्वसाधारण समजूत असल्यामुळें जोडसाहेबांना प्लेटोच्या संवादाची रंजकता दिग्दर्शित करावी लागली आहे. प्लेटो हा त्या वेळचा जाडा तत्त्वज्ञानी असला, तथापि तो पहिल्या प्रतीचा कलावंतहि आहे, असें जोड-साहेबांचें म्हणणें आहे व तें पूर्णपणें यथार्थहि आहे. कसलाहि रूक्ष विषय असो, प्लेटोच्या वाणीचा त्याला स्पर्श होतांच त्याजवर सरसतेचा सोनेरी मुलामा चढतो! यामुळें प्लेटोला अव्वल दर्जाच्या कलावंतांमध्यें स्थान द्यावयास कुणीहि मागेंपुढें पाहणार नाहीं.

जोडसाहेबांच्या मतें प्लेटोच्या ग्रंथांत तत्त्वज्ञान तर आहेच; पण ह्याखेरीज त्यांत वक्तृत्वकला, गूढवाद, गाथा, नवलकथा, नाट्य – हींहि आहेत. त्यांतहि त्यांतलें नाट्य विशेषच आकर्षक आहे. 'Apology'मधील सॉक्रेटिसचा खटला या विधानाची ग्वाही देईल. याशिवाय 'Symposium'मधील प्रेम वगैरे विषयावरील भाषणें व 'Phaedo'मधील सॉक्रेटिसच्या मृत्यूचें वर्णन हीं देखील अतिशय हृदयंगम आहेत. येशूख्रिस्ताचें मरण सोडल्यास सॉक्रेटिसच्या मरणासारख्या धीरोदात्त मरणास जगाच्या इतिहासांत तोड सांपडणार नाहीं, असें जोडसाहेब सांगतात. 'फीडो'मधील सॉक्रेटिसच्या मृत्युप्रसंगांत भीतीचा लवलेश नाहीं, तसा लवलेश नसल्याचा पोकळ दिमाख नाहीं, कीं व्याख्यानबाजी नाहीं! अमरत्वावर दृढ विश्वास असलेला तो महापुरुष अगदीं सहजपणानें व उघड्या डोळ्यांनीं मरणास कवटाळतो! प्लेटोनें केलेलें तें सारेंच वर्णन अत्यंत साधें पण अत्यंत भव्यरम्यहि आहे.

जोड यांनीं गाईलेली प्लेटोची ही महति वाचून ज्यांनीं त्याच्या ग्रंथांचें अध्ययन केलें नाहीं, त्यांना तें करण्याची स्फूर्ति होईल; आणि ज्यांनी तें केलें आहे, त्यांना आपले श्रम सार्थकीं लागल्याचें समाधान प्राप्त होईल.

* * *

## १२१ 'मेघनादवध' महाकाव्य

'लंडन टाइम्स लिटररी सप्लिमेंट'मधील या 'A Land made for Poetry' लेखांत वंगीय कविसम्राट मायकेल मधुसूदन दत्त यांच्या 'मेघनादवध' या सर्वश्रुत महाकाव्याचा निर्देश आला असून प्रौढ वयांत रवींद्रनाथ टागोर त्याचे कसे चहाते बनले याचाहि त्यांत उल्लेख आलेला आहे. प्रस्तुत छोटेखानी स्फुटांत या लोकोत्तर काव्यकृतीचा ओझरताहि परिचय करून देतां येणें अशक्य आहे. तथापि कवीच्या कल्पनावैभवाची अंधुक कां होईना, पण जाणीव होण्याकरतां या महाकाव्यांतील सहजगत्या आढळलेल्या दोन सुंदर स्थलांकडे अंगुलिनिर्देश करतों:—

(१) रावणाचा पुत्र मेघनाद याच्या वीरगुणांचे भीतियुक्त अंतःकरणानें वर्णन करतांना राम बिभीषणाला म्हणतो, "हे शूर मित्रा! तुझा ज्येष्ठ भ्राता रावण हा कालसर्प तर खरोखरच आहे, पण त्याचा विषदंत म्हणशील तर त्याचा पुत्र मेघनाद हाच होय! मेघनादाच्याच तेजानें रावण तेजः-संपन्न होत आहे!"

(२) अशोकवनामध्यें अलंकारविहीन व मलिनवसना सीता बसलेली आहे. बिभीषणाची स्त्री सरमा ही दिव्य अलंकार व वस्त्रे धारण करून तेथें येते, व नम्रभावानें जानकीच्या पदतलाशीं बसते. यावर कवि म्हणतो, "तुळशीच्या झाडाच्या मुळाशीं ठेवलेला सुवर्णदीप जसा दिसावा, तशी ती सरमा सीतेच्या पायाशीं बसल्यावर दिसली!"

या दोनहि कल्पना—विशेषतः शेवटची कल्पना—किती हृद्य आहे हें रसिकांस सांगावयास नकोच. यापेक्षांहि उत्कृष्ट स्थलें 'मेघनादवधा'त खास सांपडतील.

अशा या प्रतिभापूर्ण महाकाव्याचें मराठी रूपांतर झाल्यास तें हवेंच आहे.

माधवानुज कवींनी या दिशेनें प्रयत्न केला होता; पण त्यांचे रूपांतर विशेषसें रोचक उतरलें नसून खेरीज तें आज उपलब्धहि नाहीं.

* * *

## १२२ टागोर शहर!!

रवींद्रनाथ टागोर यांचे नांव सुधारलेल्या सर्व देशांत पुष्कळच परिचित आहे. तथापि सुधारलेले देश झाले तरी त्यांतील प्रत्येक इसमास टागोर-बाबूंची माहिती असणे शक्य नाही, व तशी खुद्द त्याचीहि अपेक्षा नसेल. या बाबतीत घडलेली एक मौजेची हकीकत इंग्लंडांतील एका नियतकालिकांत प्रसिद्ध झाली आहे ती अशीः——

दोन फ्रेंच गृहस्थ टागोरांना भेटण्यासाठी हिंदुस्थानांत यावयास निघाले. भूमध्यसमुद्रावरील एका बंदरावर त्यांची एका फ्रेंच अधिकाऱ्याशी मुलाखत झाली. मुलाखतीत टागोर यांचा प्रश्न निघतांच ते अधिकारी उद्गारले, " टागोर! अहाहा! टागोर, कलकत्ता, बनारस, म्हैसूर हीं सारीं किती पण फक्कड शहरे आहेत म्हणून सांगावी! जा, जा, मित्रहो, टागोर शहराला अवश्य जा, आणि तेथे खूप मौज करा!!"

* * *

## १२३ गूढवाद व गूढवादी

हिंदी 'सरस्वती' मासिकाच्या मार्च १९३६च्या अंकांत गूढवादाचा अधिक्षेप करणारी एक कविता आली असून तिच्या आरंभीं पुढील अर्थाची टीप जोडली आहेः " आजकाल हिंदीचे बहुतेक सर्व कवि गूढवादाकडे झुकले आहेत. ज्या देशांतील बहुसंख्याक जनतेला एकवेळचे पोटभर जेवणहि मिळण्याची मारामार पडते, त्या देशांतील कवींना 'अनंत', 'असीम', 'मधुवाला' यांचें गीत गात सुटावें, हें त्यांना कितपत भूषणावह आहे बरें?"

हिंदींतील सुमित्रानंदन पंत, 'निराला', 'प्रसाद', महादेवी वर्मा, रामकुमार वर्मा इ० इ० अनेक मुख्य कवि व कवयित्री स्वतःस गूढवादीच

म्हणवितात. ही वस्तुस्थिति लक्षांत घेतली, म्हणजे वरील टीपेमधील तक्रार सार्थ असल्याची खूण पटेल. गूढवादी कवितेला सरसकट त्याज्य ठरविणें हें जसें आततायीपणाचें आहे, तसेंच या धर्तीच्या कवितांचा अतिरिक्त बडेजाव करणें हेंहि असमंजसपणाचेंच आहे. काव्य झालें तरी ते अजिबात लोकाभिमुख न होऊन कसें चालेल ?

गूढवादी कवींचा गूढवाद जेव्हां कवितारचनेपुरताच मर्यादित असतो, तेव्हां त्याबद्दल सहानुभूति बाळगणें अशक्य नसतें. परंतु ज्यावेळीं तो दररोजच्या आयुष्यक्रमांत ढवळाढवळ करूं पाहतो, त्यावेळी मात्र कुणीहि विचारप्रधान मनुष्य बुचकळ्यांत पडल्याखेरीज राहत नाही. उदाहरणार्थ, ब्लेक या इंग्रजी कवीची गोष्ट ध्या. ब्लेकला म्हणे दिव्य संगीत ऐकूं यावयाचें व दिव्य देखावे दिसावयाचे ! एकदां तो रानावनांतून भटकत असतां त्याला एका परीचा अंत्यविधि चाललेला दिसला, म्हणतात ! टोळाच्या आकाराचे कांहीं प्राणी गुलाबाच्या पानावर एका मृत परीचें कलेवर घेऊन चालले होते. एका ठिकाणीं थांबून त्या प्राण्यांनीं तें प्रेत खाली ठेवलें व मंजुळ गाणी गात गात त्यास मूठमाती दिली ! ! ब्लेकचा हा विचित्र अनुभव त्याच्या चरित्रकारांनीं ग्रथित केला आहे. त्याचप्रमाणें, ब्लेक हा वेडा नव्हता, अशीहि साक्ष अनेक विद्वान् परोपरीनें देतात. अशा परिस्थितींत ब्लेकच्या वरीलसारख्या अनुभवांची कशी काय उपपत्ति लावावयाची, हे निदान आम्हां सामान्य जनांस तरी बिलकूल कळत नाहीं.

* * *

## १२४ पत्र–वाङ्मय

पुढील ताजी बातमी वाचा:—

" आंग्ल कवयित्री मिसेस ब्रौनिंग हिच्या ज्या पत्रसंग्रहास न्यूयॉर्कमध्यें ८००० पौंड किंमत आली, तो लौकरच प्रसिद्ध होणार आहे."

मराठी साहित्य पत्र–वाङ्मयामध्यें फारच दरिद्री आहे. पत्र–वाङ्मयाचें अलिकडील सर्वांत मोठें उदाहरण म्हणजे 'श्यामकांताचीं पत्रें' हें पुस्तक

होय. पण हें पुस्तक उत्तमपैकीं असलें, तरी तें साहित्यिकांच्या पत्रांचें नव्हे. मराठी साहित्यिकांचीं पत्रें प्रकाशित होण्याचा योग अगदीं क्वचित् येतो. या दृष्टीनें कै. बालकवि ठोमरे यांचीं, रा. नाथ निफाडकर यांनीं छापलेल्या त्यांच्या कवितासंग्रहांतील, पत्रें अंगुलिनिर्देश करण्याजोगीं आहेत.

एवढ्यांत मराठी साहित्याची झपाट्यानें वाढ होत असल्यानें लेखकांमधील पत्रव्यवहार वाढत आहे, व त्यांत साहित्यचर्चाहि बरीच होत असली पाहिजे. अशीं पत्रें मागेंपुढें प्रसिद्ध करावयाचीं आहेत, या बुद्धीनें नीट जतन करून ठेवावयास हवींत; म्हणजे त्यांचा मुद्रणकाल यावयाचा तेव्हां अवश्य येईलच. पण मुळीं पत्रेंच सुरक्षित न ठेवलीं, तर छापावयाचें तरी काय ?

इंग्रजींत अनेक थोर थोर वाग्भटांचे पत्रसंग्रह प्रकाशित झाले आहेत. त्यांची कुठवर नांवनिशी द्यावी ? त्यांत साहित्य, खाजगी सुखदुःखें वगैरे विविध विषय हाताळलेले असतात. कीट्सची काव्यासंबंधींचीं मतें त्याच्या एका पत्रांत प्रस्फुटित झालीं आहेत, तीं नमुन्यादाखल पहाः—

" I think, poetry should surprise by a fine excess and not by Singularity–it should strike the reader as a wording of his own highest thoughts and appear almost a Remembrance. 2nd: Its touches of Beauty should never be half-way there by making the reader breathless instead of content: the rise, the progress, the setting of imagery should, like the Sun, come natural to him......"

पत्रलेखनांत नामांकित साहित्यिकच तेवढे कुशल असतात, असें नव्हे; तर दुसऱ्या व तिसऱ्या दर्जाच्या साहित्यिकांनींहि या कलेंत प्रावीण्य मिळविल्याचें दृग्गोचर होईल. फार काय सांगावें, कित्येक साहित्यिकांच्या वाङ्मयानिर्मितीपेक्षां त्यांचें पत्रवाङ्मयच जास्त काल टिकण्याच्या योग्यतेचें वठलें आहे ! याचें उदाहरण म्हणून होरेस वॉलपोलचें नांव पुढें करतां येईल. होरेस वॉलपोल हा साहित्यसेवक या नात्यानें यथातथाच होता; पण पत्रलेखनांत मात्र त्यानें विलक्षण यश संपादन केलें होतें !

* * *

## १२'१ मोबदला नाकारल्याचे दाखले

वरील स्फुटांत मिसेस ब्रौनिंगच्या पत्रांना आठ हजार पौंड मूल्य आल्याचें वृत्त वाचून वाचकांच्या मनांत लेखनास मिळणाऱ्या मोबदल्यासंबंधींचे विचार कदाचित् उद्भवले असतील.

इंग्रजीमध्ये एवढ्यांत लेखनास भरपूर मोबदला मिळतो, असें विधान करण्यास हरकत नाही. तिकडे लेखक मोबदला घेतात व प्रकाशक देतातहि. मोबदला न दिल्याचा व देऊनहि न घेतल्याचा प्रकार त्या भाषेंत क्वचित्च घडतो. अशीं कांहीं उदाहरणें गंमतीखातर पुढें उद्धृत करतों—

( १ ) ज्या मिसेस ब्रौनिंगच्या पत्रांस, तिच्या मृत्यूनंतर पुष्कळ वर्षांनीं कां होईना पण, आठ हजार पौंड किंमत आली, तिचाच पति रॉबर्ट ब्रौनिंग हा आपल्या कविता द्रव्यलोभ दाखविला जात असतांहि नियतकालिकांकडे प्रसिद्धीकरणार्थ पाठविण्याचें चक्क नाकारीत असे ! एकदां तर एका अमेरिकन मासिकाच्या संपादकानें त्याजकडे कोरा चेक पाठवून कवितेची मागणी केली ! पण ब्रौनिंगनें ती साभार नाकारली !

( २ ) विक्षिप्तमूर्ति बर्नार्ड शॉ यांचीहि अशीच एक गोष्ट सांगतात. Great Thoughts मासिकाच्या संपादकाला शॉ यांचा लेख हवा होता. सबब त्यानें आगाऊ चेक पाठवून त्यांना लेख धाडण्याची विनंति केली. तेव्हां, यापूर्वी आपणास आगाऊ चेक कुणीहि पाठविला नव्हता, यामुळें आपण फार संतुष्ट झालों आहों, असें म्हणून, शॉ यांनीं सदर मासिकाकडे लेख तर धाडलाच, पण चेक मात्र तसाच परत केला !

मराठींत मोबदला देण्याचा प्रघात अत्यल्प आहे. अर्थात् त्याला कारणें असतील; पण म्हणून आहे ती वस्तुस्थिति अन्यथा ठरत नाहीं. कांहीं प्रमुख लेखकांनीं मात्र मोबदल्याखेरीज न लिहिण्याचा निश्चय केलेला दिसतो. तो यथायोग्यच आहे, यांत संशय नाही.

**प्रतिभा**, वर्ष ४, अंक ५

## १२६ ‘ अक्षर वाङ्मय ’ तें ‘ अक्षर वाङ्मय ’च !

गेल्या अंकांतील ‘ प्लेटोची थोरवी ’ हे माझें स्फुट वाचून एका वाचकाने सात्त्विक संतापाने प्रेरित होऊन ‘ प्रतिभा ’ कचेरीकडे एक पत्र पाठविलें आहे. त्यांतील कांहीं भाग असाः—

“ ...‘ प्रतिभे ’तून प्लेटोसारख्या जुन्यापुराण्या ग्रंथकाराचा पुरस्कार व्हावा, हे आश्चर्य आहे...सध्यांचा काळ निर्विवादपणें साम्यवादी वाङ्मयाची महति गाण्याचा आहे. मग तदितर वाङ्मयाची तळी उचलून धरण्याचें काय कारण ? आपणा महाराष्ट्रीयांची ही ‘बुर्झ्वा’ मनोवृत्ति कधी पालटणार ?”—वगैरे.

या पत्रलेखकांची कळकळ मला पूर्णपणें मान्य आहे. तथापि, त्यांचा माझा मूलतःच मतभेद होतो, असें दुर्दैवाने म्हणावे लागते. कारण, वाङ्मयांत शक्य तो व्यापक दृष्टि ठेवावी, असें माझें प्रथमपासून धोरण आहे. एखादी वाङ्मयकृति – मग ती कोणत्याहि मताची असो – जर सुंदर असेल तर तिला सुंदरच म्हणावे, असा माझा अभिप्राय आहे. त्या कृतींत विशिष्ट तत्त्वाचें प्रतिपादन असल्यास तिला त्याज्य समजणे हें मला स्पष्टपणें दुराग्रहमूलक वाटते. ही भूमिका मान्य होत असल्यास एखाद्या ग्रंथांत साम्यवाद मांडलेला नाहीं, अथवा त्या ग्रंथाचा कर्ता अत्यंत जुन्या काळीं होऊन गेला याबद्दल कुरकुरण्याचें प्रयोजनच रहाणार नाहीं ! आणि मग प्लेटोपासून गॉर्कीपर्यंत जे जे नाना मतांचे “ अक्षर–वाङ्मय–निर्माते ” होऊन गेले व आज कांहीं आहेत, त्या सर्वांच्या वाङ्मयकृतींपासून सारखीच आनंदप्राप्ति होईल !

अर्थात् हयात असलेल्या व उमेद कायम ठेवलेल्या साहित्यिकापासून साम्यवादासारख्या विशिष्ट मतप्रदर्शनाची अगर निदान लोकाभिमुखतेची तरी अपेक्षा करणें वावगें होणारा नाहीं, हें उघड आहे. परंतु, मृत किंवा उमेद सरलेल्या साहित्यिकांच्या लिखाणांत अमुक एक तत्त्व मांडलेलें नाहीं म्हणून त्याची किंमत कमी लेखणें ही गोष्ट मात्र फारशी समंजसपणाची ठरणार

नाही ! अशा साहित्यिकांच्या रचनेला हवी तर 'ऐतिहासिक भौतिकवादा'ची कसोटी लावावी व तिजवरून काढावयाचे ते निष्कर्षहि अवश्य काढावे. त्याबद्दल कुणी विशेष खळखळ घालणार नाही. तथापि, ती रचना साम्यवादी नसेल, तर तेवढ्याच एका 'वैगुण्या'साठी तिजवर सरसकट नापसंतीचे शिक्कामोर्तब करूं नये, एवढाच माझा कटाक्ष आहे.

वरील विचारसरणीचे स्वागत कट्टर साम्यवाद्यांकडून 'क्षुद्र बुर्झ्वा' !— या शब्दांनी होईल, हे मी जाणून आहे. परंतु, निःपक्षपाती वाचकांचा मात्र माझ्यासारखाच अभिप्राय पडेल, याविषयी मला लवमात्र संदेह नाही. या विचारसरणीमुळेच मागील अंकांत जोडसाहेबांनी गाईलेल्या प्लेटोच्या थोरवीचा मी अनुवाद केला. आणि पुढेहि प्रसंग पडेल तेव्हां प्लेटोसारख्या अन्य "अक्षर—वाङ्मयनिर्मात्यां"चा गुणगौरव करण्याची संधि अवश्यमेव साधण्यांत येईल ! मग त्याविषयी कुणी कांहीहि म्हणो !

*　　　*　　　*

## १२७ राजकारण व वाङ्मय

राजकारण व वाङ्मय यांची तुलना करून तीत एकास दुसऱ्यापेक्षां वरचढ ठरविणे नेहमीच उचित होईल, असे नाहीं. तसेंच राजकारण व वाङ्मय यांची सर्वस्वी फारकत करणेहि इष्ट होणार नाही. कारण, जीवन हे वाङ्मयाचें खरेंखुरें "जीवन" असून राजकारण हे जीवनाचे प्रमुख अंग आहे. अर्थात् राजकारण व वाङ्मय यांची अजिबात "गडी–फू" कशी होऊं शकेल ? तथापि, राजकारणामुळे कित्येकदां विशिष्ट तत्त्व, पक्ष वा व्यक्ति यांचा एकांगी अभिनिवेश अंगांत संचरून "इतरेजना"च्या राजकीयच नव्हे, तर वाङ्मयीन "कृती"कडेहि पाहण्याची दृष्टि असावी तितकी निर्मल राहत नाही, एवढें मात्र खरे. याचो अनेक उदाहरणें देतां येतील. पुढील एक नमुना पाहा:—

महाकवि मिल्टन याची क्रॉमवेलच्या बाजूचीं राजकीय मते असल्याचें प्रसिद्धच आहे. मिल्टनच्या मताशी न जुळणारी मते असलेला असा

रॉचेस्टरचा डॉक्टर स्प्रॅट नांवाचा एक बिशप इंग्लंडांत होऊन गेला. त्याच्या ताब्यांतील चर्चमध्यें जॉन फिलिप्स नामक कवीचें स्मारक उघडण्यांत आलें. त्या स्मारकावर जॉन फिलिप्सच्या कवित्वाचा वर्णन करणारा जो अल्पसा मजकूर लॅटिन भाषेंमध्यें खोदण्यांत आला होता, त्यांत मिल्टनवरून Miltono असें एक पद सहजगत्या येऊन गेलें होते. झालें! डॉक्टर स्प्रॅट याला माथ्यांत राग भरून घ्यावयाला तेवढें निमित्त पुरे होतें! त्यानें तिरमिरीनें तो मजकूर त्या स्मारकावरून तावडतोब नाहीसा करून टाकला!!—शहाण्या सुरत्या लोकांची कोण ही विलक्षण संकुचित वृत्ति!

आपल्याकडे देखील असे प्रकार घडत नाहींत असें नाहीं. कांहीं वर्षांपूर्वी रा. कृ. प्र. खाडिलकर हे त्या काळचे "जहाल" म्हणून त्यांच्या नाटकांना नाकें मुरडणारे कित्येक "मवाळ" जसे नजरेस पडत असत, तसेच कै. हरिभाऊ आपटे हे "मवाळ" म्हणून त्यांच्या कादंबऱ्यांना दूषण देणारे कित्येक "जहाल"हि आढळांत येत होते!

साम्यवादाच्या अभिमानानें या संकुचितपणाच्या प्रवाहाला एक नवा ओघ येऊन मिळणार नाहीं, अशी साम्यवादाविषयीं सहानुभूति बाळगूनहि आपण आशा करूं या.

*　　　　*　　　　*

## १२८ खांडेकरांच्या प्रस्तावनेंत दडपादडपी!

कवि 'काव्यविहारी' यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'स्फूर्तिलहरी' नामक काव्यसंग्रहाला रा. वि. स. खांडेकर यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. सदर प्रस्तावनेंत विशेष प्रयोजन नसतां व त्यांतहि अतिशय हास्यास्पद मुद्दे उपस्थित करून, 'प्रतिभा' व 'रामशास्त्री' यांजवर हल्ला करण्यांत आला आहे! 'प्रतिभे'बद्दल "...एखाद्या पाक्षिकाला वर्षभर (गुरुबाजीच्या) मजकुराचा पुरवठा तरी झाला असता!"—असें म्हणून १९३५ सालीं 'प्रतिभे'नें मुख्यतः वाङ्मयांतील बुवाबाजीविषयींच मजकूर छापला असें खांडेकर सूचित करतात! परंतु, खांडेकरांचा हा सूचितार्थ कितपत

सत्यास धरून आहे, हें निःपक्षपाती वाचकांनींच सांगावें. खांडेकरांनीं ही प्रस्तावना २१-१२-३५ रोजीं लिहिली व ' प्रतिभे 'चा गत वर्षीचा अंक १३-१२-३५ म्हणजे खांडेकरांच्या प्रस्तावनेच्या सात दिवस आधीं बाहेर पडला. या अंकांतील विषयसूचि चाळून पाहण्याची जरी त्यांनीं तसदी घेतली असती, तरी आपण केलेलें हें विधान ' धादांत खोटें ' असल्याचा प्रत्यय त्यांचा त्यांनाच आला असता !

मजविषयीं लिहितांना, मीं जागतिक वाङ्मयाची अपेक्षा केली, यामुळें जगांतील झाडून सारें वाङ्मय अभ्यासिल्याची मी बढाई मारतों, असें खांडेकर साळसूदपणानें भासवितात ! वस्तुतः हा आक्षेप नवा नसून तो रा. वि. ह. कुळकर्णी, " प्रतिभेचा एक वाचक " रा. ग. त्र्यं. माडखोलकर प्रभृति विद्वानांनी यापूर्वीच मजवर केलेला होता, व त्याचें मीं " प्रतिभे " च्या उपरोक्त १३-१२-३५ च्या अंकांत खंडनहि केलेलें आहे ! असे असूनहि खांडेकरांना आपल्या या मित्रांप्रमाणेंच लिहिण्याची लहर यावी यावरून तिऱ्हाइतांनी काय बरें बोध घ्यावा ? सर्वांत मौज ही की, स्वतः खांडेकरांनी देखील मुंबई-साहित्य-संमेलनाच्या भाषणांत पर्यायानें कां होईना, पण जागतिक वाङ्मयाची मजप्रमाणेंच अपेक्षा केली होती ! तरी देखील ' रामशास्त्र्या 'ची कुचाळी करण्याचा मोह त्यांस आवरूं नये, हें आश्चर्य होय !

आणि, यापेक्षांहि जास्त आश्चर्य मला खांडेकरांच्या एका निराळ्या प्रकारचें वाटतें ! तो प्रकार हा की, ' प्रतिभा ' व ' रामशास्त्री ' यांना झोडपून काढण्याच्या भरांत रोमाँ रोलाँ यांना त्यांनीं व्यर्थ ओढलें आहे ! त्यांचीं मूळ वाक्येंच येथें उतरून घेतों; " त्यांच्या ( ' रामशास्त्र्या ' सारख्यांच्या ) मतें केशवसुत, कोल्हटकर, गडकरी इत्यादिकांचा गुरु म्हणून उल्लेख करणें गैरशिस्त ! पण ज्याच्या कादंबऱ्यांचा अद्यापि आपल्याकडे फारसा प्रचार झाला नाहीं, त्या रोमाँ रोलाँची स्थानी-अस्थानीं जपमाळ घेणें मात्र अत्यंत आवश्यक ! "-या अवतरणांतील " **ज्याच्या कादंबऱ्यांचा अद्यापि आमच्याकडे फारसा प्रचार झाला**

नाहीं "—या वाक्यार्थावरून खांडेकरांना काय दर्शवावयाचें असेल तें असो ! आपल्याकडे म्हणजे महाराष्ट्रांत एखाद्या ग्रंथाचा सडकून प्रचार होणें हीच त्याचें महत्त्वमापन करण्याची एकमेव कसोटी आहे, असें खांडेकरांना त्यांत म्हणावयाचें आहे, की एखाद्या साहित्यिकाच्या ग्रंथांचा यथास्थित प्रचार झाला, म्हणजेच मग टीकाकारांनीं त्याची तारीफ करावी, असा त्यांस सल्ला द्यावयाचा आहे, कांहींच कळत नाहीं !

रोमाँ रोलाँ यांची 'जपमाळ' घेण्याबाबत मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, मी कांहीं वेळां रोमाँ रोलाँ यांची स्तुति केली असली, तरी पण खुद्द खांडेकर यांची स्तुति रोमाँ रोलाँ यांजपेक्षांहि मी अधिक वेळां केलेली आहे ! अर्थात् चारसहा वेळां तारीफ केल्यामुळेंच जर रोमाँ रोलाँ माझे गुरु ठरतात, तर त्याहून अधिकदां तारीफ केल्यामुळें खांडेकर हे तर माझे 'परात्पर गुरु'च ठरले पाहिजेत ! तशा प्रकारचा ते मजवर हक्क दाखवितात कीं काय, हेंच आतां पहावयाचें आहे !

'प्रतिभा' व 'रामशास्त्री' यांजविषयीं खांडेकर यांनीं लिहिलेल्या मजकुरांत याप्रमाणेंच आणखीहि अनेक गमती सांपडतात. पण स्थलाभावास्तव तूर्त इतकेंच पुरे.

खांडेकरांसारख्या नामवंत लेखकाच्या लिखाणांत वरीलप्रमाणें थिल्लर स्वरूपाचीं विधानें यावीं, ही गोष्ट एरवीं कुणाला सांगूनहि खरी वाटणार नाहीं ! स्वतः मला सुद्धां ती खरी वाटत नाही. यामुळें हा भाग खांडेकरांच्या प्रस्तावनेंत त्यांच्या नकळत कुणी तरी दडपून दिला की काय, अशी शंका घेण्याकडे मनाचा कल झुकतो; कारण खांडेकरांच्या सफाईदार लेखणींतून असा भलताच मजकूर उतरेल तरी कसा ?

—**प्रतिभा**, वर्ष ८, अंक ६

## १२९ भारतीय कला

'The London Mercury' या विख्यात मासिकाच्या मार्च १९३६च्या अंकांत श्री. जे.सी. घोष यांचा 'Contemporary Indian Art' या नांवाचा एक वाचनीय लेख प्रसिद्ध झाला आहे.

हिंदुस्थानांतील सध्यांच्या कांहीं कलावंतांना घोषबाबूंनीं पुढीलप्रमाणें चिमटा घेतला आहे : " Lord Leighton, Frith and Watts are still the great Masters in Anglo-India, and the lesser Victorian R. A. S. are immortalized there too in many engravings, half-tone or oleograph of the kind that adorn the boarding houses of Tooting. Their **most notorious** Indian offspring was **Ravi Varma** of a few decades ago, and they continue to stimulate the **Contemporary Bombay** school."

प्राचीन भारतीय कलेसंबंधीं योग्य तो आदर बाळगूनहि तिच्या निर्जीव अनुकरणाविषयीं मात्र घोषबाबू सहानुभूति व्यक्त करूं शकत नाहींत. ते म्हणतात, " Enthusiasm one must have while approaching the art of a past age, but it should be the outcome of understanding. The Indian Artists seem to seek the past as an escape from the present rather than a reinforcement of it. Witness the themes they choose : Shiva-Parvatis, Ram-Sitas, Krishna-Radhas, Shakuntlas, Leila Majnuns...and the hundred other ready-made traditional subjects from which time has drained all vitality away."

कित्येक कलावंतांनीं हे जुनेच विषय घेऊनहि कलेचा परमोत्कर्ष साधला आहे, हें खरें; परंतु इतरांनींहि तेंच तें चर्वितचर्वण करावें, हें बरोबर नाहीं; आणि घोषबाबूंची ही टीका अशाच लोकांना लागूं पडते.

संक्रमणावस्थेंत असलेल्या सध्यांच्या भारतीय कलेला उर्जितावस्था केव्हां व कशी येईल, याबाबत घोषबाबूंनीं खालील शब्दांत आपला विश्वास

प्रगट केला आहे: ' Nothing but the resurgence of the urgent need of life will restore to Indian art the vitality it lacks to-day. But that will not happen until the national awakeing has been wide enough to include the working classes of the country, and the national conscionsness enriched by the hard realities of their life. "

* * *

## १३० एका गौरकायाचा अभिप्राय

वरील स्फुटांत उल्लेखिलेले श्री. घोष हे किती केलें तरी भारतीय असून त्यांनीं आपल्या लेखांत प्रामुख्यानें अलीकडलाच भारतीय विचार केलेला आहे. आतां एका गौरकायाचा व तोहि प्राचीन भारतीय कलेसंबंधींचा अभिप्राय येथें उद्धृत करतों.

हिंदुस्थानांतील जुन्या कालच्या खोदकलेबद्दल रॉजर फ्राय् हे लिहितात—

" The Indian artist felt free to weave on unending texture of innumerable interlacing plastic forms over the surface of temples and rock-cut chapels. The tropical exhuberance of his fantastic and sometimes monstrous inventions seems unchecked even by physical difficulties. No other people has ever dreamed of sculpting such great temples out of the solid rocks as he has......undoubtedly the Indian artists had an extraordinarily developed plastic sense. " ( An Outline of Modern Knowledge ) हा उतारा आणखीहि वाढवितां आला असता, पण स्थलाभावास्तव इतकेंच पुरे.

प्राचीन भारतीय चित्रकलेसंबंधीं लिहितांना फ्राय्साहेब हे म्हणतात, "It is probable that painting was no less important than sculpture during the great periods of creative activity, but very little has survived. The frescoes at Ajinta show a narrative style of great freedom with much of the same easy command of varied poses as the sculpture, but a relatively feeble and capricious sense of the construction of an ideated space" ( ' Ibid. ' हे ' केसरीं ' तील सुप्रसिद्ध इबिडसाहेब नव्हत ! )

—प्रतिभा, वर्ष ४, अंक ७

## १३१ आधुनिक कविता व माडखोलकर

बडोद्याचे महाराज सर सयाजीराव गायकवाड यांच्या हीरकोत्सवानिमित्त प्रकाशित झालेल्या 'अर्वाचीन मराठी साहित्य' नामक ग्रंथांत रा. ग. त्र्यं. माडखोलकर यांचा ' गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता ' या नांवाचा एक विस्तृत लेख प्रसिद्ध झाला आहे. रा. माडखोलकर हे कवि व कादंबरीकार म्हणून लोकांपुढें असले, तथापि त्यांची कीर्ति टीकाकार म्हणूनच अधिक टिकेल, असें त्यांचे चहाते देखील म्हणतात. उदाहरणार्थ, खांडेकर माडखोलकरादि ' करपंचकां 'वर ' साहित्य आणि समाजजीवन ' नांवाच्या ज्या ग्रंथांत स्तुतीचीं मोर्चेलें ढाळलीं आहेत, त्यांतच पृष्ठ १२१ वर वरीलप्रमाणें मत प्रदर्शित केलेलें आहे. आणि टीकालेखनांतहि रा. माडखोलकर यांचें कवितेवरील टीकालेखनच विशेष महत्त्वाचें गणलें जातें. तशांत ' आधुनिक मराठी कविता ' नांवाचा एक स्वतंत्र ग्रंथहि ते लिहिणार असल्याचें उपरोक्त ' अर्वाचीन साहित्य ' याच ग्रंथाच्या प्रस्तावनेंत जाहीर करण्यांत आलें आहे. या सर्व गोष्टी जमेस धरल्या असतां रा. माडखोलकर यांच्या वर निर्देशिलेल्या प्रबंधाचा थोडक्यांत परामर्ष घेणें आवश्यक वाटतें.

* * *

## १३२ जुने व नवे माडखोलकर !

रा. माडखोलकर हे आधुनिक कवितेचे केवढे मोठे पुरस्कर्ते आहेत, हें निदान त्यांच्या ' आधुनिक पंचका 'च्या वाचकांस तरी नव्यानें सांगावयास नको. माडखोलकरांविषयीं ' प्रतिभे 'च्या विशेषांकांत रा. के. नारायण काळे लिहितात, " टीकाकाराला न्यायाधीशाचें आसन सोडून त्याला विमर्शकाची भूमिका स्वीकारण्याला लावावयाला कारणीभूत होण्याचा मान 'आधुनिक कविपंचका'च्या कर्त्यांचा—श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचा—आहे."

आतां ' अर्वाचीन मराठी साहित्यां 'तील लेखांत रा. माडखोलकर यांनीं सरसकट आधुनिक कवितेबद्दल काय अभिप्राय व्यक्त केला आहे, तो पाहा:—

"...गेल्या साठ वर्षांत निर्माण झालेली ही कविता राष्ट्राच्या सुखदुःखाची प्रातिनिधिक नसून बहुजनसमाजाच्या जीवनाशीं तर तिचा यत्किंचित्‌हि संबंध नाहीं. तिच्या भोंवतालचें वातावरण कृत्रिम असून **स्त्रैणपणा हें तिचें वैशिष्ट आहे...**बहुजनसमाज तर राहोच, पण ज्या सुशिक्षित वर्गांतून हे कवि उदयास आले, त्यांच्याहि आकांक्षांचें किंवा उद्योगाचें प्रतिबिंब त्यांच्या कवितेंत पडलेलें नाहीं...तमाम जनतेच्या हृदयाला आपल्या प्रभावी वाणीनें हलवून सोडील, असा एकहि महाकवि आज पुढें कां येऊं नये? याचें कारण हेंच कीं, **या कवींची प्रतिभा परप्रत्ययनेय आणि पंगु आहे. त्यांच्या ठिकाणीं स्वसंस्कृतीचें परिज्ञान नाहीं, आत्मप्रत्ययाचें ओज नाहीं, व्यापक सहानुभूति नाहीं व भूतभविष्यांचा मेळ घालून लोकांना आत्मोन्नतीचा नवा मंत्र द्यावयाला अवश्य असलेलें ध्येयदर्शित्व नाहीं.** त्यामुळें, एका बाजूला पोटासाठीं आणि स्वातंत्र्यासाठीं झगडत असलेला दीन बहुजनसमाज आणि दुसऱ्या बाजूला **प्रेमासाठीं आणि प्रसिद्धीसाठीं धडपडत असलेले उल्लू कवि**, असा विचित्र देखावा आज महाराष्ट्रांत दृष्टीस पडत आहे."—पा. ३०–३१.

आधुनिक कवितेच्या ज्या रोपट्यावर रा. माडखोलकर यांनीं पूर्वी शीतल जलाचें सिंचन केलें त्याजवरच त्यांनीं आतां जलाल तेजाब ओतावें, हा 'देखावा विचित्र' खराच! तथापि, या मतपरिवर्तनाबद्दल मला त्यांना दूषण द्यावयाचें नाहीं. मतपरिवर्तन हें मी जिवंतपणाचेंच लक्षण समजतों. मात्र, वरीलसारखा अभिप्राय 'रामशास्त्र्या'सारख्यानें जर प्रगट केला असता, तर खुद्द माडखोलकर व त्यांचे साथीदार "परधार्जिणेपणा!" "स्वकीयांचा तेजोभंग!–" असा गिल्ला करीत उठले असते, एवढें नमूद केल्यावांचून मला राहवत नाहीं! तसेंच, या अवतरणांतील 'उल्लू' 'स्त्रैणपणा' वगैरे 'जोरदार' शब्दांकडेहि मी वाचकांचें लक्ष्य वेधूं इच्छितों!

* * *

## १३३ स्त्रैणत्वाचा आरोप!

'स्त्रैणपणा' हा शब्द वर दिलेल्या अवतरणांतच आला आहे असें नाहीं; तर 'स्त्रैण,' 'स्त्रैणपणा,' 'स्त्रीपरता,' 'स्त्रीदाक्षिण्य' वगैरे

शब्दांनीं माडखोलकरांच्या या सबंध लेखभर पिंगा घातलेला आहे! त्यांच्याच जोडीला ' पौरुष, ' ' पौरुषहीन, ' ' पौरुषयुक्त, ' ' विकृति ' इ० शब्दहि त्यांत येतात! नामनिर्देशपूर्वक अनेक आधुनिक कवींना व वरील अवतरणांत जवळ जवळ सर्वच कवींना " स्त्रैण! स्त्रैण! " असें हिणवितांना माडखोलकरांस पाहिलें, म्हणजे त्यांच्या ' **बडे बाप आणि त्यांचे ? बेटे** ' ( चित्रा ) आणि ' **विरलेलें स्वप्न** ' ( कला ) या अलीकडे सडकून गाजलेल्या लेखांची कुणासहि आठवण होईल! या शेवटल्या दोन लेखांत ते " भीरु! भेकड!—" म्हणत जसे ज्याच्या त्याच्यावर तुटून पडले आहेत, तसेच ते ' अर्वाचीन मराठी साहित्य ' या ग्रंथांतल्या ' गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता ' या लेखांत बहुतेक साऱ्या आधुनिक कवींवर ' स्त्रैण! स्त्रैण!—' असें ओरडत घसरले आहेत! आणि, हा स्त्रैणत्वाचा आरोप करण्याचें ठळक कारण काय?—तर, बहुसंख्य आधुनिक कवींनीं प्रणयपर कविता लिहिल्या हें!!

याहिपेक्षां केशवसुतांच्या वैवाहिक जीवनावर शिंतोडा उडविण्याचा रा. माडखोलकर यांनीं जो प्रयत्न केला आहे, तो जास्त आक्षेपार्ह आहे. त्यांचीं मूळ वाक्यें अशीं : " **संसारांतील सुखाविषयीं उपरति** उत्पन्न झाल्यामुळेंच केशवसुतांना ही **कवितारति** आठवली असावी. ज्या प्रेमाचा वर्षाव पुरुषानें स्त्रीवर करावयाचा असतो, तें प्रेम त्यानें कवितेवर करीत सुटावें, याचा अर्थच हा कीं, **त्याच्या वैवाहिक जीवनांत कांहीं न्यून**ता **उत्पन्न झालेली असून** ती तो अशा रीतीनें भरून काढीत आहे." केवळ कवितेवरून वैवाहिक जीवनासारख्या नाजुक प्रश्नाविषयीं ठाम असा अनुकूल वा प्रतिकूल निष्कर्ष काढणें हें धोक्याचें ठरेल; आणि तो निष्कर्ष केशवसुतासारख्यांच्या माथीं मारणें हें तर अगदींच अन्यायाचें होईल! खुद्द रा. माडखोलकर यांनींहि, अल्पस्वल्प कां होईना, पण काव्यरचना केलेली आहे. आणि केवळ कवितेवरूनच कविजीवनाविषयीं भलेबुरे निष्कर्ष काढावयाचे असल्यास माडखोलकरांविषयीं देखील अशींच कांहीं तरी विधानें करतां येतील. परंतु ती निःसंदिग्ध रीतीनें खरीं थोडींच असतील? हाच न्याय इतरांसहि लागूं करावयास हवा.

* * *

## १३४ नैराश्याचा सूर

मात्र रा. माडखोलकर यांचे या लेखांतील एकदोन मुद्दे मान्य केले पाहिजेत, हें मीहि आनंदानें कबूल करतों. आधुनिक मराठी कवींतील कांहीं कवींच्या कवितेंत नैराश्याचा एकच एक सूर सारखा घुमत राहतो, हें इष्ट नाहीं, असें माडखोलकरांनीं प्रकट–अप्रकट रीतीनें जें म्हटलें आहे, तें अगदीं रास्त आहे. या कवीचें आयुष्य नैराश्य–तिमिरानें काळवंडलेलें असेल, नाहीं असें नाहीं; त्याचप्रमाणें, कविता ही व्यक्तिनिष्ठ असल्यामुळें तिच्यांत त्या त्या कवीच्या वैयक्तिक जीवनाचें कमी–अधिक प्रमाणांत प्रतिबिंब पडावें, हेंहि साहजिक असेंच आहे. परंतु, मनोदौर्बल्य असणें व त्यांतहि त्याचें सतत सार्वजनिक प्रदर्शन होत राहणें फारसें उचित नाहीं, हें कविवर्गानें लक्ष्यांत ध्यावयास पाहिजे. शिवाय, कविता ही एक बौद्धिक कला आहे, रंजन व शक्य तर ध्येयदर्शित्व हें तिचें उद्दिष्ट आहे, आणि हें उद्दिष्ट साधावयाचें तर आपलेंच व्यक्तिगत दुःख उगाळीत बसून चालणार नाहीं, हेंहि त्यांनीं चित्तांत वागावयास हवें.

* * *

## १३५ स्वातंत्र्याकांक्षेचा अभाव

याखेरीज रा. माडखोलकर यांनीं कांहीं सन्मान्य अपवाद वगळल्यास, आधुनिक कवींच्या काव्यलेखनांत आढळणाऱ्या स्वातंत्र्याकांक्षेच्या अभावावर जे आसुडाचे फटकारे उडविले आहेत, तेहि सार्थच वाटतात. टिळकांसारख्या कवीनें ब्रिटॅनियेचा मुक्तकंठानें केलेला जयजयकार पाहिला म्हणजे मन विस्मित होतें ! एवढे तेजस्वी म्हणून गणले गेलेले Bee कवि; पण त्यांनीं देखील ‘ प्रभात–पोवाडा ’ नामक कवितेच्या प्रथमावृत्तींत इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या संबंधाविषयीं धन्यता प्रदर्शित करून जर्मनीच्या माजी कैसरविषयीं पराकाष्ठेचे अनुदार उद्गार काढले होते ! ‘ फुलांची ओंजळ ’ या संग्रहांत ही कविता पुनर्मुद्रित करतांना तिच्यांतील हा भाग काढून टाकला, हें योग्यच झालें. अशीं कैक उदाहरणें देतां येतील.

बाकी, आमच्या कवींनाच तेवढा दोष देण्यांत अर्थ नाहीं. या १९३६ सालामध्येंहि एखाद्या राजपुरुषाचा सहजगत्या धक्का लागला, तरी देखील त्याबद्दल मोठ्या अभिमानानें जाहीर वाच्यता करणारे सुशिक्षित इसम जेथें आढळतात, तेथें स्वातंत्र्याकांक्षेच्या अभावाबद्दल गरीब बिचाऱ्या कवींना व्यर्थ बोल कशास लावावा ?

*                    *                    *

## १३६ कवींकडून भलती अपेक्षा !

हिंदी जनतेची स्वातंत्र्याकांक्षा आधुनिक मराठी कवितेंत प्रस्फुटित व्हावयास पाहिजे, हें वर आलेंच आहे. परंतु रा. माडखोलकर हे कविवर्गाकडून भलतीच अपेक्षा करतात, असें त्यांच्या खालील उद्गारांवरून म्हणावें लागतें.

"महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या बुद्धीची आणि मनाची धांव पावलोंपावलीं कुंठित करणारे **सामाजिक आणि राजकीय पाश तोडून टाकणारा** व आपल्या प्रतिभाबलानें भूतभविष्यांचा मेळ घालून त्याला अभिनव ध्येयांचा साक्षात्कार घडवून देणारा प्रभावशाली कवि आज हवा आहे. तरच त्याच्या दडपलेल्या आकांक्षांना वाचा फुटून तो दिवसानुदिवस उग्रतर होत चाललेल्या जीवनसंगरांत भाग घ्यावयाला समर्थ होईल." —पान ३३

या अवतरणांतील **'सामाजिक आणि राजकीय पाश तोडून टाकणारा'** हा जाड ठशांतील भाग किती 'अतिशयोक्त' आहे, हें वाचकांनींच पहावें. काव्यकला ही फक्त रंजनपर न राहतां लोकाभिमुख व्हावी, तिनें सुशिक्षितांप्रमाणें बहुजनसमाजाचीं सुखदुःखें बोलून दाखवावीं, जनतेला स्वातंत्र्याचा पाठ देण्याचें कार्य तिनें करावें. थोडक्यांत म्हणजे ती ध्येयदर्शी असावी – हें सर्व म्हणणें ठीक आहे. परंतु काव्यकलेनें **सामाजिक व राजकीय पाश तुटतात वा तुटावे, अशी अपेक्षा करणें हें मात्र निखालस भ्रममूलक व भ्रमोत्पादक आहे !** शब्दांना जर कांहीं अर्थ असेल, व साभिप्राय शब्दयोजनेला जर थोडेंसुद्धां महत्त्व असेल, तर माडखोलकरांनीं उपरिनिर्दिष्ट शब्दयोजना करावयास नको होती. ती त्यांनीं केली आहे,

तेव्हां कवींकडून ते अवास्तव अपेक्षा करतात, असें म्हटल्यावांचून गत्यंतर उरत नाहीं! या अवतरणाच्या आधींच्या वाक्यांत रा. माडखोलकर यांनीं योद्धे व मुत्सद्दी यांचा निर्देश केला आहे, हें खरें; पण तो करूनहि या अवतरणांत '**सामाजिक आणि राजकीय पाश तोडून टाकणारा**' असा प्रयोग ते ज्या अर्थीं करतात, त्या अर्थीं, एक तर वरील आरोप त्यांनीं मान्य करावयास पाहिजे, किंवा निदान विसंगतीची चूक तरी पदरांत घेतली पाहिजे! याखेरीज तिसरा मार्गच शिल्लक राहत नाही.

* * *

## १३७ विधानांचा व विचारांचा गोंधळ!

रा. माडखोलकर यांच्या या लेखांत विधानांचा वा विचारांचा गोंधळ ठिकठिकाणीं झालेला आहे. त्यांचा कुठवर परामर्ष घ्यावा? येथें फक्त वानगीदाखल कांहीं स्थलें उद्धृत करतोंः—

(१) रा. माडखोलकर यांनीं आपल्या लेखांत आधुनिक कवींना स्त्रैणत्वाप्रमाणेंच परभृततेबद्दलहि वारंवार नांवें ठेवलीं आहेत! आणि, तसें करतांना त्यांनीं 'मालाकार' चिपळूणकरांना विचारस्वातंत्र्याचें श्रेय दिलेलें आहे! ते म्हणतात, "निबंधमालेंत जें भाषेचें प्रभुत्व, जी **विचारांची स्वतंत्रता** आणि जें देशाभिमानाचे ओज दिसून येतें, त्याचा आढळ केशवसुतांच्या कवितेंत होतो काय?"—पा. ९. वस्तुतः केशवसुतांनीं जर इंग्रजी कवींचें अनुकरण केलेलें असलें, तर मालाकारांनीं मेकॉले, ॲडिसन प्रभृति इंग्रजी लेखकांचें अनुकरण केलेलें आहे. स्वतः माडखोलकरांनीं देखील 'विष्णु कृष्ण चिपळूणकर' (द्विविधदर्शन) या ग्रंथांत ही गोष्ट अनेकदां कबूल केलेली आहे. वाचकांनीं या ग्रंथाचीं २६, २८, २९ वगैरे पृष्ठें पहावीं. असें असतां 'गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता' या निबंधांत त्यांनीं केशवसुतांना परभृततेबद्दल हिणवावें व मालाकारांना मात्र विचारस्वातंत्र्याबद्दल वाखाणावें, हें नवल नव्हे काय? कदाचित् आधुनिक कवींविषयीं माडखोलकरांचें जसें मतपरिवर्तन झालें आहे, तसेंच हें चिपळूणकरांविषयींहि झालें असावें!!

या ठिकाणीं मालाकारांचा उल्लेख केला आहे. तो फक्त वादासाठीं केला असून त्यांना कमीपणा देण्यासाठीं केलेला नाहीं,हें वाचकांनीं कृपा करून लक्षांत ठेवावें. खरें पाहतां आपल्याकडे सध्यां 'परभृत' नाहीं असें काय आहे? अशा स्थितींत कवीच तेवढे निवडून काढून त्यांना झोडपून काढण्यांत काय स्वारस्य असेल तें असो! अलीकडे माडखोलकर ज्या साम्यवादाचा पुरस्कार करीत आहेत, तो तरी परभृतच नव्हे काय?

( २ ) माडखोलकरांच्या ज्या निबंधांत परभृततेबद्दल आधुनिक कवींना कमीपणा दिलेला आहे, त्यांतच राजकवि चंद्रशेखर यांच्या 'काय हो चमत्कार!'—या काव्याची मनसोक्त तारीफ केलेली आहे. हें काव्य एका इंग्रजी कवितेवरून चंद्रशेखरांना सुचलें असल्याचें सर्वश्रुतच आहे. मग त्याची माडखोलकर इतकी स्तुति कां बरें करतात?

अर्थात् याप्रमाणें अन्य कवितेवरून सुचलेली कविता हीन दर्जाची समजावी, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं. उलटपक्षीं, अशा परप्रेरित कवितेंत कवींची स्वतंत्र प्रज्ञा बऱ्याच प्रमाणांत व्यक्त झाली असल्यास ती कविता बेलाशक स्वतंत्र समजावी, अशाच मताचा मी आहें. परंतु परभृततेवरून एकास खालीं ओढावयाचें व दुसऱ्यास तिजकडे दुर्लक्ष करून वर चढवावयाचें, हा माडखोलकरांचा पंक्तिप्रपंच वाचकांच्या निदर्शनास आणण्यासाठी मी हा मुद्दा पुढें आणला आहे. एरवीं 'काय हो चमत्कार!' हें माझेंहि अतिशय आवडतें काव्य आहे.

( ३ ) पृष्ठ १४ वर रे. टिळकांच्या धर्मांतराचा निंदागर्भ व विनायक कवींच्या स्वधर्मप्रेमाचा स्तुतिगर्भ उल्लेख आलेला आहे. परंतु, निःपक्षपाती व्यक्तीला स्वधर्माभिमानी पण चंगीभंगी विनायकांपेक्षां धर्मच्युत पण सच्छील टिळकच अधिक आदरणीय वाटण्याचा संभव आहे!

( ४ ) आधुनिक मराठी कवितेंत "स्वदेशीच्या, स्वराज्याच्या किंवा कायदेभंगाच्या प्रक्षोभक चळवळींचा" पत्ताहि लागत नाहीं, असें माडखोलकर पृष्ठ ३० वर सांगतात! असा पत्ता लागूं नये, असा माझा बिलकूल मथितार्थ नाहीं. पण हा मुद्दा विशेष जोरानें मांडण्याजोगा आहे, असें मात्र

मला वाटत नाहीं. नाहीं तर, 'झेंडा उंचा रहे हमारा !''–या पद्याला काव्यमालिकेंत सर्वांत श्रेष्ठ स्थान द्यावें लागेल !

(५) पृष्ठ ९ वर चिपळूणकर व केशवसुत यांची तुलना करतांना चिपळूणकरांनीं ज्या वयांत 'केसरी' सुरू केला, त्या वयांत केशवसुत हे 'हरपलें श्रेय' हुडकण्यांत मग्न झाले होते, अशी माडखोलकर केशवसुतांची हेटाळणी करतात ! 'केसरी'सारख्या पुढें अतिशय गाजलेल्या वर्तमानपत्राची चिपळूणकरांनीं सुरुवात केली, हें त्यांचें कार्य लोकसेवेच्या दृष्टीनें महत्त्वपूर्ण आहे, याबद्दल वाद नाहीं आणि या कार्याची किंमत कुणी कमीहि करूं शकत नाही. परंतु, म्हणून या कार्याची 'हरपलेलें श्रेय' हुडकण्याच्या कार्याशीं तुलना होऊं शकते, एवढेंच नव्हे, तर तें त्यापेक्षां श्रेष्ठतरहि ठरूं शकतें, असें मात्र निश्चितपणें म्हणतां येत नाहीं. किंबहुना, मनोविकासाच्या किंवा अंतर्मुखतेच्या दृष्टीनें 'केसरी' काढण्यापेक्षां 'हरपलेलें श्रेय' हुडकणेंच ज्यास्त उच्च प्रतीचें कार्य ठरूं शकेल, असें मला वाटतें !

(६) माडखोलकरांच्या या लेखांतील विसंगतीची मोजदाद करण्यासाठीं एक स्वतंत्र लेखच लिहावा लागेल ! तूर्त तितका अवकाश नसल्यामुळें कांहीं मासले तेवढे वाचकांपुढें मांडतोंः—

(अ) पान २५ व २६ पहा. त्यांत प्रथम केशवसुत, टिळक, चंद्रशेखर प्रभृतींनीं "पर्यायानें पारतंत्र्याचा बडिवार" गाइला आहे, असें म्हटलें असून नंतर लगेच केशवसुत, विनायक, गोविंद, सावरकर प्रभृति कांहीं 'विरळ' कवींनीं 'स्वातंत्र्यप्रेमाची दीप्ति' प्रगट केली असें केशवसुतां-पुरतें थेट उलट विधान केलें आहे !

(आ) पान १२ वर केशवसुतांच्या गीतांना (व सुनीतांनाहि) 'उदात्त' व 'आकर्षक' असें म्हटलें आहे. पण, पान १९ वर याच गीतांची 'नकली वैणिकें' या संज्ञेनें संभावना केली आहे.

(इ) पान २९ वर यशवंत हे माधव ज्युलियनइतके स्त्रैण कवि नसल्याची माडखोलकर ग्वाही देतात. परंतु, फक्त एकच पृष्ठ उलटल्यानंतर मराठी वाङ्मयापैकीं केशवसुत, गोविंदाग्रज, माधव ज्यूलियन, यशवंत वगैरेंची

फक्त भावगीतेंच एखाद्या काल्पनिक हिमप्रलयांतून अवशिष्ट राहिल्यास भावी इतिहासकारांना या काळांतील महाराष्ट्रीय जनता " प्रणयपिपासेनें आसुसत व उसासत " असल्याचा बोध होईल अशी ते मल्लिनाथी करतात ! 'स्त्रैण' शब्दाची माडखोलकरांची कल्पना पूर्वी नमूद केलेलीच आहे !

(ई) पृष्ठ १३ 'तुतारी' कवितेला ओजोगुणानें रसरसलेली 'कविता' अशा प्रकारें संबोधिलेलें आहे; तर पृष्ठ १५ वर 'तुतारी'चा भर " जुनें जाऊं द्या मरणालागुनि " या कल्पनेवर असल्याबद्दल तिचा सूक्ष्म कां होईना, पण अधिक्षेप केलेला आहे !

ही यादी आणखी कितीतरी फुगवितां येईल. पण स्थलाभावास्तव सध्यां एवढें पुरें.

*　　　　*　　　　*

## १३८ प्रसिद्धि–लालसा

'गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता' या लेखांत रा. माडखोलकर यांनीं आधुनिक मराठी कवि प्रेमाप्रमाणेंच प्रसिद्धीसाठींहि किती धडपडतात, याबद्दल नाक मुरडले आहे. परंतु, आधुनिक मराठी कवीच कशाला, इतर भाषांतले कवीसुद्धां प्रसिद्धीसाठीं अतोनात धडपडतांनाच दिसतात ! याचें एक मौजेचें उदाहरण पुढे देतों:—

इंग्लंडांतील पोप हा कवि सुविख्यातच आहे. पोप हा प्रसिद्धीसाठीं नेहमीच 'आसुसत व उसासत' असे. त्याने 'Essays on Criticism' हें पुस्तक जेव्हां प्रकाशित केलें, तेव्हां त्याचा सपाटून गाजावाजा होईल अशी त्याला भारी आशा होती. तथापि; दुर्दैवानें स्तुति तर राहोच, पण या ग्रंथाची निंदाहि झाली नाहीं ! जनतेनें जणू काय हें पुस्तक उपेक्षेनेंच मारण्याचा 'कट' केला होता ! प्रसिद्धिलोलुप पोपला ही स्थिति साहजिकच दुःसह झाली. त्यानें शेवटीं निंदेमुळें तरी प्रख्यात (!) होण्याचें ठरविलें, व आपल्या पुस्तकाची आपणच हजेरी घेण्याचा निश्चय केला ! त्या निश्चया-प्रमाणें त्यानें सदर ग्रंथावर स्वतःच झणझणीत टीकालेख लिहिले, व ते निराळ्या नांवांनीं मुद्रितहि केले ! !

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक ८

## १३९ इतिहासाची व्याप्ति

“अर्वाचीन मराठी साहित्य” या ग्रंथांत प्रो. दत्तो वामन पोतदार यांचा “मराठी इतिहास व इतिहाससंशोधन ” या नांवाचा एक विस्तृत लेख प्रसिद्ध झाला आहे. इतिहासाची व्याप्ति फक्त राजकीय घडामोडींपुरती मर्यादित न मानतां आर्थिक, सांस्कृतिक वगैरे अन्य घडामोडींचाहि त्यांत अंतर्भाव व्हावयास पाहिजे, हा मुद्दा प्रोफेसरसाहेबांनीं या निबंधांत प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीनें मांडला आहे. तो सर्वसंमत होण्याजोगाच आहे, याबद्दल वाद नाहीं. या दृष्टीनें त्यांच्या या लेखांतील पुढील मजकूर विचारणीय आहेः—

( १ ) “ इतिहासासंबंधानें त्यांची ( राजवाड्यांची ) कल्पना अत्यंत व्यापक असल्यामुळें त्यांच्यासमोर केवळ राजकीय इतिहासच नव्हता. एकंदर महाराष्ट्रीय लोकांचें निरनिराळ्या क्षेत्रांतील जीवन तपासणें हा त्यांचा व्यवसाय होता. त्यामुळें आर्थिक, कार्षिक, वैयापारिक, सांस्कृतिक, धार्मिक सारस्वतिक इत्यादि लोकजीवनाचीं विविधांगें तपासणें आणि त्यांतून साहित्य मिळविणें ही त्यांची खटपट असे. ” ( पान ३३२ )

( २ ) “ रा. सरदेसाई यांच्या रियासतींत प्रायः राजकीय घडामोडींचेंच संकलन आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाबद्दल उपलब्ध सामुग्रीच्या मानानें हें संकलन आणखीहि विस्तृत होण्यास वाव आहे असें आम्हांस वाटतें, आणि तसें स्वास्थ्य लाभलें तर रावसाहेब सरदेसाई हे देखील तसा उद्योग करतील. ” ( पान ३७७ )

अर्थात् प्रो. पोतदार यांचा हा मुद्दा अगदीं नवीन आहे, किंवा राजवाड्यांव्यतिरिक्त इतर इतिहासाभ्यासकांस तो सर्वथैव अपरिचित होता अगर आहे अशांतला बिलकूल भाग नाहीं. तथापि राजकीय घडामोडींखेरीज अन्य घडामोडींचाहि साक्षेपानें परामर्ष घेणारा सर्वांगपरिपूर्ण असा इतिहासग्रंथ मराठींत जवळजवळ विरळाच, एवढें मात्र खरें. महाराष्ट्रीय इतिहासकारांचे मुकुटमणी रियासतकार सरदेसाई यांचीच गोष्ट घ्या. त्यांच्या

रियासतींत फक्त राजकीय घडामोडींचा समावेश केलेला असून आर्थिक, सांस्कृतिक वगैरे घडामोडींना त्यांत प्रायः बगलच दिलेली आहे! साने, राजवाडे, खरे, पारसनीस प्रभृतींच्या संशोधनपर ग्रंथांतून इतस्ततः विखुरलेल्या माहितीचे कण एकत्र गोळा करून केवळ राजकीय घडामोडींपुरता कां होईना, पण मराठ्यांचा सुसंगत व सविस्तर इतिहास लिहिणें हें कार्य देखील साधें–सोपें नव्हे व सरदेसायांखेरीज इतरांस तें उरकलें नाहीं, यांतच त्यांच्या मोठेपणाचें मर्म आहे. परंतु, हें सर्व जमेस धरूनहि प्रोफेसर पोतदार यांनीं दिग्दर्शित केलेली रियासतकारांची सदर उणीव अन्यथा ठरत नाहीं आणि ही उणीव दाखवून प्रो. पोतदार सरदेसायांना कमीपणा आणूं पहातात, असें तर खासच नाहीं. कारण, वरीलसारखें दोषदिग्दर्शन व तज्जन्य मार्गदर्शित्व हें सरदेसायांपेक्षांहि त्यांच्या मागून त्यांच्या गादीवर बसणाऱ्या महाराष्ट्राच्या भावी '' गिबन ''साठीं आहे, हें उघड आहे.

*　　*　　*

## १४० सत्यसंशोधन कठिणच

इतिहासकाराला पुष्कळ वेळां अडचण पडते ती सत्यसंशोधनाची. एखाद्या घडणेंतील सत्य काय हें त्याला छातीठोकपणे सांगणें अनेकदां अशक्य होते. अजिबात पुरावाच नसला, तर इतिहासकाराचें काम एकपरीनें सुकर होतें, असें म्हणतां येईल! परंतु परस्परविरुद्ध पुरावा उपलब्ध असल्यास त्यांतून खरा प्रकार शोधतांना मात्र त्याची जी धांदल उडते, ती वर्णन करण्याजोगी असते! या बाबतींत एका आंग्ल इतिहासज्ञानें दिलेलें पुढील उदाहरण वाचकांस फारच गमतीचें वाटेल—

लॉईड जॉर्ज हे इंग्लंडचे मुख्य प्रधान असतांना एकदां हाउस ऑफ कॉमन्समध्ये त्यांचें पोलंडसंबंधीं भाषण झालें. या भाषणाला क्रासिन व कामेनेफ् नांवाचे रशियाचे दोन वकील हजर होते. या प्रसंगीं हाउस ऑफ कॉमन्समध्यें प्रत्यक्ष उपस्थित असलेल्या वार्ताहरांनीं त्याच दिवशीं प्रसिद्ध झालेल्या लंडनमधील वृत्तपत्रांत किती परस्परविरुद्ध अहवाल छापले हें खालीं दिलेल्या चार अवतरणांवरून स्पष्ट होईलः—

**( 1 ) Evening Standard**

" In conversation they seemed to betray only a limited acquaintance with English; but every word of Mr. Lloyd George's utterance seemed intelligible to them. Not only did they follow him wirh eager interest, but often with animated comment. "

**( 2 ) Star**

" Krassin could follow every word of Lloyd George. His colleague ( i. e. Kameneff ) does not speak or understand English ; so Krassin every few minutes leaned over and whispered a translation into other's eai. "

**( 3 ) Evening News**

" The two did not exchange a sigle remark during the whole of the Premier's speech. "

**( 4 ) Pall Mall Gazette**

" The soviet envoys, especialy Mr. Krassin, seemed somewhat restless, and appeared to take more interest in the scene than in the speech, but this I heard attributed to their difficulty in following the words of the Prime Minister."

लॉईड जॉर्ज साहेबांच्या भाषणाचे उपरोक्त चार वर्तमानपत्रांतील हे चार वृत्तांत वाचून आपल्या पदरांत माहितीचे दाणे थोडेसे अधिक पडले असें तर वाचकांस वाटत नाहींच, पण उलटपक्षीं त्यांच्या मनांत कांहीं शंका मात्र जोरानें उत्पन्न होतात, आणि या वृत्तांतावरून तरी त्या शंकांचें निरसन होण्याची लवमात्रहि शक्यता राहत नाहीं ! त्यांतील कांहीं शंका अशाः—

१. क्रासीन यांना लॉईड जॉर्ज यांचें भाषण सुलभतेनें कळलें किंवा कळलें नाहीं ?

२. कामेनेफ् यांना तें अजिबातच कळलें नाहीं किंवा काय ?

३. हें भाषण चालू असतां ही जोडगोळी एकमेकांशीं बोलली किंवा बोलली नाहीं.—इत्यादि.

या धर्तीचा अगदींच घोटाळ्याचा पुरावा समोर आला असतांना केवढाहि विलक्षण इतिहासकार असला तरी पण त्याची हबेलंडी उडाल्यावांचून कशी राहील ?

हें व इतर सदृश उदाहरणें पाहिलीं म्हणजे सर वाल्टर रॅले यांनीं आपला इतिहासग्रंथ जाळून टाकला, याबद्दल आश्चर्य वाटेनासें होतें !

* * *

## १४१ नागपूरचीं दोन अधिवेशनें

गेल्या महिन्याच्या २४ व २५ तारखांना नागपूर येथें २० वें हिंदी संमेलन व भारतीय साहित्य परिषद यांचीं अधिवेशनें भरल्याचें वृत्तपत्रांवरून सर्वत्रांस विदित झालेंच आहे. संमेलनाचे अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद व परिषदेचे महात्मा गांधी, यांचीं भाषणें यथातथाच झालीं. अर्थात् त्यांत विचारणीय असा एक देखील मुद्दा नव्हता, असें कोणासहि म्हणतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, हिंदींतील "भाषाशुद्धि"वर राजेंद्रबाबूंनी जे कोरडे उडविले, ते अगदीं यथार्थ वाटतात. स्वत्व न गमावतां परभाषेंतील शब्द आत्मसात् केल्यास कोणतीहि भाषा समृद्ध झाल्याखेरीज राहाणार नाहीं. किंबहुना भाषासमृद्धीचा हाच सर्वोत्तम मार्ग आहे, असेंहि म्हटलें असतां चालेल. परंतु, हिंदींतील काय, किंबहुना मराठींतील काय, "भाषाशुद्धी-वाल्यां"ना हा विवेक कोठून रहावा ?

म. गांधी यांनीं आपल्या भाषणांत वाङ्मय हें लोकाभिमुख होण्याची अपेक्षा व्यक्त केली. तसेंच, धर्मांधता अगर जात्यंधता यांना प्रोत्साहन देणाऱ्या वाङ्मयाचा भारतीय साहित्य परिषद कदापि पुरस्कार करणार नाहीं, असाहि निर्वाळा त्यांनीं दिला. गांधीजींचें हें प्रतिपादन निरपवाद मानण्याजोगें असेंच आहे.

हिंदी साहित्य संमेलन हें जाणून बुजून हिंदी भाषेकरितांच असल्यामुळें त्यांत हिंदीला विशेष प्राधान्य देण्यांत यावें, यांत लोकविलक्षण असें कांहींच नाहीं, परंतु भारतीय साहित्य परिषदेनेंसुद्धां हिंदीचाच जयजयकार केला. हिंदीला येवढें महत्त्व प्राप्त व्हावें, किंवा तिला राष्ट्रभाषा होण्याचा मान मिळावा, हा प्रकार पुष्कळांस आवडत नसल्याचें दिसतें. कित्येकांना तर हें शुद्ध " खूळच " वाटतें! तथापि, " मूर्ति तितक्या प्रकृति " असें म्हणून आपण हा प्रश्न बाजूस ठेऊं.

तरीपण येथें एवढा इषारा द्यावासा वाटतो की, भारतीय साहित्य परिषदेच्या चालकांनी हिंदीचा योग्य तो पुरस्कार अवश्य करावा, पण या परिषदेला " राष्ट्रभाषा–प्रचार–समिती " मात्र बनवूं नये. हिंदुस्थानांतील प्रांतिक भाषांमधील उत्कृष्ट लिखाण जगापुढें आणण्याचें कार्यहि या परिषदेनें धूमधडाक्यानें केलें पाहिजे. आणि त्यासाठीं तात्पुरती व " आपद्धर्म " म्हणून तरी इंग्रजी भाषेची कांस धरली पाहिजे. राजकारणांत उपयोगी पडणारें एक हत्यार एवढीच एकमेव दृष्टि परिषदेबद्दल न राहिल्यास तिजकडून ही कामगिरी व्हावयास हरकत दिसत नाहीं.

हिंदी साहित्य संमेलनांतील एका ठरावांत देवनागरी उर्दू दोनहि हिंदीच्या लिप्या मानण्यांत आल्या. उर्दूपेक्षां देवनागरी लिपी ही सर्वच दृष्टींनीं श्रेष्ठतर असल्यामुळें संमेलनानें फक्त देवनागरीवरच जोर दिला असता, तर बरें झालें असतें. तथापि, संमेलनानें उर्दू लिपीला मानाची सुपारी दिल्यामुळें जर एखाद्या समाजाचें खरोखरच समाधान होत असेल, तर संमेलनानें केलें तें योग्यच केलें, असें म्हणावयास जागा होईल.

संमेलनापुढें " शिवबावनीं "तील उतारे काढून टाकण्यांत येऊं नयेत, असा आणखी एक ठराव आला होता; पण तो फेटाळण्यांत आला! भूषणकवीच्या " शिवाबावनीं "त मुसलमान समाजाला दुखविणारा भाग आला आहे, अशी एक मुसलमान तक्रार करतो काय, व हिंदी साहित्य संमेलन त्याचा पाठपुरावा करतें काय, साराच चमत्कार! जात्यंधता नष्ट व्हावयास पाहिजे, हें कबूल, आणि सध्यांच्या साहित्यिकांनीं जात्यंधतेला पोषक असें कांहींहि लिहूं नये, हेंहि कबूल. परंतु याबरोबरच सर्वांनी

थोडी उदारबुद्धि ठेवण्यासहि शिकलें पाहिजे, हें देखील कांहीं खोटें नाहीं. हिंदुस्थानांतील सारेच समाज विहिणीसारख्या नाजुक " मिजाशी "चे झाले तर लहान मोठे ग्रंथच काय, पण साधेसुधे शब्द, वचनें, वाक्प्रचार व म्हणी यांनासुद्धां आपणाला मुकावें लागेल. हें कितपत हितपरिणामी आहे बरें? तात्पर्य, जात्यंधतेलाच नव्हे, तर अशा नसत्या नाजुक " मिजाशी "ला सुद्धां मूठमाती देण्याची वेळ आतां आली आहे!

हिंदी साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान बाबू राजेंद्रप्रसाद यांना देण्यांत आलें, हें अनेक हिंदी साहित्यिकांस रुचलें नसल्याचें आढळतें. परंतु वाङ्मयसेवेखेरीज इतर गोष्टींवर भाळून भलभलत्यास संमेलनाध्यक्ष करणाऱ्या आम्हां महाराष्ट्रीयांना राजेंद्रबाबूंच्या निवडीबद्दल हिंदी लोकांस हंसण्यास मुळीं हक्कच कुठें आहे?

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक ९

## १४२ प्राचीन कवींचीं पदें

प्राचीन मराठी कवींच्या कृतींचें अध्ययन करतांना त्यांच्या स्फुट पदांपेक्षां त्यांच्या प्रदीर्घ रचनेकडेच वाचकांचें सामान्यतः लक्ष्य वेधलें जातें. ' ज्ञानेश्वरी 'सारखी प्रदीर्घ रचना, भाषा, अलंकार, तत्त्वज्ञान वगैरे अनेक दृष्टींनीं महत्त्वपूर्ण ठरते, याबद्दल वाद होण्याचें कारण नाहीं. परंतु ' ज्ञानेश्वरी 'सारखींच तिच्या जनकाचीं (व इतरहि वाग्भटांचीं) लहान लहान पदें देखील पराकाष्ठेचीं मधुर आहेत, ही वस्तुस्थिति नजरेआड करून कसें चालेल? उदाहरणार्थ, ज्ञानदेवाचें पुष्कळांनीं उल्लेखिलेलें पुढील गीत पहाः—

**घनु वाजे घुणघुणा । वारा वाजे रुणझुणा**
**भवतारकु हा कान्हा । वेगीं भेटावा कां ॥**
**चांद वो चांदणें । चांपे वो चंदन**
**देवकीनंदनेंविण । नावडे वो ॥**
**चंदनाची चोळी । माझें सर्व अंग पोळी**
**कान्हो वनमाळी । वेगीं भेटावा कां ॥**
**सुमनाची सेज । सीतळ वो निकी**
**पोळे आगीसारखी । वेगीं विझवा कां ॥**
**तुम्हीं गातसां सुस्वरें । ऐकों नेदावीं उत्तरें**
**कोकिळे ! वर्जावे । तुम्हीं बाइयांनो ॥**
**दर्पणीं पाहतां । रूप न दिसे वो आपुलें**
**बाप रखुमादेवीवर । विठ्ठलें मज ऐसें केलें ॥**

या गीताचा प्रो. रा. द. रानडे यांनीं दिलेला खालील भावार्थ वाचला, म्हणजे त्याचें सौंदर्य मनांत आणखी चांगलें ठसेल:—

“(या पदांत) याच विरहिणीचा विरह जाज्ज्वल्य दशेप्रत जाऊन आपल्या भ्रताराची भेट होत नाहीं, म्हणून तिला फार वेदना होत आहेत;

चंद्र, अगर चांफा, अगर चंदन यांच्या योगानें मनांतील दुःख वाढत मात्र आहे; चंदनाचे चोळीनें माझें सर्वांग पोळत आहे; पुष्पांची शेज शीतळ म्हणतात, पण ती आगीप्रमाणें माझ्या अंगास पोळत आहे; कोकिळांनों ! तुम्हीं सुस्वर गातां, पण त्याच्या योगानें माझ्या अंतकरणांतील दुःख जास्तच वाढत आहे; दर्पणांत पहात असतां माझें रूप मला दिसत नाहीं, अशी देवकीनंदनानें माझी स्थिति केली आहे, असें ज्ञानेश्वर म्हणतात."

ज्ञानदेवाचें हें विरहगीत जयदेव किंवा विद्यापति यांच्या विरहगीतांच्या तोडीचें रसिकांस वाटल्यावांचून रहास राहणार नाहीं.

स्फुट पदें रचण्याचा हा क्रम ज्ञानदेवाखेरीज इतरहि मराठी कवींनी चालू ठेवला, हें सर्वांस विदित आहेच. अशा पदें निर्मिणाऱ्या कवींत एकनाथाचें स्थान अलौकिक समजलें पाहिजे. स्त्रियांपासून गवयांपर्यंत अनेकजण आजहि त्याचीं पदें म्हणतात. '**मशिं बोलुं नकोरे गोविंदा । मला आला तुझा राग**' हें त्याचें स्त्रीगीत माहित नसणारा असा कोण अभागी आहे ? एकनाथानंतरहि पुष्कळच उच्च प्रतीचे पदकर्ते होऊन गेले. त्यांची परंपरा थेट देवनाथापर्यंत जाऊन भिडते. त्या सर्वांचा व त्यांच्या सुरस गीतांचा येथें कुठवर परामर्ष घ्यावा ?

दुर्दैवानें प्राचीन मराठी वाङ्मयाची उपेक्षा करण्याचाच आज पायंडा पडला आहे ! आणि त्यांतहि जे थोडे भाषाभक्त त्याकडे दृष्टि वळवितात, ते वर सांगितल्याप्रमाणें जुन्या कवींच्या पदांपेक्षां त्यांच्या प्रदीर्घ रचनेकडेच जास्त धांव घेतात ! यामुळें हा एक महनीय वाङ्मयप्रकार अंधारांतील काळ्या फडक्याप्रमाणें पुष्कळांस अगम्यच होऊन राहिला आहे !

दुःखांत सुख एवढेंच कीं, रा. लाड I. C. S. यांच्यासारखे उच्चविद्याविभूषित रसिक प्राचीन कवींच्या पदांचा आपल्या लेख–भाषणांतून तूर्त जोरानें पुरस्कार करूं लागले आहेत. तसेंच रा. पु. य. देशपांडे यांच्यासारखे साम्यवादी लेखक मार्क्सवादाच्या दृष्टीनें कोणत्याहि भाषेंतील सरसकट सारेंच पूर्ववाङ्मय त्याज्य समाजावयास नको आहे, असें अलीकडे धिटाईनें प्रतिपादूं लागले आहेत, हें देखील सुचिन्हच होय. याहि

प्रतिपादनाचा थोडाफार उपयोग होऊन साम्यवादी म्हणविणाऱ्यांना सुद्धां प्राचीन मराठी वाङ्मयाची ( व प्राचीन मराठी वाङ्मयाबरोबरच प्राचीन मराठी पदांचीहि ) मातब्बरी वाटूं लागेल, अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं.

प्राचीन मराठी पदांचे कांहीं संग्रह कै. वामन दाजी ओक प्रभृतींनीं मागें प्रसिद्ध केले होते. परंतु आज ते दुर्मिळ आहेत हें एक, आणि त्यांत "सब घोडे बारा टक्के' असा प्रकार घडला आहे, हें दुसरें. या दोन कारणांमुळें निवडक प्राचीन पदांचा 'सुवर्णनिधि' ( Golden Treasury ) प्रकाशित होण्याची आवश्यकता आहे, असें मला वाटतें.

अर्थात् प्राचीन मराठी पदांचा परामर्ष घ्यावयाचा म्हणजे त्यांत दोष अजिबात नाहींतच, अगर जे दोष म्हणून वाटतात, ते वस्तुतः गुणच होत, असा एकांतिक अभिप्राय प्रगट करावयाचा नाहीं. प्राचीन मराठी पदांत अनेक दोष आढळतात, व त्या दोषांची जाणीव ठेवूनच त्यांच्या गुणांचा गौरव केला पाहिजे. शिवाय प्राचीन पदांना वर उचलून धरतांना आधुनिक कवितेला खालीं लोटलेंच पाहिजे, असाहि कांहीं कायदा नाहीं ! याप्रमाणें क्वचित् कुणी केलेंच, तर सूज्ञांनीं तो केवळ उत्साहातिरेक होय, असें मानावें, व त्याला नसतें महत्त्व देऊं नये.

* * *

## १४३ लेखक 'कथाविषय' बनतात !

रा. खांडेकर यांनी 'उल्का' कादंबरींत कै. राम गणेश गडकरी यांना अल्पकाळ 'कथाविषय' बनविलें, ही गोष्ट पुष्कळांस अतिशय कृत्रिम वाटली. परंतु ती तशी कां वाटावी, हें समजणें खरोखरच कठिण आहे ! कारण, वाङ्मयांत पात्र म्हणून जुना नवा योद्धा, मुत्सद्दी वगैरे आणणें हा प्रकार जर वाचकांस फारसा कृत्रिम वाटत नाहीं, तर एखाद्या साहित्य सेवकालाच तो मान दिल्यानें कृतिमतेचा कळस झालासा त्यांना कां बरें वाटावा ? कदाचित् गडकरी हे फार अलीकडल्या काळांत होऊन गेले, एवढ्याच एका कारणासाठीं त्यांचा 'उल्कें'तील पुनर्जन्म वाचकांस वैरस्यकारक भासतो, असें म्हणावें, तर तेंहि विशेष समर्पक वाटत नाहीं.

हेंच पहा ना. गडकऱ्यांनंतर वारलेले टिळक नाटकादिकांत पुनः अवतीर्ण झाल्यास ती गोष्ट मात्र लोकांना तितकीशी कृत्रिमपणाची वाटत नाहीं, असें स्पष्ट दिसतें ! एकूण, इतरांस कथाविषय बनविणाऱ्या साहित्यिकांनीं स्वतः कथाविषय बनण्यावरच जनतेचा अधिक रोंख आहे कीं काय ?

इंग्रजीमध्यें लेखकांना 'कथाविषय' बनविण्याचा प्रकार बराचसा रूढ असून तो लोकांना तेवढासा कृत्रिमहि भासत नाहीं. याचीं अनेक उदाहरणें देतां येतील. उदाहरणार्थ, रूडॉल्फ वेशर यांचे 'The Barrets of Wimpole Street' हें अलीकडलें नाटक पहा. या नाटकांत रॉबर्ट ब्रौनिंग या दांपत्याची प्रणयकथा गुंफली आहे. हे नाटक इंग्लंडांत कृत्रिम तर वाटले नाहींच; पण उलटपक्षीं ते लोकांना अतिशय आवडलें ! महायुद्धानंतर इंग्लंडांतील रंगभूमीवर जी थोडीं नाटकें अत्यंत प्रभावशाली ठरलीं, त्यांत या नाटकाची गणना होते.

नुकतीच एक इंग्रजी कादंबरी प्रसिद्ध झाली असून तींत विद्यमान नाटककार बर्नार्ड शॉ हे फार थोडा वेळ कां होईना, पण चमकून गेले आहेत.

* * *

## १४४ गॉर्कीचा अलंकार

अलंकारांचा फाजील सोस जसा अनिष्ट आहे, तसेंच त्यांच्या बाबत कट्टर 'प्युरिटन' होणेंहि फारसें श्रेयस्कर नाहीं. खुद्द कम्युनिस्ट लेखकांनींहि अलंकारांचा माफकच, पण उपयोग केलेला आहे व त्यामुळे त्यांच्या लेखनाचे सौंदर्य अल्पस्वल्प वाढावयास मदतहि झाली आहे. नमुन्यादाखल जगद्विख्यात रशियन कादंबरीकार मॅक्झिम गॉर्की यांच्या सुप्रसिद्ध 'Mother' कादंबरींतील आपण एक स्थळ घेऊं या. या कादंबरीतील 'आई'चे लेखक वर्णन करीत आहे. 'आई'ला तिचा खाष्ट नवरा दारूच्या धुंदीत किती निर्घृणतेनें वागवीत असे, एवढेंच नव्हे, तर कित्येकदां त्याची तिला मारण्यापर्यंतहि कशी मजल जात असे, याचा वृत्तांत सांगून 'आई'च्या बाह्यस्वरूपाविषयीं लिहितांना लेखक म्हणतोः—" Grey locks glistened in her thick, dark hair, like

the imprints of heavy blows". ही उपमा किती औचित्यपूर्ण व व समर्पक आहे, हें मर्मज्ञांस निराळें सांगावयास नकोच.

*　　*　　*

## १४५ राजकीय पुढारी व साहित्य

पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंतील व्याख्यानांत रा. काकासाहेब कालेलकर यांनीं पुढील प्रमाणें उद्गार काढल्याचें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें आहे:—

"राजकारण व साहित्य यांचा विरोध नसून तीं एकमेकांस पूरक अशींच असणें जरूर आहे. साहित्यसेवकांना राजकारणाची गोडी असली पाहिजे व राजकारणी पुरुषांना साहित्याची ओळख असली पाहिजे. राजकारणाचे पक्षोपपक्ष साहित्यांत नसावे, हें मला कबूल आहे. परंतु राजकारणी पुरुषांनीं साहित्यांत प्रवेश करूं नये, असें म्हणून साहित्यास सोंवळ्यांत ठेवण्याची मुळींच जरूरी नाहीं. (हंशा)"

रा. कालेलकर यांचे हे उद्गार बव्हंशी यथार्थच आहेत. परंतु त्यांतील अखेरच्या वाक्यांत राजकीय पुरुषांना साहित्यापासून दूर ठेवण्याचा कुणी कुणी प्रयत्न करतात, असा जो ध्वनि निघतो, तो कितपत वस्तुस्थितीस धरून आहे, याबद्दल मात्र जबरदस्त शंका वाटते. कोणत्याहि जबाबदार व्यक्तीनें असा नादानपणाचा खटाटोप केला असल्याचें निदान मला तरी ठाऊक नाहीं. मग कालेलकरांनीं हा चिमटा कुणाला घेतला असेल तो असो.

हिंदुस्थानसारख्या परतंत्र देशांत राजकारणाचें अनन्यसाधारण महत्त्व असावें, हें कुणासहि नाकारतां येणार नाहीं. यामुळें सर्व साहित्यसेवकांनी प्रचलित राजकारणाची गोडी बाळगली पाहिजे, हा कालेलकरांचा उपदेश अगदीं बरोबर ठरतो. तथापि, राजकारणाची थोडीबहुत गोडी आहे, एवढ्याच एका कारणासाठीं एखाद्या साहित्यसेवकाला राजकारणांत लुडबूड करूं द्यावी, असें स्वतः कालेलकर देखील म्हणणार नाहींत. हाच न्याय राजकीय पुढाऱ्यांनाहि लागूं करावयास पाहिजे.

साहित्याशीं अर्थाअर्थी संबंध नसतां केवळ राजकारणाच्या जोरावर साहित्यप्रांतांत कुणी दंडेली करतों म्हणेल, तर त्या प्रकाराचा उघड उघड

निषेधच केला पाहिजे. फार लांब कशाला, खुद्द कालेलकर व त्यांचे गुरु म. गांधी यांनी भूषणकवीच्या 'शिवबावनी' काव्याबाबतं जो धुडगूस घातला आहे, तो या दंडेलीच्याच स्वरूपाचा नव्हे काय, असा कालेलकरांना माझा सरळ प्रश्न आहे. राजकारणांत उच्च स्थान प्राप्त झालें, म्हणजे तें मनुष्य सर्वज्ञ बनतें, अशांतला बिलकुल भाग नाही. परंतु आपल्याकडील मौजच ही कीं, अशा राजकीय पुढाऱ्यांना लोक सर्वज्ञ मानतात, इतकेंच काय, पण त्यांचे ते देखील स्वतःला तसेंच समजतात! एरवीं त्यांनीं वरीलप्रमाणें धागडधिंगा कशाला घातला असता? उद्यां 'प्रेमचंद' यांनीं आपल्या साहित्यसेवेच्या पुण्याईवर कॉंग्रेसमध्यें धुडगूस घालतों म्हटलें, तर कालेलकरप्रभृति कॉंग्रेसवाले तो प्रतिकार न करतां स्वस्थपणें पाहतील काय? मग तोच नियम या कॉंग्रेसवाल्यांना कां लावतां येऊं नये?

गतवर्षी म. गांधी यांना व या वर्षी बाबू राजेंद्रप्रसाद यांना हिंदी साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद देण्यांत आलें, हें कितपत योग्य झालें, याचाहि निवाडा कालेलकरांनींच करावा. पुढील संमेलनाच्या अध्यक्षत्वाची माळ स्वतः कालेलकरांच्याच गळ्यांत पडल्यास त्याबद्दल मला तरी आश्चर्य वाटणार नाहीं!

अधिकारी राजकीय पुढाऱ्यांनीं साहित्यांत कदापि पदार्पण करूं नये, असें कोणतीहि समंजस व्यक्ति म्हणणार नाहीं. अनाधिकारी राजकीय पुढाऱ्यांनीं मात्र हा निष्कारण त्रास घेऊं नये, एवढें म्हटल्यावांचून गत्यंतर उरत नाहीं.

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १०

## १४६ ' लंडन मर्क्युरी ' मधील चर्चा

'लंडन मर्क्युरी ' च्या मार्चच्या अंकांत विल्यम नत्तल यांचा " The Proletarian Reader " या नांवाचा एक विचारप्रवर्तक लेख प्रसिद्ध झाला होता. त्यावर त्याच मासिकाच्या मेच्या अंकांत निरनिराळ्या लोकांनीं लिहिलेला चर्चात्मक मजकूर संपादकानें संग्रहित केला आहे. त्यांतील वेगवेगळ्या दृष्टींनीं महत्त्वाचीं अशी दोन अवतरणें पुढें उद्धृत करतोंः—

जे. एस. रेनर यांच्या पत्रांतील खालील उतारा आंग्ल कादंबरीकारांविषयींचा त्यांचा दृष्टिकोन स्पष्ट करणारा आहे. ते म्हणतात, " I am a mechanic and a liberal like my father, but I can read English authors and enjoy them, while Tolstoy's various writings, including " War and Peace, " I dont much care for. At the same time, I agree that the modern English novelist does not really know his working-class. Dickens, George Eliot, Jane Austin, Charlotte Bronte, Kingslay I have read, and I am able to find no particular fault with their delineation of character. Meredith, on the other hand, failed entirely both with his urban and rural workers. Thomas Hardy, from long tradition and intimate association, pictures his rural workers to the life, and being an architect knew something of the building craftsman.

" Your modern novelist too often – he can't help it, having had no experience of workshop or factory, or mess-room chat – draws upon his imagination for his labouring men and is, consequently, restricted to describing curates, artists, authors, doctors, naval and military officers, lawyers–the professional type he is familiar with."

विल्यम नत्तल यांना वर्गविषयक जाणिवेमुळें वाङ्मयानंदाचा लाभ घेणें जड जातें हा मुद्दा लक्षांत घेऊन लार्ड ह्यू सेसिल यांचा पुढील उतारा वाचावाः

" But he ( Mr. Nuttal ) surely entirely misconcieves the meaning, purpose and use of the literature of fiction. Nothing can be more irrelevant or inappropriate to the enjoyment of such literature than what he calls class-consciousness. One might as well be class-conscious when visiting the National Gallery or in listening to a concert at the Queen's Hall. The works of Jane Austin, Scott, Dickens, Thaekeray, etc., are works of art, intended to produce a certain, artistic impression on the reader. "

* * *

## १४७ जोसेफ कोन्राडचें स्थान

जोसेफ कोन्राड याच्या वाङ्मयकीर्तीला मध्यंतरीं जोराची ओहोटी लागली होती. तो जगांतील अव्वल दर्जाच्या कादंबरीकारांच्या तोलाचा नसला, तथापि त्याची पायरी पुष्कळच वरची लागते. अलीकडे कित्येक टीकाकारांना कोन्राडच्या खऱ्या योग्यतेची जाणीव होऊं लागली आहे, हें सुचिन्ह होय.

एका टीकाकारानें Invention व Imagination असे दोन वेगवेगळे गुण कल्पून पूर्वोक्त गुणाचा जोसेफ कोन्राड याच्यांत अभाव होता असें त्यांचें वैगुण्य दाखविलें आहे. खुद्द कोन्राड यालाहि या वैगुण्याची कल्पना होती, असे 'The Heart of Darkness' या त्याच्या सुंदर कादंबरीच्या प्रस्तावनेमधील 'the sustained invention of a really telling lie demads a talent which I do not possess' या वाक्यावरून व्यक्त होतें. 'The Heart of Darkness,' 'Chance' इत्यादि कादंबऱ्यांत कोन्राडला मोर्लो नामक पात्र इतर पात्रांच्या स्वभाव-दिग्दर्शनासाठीं आणावें लागलें, ही वस्तुस्थितीहि त्याच्या Invention च्या अभावाचीच द्योतक आहे.

हा दोष असला, तरी कोन्राडचीं नाविकजीवनाचीं चित्रें अतिशय हृदयंगम आहेत. शिवाय याचें भाषाप्रभुत्वहि वाखाणण्याजोगेंच आहे.

पहिल्या प्रतीची प्रतिभा नसतांहि कोन्राडनें एवढे यश मिळविलें, ही गोष्ट नवोदित साहित्यसेवकांस सदैव स्फूर्तिदायक अशीच वाटेल; व त्यासाठींच त्याचा येथें आठव केलेला आहे. वीस टक्के प्रतिभा व ऐशीं टक्के परिश्रम असें प्रमाण असूनहि बरेंच मोठें कार्य करून दाखवितां येतें, याचा जोसेफ कोन्रड हा मूर्तिमंत वस्तुपाठच होय, असें म्हटल्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

* * *

## १४८ प्रो. कृ. पां. कुळकर्णी यांचें भाषण

पांचव्या शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेलें रा. कृ. पां. कुळकर्णी यांचें भाषण अगदींच जुजबी स्वरूपाचें झालें, असा बोभाटा कानावर आला आहे, व तो खराहि आहे–तथापि या भाषणाच्या बरेवाईट-पणाबद्दल मला येथें कांहींहि म्हणावयाचे नाहीं. माझी तक्रार त्यांतील निराळ्याच गोष्टींबद्दल आहे. त्या गोष्टी अशाः—

रा. कुळकर्णी यांनीं या भाषणांत एके ठिकाणीं लेखकांचा स्पष्ट नामनिर्देश न करतां त्यांचा धंदा वगैरेवरून उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, पुढील वाक्य पहा ‘ इतिहास, समाज, व्याकरण ह्यांसारख्या रुक्ष आणि क्लिष्टतर अशा विषयांचा पिच्छा पुरविण्याचें काम, एक जीवनासाठी संस्कृतग्रंथ–प्रकाशन करणारे संशोधक व एक माजी न्यायाधीश व एक माजी व्हॅक्सिनेटर करीत आहेत. ” या वाक्यांतील संस्कृतग्रंथ–प्रकाशन करणारे संशोधक, माजी न्यायाधीश व माजी व्हॅक्सिनेटर म्हणजे नक्की कोण गृहस्थ होत, याचा सहजासहजीं बोध सर्वसामान्य वाचकांना होणें दुरापास्तच आहे! सर्वसामान्य वाचकांना थोर थोर ग्रंथकारांचीं नांवें थोडीबहुत अवश्य परिचित असतात. परंतु, त्या ग्रंथकाराचे धंदे वगैरे देखील त्यांनीं मुखोद्गत करून ठेवावे, अशी भलती अपेक्षा कुळकर्ण्यांनीं अथवा इतरहि कोणी कां करावी, हें समजणें खरोखरच कठीण आहे!

दुसरें, या भाषणांतून कित्येक साहित्यिक अजिबात वगळले गेले आहेत! त्यांच्या रा. कुळकर्णी यांनीं वरीलप्रमाणें अप्रत्यक्ष रीतीनें सुद्धां उल्लेख केलेला

नाहीं ! हा प्रकार कितपत उचित आहे बरें ? समारोपाच्या भाषणांत रा. कुळकर्णी यांनीं या प्रकाराबाबत पुढीलप्रमाणें खुलासा केल्याचें प्रसिद्ध झालें आहेः—

“ माझ्या भाषणांत ज्यांचा उल्लेख करण्याचा राहून गेलें असेल, त्या साहित्यिकांनीं रागावूं नये. सर्वांचीच भाषाविषयक सेवा थोर आहे. परंतु सर्वांचा उल्लेख भाषणांत येणे शक्य नसतें. पण कोणास अनुल्लेखानें मारल्याचा मजवर वृथा आरोप येऊं नये, म्हणून हें सांगत आहें.

“ **मराठी भाषेंतील आधुनिक वाङ्मयाचे कर्ते म्हणून ज्यांचा मीं उल्लेख केला, ते खरोखर थोर आहेत. ज्यांचा उल्लेख करण्याचें राहिलें, त्यांचें कार्य अद्याप डोळ्यांत भरण्यासारखें झालें नाहीं, असें माझें मत आहे.** ” ( ‘ ज्ञानप्रकाश, ’ ४ जून १९३६ )

या खुलाशाचा पूर्वार्ध ठीक आहे, परंतु, उत्तरार्धानें त्यावर पार हरताळ फांसला जातो ! ज्यांचा आपण उल्लेख केला नाहीं, त्यांचें मुळीं कार्यच डोळ्यांत भरण्याजोगें नाहीं, असें रा. कुळकर्णी यांनी म्हणावें, हा शुद्ध हटवाद होय ! कवींपैकी चंद्रशेखर, माधव, Bee, बॅ. सावरकर प्रभृति कवि, रा. कुळकर्णी यांनीं आपल्या भाषणांतून वगळले म्हणून त्यांची कामगिरीच डोळ्यांत भरण्यासारखी झाली नाहीं, असा निष्कर्ष काढावयाचा कीं काय ? तात्पर्य, लेखकांचा उल्लेख करतांना कुळकर्ण्यांनीं बरीच अनास्था दाखविली आहे, असें म्हणणें भागणें आहे. एकतर, त्यांनी कोणाचाच उल्लेख न करतां निव्वळ तात्त्विक विवेचन करावयाचें असतें. किंवा, उल्लेखच करावयाचा, तर त्यांतून कुणीहि सन्माननीय साहित्यिक सुटूं नये, एवढी खबरदारी घ्यावयाची असती.

शेवटीं एवढें नमूद करणें जरूरीचें वाटतें कीं रा. कुळकर्णी यांचें भाषण कसेंहि झालें असलें तथापि त्यामुळें त्यांच्या योग्यतेला कसलाहि झळ पोंचत नाहीं. महाराष्ट्र–साहित्य–संमेलनाचें अध्यक्षपद त्यांनीं भूषविल्याचा योग लौकरच येवो, असें मी जातांजातां मनःपूर्वक चिंतितों.

*   *   *

## १४९ संमेलनाध्यक्षाचें भाषण कसें असावें ?

महाराष्ट्र–साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षाचें भाषण असो, की दुसऱ्या कोणत्या साहित्यविषयक मजलशीच्या अध्यक्षाचें भाषण असो, त्यांत चालू वाङ्मयाचें समालोचनात्मक विवेचन हें यावयाचेंच, अशी जवळ जवळ प्रथाच पडल्यासारखी झाली आहे ! ही प्रथा तशी वाईट नसली, तथापि ती कित्येकदां त्या बिचाऱ्या अध्यक्षाची कुचंबणा करणारी ठरते, एवढें मात्र खरें. कारण चालू वाङ्मय हें विविध विषयपर असतें, आणि त्यांतहि त्याचा फार मोठा अंश ललितस्वरूपाचा असतो. उलटपक्षीं आपल्याकडील गंभीर विषयाच्या मोठमोठ्या विद्वानांचा ( कांहीं सन्मान्य अपवाद वगळल्यास ) प्रचलित वाङ्मयाचा अद्यावत् व्यासंग नसतो, आणि ललित-वाङ्मयाचा तर त्यांना प्रायः कंटाळाच असतो ! बरें, हे विद्वान् अष्टपैलू नसले, तरी पण त्यांच्या विवक्षित क्षेत्रांतल्या सहनीय कामगिरीमुळें त्यांना वरीलसारख्या एखाद्या संमेलनाचें अध्यक्षत्व देणें आवश्यकच होते. आणि, तसें झालें म्हणजे त्यांजवर भाषण करण्याची पाळीहि येतेच, व त्या भाषणांत नेहमींच्या परिपाठाप्रमाणें चालू वाङ्मयाचा भलाबुरा परामर्ष हाहि सामान्यतः घ्यावाच लागतो. हा परामर्ष बहुधा उथळ स्वरूपाचा असतो, ही ओरड सर्वपरिचित आहेच.

आतां, हा अनर्थ टाळण्यासाठीं पुढीलपैकीं एखादा उपाय योजल्यावांचून गत्यंतर उरत नाहीं. ( १ ) एकतर, कोणत्याहि संमेलनाचें अध्यक्षपद एकांगीं विद्वानास न देतां अष्टपैलू विद्वानासच देण्याचा नियम करावा. ( २ ) किंवा, एकांगी विद्वान् निवडावयाचाच झाला, तर त्याला त्याच्या आवडीच्या विषयावर भाषण करण्याची तरी मुभा असावी; मग तो विषय भाषाशास्त्र, इतिहास, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, वगैरेपैकीं कोणताहि असो !

या दोन उपायांपैकीं पहिला उपाय अंमलांत आणणें इष्ट होणार नाहीं. रा० न. चिं. केळकरांसारखे अष्टपैलु विद्वान् प्रत्येक लहानमोठ्या संमेलनाला कसे उपलब्ध होणार ? शिवाय, ज्या गृहस्थांनीं उपरोक्त विषयांसारख्या किचकट विषयांत पराक्रम करून दाखविला आहे, त्यांचा कांहींतरी गौरव

हा करावयाला हवाच ना? आणि तो गौरव एखाद्या संमेलनाचें अध्यक्ष-स्थान देऊन करावयाचा नाहीं, तर दुसऱ्या कोणत्या मार्गानें करावयाचा? अर्थात् जोंपर्यंत महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या तोडीची भाषाशास्त्रादि विषयाचीं स्वतंत्र व मानाची वाटणारीं संमेलनें भरलीं जात नाहींत, तोंपर्यंत पहिला उपाय अंमलांत आणणें केव्हांहि न्याय्य होणार नाही. राहतां राहिला दुसरा उपाय. त्याला 'आपद्धर्म' म्हणून जनतेनें मान्यता द्यावयास पाहिजे. तरच तिला, एखाद-दुसऱ्याच गहन विषयावरील कां होईना, पण, अधिकारयुक्त विवेचन ऐकावयाला सांपडेल. कै. राजवाडे यांनीं एका ग्रंथसंग्रहालयाच्या वार्षिकोत्सवानिमित्त 'मराठी छंद' नांवाचा शास्त्रीय प्रबंध भाषणादाखल तयार केला होता, हें प्रसिद्धच आहे. याच प्रकाराची पुनरावृत्ति लहानमोठ्या साहित्यविषयक संमेलनांबाबतहि होण्यास काय हरकत आहे? आतां, असला शास्त्रीय पद्धतीचा प्रबंध श्रोतृवर्गानें पचविणें हें कांहींसें कठीण कर्म आहे, यांत शंका नाहीं. परंतु, दिवसेंदिवस श्रोतृवर्गानें आपली मनःसंस्कृति अधिकाधिक उच्च प्रतीची बनविण्याची वेळ आली नाहीं काय?

प्रचलित वाङ्मयाचा आढावाच केवळ न घेतां एखादा सर्वसाधारण स्वरूपाचा वाङ्मयविषयक प्रश्न घेऊनहि अध्यक्षीय भाषण सजवितां येणार नाही, असें नाहीं. परंतु हें कामहि वरवर वाटतें तितकें सोपें नाहीं, हेंसुद्धां तितकेंच खरें आहे. कारण, राजवाड्यांसारखी सर्वगामी कुशाग्र बुद्धिमत्ता असल्याखेरीज ऐन वेळीं अशा स्वरूपाचें हुकमी भाषण तरी कोण लिहून ठेवूं शकेल?

* * *

## १५० विचित्र स्त्री !

हॅरियट् विल्सन नामक एक विचित्र स्त्री कांहीं काळापूर्वी होऊन गेली. तिचा बाप एक स्विस् गृहस्थ असून आई इंग्रज होती. तिनें आपल्या यौवनांत अनेक बड्याबड्या धेंडांना स्वतःच्या जाळ्यांत अडकविलें होतें.

पुढें तारुण्याचा भर ओसरल्यावर द्रव्योपार्जनाचें साधन म्हणून तिनें एक अजब शक्कल काढिली ! ती ही कीं, जे लोक तिच्या कच्छपीं लागले होते, त्यांच्या त्या पापकृत्यांच्या आठवणी छापण्याचें तिनें ठरविलें ! त्यांतहि तिनें एक पोटयुक्ति अशी योजिली कीं, या भयंकर लोकापवादापासून सुटका करून घ्यावयाची असल्यास आपणास मोठमोठ्या रकमा मिळाल्या पाहिजे, अशी अनेकांकडे तिनें स्पष्ट मागणी केली ! झालें ! ज्यांना आपल्या अब्रूची विशेष चाड होती, त्यांनीं भराभर रकमा भरण्यास सुरवात केली ! इकडे संकल्पिल्याप्रमाणें हॅरियटनें आपल्या आठवणी क्रमशः बेधडक छापून टाकल्या ! त्या पुस्तकांचा केवढा दांडगा खप झाला असला पाहिजेत, याची कल्पनाच करावी. याप्रमाणें हॅरियट विल्सननें उभय मार्गांनीं अमूप द्रव्यलाभ करून घेतला ! !

हॅरियटच्या " Paris lions and London tigers " या पुस्तकाची नूतनावृत्ति नुकतीच निघाली आहे.

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक ११

## १५१ आत्मचरित्र

के. श्री. कृ. कोल्हटकर यांचें आत्मचरित्र गतवर्षी प्रसिद्ध झालें, त्या वेळेपासून अनेकांच्या मनांत आत्मचरित्रासंबंधीं तात्त्विक विचार उत्पन्न होऊं लागले आहेत, आणि ते कधीं खाजगी रीतीनें, तर कधीं जाहीर रीतीनें प्रगटहि होत असतात. त्यांतच अलीकडे पं. जवाहरलाल नेहरू यांनीं आपलें आत्मचरित्र उजेडांत आणल्यामुळें तर वरील क्रियेस तुफान भरतीच आल्यासारखी झाली आहे !

आत्मचरित्राविषयीं विचार उद्‌भूत होत असतांना एक प्रश्न विशेष प्रामुख्यानें समोर उभा राहतो. "आत्मचरित्र लिहिण्यास खरोखर पात्र व्यक्ति कोणती समजावयाची-" हाच तो प्रश्न होय. या प्रश्नांचीं अनेकविध उत्तरें देण्यांत येतात, त्यांतील कांहीं अशीं: (१) माणूस लहान असो अगर मोठा असो, त्यानें आत्मचरित्र लिहिण्याच्या फंदांत मुळीं पडूंच नये, असें म्हणून कुणी कुणी या प्रश्नाच्या मुळावरच घाव घालतात. (२) कित्येकांच्या मतें अतिशय महान् विभूति ज्या असतील, त्याच फक्त आत्मचरित्र लिहिण्यास पात्र असतात. (३) उलटपक्षीं, कांहीं जणांचा असा अभिप्राय पडतो कीं, इतरांस सांगण्याजोगे अनुभव ज्याला ज्याला आले असतील त्यानें त्यानें शक्य झाल्यास आत्मचरित्र लिहिण्याचा प्रयत्न जरूर करावा !—मग तो थोर असो अगर क्षुद्र असो ! आतां, या तिन्ही उत्तरांचा थोडक्यांत परामर्ष घेऊं.

(१) आत्मचरित्रलेखनास कित्येकांचा मूलतःच विरोध असतो, याचें प्रमुख कारण त्या लोकांची अहंकाराबद्दल विशिष्ट कल्पना असते, हें होय. या लोकांना स्वतःविषयीं लिहिणें अगर बोलणें बिलकुल रुचत नाहीं. अर्थात् त्यांना आत्मचरित्र लिहिणें म्हणजे काय अहंभावाचें उघडें—नागडें प्रदर्शनच करणें होय, असें वाटावें, यांत नवल तें कोणतें ? या वर्गांतील प्रामाणिक विरोधकांशीं अहंकार म्हणजे काय, त्याची व्याप्ति कुठवर मानावी, अहंकार

हा मुळांतच त्याज्य आहे काय, अहंकारावांचून मानवजातीचें कितपत चालूं शकेल–इ० इ० मुद्यांचा ऊहापोह केल्यास त्यांना आत्मचरित्र–लेखन हें वाटतें तितकें आक्षेपार्ह वाटणार नाहीं, अशी आशा बाळगण्यास जागा आहे.

परंतु, या वर्गातील बहुसंख्याक विरोधक फारसे ‘ प्रामाणिक ’ नसतात, असें नाइलाजानें म्हणावें लागतें. याचा अनुभव वाचकांसहि असेल. मागें ‘ काव्यरत्नावलीं ’त विद्यमान कवींचीं त्रुटित आत्मवृत्तें येत असत तीं पाहून एक साहित्यिक खूपच ‘ उखडले ’ होते ! तरी बरें कीं, त्यांच्या बोलण्यांत “ अमुक गृहस्थ मला गुरु मानतो, नि तमुक गृहस्थ माझें अनुकरण करतो !—” असे उद्गार प्रत्यहीं निघावयाचे ! ! अशांच्या आत्मचरित्र–लेखनाच्या विरोधाला काय किंमत द्यावयाची, हे सूज्ञांनींच ठरवावें !

आत्मचरित्राच्या विरोधकांतील कांहीं विरोधक तर यापेक्षांहि गमतीचे असतात. म. गांधी यांचे ‘ सत्याचे प्रयोग ’ वाचल्यानंतर एक कट्टे टिळकभक्त म्हणाले होतेः “ छे, छे ! या गांधीचें बुवा सारेंच विलक्षण ! आमच्या बळवंतराव टिळकांनीं कुठे आत्मचरित्र लिहिलें ? पण, हा गृहस्थ तें लिहून व छापूनहि मोकळा झाला !—” वगैरे. या उद्गारांचा सरळ अर्थ हा कीं, टिळकांनीं आत्मचरित्र लिहिलें असतें, तर या आक्षेपकाचा आत्मचरित्राला तत्त्वतः विरोध राहिला नसता; परंतु त्यांनीं तें लिहिलें नाहीं, म्हणूनच त्याला आत्मचरित्र हें सर्रास वावडें झालें ! !

( २ ) हें उत्तर ढोबळ रीतीनें पाहिल्यास बिनतोड वाटतें. परंतु, किंचित् विचार केल्यास एकदोन शंका उद्भवल्याखेरीज रहात नाहींत. कशा त्या पहाः फक्त ‘ **अतिशय महान् विभूतीं** ’नींच आत्मचरित्र लिहावें, असें म्हटलें म्हणजे दुय्यम दर्जाच्या विभूतींनीं त्या वाटेस जाऊं नये, असें म्हणणें ओघानेंच येतें. परंतु, हा ‘ मनाई–हुकूम ’ अमलांत आल्यास त्यामुळें फायद्यापेक्षां तोटाच ज्यास्त होणार, हें निःसंशय. कारण अतिशय महान् विभूतींच्या आत्मचरित्राइतकें कदाचित् नसलें, तथापि निदान बऱ्याच

मोठ्या प्रमाणांत, तरी दुय्यम दर्जाच्या विभूतींचें आत्मचरित्रहि उपयुक्त ठरणार नाहीं, असें विधान कसें करतां येईल ? किंबहुना प्रसंगोपात्त पूर्वोक्त आत्मचरित्रापेक्षां उत्तरोक्त आत्मचरित्रच अधिक प्रभावी ठरण्याचा संभव आहे ! अशा स्थितींत अतिशय महान् विभूतींखेरीज इतरांनीं आत्मचरित्रलेखनाच्या भानगडींत पडूंच नये, असा आग्रह धरणें कितपत समंजसपणाचें होईल ?

ही झाली पाहिली शंका. दुसरी शंका अशी कीं, ' अतिशय महान् विभूति ' हा शब्दप्रयोग सर्वसंमत होईल, अशा रीतीनें कुणाला लावतां येईल ? ' कृतिप्रधान ' विभूतींखेरीज इतरांस ही संज्ञा लावूं नये, अशी पुष्कळांची समजूत असते; आणि, अशा कृतिप्रधान विभूतींनीच आत्मचरित्र लिहावें, असाहि त्यांचा कटाक्ष असतो. म्हणजे, मोठमोठे राजकारणी, योद्धे, समाजसेवक प्रभृति लोकच ' अतिशय महान् विभूति ' या पदवीस पात्र ठरले, व आत्मचरित्र लिहावयाचें, तर तें त्यांनींच लिहिलेलें शोभेल, असाहि पण निष्कर्ष निघाला ! उलटपक्षीं, मोठमोठे तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ, साहित्यसेवक कलावंतप्रभृति लोक कृतिप्रधान विभूतींच्या तोलाचे ठरत नाहींत, आणि म्हणून आत्मचरित्रलेखनास ते नालायक आहेत, असें प्रतिपादन करण्याची पाळी आली ! परंतु, व्यापकदृष्टीनें विचार केल्यास हें मत मान्य होणें शक्य नाहीं. विशिष्ट क्षेत्रांत कार्य करणारी तीच महान् विभूति होय, असें म्हणणें म्हणजे संकुचितपणाची पराकाष्ठाच करण्यासारखें आहे. ' महान् विभूति ' या शब्दप्रयोगाची व्याप्ति वरीलप्रमाणें मर्यादित न मानतां कार्लाइलसारखी व्यापकच मानली पाहिजे.

तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ, साहित्यसेवक, कलावंत-वगैरेचें आत्मचरित्र सर्वसामान्य जनतेस कदाचित् स्फूर्तिदायक अथवा उपयुक्त न वाटलें, तरी त्या त्या क्षेत्रांतील कार्यकर्त्यास तें तसें वाटणारच नाहीं, असें म्हणणें वस्तुस्थितीस धरून होणार नाहीं. त्यांजकडून इतपत कामगिरी घडली, तरी त्यांचें चीज झाल्यासारखें होईल.

( ३ ) प्रस्तुत उत्तर कांहींसे अतिव्याप्त आहे, असें म्हणतां येईल. कारण, एखाद–दुसरा अपवाद वगळल्यास क्षुद्र व्यक्तींनीं आत्मचरित्र

लिहिण्यापासून त्यांचें स्वतःचें व इतरांचेंहि विशेष कल्याण होण्याचा संभव दिसत नाहीं. अर्थात् त्यांनीं हा खटाटोप व्यर्थ कशाला करावा? वर उल्लेखिलेल्यापैकीं एखाद्या तरी क्षेत्रांत ज्यांनीं जगाच्या डोळ्यांत भरण्याइतका पराक्रम केला असेल; तेच आत्मचरित्र–लेखनास अधिकारी समजावे.

येथपर्यंतच्या विवेचनाचें थोडक्यांत सार असें: **ज्या व्यक्तीनें एखाद्या विषयांत विक्रम गाजविला असेल, आणि जिला आपला वृत्तांत स्फूर्तिप्रद किंवा निदान या ना त्या दृष्टीनें उपयुक्त होईल, असें यथार्थत्वानें वाटत असेल तिनेंच आत्मचरित्र लिहावें. मग ती व्यक्ति 'अतिशय महान् विभूति' असो, अगर अशा विभूतीच्या कमीअधिक खालच्या श्रेणींतील असो.**

आत्मचरित्राची स्फूर्तिदायकता अथवा उपयुक्तता हा गुण वर ओघाने निर्देशिण्यांत आला आहे. या गुणाव्यतिरिक्त त्यांत आणखी एक गुण प्रकर्षानें उतरावा लागतो, तो प्रांजळपणा हा होय. हा गुण नसलेलें आत्मचरित्र बाकीच्या कितीहि गुणांनीं नटलेलें असलें, तरी तें हिणकसच मानावें लागेल! गांधीजींचे 'सत्याचे प्रयोग' हें आत्मचरित्र इतक्या महत्त्वास चढलें, तें प्रामुख्यानें याच गुणामुळें, हें सर्वत्रांस विदित आहेच. मराठी भाषेंत नाना फडणिसाचें आत्मचरित्र हें प्रांजलपणाच्या बाबतींत असेंच अद्वितीय आहे. त्यांतील एक अवतरण मुद्दाम उद्धृत करतों. त्यावरून मराठीला भूषणभूत असलेलें हें एका थोर मुत्सद्याचें आत्मचरित्र प्रांजळपणांत गांधीजींच्या 'सत्याच्या प्रयोगा'शीं कसा मुकाबला करतें, हें स्पष्ट होईल. "पुढें अक्रा–बारा वर्षांनंतर कामाविर्भाव शरीरीं होऊं लागला. तेणेंकरून व असत्समागम किंचित् झाला तेणेंकरून पापप्रवृत्ति होऊं लागली...... पुढें पंधरावे वर्षी पित्याचा (जनार्दन बल्लाळ भानु याचा) काळ झाला. त्याचें और्ध्वदेहिक ईश्वरें करविलें. त्यांत पापदृष्टि एक समयीं जहाली. हा अपराध झाला......परंतु पापबुद्धि निःशेष सुटेना. तेव्हां चित्तांत विचार केला कीं, पितामह (बाळाजी महादेव भानु) यांची बुद्धि धर्मशील असतां व सत्यवचनी, एकनिष्ठ, देवब्राह्मणांचे ठायीं परमभक्ति, सात्त्विक

आणि निषिद्ध कर्म करणेंच नाहीं—असें असतां माझें चित्त पापाकडे थोडेंसें कां जातें? याचा विचार करितां मातामह—पक्ष ( मेहेंदळे घराणें ) अति व्यभिचारी, तो संस्कार आहे. बुद्धीचा निश्चय करावा, तत्रापि स्थिरता राहूं नये. तेव्हां बलवत्तर." ( काव्येतिहास—संग्रह, लेखांक १९२, द्वितीयावृत्ति. )

*　　　*　　　*

## १५२ जी. के. चेस्टर्टन

इंग्लंडांतील विख्यात साहित्यसेवक जी. के. चेस्टर्टन हा १४ जून रोजीं दिवंगत झाल्याचें वाचकांस वृत्तपत्रांवरून पूर्वींच ठाऊक झालें असलें पाहिजे. इंग्रजी वाङ्मयांत चेस्टर्टनचें स्थान कोणतें, हें निश्चितपणें आजच सांगतां येणें शक्य नाहीं, तें काम पुढें काळच करील. तथापि, सध्यांच्या घटकेला त्याच्या साहित्याचें स्थूलमानानें मोल काय भरतें, हें थोडक्यांत सांगावयास प्रत्यवाय दिसत नाहीं.

चेस्टर्टनची वाङ्मयनिर्मिति जितकी विपुल तितकी चौरसहि आहे. त्याच्या प्रतिभेला अगम्य असें कांहींच नव्हतें. कादंबऱ्या, लघुकथा, कविता, चरित्रें, निबंध—इ० अनेक प्रांतांत त्याच्या प्रतिभेनें स्वैरसंचार केला आहे. तसेच, त्याच्या अभिरुचीचे व अध्यायनाचे विषयहि बहुविध होते. वाङ्मय, तत्त्वज्ञान, राजकारण, समाजकारण, अर्थशास्त्र वगैरे वगैरे कितीतरी विषयांवर त्याची लेखणी अविरत झिजली आहे. पृथगात्म भाषाशैली, मार्मिक विनोद, विरोधाभास व एक प्रकारचा जिवंतपणा हे गुण त्याच्या लेखनाचे आत्मीय गुण होते. या गुणांमुळेंच त्याचीं मतें न पटूनहि वाचकवर्ग त्याच्या वाङ्मयावर नेहमीं बेहद्द खूष असे!

चेस्टर्टनच्या लिखाणांतील कांहीं कविता, टीकात्मक प्रबंध व गुप्त पोलिसांच्या लघुकथा यांना इंग्रजी साहित्यांत कायमचें स्थळ मिळेल, असें वाटतें. 'The Ballad of the White Horse' ( काव्य ), 'The Victorian Age in Literature' ( टीका ), 'Charles Dickens', आणि कित्येक गुप्तपोलिसांच्या लघुकथा व बरेचसे निबंध हीं इंग्रजी वाङ्मयाचीं

शोभादायक भूषणेंच होत, असें रुचिपरत्वें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि यांतहि प्रतवारी ठरवावयाची तर, कवि किंवा लघुकथालेखक यापेक्षांहि टीकाकार या नात्यानेंच चेस्टर्टनचें नांव इंग्रजी साहित्यांत अधिक टिकेल, असें विधान करण्याकडे मनाचा कल झुकतो.

गुणांप्रमाणेंच चेस्टर्टनच्या लेखनांत अनेक दोषहि आढळतात. त्याचा ठळक दोष त्याचें 'पुराणमतवादित्व' हा होय. या दोषानें त्याच्या वाङ्मयाचा फार मोठा भाग डागळलेला आहे. त्याचप्रमाणें त्याची बहु-लेखनाची अनावर हौसहि दोषरूपच गणली पाहिजे. या हौसेमुळें त्याच्या साहित्यभांडारांत कांचनाबरोबरच कश्मलहि जमा झाले! विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, नियतकालिकांत विखुरलेल्या आपल्या प्रबंधादिकांचे संग्रह काढतांना चेस्टर्टन निवडानिवडीच्या फंदांतच पडत नसे! यामुळे त्याच्या अशा संग्रहांतील निकृष्ट मजकूर उत्कृष्ट मजकुराच्या मांडीशीं मांडी लावून बसलेला पुष्कळ वेळां दृष्टोत्पत्तीस येतो.

१९३२ सालचें नोबेल प्राईज गॉलस्वर्दी किंवा चेस्टर्टन यांपैकीं एकाला मिळेल, असा कांहीं जणांनीं आगाऊ कयास केला होता. पुढें तो मान गॉलस्वर्दीच्या वांट्याला गेला, ही गोष्ट वेगळी! परंतु या कयासावरूनहि चेस्टर्टनची विलक्षण लोकप्रियताच अनुभवास येते!

* * *

## १५३ मॅक्झिम गॉर्की

जी. के. चेस्टर्टन निधन पावल्याच्या बरोबर चवथ्या दिवशीं म्हणजे १८ जून रोजीं साहित्याकाशांतील एक अत्यंत देदीप्यमान तारा निखळून पडला! हा तारा दुसरा तिसरा कुणी नसून रशियाचा साहित्यसम्राट् व जगांतील एक सर्वश्रेष्ठ कादंबरीकार मॅक्झिम गॉर्की हाच होय!

मॅक्झिम गॉर्की याचें खरें नांव अलेक्झे मॅक्झिमोविच पेशकॉव्ह हें असून त्याचा जन्म ४ मार्च १८६८ रोजीं झाला. आईबाप लहानपणींच निवर्तल्यामुळें गॉर्कीला सारें बाल्य व यौवनहि अत्यंत हालअपेष्टेंत व्यतीत करावें लागलें! त्यानें पोटासाठीं चांभाराचा, जहाजावरील स्वयंपाक्याचा

इ. अनेक हलके धंदे केले ! अखेर, तो एका बॅरिस्टरचा सेक्रेटरी झाला, तेव्हां कुठें त्याला अल्पस्वल्प स्वास्थ्य प्राप्त झालें, व या वेळेपासून त्याला चिरवांछित साहित्यसेवेकडे लक्ष द्यावयास फुरसत होऊं लागली ! तथापि एवढ्यानें त्याच्या मागचा वनवास सुटला नाहीं, व सुटणें शक्यहि नव्हते. कारण, १८९९ पासूनच तो राजकारणांत भाग घेऊं लागला होता, आणि पुढें तर त्यानें उघडउघड क्रांतींत भाग घेतला, यामुळें देशत्याग, अज्ञातवास वगैरे अग्निदिव्यांतून त्याला अनेकवार पार पडावें लागलें !

याप्रमाणें गॉर्कीचा सर्व जन्म त्रासांतच गेला ! म्हणूनच कीं काय, त्यानें 'गॉर्की' हें टोपणनांव धारण केलें ! ( Gorki=कटु ) तशांत गॉर्कीची प्रकृतीहि फारशी कधींच चांगली नव्हती. तो प्रायः आजारीच असे. पूर्वी एकदां जिवाला कंटाळून त्यानें आत्महत्येचाहि प्रयत्न केला होता ! त्यावेळीं त्यानें जी गोळी अंगांत उडवून घेतली होती, ती आंतमध्यें तशीच राहून तिनें त्याला पुढें पुष्कळच दुःख दिलें ! तात्पर्य, गॉर्की हा एक अत्यंत दुर्दैवी पुरुष होता, यांत शंका नाहीं !

गॉर्कीचें जीवन इतकें कष्टाचें असूनहि त्यानें केलेली पहिल्या प्रतीची वाङ्मयनिर्मिति पाहिली, म्हणजे कुणासहि अचंबाच वाटेल ! बरें, निव्वळ साहित्यसेवेखेरीज गॉर्की इतर कोणतेंच कार्य करीत नव्हता, असेंहि नाही. त्याचेच पुढील उद्गार पहा; " Personally I never felt myself and and do not feel myself now an exclusively literary man. I was all my life busy in one or other field of social activity and up to this day I have not lost my bent for that. " या प्रकारामुळें तर त्याच्या चपळ पण रसाळ लेखणीचें विशेषच कौतुक वाटूं लागतें !

गॉर्कीनें वाङ्मयप्रांतांत पदार्पण केलें, त्यावेळीं डोस्टोव्हिस्कीची रशियावर पुष्कळच छाप होती. आणि, यापेक्षांहि महत्त्वाची गोष्ट ही कीं टॉलस्टॉय, चेकॉव्ह व कोरोलेन्को यांच्यासारखे साहित्यदिग्गज त्यावेळीं विद्यमान होते. खुद्द गॉर्की, टॉलस्टॉय व चेकॉव्ह यांच्या लिखाणाकडे आदर्श म्हणूनच पहात असे. अशी परिस्थिति असतांनासुद्धां गॉर्कीनें आपल्या प्रतिभादीप्तीनें

जनतेचीं मनें इतकीं आकृष्ट केलीं कीं, कथालेखक या नात्यानें त्याचा लौकरच टॉलस्टॉयच्च्या खालोखाल उल्लेख होऊं लागला ! हें एकच उदाहरण गॉर्कीची योग्यता पटवून देण्यास पुरेसें आहे.

गॉर्कीच्या ग्रंथांपैकीं ' Mother ' या कादंबरीचा आपल्याकडे सर्वांत जास्त प्रचार आहे. आणि ही कादंबरी आहेहि तशीच सुलक्षणी. अद्‌भुतरम्य कथानक, ' आई, ' पॅव्हेल, छोटा रशियन—प्रभृतींचें वेधक व्यक्तिदर्शन, चित्रपटासारखी डोळ्यांपुढें प्रसंग हुबेहुब उभा करणारी वर्णनशैली, उत्तुंग ध्येयवाद, उपमादिकांच्या बाबतींतील औचित्य व संयम वगैरे वगैरे या कादंबरीचे सारेच विशेष निर्देश करण्याजोगे आहेत. तिच्यांतील पात्रांच्या तोंडीं लेखकानें विशिष्ट मत प्रतिपादन करणारीं भाषणें मधून मधून पेरलीं आहेत. परंतु, त्यामुळें कुठेंहि रसभंग होत नाहीं. उलटपक्षीं कांहीं कांहीं ठिकाणचीं भाषणें तर सर्वस्वीं प्रतिभाप्रेरित वाटतात, उदाहरणार्थ, ' छोट्या रशियन ' च्या तोंडचें " All people are sick, they are afraid to live; they wander about as in the mist. " या वाक्यानें आरंभ होणारें भाषण वाचावें, म्हणजे वरील विधानाची सत्यता पटेल.

' Mother ' खेरीज गॉर्कीनें आणखी कितीतरी कादंबऱ्या लिहिल्या आहेत. क्रांतीच्या काळांत रचिल्या गेलेल्या त्याच्या ' The Artamonov Business ' व ' Life of Klim Somgin ' या कादंबऱ्यांची रशियांतील विद्वानांनीं मुक्तकंठानें तारीफ केलेली आहे. गॉर्कीनें कादंबऱ्यांशिवाय अनेक लघुकथाहि लिहिल्या आहेत. त्याच्या लघुकथांचा इंग्रजींतील ' Through Russia ' हा संग्रह प्रसिद्धच आहे.

गॉर्कीच्या कथावाङ्मयाप्रमाणें त्याचें नाट्यवाङ्मयहि रशियांत लोकप्रिय आहे. त्यानें विसांहून अधिक नाटकें लिहिलीं असून रशियांत त्यांचे रंगभूमीवर यशस्वी प्रयोग होत असतात.

याखेरीज आत्मचरित्र, निबंध इ. बरीच निर्मिति गॉर्कीनें केली आहे. त्याचे निबंध देखील प्रभावशाली ठरले आहेत. व्ही. मायकोव्हिस्की नामक कवीच्या नेतृत्वाखालीं रशियांत एक विचित्र चळवळ उत्पन्न झाली होती !

कादंबऱ्या, लघुकथा हे वाङ्मयप्रकार टॉलस्टॉय, टूर्जेनेव्ह–यांसारखे सरदार लोक व बाल्झॅकसारखे 'बुर्झ्वा' यांनाच सोयीस्कर असून कामगारांच्या रशियाला त्यांची गरज नाहीं–रशियाला फक्त निबंध हाच एकमेव वाङ्मय-प्रकार हवा आहे अशी उपरोक्त साहित्यिक हांकाटी करूं लागले होते! ही हांकाटी कशी आत्मघातकी आहे, हें सिद्ध करण्यासाठीं गॉर्कीनें सणसणीत लेख लिहिले; आणि त्यांचा अपेक्षिल्याप्रमाणें फार परिणामहि झाला!

या प्रत्यक्ष लेखनकार्याशिवाय गॉर्कीनें आणखी कितीतरी साहित्यविषयक हालचाली केल्या. नवोदित लेखकांस विशिष्ट हेतूनें विशिष्ट कार्यासाठीं उत्तेजन देणें यांत गॉर्कीचा हातखंडा होता. कित्येक लेखकांस तर त्यानें जणुं काय हात धरूनच लेखनकला शिकविली! तसेंच, अनेक मोठमोठ्या ग्रंथांचें संपादन करणें, करविणें, नियतकालिकें चालविणें–वगैरे शेंकडों घडामोडी गॉर्की करीत असे!

असा हा महान् साहित्यिक दिवंगत झाला ही रशियाचीच नव्हे, तर सर्व जगाचीच फार मोठी हानि झाली आहे! राजकीय परिस्थितीमुळेंच बहुधा गॉर्कीला नोबेल प्राईज मिळण्याचा योग आला नाहीं! तथापि, म्हणून गॉर्कीच्या श्रेष्ठतेंत उणेपणा येतो, असा बिलकुल प्रकार नाहीं! जगांतील प्रथम श्रेणीमधल्या साहित्यिकांत गॉर्कीची सदैव गणना झाल्याखेरीज कदापि राहणार नाही, असें निदान त्याच्या बाबतींत तरी खात्रीनें आजच म्हणतां येतें.

* * *

## १५४ शारदाबाईचा तडाखा!

'समाजस्वास्थ्य' मासिकाच्या जून १९३६ च्या अंकांत आमच्या बुरखामंडळाच्या सदस्या श्रीमती 'शारदाबाई' यांचें नेहमींप्रमाणें एक पत्र प्रसिद्ध झालें आहे. त्यांतील अवतरण वाचकांची करमणूक करील अशी आशा आहेः—

"अगडबंब साहित्यिक समजलेले लोक विनाकारण आपल्या अज्ञानाचें प्रदर्शन कां करीत असतात, हें समजणें जरा कठीण आहे. 'ज्योत्स्ना' म्हणून जें नवीन मासिक निघालें आहे त्यावर वि. स. खांडेकरांचें नांव

संपादक म्हणून आहे, आणि त्यांत त्यांचा जुना लेख छापला आहे. त्यांत ते म्हणतात, 'आयोडीन कुणाला माहीत नाहीं? औषध टोंचायच्या आधीं कातडी बधिर करण्याकरतां डॉक्टर त्याचा उपयोग नित्य करतात.' हा अजब शोध खांडेकरांनीं १९३३ सालीं हा लेख लिहितांना लावला होता. पण मला तो आत्तांच पहायला मिळाला! कातडी बधिर करण्याकरतां आयोडीन लावीत नाहींत, कातडीवरील जंतूंचा नाश करण्याकरतां लावतात हें खांडेकरांसारख्या लेखकाला माहीत असूं नये? आणि तेच विचारतात, 'आयोडीन कुणाला माहीत नाहीं?' खांडेकरांना माहीत नाहीं, असेंच याचें उत्तर द्यावें लागेल. खांडेकरांचें सर्वस्व म्हणजे उपमा—चार दोन उपमा घातल्या कीं, लेख सजला. मग त्यांत अर्थ काय आहे, हें पाहण्याचें कारण नाहीं!

याच मासिकाच्या संपादकमंडळांत माडखोलकरांचेंहि नांव आहे. त्यांनी आनुवंशिकतेचें नांव कोठेंतरी ऐकलें होतें. तेव्हां तें शास्त्र आपल्याला अवगत आहे अशी त्यांची कल्पना झाली! त्यांचा लेख ('बडे बाप आणि त्यांचे (?) बेटे') 'प्रतिभे'त पुनः दिला होता, तो मीं वाचला. त्यावरून असें दिसतें कीं, बापाचे गुण मुलांत असोत, किंवा त्याचे उलट गुण असोत दोहोंचेंहि कारण आनुवंशिकता हेंच असलें पाहिजे. मुलांत जर बापाचे गुण दिसले, तर ते आनुवंशिकतेनें आले असें कोणीहि कदाचित् म्हणेल. पण उलट गुण दिसल्यास या विद्वानांच्या मतें बापानें दाबून टाकलेले गुण मुलांत उतरले, असें समजलें पाहिजे!! म्हणजे एकंदरींत आनुवंशिकतेनें कधीं समान गुण मुलांत येतात, कधीं उलट गुण येतात!!! आहे कीं नाहीं शास्त्रीय ज्ञान? या शास्त्रीय युगांत असल्या निष्काळजी लिखाणानें ते हास्यास्पद मात्र होतात, हें त्यांना कधीं समजेल तें समजो!"

—**प्रतिभा,** वर्ष ४, अंक १२

## १५५ 'बालकवि'

'बालकवि' ठोमरे यांजविषयीं एक पुस्तक लौकरच प्रसिद्ध होणार असल्याचें मी एवढ्यांत कुठें तरी वाचलें. त्यावरून बाल्यदशेंत काव्यरचना केलेल्या इतरहि अनेक साहित्यिकांसंबंधींचा विचार माझ्या मनांत उद्‌भूत झाला. अशा दोन 'बालकवीं'बद्दल आंग्लकवि वॉल्टर डि ला मेअर यांनीं एके ठिकाणीं ग्रथित केलेल्या माहितीच्या आधारें पुढील चार ओळी लिहिल्या आहेतः—

प्रख्यात कवि व चित्रकार डांटे ग्रॅब्रियल रोझेटी हा अशक्य वाटेल इतक्या लहान वयांत कविता लिहीत असे व चित्रेंहि काढीत असे ! केवळ पांच वर्षांचा असतां त्यानें 'Tha Slave' नांवाचें नाटक 'Blank Verse' छंदांत लिहिलें ! हें नाट्यकाव्य शुद्धलेखन—व छंद या दोनहि दृष्टींनीं बिनचूक होतें असें सांगतात; हें महादाश्चर्यच नव्हे काय? त्याच्या चित्रकलेबद्दल अशाच अद्‌भुत आख्यायिका प्रचलित आहेत. काव्यकला व चित्रकला या दोहोंवरहि रोझेटीनें पुढील आयुष्यांत केवढी हुकमत संपादन केली होती, हें बहुश्रुत वाचकांस मुद्दाम सांगावयास नकोच. रोझेटीच्या या कौशल्याचें वॉल्टर डि ला मेअर यांनीं "...His pictures become literary, his poems pictorial" अशा सुंदर शब्दांत वर्णन केलें आहे.

'छोटा बुलबुल' अलेक्झँडर पोप यानें आपण आठवत नाहीं इतक्या लहान वयापासून कविता करीत होतों, असा स्वतःच कबुलीजबाब दिलेला आहे व तो खोटा मानण्याचें कारणहि नाहीं. त्यानें बाराव्या वर्षी 'इलियड' काव्याच्या भाषांतराच्या आधारें एक नाटक लिहिलें होतें व त्याचा त्याच्या शाळा—सोबत्यांनीं एका बगिच्यामध्यें प्रयोग केला होता ! त्या प्रयोगांत, सदर बागेचा कुणीं डीन नांवाचा रक्षक होता, त्यानें ॲजॅक्सची भूमिका केली होती ! पोपनें जवळपास याच सुमारास 'Ode to Solitude' ही अत्युत्तम कविता लिहिली. तिच्यांतील अखेरच्या कडव्यामधली शब्दरचना

इतकी मृदुमधुर आहे कीं, ती हेरिक कवीलासुद्धां साधली नसती, असा वॉल्टर डि ला मेअर यांनीं अभिप्राय व्यक्त केला आहे. तें कडवें असें:—

Thus let me live unseen, unknown
Thus unlamented let me die;
Steal from the world, and not a stone
To tell where I lie!

याखेरीज थॉमस हार्डी, वर्डस्वर्थप्रभृतींचींहि वॉल्टर डिला मेअर यांनीं उदाहरणें दिलीं आहेत.

* * *

## १५६ कलावंताचें आत्मचरित्र !

‘ प्रतिभे ’च्या मागील अंगांत आत्मचरित्रासंबंधीं एक स्फुट आलेलें आहे. त्यावरून एक वाचक पत्रद्वारें विचारतात. “ कलावंतांनीं देखील आत्मचरित्र लिहावें, असें ‘ रामशास्त्री ’ लिहितात. पण, आम्हां गरिबांना त्यांचें आत्मचरित्र कशाची स्फूर्ति देणार ? जेथें दोनदां खाण्याची पंचाईत पडते, तेथें कलावंतांच्या कलाकुशलतेला कोण विचारतो व त्यांच्या आत्मचरित्राचाहि काय उपयोग ?”—इ.

प्रथम हें ध्यानांत घ्यावयास पाहिजे कीं, कुणाला कशापासून स्फूर्ति मिळेल, याचा कांहींहि नियम नसतो. या बाबतींत एका महाप्रतापी यवन सम्राटाची हकीकत नमूद करण्यासारखी आहे. हा सम्राट् वैभवास चढण्यापूर्वी युद्धांत त्याचा पराभव झाला होता. पराभवामुळें त्याला पळून जावें लागलें, व पळतां पळतां विश्रांतीसाठीं तो एका ओसाड इमारतीच्या आश्रयास गेला. या इमारतींत असतां त्याला एक मुंगी कसला तरी अन्नाचा कण तोंडांत धरून भिंतीवर चढतांना दिसली. ती मुंगी कांहींशी वर चढते न चढते, तोंच तोंडांतील कणामुळें ती खालीं येऊन कोसळली ! या प्रकाराची कितीदां तरी पुनरावृत्ति झाली ! तथापि, त्या मुंगीनें प्रयत्न म्हणून सोडला नाहीं; आणि, अखेर ती चिकाटीमुळें भिंतीवर चढलीच ! हें दृश्य पाहून त्या पराभूत राजाच्या मनांत एकदम

नवचैतन्य उत्पन्न झालें व त्यानें पुनः लढाई करून शत्रूचा पुरा बींमोड केला ! ! तात्पर्य, संस्कारक्षम अंतःकरण असल्यास मुंगीसारखा क्षुद्र जीवहि रावापासून रंकापर्यंत स्फूर्तिदायक होऊं शकतो. मग कलावंत हीं तर माणसेंच आहेत !

अर्थात् आत्मचरित्र लिहिलेल्या झाडून साऱ्या कलावंतांची ती कृति सर्वसामान्य जनतेस स्फूर्तिप्रद होईल, असें मला म्हणावयाचें नाहीं. कित्येक कलावंतांचीं आत्मचरित्रें फक्त त्या त्या क्षेत्रांत वावरणाऱ्या लोकांनाच स्फूर्तिदायक होण्याचा संभव आहे, व हा मुद्दा गेल्या अंकांत मीं ओझरता मांडलाहि आहे. परंतु, कित्येक कलावंतांचीं आत्मचरित्रें कांहीं बाबतींत तरी सर्वसामान्य जनतेला देखील स्फूर्तिदायक होऊं शकतील, हें खास; आणि यासाठींच कलावंतांचीं आत्मचरित्रें हीं तुम्हां–आम्हांस येथून–तेथून सरसकट त्याज्य होत, असें म्हणणाऱ्यांस माझा तीव्र विरोध आहे. कलावंतांचे ध्येयविषय हे वेगळे असतील; पण, ते ध्येयविषय प्राप्त करून घेतांना त्यांना थोडी तरी तडफड–धडपड ही करावी लागलीच असेल ! सर्वच कलावंत तडफड–धडपड न करावी लागण्याइतके भाग्यवान् कुठून असणार ? अशा तडफड–धडपडींतच सर्वसामान्य जनतेला स्फूर्तिनिधान सांपडणार आहे !

उदाहरणादाखल पिआनो उत्कृष्ट वाजविणाऱ्या मिस मॅथिल्ड व्हर्ने या संगीतज्ञेचें ' Chords of Remembrance ' हें आत्मचरित्र घ्या. मिस व्हर्ने हिनें पुढील आयुष्यांत लक्ष्मी व कीर्ति यांचा अमूप लाभ करून घेतला, हें कबूल; पण तिचे आरंभींचे दिवस अतिशय कष्टांत गेले, ही वस्तुस्थिति नाहींशी कशी होईल ? एकदां अमेरिकेंत आपली बहीण ॲलिस हिजसह असतांना मिस व्हर्ने हिजवर पोट जाळण्यासाठीं साध्या पाव–लोण्याची चोरी करण्याचे प्रसंग आले होते ! असें खडतर जीवन असूनहि व्हर्नेनें पुढें नांवलौकिक कमविला, ही गोष्ट तिला जितकी भूषणावह आहे, तितकीच इतरांना स्फूर्तिदायकहि नाहीं काय ?

* * *

## १५७ चरित्रनायक व चरित्रलेखक

'अर्वाचीन मराठी साहित्य' या ग्रंथामध्यें प्रो. श्री. ना. बनहट्टी यांचा 'चरित्रवाङ्मय' या नांवाचा वाचनीय लेख छापण्यांत आला आहे. या लेखांत चरित्रग्रंथ चांगला उतरण्यास लेखकामध्यें कोणते गुण असले पाहिजेत, याबद्दलहि प्रसंगानुरोधानें उल्लेख आलेले आहेत. अशा गुणांत प्रो. बनहट्टी हे वृत्तिसाम्याला बरेंच महत्त्व देतात, व तें वाजवीहि आहे. चरित्रनायक व चरित्रलेखक यांच्यांत वृत्तिसाम्य नसून वृत्तिभिन्नता असेल, तर चरित्रलेखकाला चरित्रनायकाशीं तितकेसें समरस होतां येणार नाहीं, व त्याच्या लिखाणाला यावा तेवढा रंगहि येणार नाहीं. रा. न. चिं. केळकर यांचें टिळक-चरित्र व प्रो. न. र. फाटक यांचें रानडे-चरित्र हे ग्रंथ वाचकांच्या अपेक्षेप्रमाणें वठले नाहींत, याला ज्या उणिवा कारणीभूत झाल्या, त्यांत वृत्तिभिन्नतेचा प्रो. बनहट्टी ठळकपणानें समावेश करतात. त्यांची पुढील अवतरणें पहा—

( १ ) "...चरित्रनायक ( कै. टिळक ) आणि चरित्रलेखक ( रा. केळकर ) यांच्या वृत्तींमध्यें स्वभावतः बराच फरक आहे. टिळकांसारख्या वैशिष्ट्यपूर्ण अलौकिक व्यक्तीला त्यांच्यासारख्या वृत्तीचा चरित्रकार मिळाला असता, तर 'समसमां संयोग कीं जाहला' असा प्रकार होऊन दुधांत साखर पडली असती. आतां, टिळक आणि केळकर यांच्या मनोवृत्ति परस्पर कशा भिन्न आहेत, हें येथें विस्तरशः सांगण्याचें कांहीं कारण नाहीं...तिजमुळेंच दुर्दांत, मानोन्नत आणि धैर्यमेरु अशा टिळकांचें व्यक्तित्व या प्रचंड चरित्रांतहि नीटपणें रेखाटलें गेलें नाहीं, असें म्हणावेंसें वाटतें.—पा. २९३-२९४.

( २ ) "याशिवाय वृत्तिभिन्नता, जी टिळक-चरित्राच्या बाबतींत दाखविण्यांत आली, ती तर येथें ( प्रो. फाटक यांच्या रानडे-चरित्रांत ) फारच मोठ्या प्रमाणांत दिसून येते. रानड्यांसारख्या धार्मिकवृत्तीच्या, धीरगंभीर व उदारमनस्क पुरुषास तशाच वृत्तीचा चरित्रकार मिळावयास हवा होता." पा. २९५

रा. केळकर यांचें टिळक-चरित्र वाङ्मयदृष्ट्याहि निराशाजनक असल्याचें विख्यातच आहे ! याला लेखनाची मनस्वी घाई व एक प्रकारचा निष्काळजीपणा हेच दोष कारणीभूत झालेले आहेत. टिळक-चरित्राविषयीं "या ग्रंथाच्या तीन खंडांनीं केळकरांची कीर्ति त्रिखंडांत पसरली !—" असे उद्गार क्वचित् काढण्यांत येतात. पण, या उद्गारांच्या मुळाशीं सदर ग्रंथाबद्दल चिकित्सापूर्वक बनविलेलें प्रांजल मत आहे, कीं केवळ 'खंड' शब्दावर कोटि करण्याचा दुर्निवार मोह आहे, हें सांगतां येणें मात्र कठिण आहे !

वरील अवतरणांतील दुसऱ्या अवतरणांत प्रो. बनहट्टी यांनीं "रानड्यां सारख्या धार्मिकवृत्तीच्या धीरगंभीर व उदारमनस्क पुरुषास तशाच वृत्तीचा चरित्रकार मिळावयास हवा होता—" असें म्हणून प्रो. फाटक हे धार्मिक वृत्तीचे, धीरगंभीर व उदारमनस्क नसल्याचें पर्यायानें ध्वनित केलें आहे. प्रो. फाटक यांच्याविषयीं मला कांहींच माहिती नसल्यानें प्रो. बनहट्टी यांच्या या ध्वनितार्थाबद्दल बरेंवाईट कांहीच लिहितां येत नाहीं; तरीपण प्रो. फाटक हे धार्मिकवृत्तीचे नसल्याचें प्रो. बनहट्टी जें सुचवितात, त्याला त्यांची रामदासावरील लेखमाला कारण झाली असेल काय, अशी मला शंका येते व ती मी येथें निर्दिष्ट करूं इच्छितो.

वृत्तिसाम्यामुळें चरित्रग्रंथ खुमासदार उतरतो, याचें उत्तम उदाहरण म्हणजे विष्णुशास्त्री चिपळुणकरांचें जॉन्सनचें चरित्र हें होय. जॉन्सन हा चरित्रनायक व चिपळुणकर हे चरित्र-लेखक यांच्यांत वृत्तिसाम्य कसें होतें, याची चिपळुणकरांवरील आपल्या निबंधांत रा. माडखोलकर यांनीं मार्मिक मीमांसा केली आहे.

*   *   *

## १५८ संमेलनाध्यक्षाच्या भाषणाबाबत पुरावा

'प्रतिभे'च्या १ जूनच्या अंकांतील 'संमेलनाध्यक्षाचें भाषण कसें असावें' हें माझें स्फुट वाचकांस आठवत असेलच. त्या स्फुटांत मी असें

प्रतिपादन केलें होतें कीं, साहित्य विषयक मजलशीच्या अध्यक्षाला त्याच्या आवडीच्या विषयावर भाषण करण्यास मुभा असावी; मग तो विषय भाषाशास्त्र, इतिहास, तत्त्वज्ञान–वगैरेपैकीं कोणताहि असो ! त्या अध्यक्षाने प्रचलित वाङ्मयाचें भलेंबुरें समालोचनात्मक विवेचन करण्यापेक्षां स्वतःच्या आवडत्या विषयाचा ऊहापोह केल्यास त्याच्या भाषणास अधिक रंग चढेल, अशा अर्थाचें कारण मी सदर प्रतिपादनास दर्शविलें होतें. माझ्या या प्रतिपादनास पुष्टि देणारा एक नवा पुरावा नुकताच उजेडांत आला आहे.

शारदोपासक संमेलनांत त्याचे अध्यक्ष रा. कृ. पां. कुळकर्णी यांनीं भाषाशुद्धीवर जें भाषण केलें होतें, त्याचा विस्तृत अहवाल २६ जूनच्या 'ज्ञानप्रकाशां'त आला आहे. रा. कुळकर्णी हे भाषाशास्त्राचे गाढे विद्वान असल्यामुळें त्यांचें हें भाषण किती सरस असलें पाहिजे हें न सांगतांच कळण्याजोगें आहे. कुळकर्ण्यांच्या अध्यक्षीय भाषणापेक्षां त्यांचें हें भाषा-शुद्धीवरील भाषण खात्रीनें नाविन्यांत श्रेष्ठ प्रतीचें ठरते. तें वाचल्यानंतर आपणांस थोड्याफार तरी नवीन गोष्टी कळल्या, असा वाचकांच्या मनावर ठसा उमटतो. संमेलनप्रसंगीं हें भाषण ऐकतांना श्रोत्यांना देखील असाच अनुभव आला असेल. परंतु, हेंच विधान कुळकर्ण्यांच्या अध्यक्षीय भाषणाबद्दल मात्र करतां येत नाहीं ! त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत वाङ्मयविषयक विवेचन न करतां भाषाशुद्धीसारख्या प्रश्नावर भाषाशास्त्राच्या दृष्टीनें चर्चा केली असती, तर मराठीमध्यें एका बहुमोल भाषणाची भर पडली असती, हें निःसंशय, पण, संमेलनाध्यक्षाच्या भाषणाबाबत पडलेल्या विशिष्ट प्रथेमुळें तो योग आला नाहीं !

तात्पर्य, अव्वल दर्ज्याचें भाषण हवें असेल, तर कोणत्याहि साहित्य-विषयक मजलशीच्या अध्यक्षाला त्याच्या आवडीच्या विषयावर भाषण करण्याची सवलत मिळाली पाहिजे. तसें न केल्यास अगदीं सरासरी व रटाळ भाषणें ऐकण्या–वाचण्याचे प्रसंग टळणें अशक्य आहे !

*　　*　　*

## १५९ भाषाशुद्धि व कुळकर्णी

रा. कुळकर्णी यांच्या उपरोक्त भाषणावरून भाषाशुद्धीची चळवळ कशी निरर्थक आहे, याचें उत्कृष्ट प्रत्यंतर येतें. त्यांनीं भाषाशुद्धिवाल्यांना केलेला ‘ हितोपदेश ’ मननीय आहेः

“ माता, माई, जननी, आई, अया व कार्य, कर्म, काज, कज्जा, काम हे सर्व एकाच अर्थाचे मूळ शब्द आहेत. परंतु, व्यवहारांत त्यांच्या अर्थांत् निरनिराळ्या छटा दाखविल्या आहेत. तेव्हां मराठी भाषेंत जे परकी शब्द येतात, ते अशाच अगदीं बारीक छटांचे संकेत ( Concept ) दाखविण्याकरितां येत असतात. आणि, तेच शब्द काढून टाकले, तर त्या बारीक छटा दाखविण्याच्या बाबतींत आपली कुचंबणा होईल आणि तेवढ्या दृष्टीनें भाषेंत वैगुण्य येईल. अत्यंत उत्कर्ष पावलेली सुधारलेली भाषा तीच होय कीं, जिच्यांत अर्थाची कोणतीहि बारीकसारीक छटा प्रदर्शित करण्याचें सामर्थ्य आहे. हे शब्द काढून टाकण्यानें आपण भाषेंत वैगुण्य आणण्याचा दोष करीत नाहीं ना, ह्याचा विचार ह्या भाषा-सुधारकांनीं करावा, एवढी विनंति आहे. ”

परभाषेंतील शब्द घ्यावयाचे नसल्यास कोणती जोखीम अंगावर घ्यावी लागेल, याचें रा. कुळकर्णी यांनीं पुढील शब्दांत बयाण केलें आहेः—

“ जर शब्द घ्यावयाचे नाहींत, असा निर्धार असला, तर दुसरा मार्ग आहे. परंतु, तो खडतर आहे. शब्द नाहीं ना घ्यावयाचे ?—मग पाश्चात्य राष्ट्राप्रमाणें आपल्या राष्ट्रांत निरनिराळे व्यवहार उत्पन्न करा. त्यांच्याप्रमाणें निरनिराळें संशोधन चालू द्या. तुम्ही आपले स्वतःचे संकेत उत्पन्न करा व मग आपोआप त्यांचे दर्शक शब्द तुमचे होतील व इतर भाषीयांनाहि ते घ्यावे लागतील. ज्या राष्ट्रांत स्वतःचे उद्योग करण्याचें, स्वतःचें संशोधन करण्याचें, शास्त्रनिर्मिति करण्याचें सामर्थ्य नसतें, त्या राष्ट्राला त्या नव्या कल्पनांसाठींच फक्त नव्हे, तर त्याच्या दर्शक शब्दां-साठींहि दुसऱ्या राष्ट्रांच्या तोंडाकडे पहावें लागणें, हें दुर्दैव आहे; परंतु सत्य आहे.”

*　　　*

## १६० "फुलपात्र"

याच भाषणांत रा. कुळकर्णी विचारतात, " Flowerpot " या शब्दामागें असलेली Concept किंवा संकेत 'फुलपात्र' ह्या शब्दाच्या मागें असेल काय, असा माझा रोकडा सवाल आहे." त्यांचा हा रोकडा सवाल बहुधा प्रो. माधवराव पटवर्धन यांना उद्देशून असावा. कारण, प्रो. पटवर्धन यांनीं शारदोपासक संमेलनांतील आपल्या एका भाषणांत 'फ्लॉवरपॉट' या शब्दाला 'फुलपात्र' हा मराठी प्रतिशब्द सुचविला होता.

मराठी भाषा बोलली जाणाऱ्या कांहीं प्रदेशांत 'फुलपात्र' शब्द 'पाणी पिण्याचा पेला' या अर्थानें थोड्या वर्षांपूर्वी विशेष वापरण्यांत येत होता, निराळ्याच अर्थानें रूढ असलेला 'फुलपात्र' हा शब्द 'फ्लॉवरपॉट' या सर्वस्वीं भिन्न अर्थानें एकाच वेळीं वापरूं पाहणें हें कितपत इष्ट आहे, याचा या शब्दाच्या पुरस्कर्त्यांनीं अवश्य विचार करावा.

मराठींत काय, अगर अन्य भाषांत काय, एकाच शब्दाचे भिन्नभिन्न अर्थ होत नाहींत, असें नव्हे, हें अर्थात् मीहि जाणून आहें. माझें म्हणणें इतकेंच कीं, जेव्हां परभाषेंतील शब्दांचे समानार्थक मराठी शब्द बनविले जातात, तेव्हां ते 'नवीन' शब्द मराठींत आधींच निराळ्या अर्थानें रूढ आहेत काय, याची चौकशी व्हावयास पाहिजे, आणि तसे ते रूढ असल्यास ते शब्द नव्या अर्थानें वापरण्याचा विचार सोडून द्यावयास पाहिजे. जेथें मुद्दाम नवीन शब्द बनवावयाचे आहेत, तेथें ते एकापेक्षां अधिक वस्तूंचे वाचक ठरून व्यर्थ घोंटाळा उडविणार नाहींत, अशी खबरदारी घेणें आवश्यक आहे, याबद्दल सहसा मतभेद होऊं नये.

*　　　*　　　*

## १६१ पळसाला पानें तीन !

लखनौ कॉंग्रेसच्यावेळीं लखनौ येथें जें हिंदी कविसंमेलन भरलें होतें त्याच्या कांहीं मौजा जून १९३६ च्या 'चांद' मासिकांत एका प्रेक्षकानें प्रसिद्ध केल्या आहेत. प्रस्तुत प्रेक्षक सांगतो. " हिंदी कवि–संमेलनांत

काव्यगायनाची तऱ्हाहि वेगळीच होती. ज्याप्रमाणें एखादें माकड झाडाच्या फांदीवरून जमिनीवर कोसळावें, त्याप्रमाणें कवि लोक टणकन् उडून मंचावर येऊन बसत असत!...प्रत्येक कवि आपली कविता म्हणून दाखविण्यासाठीं अत्यंत अधीर झालेला दिसत होता!...कवि व कविता या उभयतांची ही दुर्दशा पाहून मला फार दुःख वाटलें!...कुणी कविता ऐको कीं न ऐको, कविमहाशय आपली कविता म्हणून दाखविण्यासाठीं जात होते!...''

कविवर्गाचा हा थिल्लरपणा महाराष्ट्रीयांस सुपरिचितच आहे. योग्य प्रमाणांत कीर्तिलालसा असणें बिलकुल वावगें नाही. जे सत्कवि आहेत, व शिवाय ज्यांना गोड गळ्याची देणगी प्राप्त झाली आहे, त्यांनीं काव्यगायन करावयाचें नाहीं, तर तें करावयाचें तरी कुणी? पण जे सत्कवि नाहींत व असूनहि ज्यांना गाण्याचें अंग नाहीं; तसेंच, ज्यांच्या काव्यगायनाबद्दल श्रोतृसमाज तिळमात्र सुद्धां उत्सुक नाही, त्यांनीं काव्यगायनासाठीं धडपड करून स्वतःस हास्यास्पद करून कां घ्यावें, हें कळणें दुरापास्त आहे!

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १३

## १६२ तेजस्वी वाङ्मयाचे प्रणेतेः टिळक

आज लो. टिळक यांची पुण्यतिथि. या प्रसंगीं त्या थोर विभूतीच्या वाङ्मयविषयक कामगिरीविषयीं दोन शब्द लिहिल्यास ते ' प्रासंगिक ' असेच होणार आहेत.

टिळकांचे 'Orion', ' Arctic Home in the Vedas ' व 'गीता-रहस्य' हे तीन ग्रंथ सर्वत्रांस विदितच आहेत. या ग्रंथांनीं टिळकांना विद्वन्मंडळांत मानाचें स्थान मिळवून दिलें; आणि त्यांतील सर्वच प्रतिपादन कुणास मान्य होण्याजोगें नसलें, तथापि त्यांच्या पांडित्यप्रचुरतेबद्दल मतभेद होत नाहीं. हें सारें खरें असलें, तरी पण टिळकांच्या व्यक्तित्वाचा ' कडकडून साक्षात्कार ' होण्यासाठीं या ग्रंथांऐवजीं ' केसरी'तील त्यांच्या लेखांकडेच वळलें पाहिजे. तें उत्कट स्वदेशप्रेम, ती प्रयत्नवादाची अविरत शिकवण, तो पारतंत्र्याचा कमालीचा तिरस्कार व विशेषतः ती दुर्दमनीय तेजास्विता, यांचें दिव्यदर्शन त्यांच्या 'केसरी'तील लेखांखेरीज अन्यत्र कसें होणार ?

तसें म्हटलें, तर टिळकांच्या लेखांची भाषा कधीं नटविली-सजविली नसावयाची किंवा त्यांत उपमा-उत्प्रेक्षांचा लखलखाटहि नसावयाचा. तरी देखील त्यांचे लेख जनमनाची विलक्षण पकड घेत, व अजूनहि घेतात, याचें कारण त्यांतील अपूर्व तेजस्विता हेंच होय. केवळ वाङ्मयदृष्ट्या पाहिलें, तर कै. शि. म. परांजपे व रा. न. चिं. केळकर यांच्या लेखांनीं टिळकांच्या लेखांना केव्हांच मागें टाकलें आहे. परंतु बुद्धिवादाला बगल न देतां तेजस्विता आणण्याच्या बाबतींत परांजपे-केळकरांच्या लेखांना टिळकांच्या लेखांशीं मुकाबला करतां येणें शक्य नाहीं ! परांजप्यांचे ' काळा 'तील लेख ओजोगुणानें रसरसलेले नव्हते, असें त्यांच्या कट्ट्या दुष्मानासहि म्हणतां यावयाचें नाहीं. पण, परांजप्यांचें सारें ओज बहुधा केवळ भावनावशतेच्याच तळावर मंडित झालेलें असावयाचें ! बरें, इकडे

केळकरांच्या लेखांकडे पहावें, तर त्यांत बुद्धिवादाला सर्वाधिक प्राधान्य दिलेलें आढळतें. शिवाय बहुतेक वेळां त्यांचा बुद्धिवाद इतका अतिरेकास गेलेला असतो कीं, त्याच्या आसपास तेजस्वितेचा वारासुद्धां फिरकतांना दृष्टोत्पत्तीस येत नाहीं ! टिळकांचे लेख म्हणजे परांजपे व केळकर या दोघांच्या लेखांमधला ' सुवर्णमध्य ' होय, असें एका अर्थीं म्हणतां येतें.

टिळकांच्या राजकीय कार्यक्रमावर टीका करतांना ' हें आमच्याच पुस्तकांतून फाडून घेतलेलें पान होय ' असें कित्येक नेमस्ताग्रणी म्हणत असत. त्यांचें हें विधान खरें आहे, असें क्षणभर समजलें, तरी त्यामुळे टिळक व नेमस्ताग्रणी यांच्यांत तेजस्वितेबाबत असलेले जमीनअस्मानचें अंतर नाहींसें होत नाहीं. या उभयतांचे लेख वा भाषणें यांचा या दृष्टीनें तुलनात्मक अभ्यास केल्यास ही गोष्ट प्रत्येकास खात्रीनें पटेल. टिळकांची ' **भारतीय असंतोषाचे जनक** ' ही पदवीच या गोष्टीची साक्ष देण्यास पुरेशी आहे ! टिळकांना ही पदवी प्राप्त होण्याचें बरेंच मोठें श्रेय त्यांच्या लेखांकडे जाते; आणि याबद्दल मराठी भाषा बोलणाऱ्या लोकांना अभिमान वाटला पाहिजे !

टिळकांच्या लेखांसारखे तेजस्वी लेख मराठीमध्यें सध्यां अजिबातच निर्माण होत नाहींत, असें म्हणणें सत्यास धरून होणार नाहीं, हें खरें; तथापि त्यांचें प्रमाण अत्यल्पच आहे, हेंहि तितकेंच खरें आहे. याची कारणमीमांसा भिन्नभिन्न लोक भिन्नभिन्न प्रकारांनीं करतील. उदयोन्मुख तरुण पिढीपुरतें मात्र एवढें बरेंचसें बिनचूकपणाने म्हणतां येईल की, अभिनव तत्त्वज्ञान ग्रहण करण्याच्या दृष्टीनें तरुण पिढीचा सांप्रत संक्रमणकाल सुरू आहे. तरुण पिढीच्या विचारांत जो जो ठामपणा येत जाईल, तों तों तिच्या हातून अधिकाधिक तेजस्वी वाङ्मय निर्माण होत जाईल, अशी आशा करण्यास जागा आहे.

तें कांहीं असो, मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत ' गीतारहस्या'मुळें तर टिळकांचें नांव कायमचें राहीलच; परंतु ' तेजस्वी वाङ्मयाचे प्रणेते ' या नात्यानेंहि त्यांत त्यांचें नांव सदैव गाजेल, यांत शंका नाहीं.

*   *   *

## १६३ टीका व व्यक्तिद्वेष

जी. के. चेस्टरटन याच्या मृत्यूनंतर त्याच्यावर अनेक लेख एकल्यांत छापले गेले. त्यांतील कांहीं लेखांत चेस्टरटनच्या तीव्रातितीव्र टीकांनीहि त्याला शत्रु उत्पन्न झाले नाहींत, असा उल्लेख आलेला आहे. आणि, तो बव्हंशीं खराच आहे. चेस्टरटननें बर्नार्ड शॉ, एच्. जी. वेल्स वगैरेना इतके निर्घृण प्रहार केले, तथापि, त्यामुळें त्यांच्या मित्रत्वाला कांहीं बाध आला नाहीं. पण, याचें श्रेय चेस्टरटनला आहे, कीं शॉ–वेल्स वगैरेंवर आहे, कीं उभय पक्षांस आहे, हा खरोखर विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

टीका–विशेषतः प्रतिकूल टीका–ही द्विविध हेतूंस्तव जन्मास येते. एकतर, खासगत वैर, स्वभावपैशुन्य अगर मत्सर यांजमुळें तिची निर्मीति होते. किंवा दुसरें तात्त्विक मतभेदांमुळेंहि तिचा संभव होतो. पहिल्या प्रकारची टीका ही शक्य तितकी कडक असणार, हें उघड आहे. दुसऱ्या प्रकारची टीका कडक असावयाची कीं सौम्य असावयाची, हें मात्र त्या टीकाकाराच्या मनोवृत्तीवर अवलंबून राहील. चेस्टरटन याची टीका सामान्यतः कडकच असे. फक्त ती केव्हां गंभीर तर केव्हां विनोदी असे, एवढाच काय तो फरक. बाकी, विनोदामुळें तिच्यांतील 'विषार' कमी होत असे, अशांतला बिलकुल भाग नाहीं !

ही झाली प्रहार करणाऱ्याची गोष्ट. आतां ज्यांच्यावर प्रहार झाले, त्यांची वर्तणूक कशी घडत असे, ती पहा. शॉप्रभृति टीकाविषयीभूत व्यक्तींनीं चेस्टरटनच्या प्रतिकूल टीकांना योग्य प्रसंगीं उत्तरें दिलीं व तीं '**यथा यक्षस्तथा बलिः**' या न्यायानें कित्येकदां मूळ टीकेप्रमाणे झणझणीतहि असत. तथापि, या टीकाविषयीभूत व्यक्तींना "चेस्टरटनची टीका व्यक्तिद्वेषमूलक आहे !"–अशी तक्रार केल्याचें निदान माझ्या तरी अवलोकनांत आलेलें नाहीं ! उलटपक्षीं, त्यांनीं चेस्टरटनवर किती तरी वेळां स्तुतिपुष्पेंच उधळलेलीं आढळतील ! अर्थात् चेस्टरटन सुद्धां प्रतिपक्षाचा गुणगौरव करण्याची संधि आल्यास ती सहसा दवडत नसेच. तात्पर्य, हें सारें वाग्युद्ध 'खेळाडू वृत्ती'नेंच चालत असे.

परंतु, अशी ' खेळाडू वृत्ति ' मराठी वाङ्मयांत कितपत दृष्टीस पडते ? टीकाकारांनी खंडीभर स्तुति करून रतीभर जरी निंदा केली, तरी आपल्याकडील साहित्यिकांची मिजास जाते ! त्यांना अगदी शंभर टक्के स्तुति हवी असते. तशी ती टीकाकारानें न केल्यास ते त्याजवर ' **रसिकता सर्व करपली मत्सरानलें !** '–असा आरोप करून पार मोकळे होतात ! ! मामुली प्रकारच्या प्रतिकूल टीकेची जर ही स्थिति तर चेस्टरटनने शॉ, वेल्स इत्यादिकांवर ज्या पद्धतीची टीका केली, त्या पद्धतीची टीका मराठींत कुणी कुणावर केल्यास केवढा हलकल्लोळ उडेल, याची कल्पनाच केलेली बरी !

टीकाकाराचें तर राहोच, पण जिवलग मित्रानें व तीहि खाजगी रीत्या प्रतिकूल टीका केल्यास लेखकमहाशय कसे गरम होतात व त्या दोघां मित्रांत केवळ टीकेमुळें कायमचें वितुष्ट येण्याचा कसा संभव असतो, याचा अनुभव पुष्कळांस असेलच. यामुळें मित्र मित्राजवळ सुद्धां त्याच्या लेखनासंबंधीं स्पष्ट अभिप्राय व्यक्त करण्यास कचरतो ! हें सर्व वातावरण गुदमरून टाकणारें नाहीं काय, याचा निर्णय सूज्ञांनीच करावा.

मराठी लेखकांचा हा नसता हळुवारपणा ऊर्फ दौर्बल्य पाहिलें, म्हणजे चेस्टरटनच्या तीव्र टीकेनें देखील त्याला शत्रु निर्माण आले नाहीत, याचें श्रेय चेस्टरटनऐवजी त्याच्या टीकाविषयीभूत व्यक्तींनाच देणें न्यायाचें होईल, असें मला वाटते. कारण, या व्यक्तींना आमच्या मराठी साहित्यिकां-प्रमाणे " व्यक्तिद्वेष ! व्यक्तिद्वेष ! "–असा आरडाओरडा करतां आला नसता, असे नाहीं; पण, तसें न करतां त्यांनीं उदार बुद्धीनें ' खेळाडू वृत्ति ' धारण केली. हा प्रकार आमच्या लेखकांची वागणूक पाहतां अभूतपूर्वच मानावा लागतो !

येथपर्यंत तात्त्विक मतभेदामुळें जन्मास येणाऱ्या प्रतिकूल टीकेचे विवेचन केलें. राहतां राहिलं खासगत वैर, मत्सर अगर स्वभावपैशुन्य यांमुळे निर्माण होणारी प्रतिकूल टीका.

या प्रकारची टीका ओळखण्याची मुख्य खूण ही की तींत टीकाविषयी-भूत व्यक्तीचे रास्त गुणहि दिग्दर्शित केलेले नसतात व शिवाय टीकाकार ' तत्त्वा 'वरून ' व्यक्ती 'वर आलेला असतो ! अशा टीकेमुळें भावनाप्रधान

लेखकास मनस्वी त्रास होतो, हे निर्विवाद आहे. तथापि लेखकांनी मन घट्ट करून या धर्तीच्या टीकांकडे दुर्लक्ष्यच केलें पाहिजे. कारण, ते खरोखरच प्रतिभासंपन्न वाङ्मयनिर्माते असल्यास त्यांजवर केवढीहि निष्ठुर टीका झाली, तरी ती लौकरच कालोदरांत लुप्त होऊन त्यांच्या कृति मात्र भाषेत अजरामर होऊन राहतील !

टीकाकारांचा वर्ग, या जातीच्या टीका व त्यांचे जनक यांच्यामुळेंच बराचसा अप्रिय झालेला आहे. शोपेनहॉरसारख्या तत्त्ववेत्त्यानेंसुद्धां टीकाकारांविषयीं चिडून लिहिले आहे, हें ध्यानांत घेतां या वर्गाच्या सर्वसाधारण अप्रियतेचा अजमास होईल. या अप्रियतेच्या 'दुजगबाहुल्या'ला भिऊनच आपल्याकडील पुष्कळ वाङ्मयभक्त टीका लिहिण्यास माघार घेतात. परंतु, मराठीत वेळोवेळीं मूळ धरणाऱ्या अनिष्ट प्रवृत्तींचा बीमोड करावयाचा असल्यास टीकेचा अंगीकार केल्यावांचून गत्यंतर उरत नाही ! मग त्यासाठीं कितीहि शिव्याशाप सोसावे लागले, तरी त्यांची पर्वा करूं नये ! भाषेला जशी व जितकी श्रेष्ठ लेखकाची जरूरी आहे, तशी व तितकीच सडेतोड टीकाकाराचीहि आहे !

* * *

## १६४ " भावनेचें तर्कशास्त्र ! "

आरंभाच्या टिळकांवरील स्फुटांत कै. शि. म. परांजपे यांच्या लिखाणास 'भावनावश' हा शब्द लावला आहे. या शब्दावरून 'भावनेच्या तर्कशास्त्रा'बद्दल वाचण्यांत आलेला मौजेचा मजकूर आठवला तो थोडक्यांत पुढें देतोंः—

Ribot नामक विख्यात तत्त्ववेत्त्याच्या 'La Logique des Sentiments' नांवाचा एक ग्रंथ आहे. या ग्रंथावरून एका लेखकानें फ्रेंचमध्यें 'भावना व तर्कशास्त्र' या विषयावर एक लेख पूर्वी लिहिला होता. त्यांतील माहिती इंग्रजीवरून खालीं ग्रथित केली आहे.

भावनांना देखील चुकीच्या कां होईना, पण तर्कशास्त्राचा आधार असतो, हा मुद्दा Ribot नें ओळखला होता. भावनांत एक प्रकारचा 'बुद्धिवाद' असतो, व त्या वरवर दिसावयाला तरी युक्तिसंगत व समर्थनीय वाटतात.

' भावनेचें तर्कशास्त्र ' आधींच ठरविलेल्या स्वानुकूल ' निष्कर्षा 'भोवतीं ( Conclusion भोवतीं ) गरगरत असतें. खऱ्याखुऱ्या तर्कशास्त्रांत अनुकूल-प्रतिकूल अशा दोनहि बाजूंचा सारासार विचार प्रथम करतात, आणि नंतर निष्कर्षाप्रत येऊन ठेपतात. परंतु, ' भावनेच्या तर्कशास्त्रां 'त मुळीं निष्कर्षापासूनच सुरवात केलेली असून त्याचें नियमनहि निष्कर्षानुसारच केलेलें असते ! भावनावश मनुष्य एखाद्या वस्तूच्या प्राप्तीसाठीं तळमळत असल्यास ती वस्तु कसेंहि करून मिळवावयाचीच, असा ' निष्कर्ष ' तें आगाऊच आपल्या मनाशीं ठरवून ठेवतें आणि मग तो ' निष्कर्ष ' तर्कशुद्ध आहे, असे दाखविण्यासाठीं अनुकूल तेवढींच प्रमाणें ते दृष्टीसमोर आणीत असतें !

समजा, 'अ' नांवाचा एक गुलजार तरुण आहे. त्याच्या माहितीची एक अतिशय फक्कड ' पोरगी ' आहे. त्या लावण्यलतिकेकडे त्याचें हृदय साहजिकच वेगाने धांव घेते ! आतां, ' भावनेच्या तर्कशास्त्रा 'च्या दृष्टीने तो तरुण काय करील ?—तो पहिल्याच झटक्याला असा ' निष्कर्ष ' ठरवून टाकील कीं, ही युवती प्राप्त करून घ्यावयाचीच ! आणि, हा निष्कर्ष याप्रमाणे आधींच कायम करून नंतर तो त्याला पोषक अशीं प्रमाणे शोधूं लागेल ! ' भावनेचे तर्कशास्त्र ' म्हणावयाचें ते हेच. वरील 'निष्कर्षा'-प्रत येऊन ठेपल्यावर या तरुणाचें ' भावनेचें तर्कशास्त्र ' सुरू होईल, ते असें: " ही तरुणी मी मिळविलीच पाहिजे ! कारण, मला सुखी करूं शकेल अशीच ती आहे ! तसेंच, स्त्रीला सुखी करावें, हें प्रत्येक पुरुषाचे कर्तव्य आहे व ते मी या तरुणीच्या बाबतींत पार पाडलेंच पाहिजे ! शिवाय, माझ्यासारख्या बुद्धिमान् माणसाला प्रेम व बुद्धिवाद ( Reason ) हीं दोनहि एकच आहेत—" इ० इ०

वा ! काय ही तर्कशुद्ध विचारसरणी ! त्या तरुणीच्या फक्त गोऱ्यागोमट्या चेहऱ्यावरून ती आपणाला सुखी करील, अशी हे शेख महंमद समजूत करून घेतात ! जणुं काय, सुंदर चेहरा हेच सुखाचें एकमेव साधन आहे ! दुसरें, ती युवती आपल्यामुळे सुखी होईल, असाहि हा प्रेमिक अर्थ सुचवितो ! पण हा ' अर्थ ' किती ' अर्थहीन ' आहे हें वेगळे सांगावयास

नकोच ! तिसरे, आपण बुद्धिमान् असल्याची तो खरी म्हणा वा खोटी म्हणा, गोड कल्पना करून घेतो, आणि आपल्या बाबतींत प्रेम व बुद्धिवाद हीं भिन्न नसल्याबद्दलहि तो मनाची समजूत घालतो. सारांश, ही सर्वच विचारसरणी भ्रममूलक आहे ! ती तरुणी आपल्यावर प्रेम करते कीं नाहीं, ती आपणास साध्य होणें कितपत शक्य आहे – वगैरे प्रश्नांचा हा तरुण विचारच करीत नाही ! पण, त्यानें असा विचार केला, तर मग ' भावनेचें तर्कशास्त्र ' तें काय उरलें ?

* * *

## १६५ शॉविषयींचा जुना अभिप्राय

डॉ. हेंडरसन नामक एका अमेरिकन विद्वानानें, पसतीस वर्षांपूर्वी, बर्नार्ड शॉ यांजविषयीं अभिप्राय लिहून ठेवला होता, तो आजहि फार मार्मिक वाटत असल्यामुळें येथे अंशतः उद्धृत करतों:—

'He is thoroughly imbued with the most modern ideas. History he has studied through Mommsen, socialism through Marx, drama through Ibsen, philosophy through Nietzsche and art through Rossetti and Burne-Jones ... Mr. Shaw early learned the lesson that the way to arouse the attention of the stolid British public is to attack its sense of order and propriety. He remembered with Thackerey that in order to gain the notice of the British lion, it is only necessary to tweak its tail. Accordingly he mounted the cartwheel of notoriety and, to the blaring of brass bands, declared himself a natural-born mountebank. " Come hither ", he said, " I will tell you what remarkable freak I am ! "

* * *

## १६६ केळकर व केंद्रवाद

पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजांत २० जून रोजीं रा. न. चिं. केळकर यांचें साहित्यविषयक भाषण झालें. त्यांत केंद्रवादाविषयी बोलतांना त्यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढल्याचें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें आहे:—

" जें ओजस्वी, तेजस्वी व भावी जीविताचें चित्र काढणार तेंच उत्तम वाङ्मय. जेथें प्रभाव तेथेंच केंद्र. म्हणून पुणें हेंच केंद्र. पूर्वकाली गोदातीर केंद्र होतें. पुण्याचा मान गेल्या शंभर वर्षांतलाच आहे. पुण्याची वाङ्मयाची भाषा, तिचें राज्य आहे तोंपर्यंत आपलें वर्चस्व चालविणार. तेथें पुष्कळशा संस्था एकत्रित झाल्या आहेत, म्हणून पुण्याची भाषा ही वाङ्मयाची भाषा मानली जाते." ( ज्ञानप्रकाशः ९ जुलै १९३६. )

पुणें शहराबद्दल रा. वरेरकर यांच्यासारखी ' विरोधी भक्ति ' मला वाटत नाहीं, हें ' प्रतिभा ' वर्ष ३, अंक १३, यांतील ' पुणें विरुद्ध प्रो. जोशी ' या माझ्या स्फुटावरून वाचकांस ठाऊक झालेंच आहे. यामुळें महाराष्ट्राच्या अनेक केंद्रस्थानांपैकीं पुणें हेंहि एक केंद्रस्थान आहे, ही गोष्ट मी केव्हांहि आनंदानें कबूल करीन. आणि केंद्रवाद सुरू करणारे विद्वानहि तिला खात्रीपूर्वक मान्यताच देतील. परंतु, वाद होतो तो निराळ्याच गोष्टीवरून. महाराष्ट्राचें पुणें हेंच एकुलतें एक केंद्रस्थान आहे, असें जेव्हां म्हणण्यांत येते, तेव्हां मात्र मतभेद उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहींत ! रा केळकर यांच्या भाषणाचा 'ज्ञानप्रकाशां'तील गोषवारा बरोबर असल्यास " म्हणून पुणें हेंच केंद्र "—असें वाक्य उच्चारून महाराष्ट्राचें एकमेव केंद्रस्थान पुणें शहरच आहे, असें ते ध्वनित करतात, असें अनुमान करावें लागतें. केळकरांचें हें विधान सर्वमान्य होणें शक्य नाहीं, एवढेंच तूर्त नमूद करून हा विषय येथें अपुराच सोडतो.

*　　　*　　　*

## १६७ सर रॉय यांचा प्रांताभिनिवेश

' प्रतिभे 'च्या गेल्या अंकांत " ग्रंथः ग्रंथकारः गप्पा " या सदरामध्यें बंगालचे शास्त्रज्ञ सर प्रफुल्लचंद्र रॉय यांच्या आत्मवृत्ताच्या द्वितीय खंडावरून त्यांच्या संकुचित प्रांताभिनिवेशावर झगझगीत प्रकाश पाडण्यांत आला आहे. सदर मजकूर वाचून एका गृहस्थानें पुढील वृत्तांत पत्रानें कळविला आहेः—

" सर प्रफुल्लचंद्र रॉय हे किती संकुचित वृत्तीचे बंगाली आहेत, याची संपूर्ण कल्पना त्यांच्या आत्मचरित्रावरूनहि येणार नाहीं. त्यांच्याशीं ज्या

परप्रांतीयांचा प्रत्यक्ष संबंध आला असेल, त्यांनाच त्याची नीट कल्पना येते. माझा व सरसाहेबांचा अर्थात्‌च प्रत्यक्ष संबंध आलेला नाही. तरी पण मी कलकत्ता येथें...साठीं असतांना विश्वसनीय लोकांकडून मला एक हकीकत कळली होती. ती अशी की, इतिहासलेखक गोविंदराव सरदेसाई यांचे मृत पुत्र कै. शामकांतराव हे युरोपांत उच्च शिक्षण घ्यावयास जाण्यापूर्वी सर रॉय यांचा सल्ला घेण्यासाठीं गेले होते. त्यावेळीं "परप्रांतीयास मी कसलीहि मदत करूं इच्छित नाहीं!"–असे म्हणून सरसाहेबांनीं त्यांना वाटाण्याच्या अक्षता लाविल्या! फुकाचा सल्ला देण्यासहि ते तयार नव्हते! शामकांतराव यांच्या सोबत कोणीतरी वडे बंगाली गृहस्थ गेले होते. ते बहुधा सर जदुनाथ सरकार असावेत, असे वाटतें. नक्की सांगतां येत नाहीं...ही हकीकत बाहेर फुटली, तेव्हां कलकत्त्यास रहाणाऱ्या आम्हां महाराष्ट्रीयांत भयंकर खळबळ उडाली!..." वगैरे.

हा वृत्तांत कितपत खरा आहे, हे जाणत्यांनीं सांगावे. हें पत्र वर देण्याचा हेतु इतकाच की, थोर थोर मंडळी किती 'कूपमंडूक वृत्ती'ची असते, हें वाचकांस कळावे. महाराष्ट्रीयांतहि प्रांताभिनिवेश थोडथोडका नाहीं. विशेषतः त्यांचा उपप्रांताभिमान तर वाटेल तेव्हां उसळून वर येतो! सर रॉय यांच्या या 'दंभस्फोटा'वरून तरी त्यांनी धडा घ्यावा, हाहि हें पत्र छापण्यांत आणखी एक हेतु आहेच.

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १४

## १६८ उद्यांचा ' गॉर्की-दिन '

उद्यां कांहीं वाङ्मयसंस्था व वाङ्मयसेवक ' गॉर्की-दिन ' साजरा करणार आहेत. या निमित्तानें ' प्रतिभा ' पाक्षिक देखील त्या दिवंगत सरस्वती-पुत्राच्या चरणीं स्तुतिसुमनांजलि अर्पण करीत आहे.

मॅक्झिम गॉर्की याच्या लोकोत्तर साहित्यसेवेचा आज नव्यानें परिचय करून देण्याचें कांहींच कारण उरलेलें नाहीं. त्याच्या एकापेक्षां एक ददीप्यमान् ग्रंथरत्नांनीं जागतिक महत्त्वाच्या साहित्यिकांत त्याला केव्हांच मानाचें स्थान प्राप्त करून दिलें आहे ! गॉर्कीनें एवढी अफाट वाङ्मयनिर्मीति न करतां ' Twenty-six men and a girl ' ही एकच कथा लिहून ठेवली असती, तरीसुद्धां त्याला शारदेच्या दरबारांत खडी ताजीम मिळाली असती ! मग या अपूर्व कथेच्या जोडीला त्यानें इतर अनेक उत्तमोत्तम कादंबऱ्या, नाटकें व लघुकथा यांची भर घातली असतांना त्याला रशियाच्या साहित्यसम्राटाचें पद मिळावें, यांत नवल तें कोणतें ?

बाकी, स्वतः गॉर्कीला साहित्यांतील काय, किंवा राज्यव्यवहारांतील काय, ' सम्राट् ' हा शब्द कधींच रुचला नसता ! कारण त्याचा जन्म जसा चांभाराच्या पोटीं म्हणजे खालच्या वर्गांत झाला, तसेंच त्याचें सर्व आयुष्य खालच्या वर्गाच्या अभ्युदयाप्रीत्यर्थ खर्च झालें. ललित वाङ्मयरचना हा त्याचा इतका आवडता उद्योग, पण त्यांत देखील त्याच्या प्रतिभेची कोळीण प्रायः खालच्या वर्गाच्या सुख-दुःखांचेंच जाळें विणतांना दृष्टोत्पत्तीस येते !

गॉर्कीखेरीज जगांतील इतरहि कांहीं मोठमोठ्या साहित्यिकांनीं खालच्या वर्गाचीं चित्रें रेखाटण्याचा प्रयत्न केलेला आहे. आणि त्या त्या लेखकाच्या मगदुराप्रमाणें तीं चित्रें कमीअधिक प्रमाणांत हृदयंगमहि उतरलीं आहेत. परंतु, गॉर्कीनें रंगविलेल्या चित्रांतील वैशिष्ट्य एकंदरीनें दुर्मिळच, असें म्हटल्यास ती खचित अतिशयोक्ति होणार नाहीं ! गॉर्कीमध्यें

पहिल्या प्रतीची प्रतिभा वास करीत होती, व ही प्रतिभाच त्याच्या वाङ्मयकृति एवढ्या प्रभावशाली बनविण्यास प्रामुख्यानें कारणीभूत झाली, हें तर खरेंच; परंतु खालच्या वर्गाच्या जीविताचा प्रत्यक्षानुभव व क्रांतिपोषक तत्त्वज्ञान, या दोन गुणांनींहि त्याच्या कृतींना अमूप उजाळा दिला, हेंहि तितकेंच खरें आहे. खालच्या वर्गाचीं दृश्यें दाखविणाऱ्या अनेक ललितलेखकांना त्यांजविषयीं प्रत्यक्षानुभव नसतो. फक्त कादंबरी अगर नाटक लिहिण्याच्या सुमारास Slums किंवा भिकारवाडे यांतून चारदोन फेरफटके केल्यानें खालच्या वर्गाच्या परिस्थितीचें यथार्थ ज्ञान कसें होणार? कित्येक ललितलेखकांस हें ज्ञान बऱ्यापकीं असतें; पण या पददलितांचें दैन्य दूर होण्याचा खरा मार्ग कोणता, याविषयींच्या त्यांच्या कल्पना स्पष्ट व निश्चित नसतात, आणि साम्यवादी तत्त्वज्ञानासारखें तत्त्वज्ञान स्वीकारण्याची तर त्यांची तयारी नसते! यामुळे साहजिकच त्यांच्या लिखाणांतून दैववादाचा रडका सूर वाहूं लागतो! गॉर्कीचें तत्त्वज्ञान क्रांतिपोषक असल्यामुळें त्याच्या वाङ्मयाचा सर्वसाधारण परिणाम नैराश्यो-त्पादक न होतां सात्त्विक संताप उत्पन्न करणारा असा होतो. अर्थात् त्याच्या कांहीं कृति या नियमास अपवादभूत असतील; परंतु प्रस्तुत विधान ढोबळ मानानेंच केलेलें आहे, हें ‘ सर्वसाधारण ’ या शब्दावरून सूचित होईलच.

गॉर्की हा स्वतः बोल्शेव्हिक नसून बोल्शेव्हिकांचा नुसता मित्र होता, यासारखे निरर्थक श्लेष कांहीं विलायती पत्रकर्ते काढूं लागले आहेत! या वादाशीं आपल्याला तूर्त कांहींहि करावयाचें नाहीं. एवढें मात्र खास कीं, गॉर्कीच्या पुष्कळ कृतींत क्रांतिपोषक निनाद स्पष्टपणें घुमतांना ऐकूं येतात!

गॉर्की व अन्य लेखक यांच्या अनुकरणानें मराठींतहि खालच्या वर्गाचीं सुखदुःखें रंगविणारें ललितवाङ्मय थोडेंबहुत निर्माण होऊं लागलें आहे. गॉर्कीसारख्यांचे मोरेच गुण नुसत्या अनुकरणानें अंगीं कसे येणार? तथापि, या प्रकारचें वाङ्मय थोडें तरी यशस्वी व्हावयाचें असल्यास त्या वाङ्मयाच्या जनकास खालच्या वर्गाचा जितका अनुभव येईल, तितका हवाच आहे, हा बोध गॉर्कीपासून अवश्य घेतला पाहिजे. गॉर्कीप्रमाणें खालच्या वर्गांत

जन्मलेला गृहस्थच खरोखरी त्या वर्गाचें वर्णन करण्यास पात्र असतो. परंतु, जेथें तसें नाही, तेथें ही उणीव यत्नपूर्वक शक्य तेवढी नाहींशी करणें भाग आहे. ज्या लेखकांस कामकरी, शेतकरी वगैरे खालच्या वर्गातील लोकांचीं वाङ्मयीन चित्रें रेखाटावयाचीं आहेत, त्यांनी त्यांच्यांत सतत मिसळून त्यांची सुखदुःखें, त्यांच्या आशा–आकांक्षा, समजावून घेतल्या पाहिजेत. असें झालें तरच ती चित्रें अल्पस्वल्प कां होईना, पण जीवंत वाटतील !

*　　*　　*

## १६९ शोपेनहॉरचे वाङ्मयविषयक विचार

'प्रतिभे'च्या गेल्या अंकांत टीकेवरून सुप्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्ता शोपेनहॉर याचा उल्लेख करण्यांत आला आहे. आज त्या थोर पंडिताच्या ठळकठळक वाङ्मयविषयक विचारांचा ओझरता परिचय करून घ्यावयाचा आहे.

शोपेनहॉरनें आपल्या निबंधादिकांत जे वाङ्मयविषयक विचार प्रदर्शित केले आहेत, ते सर्वच अगदीं अभिनव अगर मूलगामी आहेत. अशांतला भाग नाही. तथापि, एका महान तत्त्ववेत्त्याचे विचार या नात्यानं त्याचें सारेंच म्हणणें–मग तें चुकीचें कां असेना !–महत्त्वपूर्ण ठरतें, हे उघड आहे. ग्रंथकर्तृत्वाविषयीं लिहितांना जे लेखक मोबदल्यासाठी लेखन करतात, त्यांजवर शोपेनहॉरनें खूपच तडाखा उडविला आहे ! एखादा लेखक केवळ द्रव्यप्राप्तीसाठीं ' लेखनकामाठी ' करीत असला, व स्वतःविषयीं " **हम तो अब बन चुके !**–" अशी त्याची भावना झालेली असली, तर तो आपल्या कृतीच्या गुणवत्तेपेक्षां तिच्या जाडजूडपणावरच अधिक लक्ष्य देईल, हें निःसंशय आणि, अशा परिस्थितीत त्या लेखकाला कुणी धारेवर धरल्यास ते एका अर्थी समर्थनीयहि होईल. परंतु, लेखनाबाबत मोबदल्याची अपेक्षा करणें हेंच मुळी तत्त्वदृष्ट्या गर्हणीय आहे, असा कुणी आग्रह धरल्यास तो कितपत उचित ठरेल ? शोपेनहॉरची जवळजवळ अशीच प्रवृत्ति होती ! द्रव्यलालसेनें लेखक ज्यावेळीं पानांमागें पानें खरडीत सुटतो, त्यावेळीं तो वाचकांस फसवीत असतो, असा शोपेनहॉरनें अभिप्राय व्यक्त केला आहे ! एवढेंच नव्हे, तर हा प्रकार ध्यानांत येतांक्षणींच वाचकांनीं तें

पुस्तक खुशाल भिरकावून द्यावें, अशींहि तो शिफारस करतो ! ! त्यानें म्हटल्याप्रमाणें लेसिंगसारख्या अव्वल दर्जाच्या लेखकाच्या देखील कित्येक कृति द्रव्यलोभामुळे रद्दड उतरल्या असतील, हें खरें; परंतु यावरूनहि मोबदला घेणें हें सर्वस्वीं अनुचित असल्याचें सिद्ध होत नाहीं ! लेसिंगलाहि फटकारण्यारा जा शोपेनहॉर कचरला नाहीं, त्यानें भराभर व भाराभर ग्रंथ प्रसवणाऱ्या आपल्याकडील कलमबहाद्दरांचा कसा ' आडिस–अबाबा ' केला असता, याची कल्पनाच करावी !

ग्रंथांच्या ' कॉपीराईट 'बद्दलहि शोपेनहॉरनें असेच तारे तोडले आहेत ! त्याचे पुढील एकच वाक्य पहा; Writing for money and reservation of copyright are, at bottom, the ruin of literature." शोपेनहॉरच्या या अजब विधानावर ' व्याख्यान-अटाटी ' ( इति एकनाथः ) करण्याची जरुरी आहे काय ?

शोपेनहॉरची निनांवी टीकेसंबंधीची मतेंहि अशीच एकांतिक स्वरूपाची आहेत ! निनांवी टीकेच्या पोटांत टोपणनांवी टीका अर्थात् आलीच ! शोपेनहॉरच्या या मतांचा त्याचा भाषांतरकार सॉंडर्स हा देखील पाठपुरावा करूं इच्छित नाहीं असें दिसतें ! ( ' The Art of Literature ' प्रस्तावना पा. ६ पहा ) निनांवी टीका छापणाऱ्या लेखकांविषयीं शोपेनहॉरला काय वाटत होतें, हें विशद होण्यासाठीं त्यानें त्यांना हांसडलेल्या कांहीं शिव्याच येथें उद्धृत करतो : cowardly, base, rascal, scoundrel, knave इ० इ० ! ! ! तत्त्ववेत्ता म्हणविणाऱ्याच्या तोंडीं हे अपशब्द फार छान शोभतात, नाहीं बरें ?

शोपेनहॉरच्या निनांवी व विशेषतः टोपणनांवी टीकाकारांबद्दलचा हा अभिप्राय वाचून एखाद्यास ' रामशास्त्र्या 'बाबत शोपेनहॉरचें अनुकरण करण्याची लहर येईल. याचा आगाऊ अजमास बांधूनच वरील मजकूर लिहिलेला आहे. परंतु, तसा प्रसंग आलाच, तर ' समान धर्मे ' या नात्यानें ' रामशास्त्र्या 'चा भार हलका करण्यास त्याचे ' सुहास '– ' साहित्यिका ' पासून तों थेट ' किरण '–' चंद्रशेखर 'पर्यंत सारे जुने–नवे टोपणनांवी मित्र धांवून येतील, असा त्याला दृढ विश्वास वाटतो !

ग्रंथकार सामान्य असो कीं असामान्य असो, मत्सरी लोकांमुळें त्यास यशोलाभ करून घेणें फार जड जातें, असें शोपेनहॉर म्हणतो! हें सांगतांना त्यानें एका सुंदर रूपकात्मक कथेचा उल्लेख केला आहे. एकदां सर्व पक्ष्यांची गुप्त मजलस भरली होती. ते पक्षी मोराविषयींच्या मत्सरानें सारखे जळफळत असून मोराचा सौंदर्याबद्दलचा दिमाख कसा नाहींसा करावा, हा त्यांजपुढें प्रश्न उभा राहिला होता! मोराचें सारें सौंदर्य, त्याचा सारा दिमाख त्याच्या चित्रविचित्र रम्य पिसाऱ्यांत सामावलेला आहे. याची त्या सर्वांस जाणीव होती. मजलशींत मोराचा नक्षा उतरविण्याबाबत गडकून 'भवति–न–भवति' झाली! अखेर कावळ्याच्या जातीचा एक पक्षी उद्गारला, "गड्यांनो! मोराचा गर्व हरण करण्याचा एकच उपाय आहे. तो हा कीं, कसेंहि करून त्याच्या पिसाऱ्याचें प्रदर्शन बंद पाडलें पाहिजे! पिसाऱ्याचें प्रदर्शन बंद झालें, म्हणजे मोराच्या सौंदर्याची कोण कशी तारीफ करणार? जी वस्तु दिसत नाहीं, ती मुळीं अस्तित्वांतच नसते, असें समजण्याची जगाची रीत आहे." या कथेंत गुंफण्यांत आलेलें तत्त्व किती मार्मिक आहे, हें सहृदयास सांगणें नकोच.

परंतु, हें तत्त्व साहित्यवनांतील जो जातिवंत मयूरपक्षी असेल, त्यालाच यथार्थत्वानें लागू होईल, हें ध्यानांत ध्यावयास पाहिजे. नाहीं तर उद्यां पंख असलेला वाटेल तो 'जीव' टीका झाली एवढ्याचकरितां स्वतःच्या अथवा आपल्या 'इष्टजनां'च्या पाठीवर मोरपिसारा उगवला असल्याची भ्रामक समजूत करून ध्यावयाचा आणि मग त्या "हौतात्म्या"च्या नशेंत तो अथवा त्याचा इष्टजन ज्याच्या–त्याच्यावर चंचूप्रहार करण्यास नाहक उद्युक्त व्हावयाचा!

शोपेनहॉर यानें भाषाशैलीसंबंधीं प्रदर्शित केलेले विचार सर्वसामान्य होण्याजोगे असेच आहेत. लेखकानें आपल्या लिखाणांत शक्य तर गहनांतील गहन तत्त्वें मांडावींत; पण त्याची शब्दयोजना मात्र सोप्यांतील सोपी असली पाहिजे, याबद्दल शोपेनहॉरचा विशेष कटाक्ष आहे. लेखनशैली पहावी, तों ती 'खूपच शब्दबंबाळ' व विचार पहावे तों ते अगदीं 'दरिद्री'

या विरोधाचा त्याला मनस्वी संताप येई! अशा प्रकारच्या 'जडजंबाल' लेखकांवर शोपेनहॉरनें जे कोरडे ओढले आहेत, त्यांचा थोडा मासला येथें दाखवितों—

"They take so much pleasure in bombast and write in such a high-flown, bloated, affected, hyperbolical and acrobatic style that their prototype is Ancient Pistol, whom his friend Falstaff once impiently told to say what he has to say **like a man of this world**."

'परस्परप्रशंसा' करण्याच्या पद्धतीबद्दल शोपेनहॉरनें "...the disgraceful way in which mutual friends will puff one another into a reputation." असे तुच्छतेचे उद्गार काढले आहेत, तेहि वाचकांस मनोरंजक वाटतील.

* * *

## १७० ॲल्डस हक्स्ले

'John O' London's Weekly' नें आपला २५ जुलैचा अंक 'हक्स्ले अंक' म्हणून काढला आहे. या अंकांत ॲल्डल्स हक्स्ले या प्रख्यात कादंबरीकाराविषयीं जोडसाहेबांनीं एक उत्कृष्ट लेख लिहिला आहे. त्या विस्तृत लेखाचा येथें सारांशहि देणें दुर्घट असल्यामुळें त्यांतील मुद्यांची माहिती तेवढी थोडक्यांत नमूद करतों.

ॲल्डल्स हक्स्ले यांचा जन्म २६ जुलै १८९४ रोजीं झाला. सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ टी. एच्. हक्स्ले हे ॲल्डल्स हक्स्ले यांच्या वडिलांचे वडील, आणि विख्यात कवि व टीकाकार मॅथ्यु अर्नोल्ड हे त्यांच्या मातोश्रींचे वडील. यावरून हक्स्ले यांचा जन्म केवढ्या नामांकित घराण्यांत झाला, याची कल्पना येईल. हक्स्ले यांचें शिक्षण ईटन व बॅलिअल कॉलेज, ऑक्स्फर्ड येथें झालें. विद्याभ्यास चालू असतांनाच हक्स्ले यांना एकाएकी अंधत्व प्राप्त झालें होतें! सुदैवानें २० व्या वर्षाच्या सुमारास त्यांची दृष्टि बरीचशी परत आली, व त्यांची एका महान् आपत्तींतून मुक्तता झाली! १९१९ मध्यें हक्स्लेसाहेबांचा विवाह झाला. त्यांचा मुलगा मॅथ्यु हा बापापासून चित्रकलेचा गुण घेऊन त्या विषयांत लौकिक कमावील, असा रंग दिसत आहे.

ॲल्डस हक्स्ले यांनीं कविता, लघुकथा, कादंबऱ्या, नाटकें व निबंध लिहून आपल्या बुद्धीचा चौरसपणा प्रगट केला आहे. तथापि, जनता त्यांना इतर नात्यापेक्षां कादंबरीकार याच नात्यानें जास्त ओळखते. यांच्या कांही ग्रंथांची नांवनिशी व त्यांचा मुद्रणकाळ येणेंप्रमाणें:—

'Leda' (Poems) 1920; 'Limbo' (short stories) 1920; 'Crome Yellow' (novel) 1921; 'Antic Hay' (novel) 1923; 'The Little Mexican' (short stories) 1923; 'Those Barren Leaves' (Novel) 1925; 'Two or Three Graces' (short stories) 1926; 'Point Counter Point' (novel) 1929; इ० इ० अलीकडे त्यांची 'Eyeless in Gaza' ही नवी कादंबरी प्रकाशित झाली आहे. या सर्व कृतींत 'Point Counter Point' ही कादंबरी विशेष भरदार (Substantial) आहे, असा जोडसाहेबांचा अभिप्राय आहे.

हक्स्ले हे अतिशय विद्वान् लेखक आहेत. इतके कीं, कोणताहि समकालीन कादंबरीकार पांडित्यामध्यें त्यांचा हात धरूं शकत नाहीं, असा जोड हे निर्वाळा देतात! या विद्वत्तेचा त्यांच्या कादंबऱ्यांवर अतिशय प्रभाव पडला आहे. त्यांत विद्वत्ताजन्य कल्पकतेचें कारंजें सदैव थुइथुइ नाचतांना आढळांत येतें! यामुळें त्यांच्या कादंबऱ्या म्हणजे सुविद्य वाचकांस बौद्धिक मेजवानीच वाटते! परंतु, या गुणाबरोबरच त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये दोन ठळक दोषहि शिरलेले आहेत. रचनेचें शैथिल्य व भावनेचा अभाव, हे ते दोन दोष होत. हक्स्ले यांच्या कादंबऱ्यांचें आणखी एक वैशिष्ट्य हें आहे कीं, त्यांत चांगले पुरुष व त्यांतहि चांगल्या स्त्रिया या तुरळकच नजरेस येतात! यामुळें हक्स्ले हे 'सैतानाचे भक्त' आहेत कीं काय, असाहि कित्येकांस संशय वाटतो! जोडसाहेबांस मात्र तसें वाटत नाहीं.

हक्स्ले हे 'कलेकरतां कला' या तत्त्वाचे भोक्ते नसून 'जीवनाकरतां कला' या तत्त्वाचे भोक्ते आहेत. त्यांच्या बहुतेक सर्व ललितकृति सहेतुक आहेत. जगाला त्यांना कांहीं तरी संदेश द्यावयाचा असतो, म्हणूनच ते लेखनाचा खटाटोप करतात. त्यांच्या तत्त्वज्ञानाचें सार 'Point Counter Point' या कादंबरींतील पुढील अवतरणांत बऱ्हंशीं उतरलेलें आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं:—

" Everybody strains after happiness, and the result is that nobody's happy. It's because they are on the wrong road. The question they ought to be asking themselves isn't: Why aren't we happy, and how shall we have a good time? It's: How can we please God, and why aren't we better? If people asked themselves these questions and answered them to the best of their ability in practice, they'd achieve happiness without ever thinking about. For it's not by pursuing happiness that you find it: it's by pursuing salvation."

* * *

## १७१ मेटरलिंक व नाटकांतील संगीत

परवां मी जगद्विख्यात कवि व नाटककार मॉरिस मेटरलिंक यांजसंबंधीं एक प्रबंध वाचीत होतों. मेटरलिंक यांना आपल्या नाटकांत संगीताचा उपयोग करणें फारसें आवडत नाहीं, असें त्या प्रबंधांत म्हटलेलें आहे.

मेटरलिंक यांची ही विचित्र अभिरुचि अवलोकन करून आमचे महाराष्ट्रीय नाटककार बहुधा स्तंभितच होतील! कारण, संगीताच्या बळावर तर नाटक यशस्वी करून दाखविण्याचा आमच्या बहुसंख्य नाटककारांनीं बेत योजलेला असतो! अर्थात् त्यांना मेटरलिंकची ही आत्मघातकी आवड कशी पसंत पडावी?

बाकी, मराठी नाटकांना बोलपटांनीं अलिकडे एवढ्या जोराचा धक्का दिला आहे कीं, नाटकांत संगीत असावें कीं नाहीं, अशासारख्या प्रश्नांची चर्चा करण्याचें सांप्रत प्रयोजनहि उरलेलें नाहीं! या धक्क्यांतून नाट्य-कला पूर्णपणें सांवरेल, तेव्हां कुठें अशा चर्चेचा उपयोग होईल!

—प्रतिभा, वर्ष ४, अंक १५

## १७२ गॉर्कीचे आक्षेपक

मॅक्झिम गॉर्की याची गणना ' कलावंत ' या नात्यानें पहिल्या प्रतीच्या लेखकांत होऊं शकते किंवा नाहीं, या प्रश्नावर आपल्याकडे एवढ्यांत बरीच खंडन-मंडनपर चर्चा होऊं लागली आहे. कित्येक विद्वानांच्या मतें गॉर्की निखालस दुय्यम दर्जाचा साहित्यिक ठरतो !

गॉर्कीच्या लेखनांत लालित्य सापेक्षतः कमी प्रमाणांत आढळतें, ही गोष्ट अगदीं सत्य आहे. परंतु, साहित्याचें महत्त्वमापन करण्याची लालित्य हीच एकमेव कसोटी आहे असें थोडेंच आहे? तसें असतें तर रॉबर्ट ब्राउनिंगची रसज्ञांनीं जी इतकी मातब्बरी मानली आहे, ती खचित मानली नसती! गॉर्कीचें वाङ्मय हें मुळीं लालित्यासाठीं नाहींच. तें ध्येयवादी असलें, तथापि त्याची जात वास्तववादाची आहे. वास्तव-वादाची व लालित्याची निव्वळच ' अत्रे-वरेरकरी ' नसली, तरी पण त्यांची ' अत्रे-अनंतरावी 'हि खात्रीनेंच नव्हे ! असें असतांना गॉर्कीच्या वास्तववादी साहित्यापासून नुसत्या ' **ललित गोष्टी** ' अपेक्षिणें कितपत समंजसपणाचें होईल? तशी अपेक्षा करणें म्हणजे आपली अभिरुचि पराकाष्ठेची कोती असल्याचें प्रदर्शन मांडणेंच होय !

गॉर्कीच्या वाङ्मयाचा आत्मीय गुण ' जीवंतपणा ' हा आहे. जे जीवंत वाङ्मयाचे भोक्ते आहेत, ते त्याच्या कृतींनीं मोहून गेल्याशिवाय कदापि राहत नाहींत ! मग त्या कृतींचा कस लालित्यांत किंचित् कमी उतरला, तरी त्यांना त्याची पर्वा नसते ! अर्थातच अशा जीवंत वाङ्मयकृतीला ' कला कला ' म्हणतात त्या वस्तूचीं सर्वच कोष्टकें अगर सर्वच वजनें-मापें बिनचूक लागूं कशीं पडावीं? जललहरींच्या सहस्र बाहूंनीं गगनमंडळास कवटाळूं पहाणाऱ्या महासागराच्या गर्जनेचें सारें वैभव तिच्या गंभीरपणांत सामावलेलें आहे. ती गर्जना मानवांनीं निर्मिलेल्या संगीताच्या क्षुद्र तालांत अथवा सुरांत बसत नाहीं, एवढ्यासाठीं तिला तुच्छ लेखणाऱ्या अरसिकाची

खरोखरच कींव केली पाहिजे! गॉर्कीच्या साहित्याविषयीहि असेंच म्हणतां येतें!

दुर्दैवानें आपल्याकडील शहाणीं–सुर्ती माणसें सुद्धां ललितवाङ्मयाबाबत भलतींच कोमल मनाचीं झालीं आहेत! टांकाची कागदावर होते तेवढी देखील 'करकर' ललितवाङ्मयांत झालेली त्यांना खपत नाहीं! मग त्यांत रणशिंगाचे जोरदार प्रतिध्वनि एकसारखे घुमूं लागल्यास ते त्यांना कसे सहन व्हावे? कविवर्य तांबे यांच्या 'रुद्रास आवाहन' व 'डोळे हे जुलमि गडे' या दोन कविता या लोकांच्या समोर टाकल्यास ते पहिलीपेक्षां दुसरी कविताच अधिक पसंत करतील! बरें, खुद्द कविवर्यांकडे पहावें तों काय, त्यांचीहि हुबेहूब तीच गत झालेली नजरेस येईल! केशवसुतांच्या कवितेंत शब्दमाधुर्य व गेयता हे गुण नसल्यामुळें कविवर्यांनीं तिची आपल्या शिष्यवरांजवळ कशी 'खिल्ली' उडविली होती, याचें स्मरण माजी 'रत्नाकर' मासिकाच्या वाचकांस असेलच!!

सांगण्याचा मुद्दा हा कीं, एरवीं उच्च प्रतीची रसिकता प्रगट करणाऱ्या व्यक्तीहि प्रसंगोपात्त 'बाह्य झळफळी'वरच आषक होतात! आणि अशी 'झळफळ' ज्या कृतींत नसते ती त्यांना नीरस, टाकाऊ वाटते! गॉर्कीच्या बऱ्याच आक्षेपकांचा समावेश याच कोटींत होतो, असें म्हणावयास हरकत नाहीं. या आक्षेपकांनीं त्याची 'Mother' ही कादंबरी सुद्धां रद्दड ठरविली आहे! खरेंच आहे. या कादंबरींत प्रणयाचें स्तोम नाहीं, कामुक वर्णनें नाहींत, मुद्दाम वेंचून काढलेले कोंवळे कोंवळे शब्द नाहीत, किंवा उपमा–उत्प्रेक्षांच्या कोल्हाटी उड्याहि नाहींत! अशी सर्वच बाबतींत 'नकार घंटा' वाजविणारी ही कादंबरी आमच्या लालित्यलोलुप पंडितांस कशी रुचावी? त्यांच्या दृष्टीनें ती साहजिकच अगदीं गचाळ ठरणार!

गरीब बिचारा मॅक्झिम गॉर्की! या नटव्या युगांत आंतल्या सजीवतेपेक्षांहि बाहेरच्या डामडौलांसच जास्त मोल येतें, हें 'दिव्य तत्त्व' त्याला कुठून अवगत असणार? त्यानें ज्या अर्थी रंगीबेरंगी पण 'निर्जीव' व निर्गंध कागदी फुलापेक्षां फिक्या रंगाच्या पण 'सजीव' व गंधयुक्त

पुष्पांना अधिक मान दिलेला आहे, त्या अर्थी आमचे हे ' कलावादी ' त्याला इतःपर कधींहि क्षमा करणार नाहींत ! या ' घोर पातका'चें फळ म्हणून ते आतां त्याला दुसऱ्या वा तिसऱ्या दर्ज्याच्या लेखकांत बसवून त्याचा कायमचाच सूड उगविणार !

* * *

## १७३ टॉलस्टॉय व रोमाँ रोलाँ

टॉलस्टॉय व रोमाँ रोलाँ यांच्यांत झालेल्या पहिल्या पत्रव्यवहाराची हकीकत नुकतीच वाचण्यांत आली, ती पुढें दिलेली आहे. या हकीकतीच्या रूपानें रोमाँ रोलाँ यांजविषयीं मला आज पुन्हां लिहावें लागत आहे, याबद्दल रा. खांडेकर हे मला क्षमा करतील काय? रोमाँ रोलाँ यांजसंबंधी मी कित्येकदां स्फुटें लिहिल्याबद्दल खांडेकरांचा मजवर कसा घुस्सा झाला आहे, हें माझ्या वाचकांस विदित आहेच ! ( ' प्रतिभा, ' वर्ष ४, अंक ६ पहा. )

४९ वर्षांपूर्वीची गोष्ट. पॅरिस शहरामधील एका २१ वर्षांच्या कलाप्रेमी तरुणास एकाएकीं एक भलें जाडजूड पत्र मिळालें. पत्र तब्बल ३८ पानांचें असून 'प्रिय बंधु' असा त्यावर मायना लिहिला होता व खालीं विश्वविख्यात कलावंत व तत्त्वज्ञ टॉलस्टॉय याची सही होती ! हें पत्र वाचून या तरुणास केवढी धन्यता वाटली असली पाहिजे, याची कल्पनाच केलेली बरी !

टॉलस्टॉयकडून मुळीं पत्र येईल, आणि तेंहि इतकें लांबलचक व ' दिलखुलास ' अशी त्या तरुणास खरोखरच बिलकूल अपेक्षा नव्हती ! कुठें टॉलस्टॉय व कुठें हा तरुण ! तशांत या तरुणाच्या ज्या पत्राला उत्तर म्हणून टॉलस्टॉयनें हें पत्र धाडलें होतें, तें टॉलस्टॉयकडे रवाना होऊन कितीतरी दिवस लोटले होते. खुद्द हा तरुण देखील त्या पत्राची आठवण विसरला होता ! यामुळें टॉलस्टॉयचें हें उत्तरात्मक पत्र अनपेक्षितपणें आलेलें पाहून हा तरुण साहजिकच अगदीं थक्क होऊन गेला !

टॉलस्टॉयला पाठविलेल्या वरील पत्रांत या तरुणानें कांहीं कलाविषयक शंका प्रदर्शित केल्या होत्या. टॉलस्टॉयचें एक पुस्तक या तरुणाच्या नुकतेंच वाचनांत आलें होतें. त्यांतील कलाविषयक मतें वाचून त्याच्या मनांत कांहीं

शंका उद्भूत झाल्या होत्या. त्याच त्यानें आपल्या पत्रांत ग्रथित केल्या होत्या. टॉल्स्टॉयसारखा थोर साहित्यिक आपल्यासारख्या अनोळखी तरुणास उत्तर पाठवील, अशी या तरुणास तिळमात्रहि आशा नव्हती! तथापि, उत्तर येवो किंवा न येवो, पृच्छापर पत्र धाडण्यास तरी काय हरकत आहे, असा विचार करून या तरुणानें हें पत्र टॉलस्टॉयला लिहिलें होतें! सुदैवानें टॉलस्टॉयचें उत्तरहि आलें!

स्टॉल्स्टॉयच्या या तत्त्वगर्भ पत्राचें सार पुढील शब्दांत सांगतां येईल; "**कलेचें प्रेम ही कलावंत होण्याची मुख्य अट नसून मानवजातीचें प्रेम हीच ती अट आहे. ज्याच्या हृदयांत मानवजातीबद्दल गाढ प्रेम वास करीत आहे, तेच 'कलावंत' या नात्यानें उपयुक्त कार्य करण्याची आशा बाळगूं शकतात.**"

उपरोक्त तरुण म्हणजे दुसरे-तिसरे कुणी नसून पुढील आयुष्यांत टॉलस्टॉयप्रमाणें विश्वविख्यात झालेले ( खांडेकर, माफ करा बुवा! ) रोमाँ रोलाँ हेच होत. टॉलस्टॉयच्या या पत्राचा रोमाँ रोलाँ यांच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, अंतःकरणाच्या तळमळीनें लिहिलेल्या कोणत्याहि पत्रास उत्तर द्यावयाचें असा त्यांनीं दृढ निश्चय केला, व तो आजवर अमलांतहि आणला! निराशा-तिमिरांत चांचपडणाऱ्या कितीतरी जीवांना रोमाँ रोलाँ यांनीं पत्रद्वारें आशाकिरण दाखविलेले आहेत!

रोमाँ रोलाँ यांच्या 'I will not rest' या नव्या पुस्तकाचा मथळा टॉलस्टॉयच्या 'I cannot be silent' या मथळ्याचा जुळा भाऊच होय!

* * *

## १७४ शॉ आत्मचरित्र कां लिहित नाहींत!

बर्नार्ड शॉ यांनीं आपलें आत्मचरित्र लिहिल्यास तो बहुधा त्यांच्या ग्रंथसंभारांतील सर्वांत मनोरंजक ग्रंथ ठरेल, हें निर्विवाद आहे. परंतु, शॉ असा प्रयत्न कां करीत नाहींत, हें कोडें पुष्कळांस पडलें होतें, तें एक ऑगस्टच्या 'John O 'London's Weekly मध्यें जे. एस. कॉलिस यांनीं सोडविलें आहे. ते म्हणतात,

" The real answer (to the question why Bernard Shaw does not write his autobiography ) is that he lacks final personal vanity. He has nothing to work off his chest. He has always been a man without personal anger, rancour or malice. He is the supremely well-tempered man. He has forgiven everything – others and himself. He refuses to regret what he has missed and sacrificed – and he has renounced a tremendous amount in order to do his work, in order to be Bernard Shaw. That is to say, he is a great and a rare person. And for such a person there is no stimulus to write an autobiograhy"

शॉ यांनीं आत्मचरित्र न लिहिण्याची ही कारणमीमांसा अनेकांस अभिनव वाटेल !

बर्नार्ड शॉ हे भारी अहंमन्य आहेत– स्वतःचीं जाहिरात करण्यांत ते बडे वाकबगार आहेत, अशी बऱ्याच लोकांची त्यांजबद्दल भावना आहे. तिजमुळें एका गृहस्थाची कशी फसगत झाली, त्याचें कॉलिस साहेबांनीं बहारदार वर्णन केलें आहे ! शॉ हे ' G. B. S. ' या आपल्या संपूर्ण नांवाच्या आद्याक्षरांनीं सर्वपरिचित झाले आहेत. वरील गृहस्थानें एकदां एका हॉटेलसमोर शॉ यांची मोटार पाहिली. मोटारीवर G. B. (Great Britain ) अशीं अक्षरें लिहिलेलीं होती. परंतु, शॉ यांजविषयींच्या उपरोक्त गैरसमजामुळें हीं अक्षरें ' G. B. S. ' अशीं आहेत, असा या गृहस्थास भास झाला, व त्यामुळें शॉ यांच्या अहंमन्यतेबद्दल त्याची पुरतीच खात्री पटली ! जगांत गैरसमज उत्पन्न होऊन वाढीस लागतात, ते असे !

* * *

## १७५ साम्यवाद्यांचा ' आंतर हेतु '

खांडेकर-माडखोलकरादि 'कर-पंचका'चे पोवाडे गाण्याचा आलिकडे कांहीं साम्यवाद्यांनीं सपाटा चालविला आहे, हें सर्वश्रुतच आहे. ' कर–पंचकां 'त समाविष्ट करण्यांत आलेले साहित्यिक गुणी आहेत, याबद्दल वाद नाहीं. तसेंच, त्यांच्या गुणांची कुणी तारीफ केल्यास तिजबद्दलहि सहसा तक्रार

होणार नाहीं. परंतु, साम्यवादी त्यांची जी स्तुति करतात, तिच्या बुडाशीं कांहीं ' आंतर हेतु ' असावा काय, असा संशय उत्पन्न होतो, व तो अर्थात्‌च सकारणहि असतो.

' साहित्य आणि समाजजीवन ' या ग्रंथांत रा. लालजी पेंडसे यांनीं कर–पंचकाचा जो गौरव केला आहे, तो कदाचित्‌ ' आंतरहेतू 'नें प्रेरित झालेला नसून प्रांजलहि असेल. परंतु, सर्वच साम्यवाद्यांचा तसा प्रकार नसतो, हें त्यांच्या बोलण्यावरून पुष्कळदां प्रत्ययास येतें. ' प्रतिभे 'च्या गेल्या अंकांतील रा. पु. य. देशपांडे यांचा लेख वाचून एक नवोदित साम्यवादी उद्गारलेः " पेंडशांनीं 'कर-पंचका'ची स्तुति गाइली, या गोष्टीला ' पी. वाय्‌. ' यांनीं एवढें महत्त्व देण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. लालजींचें काय असेल तें असो. आम्ही कांहीं लोक मात्र ' कर–पंचका 'च्या लेखनगौरवाकडे प्रचारकी दृष्टीनेंच पाहतों ! साम्यवादाचा प्रचार करणारे अगर करूं इच्छिणारे नामवंत साहित्यिक मराठींत जवळ जवळ नाहींतच. ' कर–पंचकां 'तील खांडेकर, माडखोलकर प्रभृति वाङ्मयसेवक हे ' फॅशनेबल लेखक ' आहेत ! ' फॅशनेबल ' या अर्थानें कीं, जनतेंत जो विचार नव्यानें उदित होत असेल व जो पुढेंमागें लोकप्रिय होण्याचा संभव असेल, त्याचा कळेल तसा व झेपेल तेवढा हिरिरीनें पुरस्कार करण्याकडे या साहित्यिकांची प्रवृत्ति असते ! ती ओळखूनच साम्यवादाचा प्रचार होण्यासाठीं आम्ही लोक त्यांना आंजारत–गोंजारत असतों ! एरवीं, ' पी. वाय्‌.' सांगतात तें त्यांचें ' जिनगरी शब्दपंडित्य ' किंवा 'कृत्रिमपणा' आमच्या ध्यानांत आलेला नाहीं, असें थोडेंच आहे ?..." इ. इ.

हें विधान खरें असल्यास ' कर–पंचका 'ला " देवा ! आमच्या मित्रांपासून आमचें रक्षण कर !—" असें साम्यवाद्यांबाबत म्हणण्याची पाळी आल्यावांचून खचित रहाणार नाहीं ! कारण अशा प्रकारच्या स्तुतीपेक्षां उघड निंदा शतपटीनें चांगली, हें काय सांगावयास पाहिजे !

इकडे साम्यवादी केवळ प्रचारकी वाणीनें ' करपंचका 'ची वाहवा करतात, तर तिकडे खांडेकरांसारखे वाग्भट त्या प्रकारच्या स्तुतीनें भाळून

आऊन कालिदास–भवभूतीपासून तों थेट फडके–पु. य. देशपांड्यांपर्यंत सर्वांवर एकजात तुटून पडतात, हें दृश्य पाहून तिऱ्हाइतांस खरोखरच कमालीची मौज वाटते !

* * *

## १७६ प्रो. वा. म. जोशी यांची साक्ष

खांडेकरादि लेखकांनीं चितारलेलीं खालच्या वर्गांची चित्रें किती नकली असतात, याची साक्ष कंपूवाल्यांखेरीज इतर कुणीहि देईल ! प्रो. वा. म. जोशी यांनीं पुण्यांतील 'गॉर्की–दिना'च्या प्रसंगीं अध्यक्षपदावरून जें भाषण केलें, त्यांत त्यांनीं कुणाचा नामनिर्देश न करतां पण उघड उघड लक्षांत येईल, अशा रीतीनें ह्याच मुद्दा मांडलेला आहे. त्यांचीं मूळ वाक्यें अशी : " गॉर्कीचें महत्त्व यांत आहे कीं, त्याला खालच्या वर्गांचें जीवन माहीत होतें व तें त्यानें रेखाटलें. **आम्ही हल्लींचे लेखक निकृष्टवर्गीय जीवनाचें वर्णन करतों, पण तें खरें नसतें, ही गोष्टहि सत्य आहे. कारण, आम्हाला तें जीवन माहीत नसतें. आम्ही पुष्कळसे शाब्दिक खेळ खेळणारे आहोंत; गॉर्कींत होती ती तळमळ आमच्यांत नाहीं.**" (' ज्ञानप्रकाश,' १९ ऑगस्ट १९३६ )

प्रो. वामनरावजींनीं ' शाब्दिक खेळ खेळणारे ' अशा शब्दांनीं उल्लेखिलेले हे ' **जिनगरी शब्दपंडित** ' कोण असावेत, याची निराळी फोड करावयास नकोच !

* * *

## १७७ ग्रंथसंग्रहालयाचा संकुचितपणा !

मुंबई येथें ठरल्याप्रमाणें १५ ऑगस्ट रोजीं ' गॉर्की–दिन ' साजरा झाला. ' गॉर्की–दिनाच्या कार्यक्रमांत सामील होण्याबद्दल मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या व्यवस्थापकांना विचारणा करण्यांत आली होती. परंतु गॉर्कीचा मराठी साहित्याशीं कांहींच संबंध नसल्यामुळें या कार्यक्रमांत ग्रंथ-संग्रहालयाला भाग घेतां येत नाहीं, असें व्यवस्थापकांनीं सरळ सरळ

कळविल्याचें वृत्त बाहेर आलें आहे! महाराष्ट्रीयांची संकुचित बुद्धि पुष्कळदां प्रत्ययास येते, तिचा हा ताजा मासला होय!

मला वाटतें उद्यां वाल्मीकि–व्यास यांच्यासारख्या ऋषि–श्रेष्ठांच्या पुण्य-स्मरणार्थ एखादा समारंभ व्हावयाचा असला तरी देखील उपरोक्त व्यवस्थापक वरीलसारखेंच उत्तर देतील!

वाल्मीकि–व्यास हे महान् तपस्वी व कवि असतील, त्यांनीं रामायण–महाभारतासारखे हिंदूंचे पूज्य ग्रंथ लिहिले असतील, त्यांच्या ग्रंथांची भाषा संस्कृत ही असेल, आणि ती संस्कृत भाषा मराठी भाषेची आजीसुद्धां असेल; परंतु वाल्मीकि–व्यासांनीं ज्या अर्थी मराठींत एक ओळहि खरडली नाहीं, त्याअर्थी त्यांच्या समारंभांत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें सामील कसें बरें व्हावें?

मागें उल्लेखिलेल्या पुण्याच्या ‘ गॉर्की–दिना ’च्या या सभेंत प्रो. वा. म. जोशी यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले, ते मी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या व्यवस्थापकांस नजर करतों: “ **मला आनंद एवढ्याकरतां वाटतो कीं, एका रशियन माणसाबद्दल आपणांस आपलेपणा वाटूं लागला. आजच्या समारंभावरून ‘ मराठा तितुका मेळवावा ’ ही संकुचित दृष्टि गेली याबद्दल मला आनंद होतो.** ” (‘ज्ञानप्रकाश’, १९ ऑगस्ट)

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १६

## १७८ तात्त्विक वादांतील अभिनिवेश

बरोबर म्हणा कीं चुकीची म्हणा, आपणां महाराष्ट्रीयांची ‘ भांडखोर ’ म्हणून सडकून बदनामी झालेली आहे, एवढें खरें ! या बाबतींत एक मौजेचें उदाहरण देतां येण्यासारखें आहे. ‘ विविधज्ञानविस्तार’च्या सप्टेंबर १९२८ च्या अंकांत प्रो. चिं. वि. जोशी यांनीं ‘ देशी भाषांचें प्राचीनत्व ’ या नांवाचें एक टिपण प्रसिद्ध केलें होतें, तें पुष्कळ वाचकांच्या लक्ष्यांत असेलच. या टिपणांत चैत्र, कृष्ण १४, शके ७०० ( इ. स. ७७८ ) रोजीं अपराण्हीं लिहून पूर्ण झालेल्या ‘ कुवलयकथामाला ’ नामक अपभ्रंश भाषेंतल्या काव्यामधलें पुढील अवतरण आलेलें आहे.

**मूळः**—दढमडहसामलंगे सहिरे अहिमाणकलहसीले य । ‘ दिण्णले–गहिल्ले ’ उल्लविरे तत्थ मरहट्ठे ॥

**अर्थः**— बळकट, ठेंगण्या, सांवळ्या अंगाच्या, काटक, अभिमानी, भांडखोर, ‘ दिण्णले ’ ( दिले ), ‘ गहिल्लें ’ ( घेतले ) असें बोलणाऱ्या मराठ्यांस ( त्यानें पाहिलें ).

या अवतरणावरून आपण महाराष्ट्रीय ‘ अभिमानी ’ व ‘ भांडखोर ’ म्हणून हजार–बाराशें वर्षांपूर्वीं देखील कसे गाजलों होतों, याचें प्रत्यंतर येईल ! परप्रांतीयांचा व कित्येक स्वकीयांचा सुद्धां आजहि हाच अभिप्राय पडतो !

तसेंच पाहिलें, तर भांडखोरपणा हा मूलतः अगदींच गर्हणीय खाचित नव्हे. भांडखोर असणें हें निदान जीवंतपणाचें तरी एक खात्रीचें लक्षण आहे. शेळपटपणा किंवा ‘ अजगरवृत्ति ’ यांपेक्षां भांडखोरपणा हा शतपटीनें बरा ! भांडखोर असलेल्या व्यक्तीस अगर समाजास योग्य दिशेनें नेलें असतां तिजकडून अगर त्याजकडून पसंगोपात्त चार–दोन तडफेचीं कामें निःसंशय करून घेतां येतील ! परंतु नेभळटांचा किंवा ‘ जडभरतां ’चा असा उपयोग कितपत होऊं शकेल ? अग्निकणांप्रमाणें धूलिकण चटका

देणारे नसतील; तथापि, अग्निकणांत मोठमोठीं कार्यें पार पाडण्याचें जें प्रचंड राक्षसी सामर्थ्य वास करीत असतें, तें धूलिकणांत सुतराम् वास करीत नाहीं, हेंहि सर्वपरिचितच आहे !

भांडखोरपणाच्या या ' महिम्नस्तोत्रा 'वरून माणसानें उठल्याबसल्या भांडखोरपणाचा अंगीकार करावा, असें मला सूचित करावयाचें नाहीं. उलटपक्षीं, तात्त्विक वादविवादासारख्या प्रसंगी भांडखोरपणाची झांवळ झांवळ देखील छाया आपल्यावर पडूं नये, असेंच माझें मत आहे. भांडखोरपणाच्या 'पोटीं' त्याचा 'जनक' अभिमान ऊर्फ अभिनिवेश अर्थात् आलाच ! तात्त्विक वादांत अभिनिवेश व तज्जन्य भांडखोरपणा शिरला कीं, त्या विषयाचे धिंडवडे निघालेच म्हणून समजावें ! अभिनिवेशामुळें तो वाद निकालांत म्हणून कधीं निघावयाचाच नाहीं ! दिवाणी दाव्याच्या निकालाचा दीर्घसूत्रीपणा सुद्धां त्यापुढें अगदीं रद्द ठरेल ! हेंच पहा ना. शिवजन्मतिथीच्या प्रश्नावर महाराष्ट्रीय इतिहाससंशोधकांचें केवढें अटीतटीचें रणकंदन झालें ! पण, त्याची फलश्रुति काय झाली ?– तर सर्वसामान्य वाचकांचा घोंटाळा ! इतके उलटसुलट पुरावे पुढें येऊनहि दोन्ही बाजूंच्या पंडितांचें एकमत कांहीं केल्या होतच नाहीं ! आतां, फक्त एकच गोष्ट काय ती शिल्लक राहिली आहे ! ती ही कीं, एखादा लोकोत्तर चमत्कार घडून येऊन त्यामुळें खुद्द शिवाजी पुन्हां अवतीर्ण व्हावयाचा व त्यानें स्वमुखानें सांगावयाचें, " आपण अमुक सालीं जन्मलों—" म्हणून ! ! असें झालें तरच या संशोधकांची ही केशाकेशी थांबली तर थांबेल ! परंतु, या संशोधकांतहि प्रत्यक्ष शिवाजीलाच खोटा ठरविणारे कांहीं खप्पीदास निघणारच नाहींत, याची काय शाश्वति सांगावी ?

महाराष्ट्राच्या सुदैवानें आपल्याकडील सारेच विद्वान् असे दुराग्रही नाहींत. पुष्कळांनीं स्वतःचे प्रमाद घडल्याचें अगर मतपरिवर्तन झाल्याचें स्वच्छ कबूल केलेलें आहे ! अलीकडल्या काळांतील अशा प्रांजल विद्वानांत **प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे** यांची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. एवढ्यांत प्रसिद्ध झालेला त्यांचा ' निरुक्ताचें भाषांतर ' हा बृहद्ग्रंथ त्यांच्या गाढ विद्वत्तेप्रमाणेंच त्यांच्या अनुकरणीय प्रांजलपणाचीहि उच्चरवानें ग्वाही

देत आहे! प्रो. राजवाडे यांचा परवांच्या ' विस्तारां 'तील ' दातारशास्त्री व उत्तरारुणप्रकाश ' हा लेख देखील तीच साक्ष देतो! या लेखांतील प्रोफेसरसाहेबांचीं पुढील वाक्यें पहा: 'ऋग्वेदांतील ऋचांत धनपर अर्थ आहे, अशी कांहीं कारणानें माझी समजूत झाली होती, व प्रत्येक ऋचेचा धनपर अर्थ करण्याची मीं खटपट केली, पण पुष्कळ काल गेल्यावर जेव्हां ते अर्थ मीं पुन्हां वाचले, तेव्हां आपण केलेले बरेचसे धनपर अर्थ ओढाताणीचे आहेत, अशी मनाची खात्री झाली. हा एक प्रकारचा हटवाद आहे..." असा सरळसरळ कबुलीजबाब देण्यास थोडेंथोडकें मनोधैर्य लागत नाहीं!

तात्त्विक वादांत प्रांजलपणा असावा, याचा अर्थ त्यांत चंचलपणा आणावा असा खासच होत नाहीं! तात्त्विक वादामध्ये हटवाद जसा त्याज्य, तसेंच चांचल्यहि त्याज्यच होय! धांदरटपणानें आज एक मत बनवायचें व त्याची तरफदारी करीत सुटावयाची, आणि उद्यां तितक्याच धांदरटपणानें मागील मताच्या नेमकें उलट मत बनवावयाचें व त्याचीहि तेवढ्याच उत्साहानें तरफदारी करीत सुटावयाची – हा प्रकार कितीसा उचित म्हणतां येईल बरें? अशा चंचलप्रकृति पंडितांनीं "Consistency is the virtue of an ass—" हें केळकरी सूत्र आपलें ध्येयवाक्य म्हणून ठरविलें असेल, तर नकळे!! परंतु असलें ध्येयवाक्य त्यांचें त्यांनाच लखलाभ असो!

एखादें मत विचारपूर्वक बनविल्यानंतर उत्तरपक्ष करणारा ते साधार खोडीपर्यंत त्याला चिकटून राहण्यांत व त्याचें प्रतिपादन करण्यांत गैर ते काय आहे? तसें न केल्यास या मतप्रतिपादकांचे ' **न. चिं. केळकर** ' अथवा '**वा. म. जोशी**' झाल्यावांचून कदापि राहणार नाहींत! आक्षेपकांकडून कित्येक वेळां मूळ मुद्दा खोडला जात नाहीं; पण त्यांच्या आरडाओरड्या-मुळें तो खोडला गेला, असा तिऱ्हाईतांस भास मात्र होतो! अशा प्रसंगीं पूर्वपक्ष करणाऱ्यानें आपल्याच पक्षाचें पुन्हां समर्थन केल्यास त्याजवर अभिनिवेशाचा, हटवादाचा किंवा भांडखोरपणाचा आळ आल्याखेरीज सहसा रहात नाहीं! मताचा ठामपणा व अभिनिवेश यांच्या मरहद्दी

एकमेकांस इतक्या भिडलेल्या आहेत, आणि त्यांतील सीमारेषा इतकी सूक्ष्म आहे कीं, एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत पदार्पण झालें किंवा नाहीं याचा निर्णय भल्याभल्यांसहि होत नाहीं ! तेव्हां मतप्रतिपादकानें अभिनिवेशाच्या नुसत्या आरोपाला बिचकून कसें चालेल ?

जातां जातां हेंहि नमूद केलें पाहिजे कीं, शिवजन्मतिथीच्या वादाचा वर जो निर्देश केला आहे, तो केवळ उदाहरणादाखलच केलेला आहे. या वादांतील उभय बाजूंच्या संशोधकांना स्वतःचा पुरावा बिनतोड आहे, असें प्रांजलपणें वाटत असणें शक्य आहे. सदर उल्लेखावरून त्यांच्या प्रांजलपणाबद्दल मी शंका घेतों, असें अनुमान कृपा करून कुणी काढूं नये.

* * *

## १७९ लेखक स्वतःची कृति वाचतात काय ?

मुद्रणानंतर लेखक स्वतःची कृति वाचतात काय, हा एक अतिशय मनोरंजक प्रश्न आहे. या प्रश्नांचीं उत्तरें त्या त्या लेखकाच्या मनोधर्माप्रमाणें निरनिराळीं द्यावीं लागतील. निव्वळच थिल्लर लेखक जे असतील, ते आपल्या कृतीचीं पारायणावर पारायणें करतील, त्यांच्याहून कांहींशा गंभीर वृत्तीचे जे लेखक असतील; ते आपली कृति फार फार तर एखाद–दुसरा वेळ वाचतील, व नंतर बाजूस ठेवून देतील; आणि अतिशयित गंभीर वृत्तीचे जे लेखक असतील, त्यांना स्वतःची कृति स्वतः वाचणें हें अत्यंत आक्षेपार्ह वाटण्याचाच जास्त संभव आहे ! या शेवटल्या वर्गांत समाविष्ट होणारे लेखक अत्यल्पच असतील, हें उघड आहे.

मनोधर्माप्रमाणेंच वयोमानानुसारहि स्वतःची कृति वाचण्याबाबत लेखकांची प्रवृत्ति बदलूं शकेल. तसेंच, जे लेखक पुढील आवृत्तीसाठी आपल्या कृतीवर सफाईचा हात फिरविण्याच्या उद्देशानें किंवा, इतरांनी आपल्या कृतीवर घेतलेल्या आक्षेपांचें निरसन करण्याच्या बुद्धीनें तिचें वाचन करतात, त्यांचे आणखी स्वतंत्र वर्गच मानावे लागतील. तात्पर्य, वरील वर्गीकरण हें अगदींच स्थूल मानानें केलेलें आहे, हें येथें सांगून ठेवणें अत्यवश्य आहे.

किल्येकांस स्वकृतीचें वाचन करणें हें शिष्टाचारास सर्वथैव सोडून असल्याचें वाटतें! परंतु वस्तुतः असा दूषितग्रह होण्याचें कांहींच कारण नाहीं. स्वतःची कृति वाचणें हें आरशांत स्वतःचें तोंड पहाण्यासारखेंच एक कृत्य आहे. आपलें तोंड आरशांत कोण पाहत नाहीं? फक्त तें अष्टौप्रहर पाहत असूं नये म्हणजे झालें! तोच न्याय स्वकृतिवाचनासहि लागूं करावयास पाहिजे.

हस्ताक्षरांतील मजकुराची मुद्रणसंस्कारानंतर कशी अद्‌भुत ‘कायापालट’ होते, याची यथार्थ कल्पना खुद्द लेखकांशिवाय इतरांस येणें दुर्घट आहे! खेडवळ पोषाख केलेला गृहस्थ व व्हाईट वे लेडलॉ कंपनीचे कपडे परिधान केलेला गृहस्थ यांच्यांत जें अंतर आहे, तेंच हस्ताक्षरांतील मजकूर व मुद्रित मजकूर यांच्यांत असतें, असें म्हणावयास हरकत नाहीं! (‘प्रभात’ व ‘प्रभा’ पत्राच्या मुद्रकांनो! या वाक्याबद्दल आपण मला क्षमा कराल का?) कै. विनायक कोंडदेव ओक हे आपली कविता छापल्याखेरीज कुणास दाखवीत नसत, असें म्हणतात. त्यांत खरोखरच पुष्कळ अर्थ आहे!

मात्र स्वतःच्या लिखाणाची प्रुफें जे लेखक स्वतःच तपासतात, त्यांना तें मुद्रित स्वरूपांत वाचून विशेष आनंद होणें शक्य नाही. प्रुफें तपासल्या-वर त्या लिखाणाची इतकी शिसारी येते कीं, मध्यंतरी बराच काळ लोटल्यावांचून तें हातांत धरावेंसें सुद्धां वाटत नाहीं! बरें, प्रुफें स्वतः न तपासावीं, तर स्वप्नांतहि न येणाऱ्या भयंकर मुद्रणदोषांमुळें आपली ‘बुद्धि’ अजिबात चळली, अथवा आपलें ‘बिंग’ सपशेल बाहेर पडलें, असा वाचकांचा नाहक गैरसमज व्हावयाचा!! अशा स्थितींत बहुतेक लेखकांना प्रुफें स्वतः तपासल्याखेरीज दुसरा कोणता मार्ग उरतो?

आंग्ल साहित्यिक न्यूमन हा आपली मुद्रित कृति प्रायः कधींच वाचीत नसे. मुद्रित कृति वाचल्यानंतर तींत अकटविकट मुद्रणदोष झाल्याचें निदर्शनास यावें, ते दोष दुरुस्त करण्याचा कांहींहि उपाय शिल्लक राहूं नये, आणि त्यामुळें अंतःकरणास दीर्घकालपर्यंत हळहळ वाटत जावी, या सर्व याता-

यातीपेक्षां ती कृति मुळीं न वाचलेलीच चांगली, अशी न्यूमनची बहुधा विचारसरणी असावी !

दुसरा आंग्ल साहित्यिक हॅझ्लिट् हा आपली मुद्रित कृति वाचीत असे, पण तिच्या वाचनानें त्याला फारसें समाधान मात्र लाभत नसे ! एक तर हॅझ्लिट हा आधींच आपल्या लिखाणावर मुद्रणापूर्वी वारंवार सफाईचा हात फिरवावयाचा; तशांत तो प्रुफेंहि स्वतःच तपाशीत असल्यामुळें तर त्याच्या लिखाणांतील नावीन्य निदान त्याच्यापुरतें तरी पार नष्ट होत असे ! अर्थात् तें लिखाण त्याला आनंद कसा काय देऊं शकेल ? स्वतःच्या कृतीपासून आनंद व्हावयाचा असल्यास ती कृति आपण निर्माण केली, ही जाणीव ससूळ नाहींशी व्हावयास पाहिजे; नाहीं तर, त्या लिखाणांतील शब्द, विचार वा विकार यांपासून चित्तांत कसलेंहि अनुकरण उत्पन्न होणार नाहीं, असें हॅझ्लिट म्हणत असे !

स्टीव्हन्सनचा अनुभव थेट हॅझ्लिटसारखा होता ! तो म्हणावयाचा, " I might read the ' Rig Veda ' in the original, but never ' Treasure Island. ' ही यादी आणखीहि वाढवितां येईल.

* * *

## १८० कवि यशवंत यांचें भाषण

बडोदें येथील महाराष्ट्र–शारदा–मंडळाचें तृतीय वार्षिक संमेलन पुण्याचे कवि यशवंत यांच्या अध्यक्षतेखालीं नुकतेंच पार पाडलें. या प्रसंगी यशवंतांनीं जें भाषण केलें, तें अगदीं निराशाजनक आहे ! त्यांच्या या भाषणाचा सर्व रोख कांहीं विशिष्ट व्यक्तींना झोडपून काढण्याचा आहे ! परंतु, मौज ही कीं, याच भाषणांत त्यांनीं टीकाकारांचे वाभाडे काढलेले आहेत ! यशवंतांचीं पुढील वाक्यें पहाः—

( १ ) " सध्यांच्या मराठी नियतकालिकांवर दृष्टि फेंकणारांना जर कांही चटकन् दिसत असेल, तर निरनिराळे वाद; आणि वाद म्हणजेच टीका-प्रहार ! ज्याला जें हत्यार सांपडेल, त्यानें तें सर्व वाङ्मयावर उगारीत सुटावें, असा प्रकार दिसतो. "

(२) "ह्यातांत काय आहे आणि आपण तें कशावर चालवितों, ह्याचा पोंच नसलेलीं हीं दृश्यें जवळजवळ वाङ्मयप्रांगणांतहि आज दिसत आहेत!"

(३) "वृत्ति गढुळलेली नाहीं, मनाचा तोल सुटलेला नाहीं, असा टीकाकारच सहसा आढळत नाहीं. आपलें समर्थन करण्यासाठीं लेखणी उचलतांना ती दुसऱ्याच्या वर्मावर कशी बसेल, हें पहाण्याकडेच सगळा भर!"

यांतील तिसऱ्या अवतरणाकडे मी वाचकांचें प्रामुख्यानें लक्ष्य वेधूं इच्छितों. यशवंत म्हणतात त्याप्रमाणें, वर्मावर घाव घालणें अयोग्य आहे, हें मलाहि मान्य आहे. तथापि वर्मावर प्रहार करूं नये, असें म्हणणारे लोकच वर्मावर प्रहार करण्यास चुकत नाहींत, याला काय म्हणावें? ता.२९ मे च्या 'ज्ञानप्रकाशां'त कवि यशवंत यांनीं प्रो. श्री. म. माटे यांना जें उत्तर दिलेलें आहे, त्यांत खालीं दिलेला तडाखा आढळतो: "श्री. तात्यासाहेब केळकर यांचें शिक्षणप्रसारक संस्थेशीं असलेलें नातें लक्ष्यांत घेतां माटे यांनीं तात्यासाहेबांना "महानुभाव" म्हणून आळवण्याशिवाय गत्यंतर नाहीं, आणि त्यांची शिकवण पत्करल्याशिवाय निर्वाह नाहीं" —हा वर्मावर घाव नव्हे काय, असा यशवंतांना माझा सवाल आहे!

बडोद्याच्या याच भाषणांत कारकुनी, उपसंपादकगिरी किंवा मास्तरकी यांजवरून कुणावरहि तुटून पडूं नये, अशी यशवंत मागणी करतात. या मागणीला कुणाचाहि दुजोराच मिळेल, यांत शंका नाहीं. तथापि, खुद्द कवि यशवंत हे याहि बाबतींत घसरले आहेत, याचा प्रत्यय त्यांच्या "ज्ञानप्रकाशां"तील उपरोक्त लेखावरूनच येईल! सदर लेखांत त्यांनीं प्रो. माटे यांची धंद्यावरून टवाळी केली आहे! त्याचें मूळ वाक्य असें: "पण दुसऱ्याचा येळकोट काढणाऱ्यानें स्वतःचें पागेपण तरी विसरावयाला नको होतें. मूळ मुद्यांचा पत्ता नसलेली ही कानशिलांत! माझें दूरच राहो; पण असला पोकळ पंतोजीपणा कॉलेजमध्यें देखील चालणार नाहीं!" फक्त तीन महिन्यापूर्वी आपण काय लिहिलें, याची देखील

यशवंतांना दाद नसावी व उदात्तपणाचा आव आणून त्यांनीं इतरांस कमी लेखावें याचें आश्चर्य वाटतें !

अथवा, यांत आश्चर्य तरी कसलें ? आपल्याकडील कित्येक साहित्यिकांची कांहीं चमत्कारिकच मनोवृत्ति बनलेली आहे ! "आम्ही दुसऱ्याविषयी काय वाटेल तें लिहूं, टीका करूं, वर्मावर प्रहार करूं, हवा तसा धुडगुस घालूं; पण आमच्याविरुद्ध मात्र कुणी 'ब्र'हि काढूं नये ! लिहावयाचेंच असेल, तर आमच्याबद्दल फक्त स्तुतिपर लिहा ! नाहीं तर, आम्ही तुमच्यावर 'हेवा-दावा,' 'प्रांतिकता' इ० इ० अनेक दोष लादूं !–असेंच जणूं काय हे साहित्यिक टीकाकारांना म्हणत आहेत ! त्यांचा हा 'वटहुकूम' पाळावयाचा काय, हेंच स्वतंत्र वृत्तीच्या टीकाकारांनीं ठरवावयाचें आहे !

उपसंपादकगिरीबद्दल कुणी कुणाला हिणविल्यास यशवंतांचें कविहृदय हळहळतें, व ते त्या उपसंपादकाच्या साह्यास लगबगीनें धांवून जातात ! पण, या उपसंपादकांनीं जेव्हां आपल्या हस्तकाकरवीं इतरांस 'धंदेवाईक संपादक' म्हणून नांवें ठेवण्याचा सपाटा चालविला होता,* तेव्हां मात्र यशवंतांनीं निषेधाचा एक शब्दहि उच्चारला नाहीं, या पंक्तिप्रपंचावरून वाचकांनीं काय तो बोध घ्यावा !

वर 'प्रांतिकते'चा उल्लेख आलेला आहे, तो काल्पनिक नाहीं. स्वतः यशवंतांनींच एका साहित्यिकावर हा आरोप केलेला आहे ! त्यांचें मूळ वाक्य असें : "समग्र टीकालेख समाजसत्तावादाचें प्रचारकत्व पत्करून आणि **प्रांतिकतेंतून उद्भवलेल्या हेव्यादाव्यांच्या आहारीं जाऊन** लिहिलेला आहे, हें कोणाहि निर्लेप मनाच्या वाचकाला कळून येण्यासारखें आहे." यशवंतांनीं प्रस्तुत आरोप रा. पु. य. देशपांडे यांजवर त्यांच्या 'प्रतिभे'तील 'साहित्य आणि समाजजीवन' या लेखमालेवरून केलेला आहे. रा. देशपांडे हे आपल्यावर करण्यांत आलेल्या आरोपांचा

---

*'महाराष्ट्र' ता. १५ मार्च १९३६ यांतील 'महाराष्ट्राच्या केंद्राची ओढाताण' हा लेख पहा.

समाचार घ्यावयास पूर्णपणें समर्थ आहेत. त्यांच्या तर्फेनें येथें विशेष लिहिण्याचें बिलकूल प्रयोजन नाहीं. तथापि, एवढें सांगणें जरूरीचें आहे कीं, यशवंत किंवा त्यांचे जोडीदार आपल्या टीकाकारांवर मत्सरादिकांचे जे आरोप करतात, तेच इतरांना त्यांजवरहि करतां येतील! उदाहरणार्थ, यशवंतांनीं या भाषणांत मुक्तछंदाची निरर्थकता विस्तारानें प्रतिपादिली आहे. मुक्तछंद हा तत्त्वतः ग्राह्य असो कीं त्याज्य असो; त्याची पाठराखी आपणास येथें करावयाची नाहीं. परंतु, यशवंत कवि मुक्तछंदाचा निषेध करतात, तो "**प्रांतिकतेंतून उद्भवलेल्या हेव्यादाव्यांच्या आहारीं जाऊन**" करतात, असा जर कुणी कांगावा केला, तर त्यावर ते काय उत्तर देणार? यशवंतांचा वरील आरोप या कांगाव्यासारखाच हास्यास्पद आहे!

यशवंतांच्या भाषणांत अशा कोपरखळ्या मारलेल्या नसत्या, तर तें पुष्कळच वाचनीय झालें असतें. कांहींहि म्हटलें, तरी यशवंत हे महाराष्ट्रांतील एक चांगल्यापैकीं कवि आहेत. अशा सत्कवीनें वर्तमानपत्री हमरातुमरीकडे सर्वस्वीं दुर्लक्ष करून केवळ तत्त्वबोधाच्या दृष्टीनें आपलें भाषण लिहिलें असतें, तर सर्व रसिकांस तो एक अलभ्य लाभच वाटला असता! यशवंतांच्या या भाषणांत तात्त्विक ऊहापोह अजिवात नाहीं, असें नाहीं. पण, या "तूं–तूं मी–मी"मुळें तो ऊहापोह डागळला गेला आहे!

यशवंतांनीं आपल्या भाषणांतील या तात्त्विक चर्चेंत तंत्रादिकांचें फाजील स्तोम माजवूं नये, असा जो इषारा दिलेला आहे, तो सर्वथैव बरोबर आहे. ललितकृतीचें यशापयश तिच्या 'तंत्रायंत्रा'वर निर्भर नसून आंतील चैतन्यावर निर्भर असतें. यशवंत म्हणतात, "पण टिकण्याच्या गुणाला ज्याप्रमाणें जुन्या शिष्टसंमत मंत्रतंत्रांच्या चौखांबीचाच जसा उपयोग झाला नाहीं, तद्वत्च नव्या तंत्रमंत्रांनीं रचलेला टिकाऊपणा दिलेला नाहीं. टिकाऊपणा हा अंगच्या चैतन्यावर अवलंबून आहे."

त्याचप्रमाणें, कलाकृतींत, तपशीलाला वाजवीपेक्षां ज्यास्त महत्त्व देण्याचें कारण नाहीं, हें यशवंतांचें विधानहि विचारार्ह आहे. कलाकृतींत तपशीलाचा

बिनचूकपणा साधतां आल्यास उत्तमच. पण, तो तसा क्वचित् नच साधला तर त्याकडे टीकाकारांनीं उदार दृष्टीनेंच पहावें, हें बरें. यशवंतांनीं आपल्या कवितेंतील

**त्या बक्षिसांच्या पोतड्या झांसूनि मोतद्दार घे ।**

या पंक्तीवर घेण्यांत आलेल्या आक्षेपाचें जें खंडन केलें आहे, तें सर्वांसच पटण्यासारखें नसलें, तथापि वरील विचारसरणीनुसार त्यांत सत्यांश आहे, असें म्हणावें लागतें.

*　　*　　*

## १८१ इस्लामी कला

एका इतिहासप्रेमी गृहस्थास उपलब्ध झालेलें एक चित्र आहे. या चित्रांत इस्लाम धर्मसंस्थापक महंमद पैगंबर याच्या आयुष्यांतला एक प्रसंग चितारलेला आहे. कुतूहलाची गोष्ट ही कीं, महंमद पैगंबराचे सारें शरीर त्यांत रेखाटलेलें आहे, पण त्याचें तोंड मात्र वस्त्राच्छादित असें दाखविलें आहे.

इस्लामी धर्म हा चित्रकलेसारख्या कलांचा पक्षपाती नसून विरोधकच आहे. इहलोक व परलोक यांतील कोणताहि प्रसंग चित्रांकित करूं नये, अशी त्या धर्माची शिकवण आहे. ही धर्माज्ञा कट्टर मुसलमान अक्षरशः पाळीत असले, तथापि तिचें त्या धर्माच्या अन्य अनुयायांनीं विशेष कसोशीनें पालन केलेलें नाहीं. कारण, कलेविषयीं अनिवार आसक्ति असणें हा मनुष्याचा स्वभावधर्म आहे; आणि मोक्षधर्मापेक्षां स्वभावधर्म हा नेहमींच बलवत्तर असतो ! उपरोक्त चित्र या सिद्धांताचें प्रत्यक्ष उदाहरणच होय. ज्या महंमद पैगंबरानें चित्रकलेचा निषेध केला, त्याचेंच या आलेख्यांत चित्र काढलेलें आहे ! फक्त त्याच्या शब्दास थोडाफार मान देण्यासाठीं म्हणा, अगर पावित्र्यासंबंधीच्या विशिष्ट कल्पनेमुळें म्हणा, या चित्रांत महंमद पैगंबराचा चेहरा तेवढा झांकलेला दाखविला आहे, एवढेंच.

धर्माज्ञेची तमा न बाळगतां मुसलमान कलावंतांनीं चित्रकलेंत केवढी प्रगति केली, याचा अनुभव कांहीं वर्षांपूर्वी ' हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स्

कमिशन'च्या एका अधिवेशनांत मला आला. या अधिवेशनप्रसंगीं उत्तर हिंदुस्थानांतील मोठमोठ्या घराण्यांच्या संग्रहीं असलेल्या बहुमोल चित्रांचें महत्प्रयासानें प्रदर्शन मांडण्यांत आलें होतें. अधिवेशनास हजर राहण्याचा योग आल्यामुळें हीं चित्रें सहजगत्याच माझ्या पाहण्यांत आलीं. ( 'हिस्टॉरिकल रेकॉर्ड्‌स् कमिशन'च्या एका बैठकीस मी प्रत्यक्ष हजर होतों, हें वाचून ६–१०–३५ च्या 'चित्रे'त मला उद्देशून 'हिस्टॉरिकल रेकॉर्ड्‌स् कमिशन' हें काय प्रकरण आहे, याची त्यांनीं चौकशी तरी केली होती काय ?–असा प्रश्न करणारा 'प्रतिभेचा एक वाचक' बहुधा 'आइस्क्रीम'च होईल ! ) त्यांतील 'लैला–मज्‌नून' सारखीं अद्‌भुत चित्रें अजूनहि माझ्या मनश्चक्षूं-पुढें उभी राहतात !

मूर्तिकलेंत मात्र मुसलमानांनीं कामगिरी बजाविल्याचें फारसें आढळत नाहीं. याच्या मुळाशीं अर्थातच्च त्यांचा मूर्तिपूजाद्वेष असला पाहिजे ! मोंगल बादशहांच्या अमदानींत ताजमहालासारखीं अखिल भरतखंडास भूषणभूत असलेलीं इमारती कामें कितीतरी झालीं, परंतु मोंगल राजघराण्यांतील एकाहि व्यक्तीचा पुतळा तयार करण्यांत येऊं नये, हें आश्चर्यच नव्हे काय ? जहांगीर बादशहानें 'उद्धटपणा'साठीं यमसदनास धाडलेल्या दोघां हिंदु राजांचे हत्तीवरील पुतळे आग्र्याच्या किल्ल्यावर उभारले होते, असें आपण इतिहासांतरी वाचतों आणि कित्येक भाबडे लेखक हा दाखला देऊन इस्लामी राज्यकर्ते मूर्तिकलेचे विरोधक नव्हते, असेंहि सिद्ध करूं पाहतात ! तथापि, स्वतःचा किंवा आपल्या कुळांतील अन्य पुरुषांचा पुतळा न उभारणारा जहांगीर शत्रूंचे मात्र पुतळे उभारतो, यावरून मूर्तिकलेविषयीची त्याची आवड व्यक्त होते, कीं तिरस्कार व्यक्त होतो, याचा सूज्ञांनींच निर्णय करावा !

वाईटांतूनहि कधीं कधीं चांगलें निष्पन्न होतें, असें म्हणतात, त्याची प्रचीति मुसलमानांच्या मूर्तिकलाविरोधाबाबत एकदां आलेली आहे. एका मुसलमानाची प्रिया दिवंगत झाली. त्यानें आपल्या प्रियतमेचें अनुकूलते-नुरूप थडगें उभारलें. त्या थडग्यावर धर्माज्ञा आड न येती, तर त्यानें

बहुतेक प्रियतमेची मूर्तिच खोदविली असती ! पण धर्मप्रेमामुळें त्याला तसें करतां येईना ! अखेर, त्यानें प्रियतमेची मूर्ति नाहीं तर नाहीं, पण तिच्या सौंदर्याची कांहीं ना कांहीं खूण असावी, म्हणून त्या थडग्यावर तिची वेणीच खोदविली ! खोदकाम करणाऱ्यानेंहि डोक्याचा मागील भाग व वेणीचा शेंपटा उत्कृष्ट प्रकारें वठविलेला आहे ! प्रियतमेच्या सौंदर्याचें प्रतीक म्हणून तिच्या वेणीची निवड करण्यांत या प्रेमिकानें केवढी रसिकता प्रगट केली आहे, हें स्पष्ट करून सांगावयास नकोच. केवळ ' Fetish ' म्हणूनच नव्हे, तर स्त्रीसौंदर्याचें एक प्रमुखांग या नात्यानेंहि केशकलापाचें अपरंपार महत्त्व आहे.

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १७

## १८२ थॉमस मॅन यांचे तीन अवतार !

'लंडन टाइम्स 'च्या ' लिटररी सप्लिमेंट 'मधें अगदीं आरंभालाच नूतन ग्रंथाधारें एकेक वाचनीय प्रबंध दर खेपेस देण्यांत येत असतो. कित्येकदां हे प्रबंध इतके उत्कृष्ट असतात कीं, ते वाचून सहृदय वाचक डोलल्यावांचून खास राहत नाहींत ! २२ ऑगस्टच्या अंकांत जगद्विख्यात जर्मन साहित्यिक ' **थॉमस मॅन** ' यांच्यासंबंधीं ' The Three Thomas Manns ' या शीर्षकाखालीं असाच एक पहिल्या प्रतीचा प्रबंध आलेला आहे.

थॉमस मॅन यांनीं ज्याप्रमाणें कादंबऱ्या, लघुकथा यांसारखें ललितवाङ्मय निर्माण केलें आहे, त्याचप्रमाणें निबंधादिकांसारखें गंभीर वाङ्मयहि निर्माण केलेलें आहे. थॉमस मॅन हे लोकोत्तर कलावंत आहेत, तसेच ते थोर विचारवंतहि आहेत. यामुळें त्यांच्या गंभीर वाङ्मयांतच केवळ नव्हे, तर ललितवाङ्मयांतहि तत्त्वाविचाराचे झरे झुळझुळ पाझरतांना दृष्टोत्पत्तीस येतात ! थॉमस मॅन यांच्या तत्त्वज्ञानाचा साकल्यानें आढावा घ्यावयाचा तर, त्यांच्या ललित व गंभीर अशा उभयविध कृतींचा परामर्ष घेतला पाहिजे, हें उघड आहे. परंतु, त्यांच्या फक्त निबंधांचेंच अवलोकन केल्यास काय दिसेल, हें पाहणेंहि कमी मनोरंजक व बोधप्रद नाहीं !

थॉमन मॅन यांच्या निबंधामध्यें कोणतेंहि एक मत अथपासून इतिपर्यंत ठामपणें मांडलेलें नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्यांत परस्परविरोधहि आढळून येईल ! ' लिटररी सप्लिमेंट 'च्या लेखकानें याच कारणामुळें तत्त्वप्रतिपादनाच्या दृष्टीनें थॉमस मॅन हे एक नसून किमानपक्षीं तीन तरी आहेत, असें गमतीखातर म्हटलें आहे.

थॉमस मॅन यांच्या ' पहिल्या अवतारा 'मध्यें त्यांजवर सृष्टीची–सृष्टीच्या ' रात्रि–स्वरूपा 'ची–घनदाट छाया पडलेली आहे ! थॉमस मॅन यांनीं बाल्यापासून 'निद्रा' व 'विस्मृति' यांच्यावर अपार प्रेम केलें आहे. ते निद्रेमधून जागे होतात, ते जणुं काय पुन्हां निद्राधीन होण्याच्या तीव्र

लालसेनेंच ! ! निद्रितावस्था हीच मानवजातीची सहजावस्था नसेल ना, असेंहि त्यांना केव्हां केव्हां वाटतें ! जीवनकलहांत उपयोगास येणारें एक शस्त्र या नात्यानें मनाची उन्नति करीत असतांना मानवजातीनें कदाचित् या सहजावस्थेचें अवगुंठन झुगारून दिलें असावें ! " ये, मृत्यो, ये ! "— अशी ते आपल्या मरणाला साद घालीत आहेत ! व्यक्तित्व व 'जाणीव' यांच्या शृंखला तटातट तुटण्याचें, त्यांच्या मतें, मृत्यु हेंच एकमेव साधन होय ! बौद्धांचें '**निर्वाण**' हें जसें अंतिम साध्य होतें, तसेंच तें थॉमस मॅन यांचेंहि आहे ! एकंदरीनें या पहिल्या अवतारांत थॉमस मॅन हे जर्मन तत्त्वज्ञ शोपेनहॉर यांच्या पावलावर पाऊल टाकून मार्गक्रमण करीत आहेत, असा निष्कर्ष निघतो !

दुसऱ्या अवतारामध्यें थॉमस मॅन हे शोपेनहॉरचें अनुकरण न करतां दुसरा एक जर्मन तत्त्वज्ञ नीत्शे याचें अनुकरण करतात. या अवतारांत ते असा संदेश देतात कीं, मानवजातीनें आपलें भवितव्य आपलें आपणच ठरवून वैभव, बल व सौंदर्य या तीन खांबांवर आपल्या जीविताचा 'तिखांबी' तंबू उभारला पाहिजे ! या अवतारामध्यें असतांना ते काळ्याकभिन्न रात्रींची उपासना करण्याचें सोडून देतात, व तेजोमय दिवसाची अग्रदूतिकाच अशा 'उषे'च्या चरणीं विनम्र होतात ! मृत्यूपेक्षां जीवित हें त्यांना आतां अधिक प्रिय होऊं लागतें ! निरामयता व जीवनशक्ति यांची ते कांस धरतात. निराशेसारख्या मानसिक रोगटपणाचा ते तिरस्कार करतात ! प्रथमावतारांत त्यांना सृष्टि व जीवित यांची—नव्हे, स्वतःची देखील—भीति वाटत असे ! पण, या द्वितीयावतारांत त्यांची ती भीति पाहतांपाहतां पार वितळून जाते ! विश्वोत्पत्तीला कांही तरी अर्थ आहे, त्यांत कांहीं तरी उद्देश आहे, हें त्यांना इतःपर पटूं लागतें !

याच दुसऱ्या अवतारांत थॉमस मॅन हे कला व कलाकार यांना तुच्छ मानतात ! कलेपेक्षां जीवनास ते जास्त महत्त्व देतात. कलाकारांसंबंधीं **'अमर्याद भोगपरायण व निरुद्योगी मर्कटें'** असे मासलेवाईक उद्गार नीत्शेनें एकदां काढले होते. या 'अमर्याद भोगपरायण व निरुद्योगी मर्कटां'चा उद्धार

व्हावा, अशी थॉमस मॅन यांची यावेळीं मनीषा असते! बायबलांतील ज्ञानवृक्षाच्या फळासारखेंच हेंहि कलारूपी फळ पापप्रवृत्त करणारें व म्हणून असेवनीय आहे; आणि जो अभागी जीव या फळाचें सेवन करील, तो त्या कर्मप्रधान जगांत राहण्यास अपात्र ठरतो, अशी थॉमस मॅन यांची धारणा होऊं लागते!

वरील दोन अवतारांखेरीज थॉमस मॅन यांचा आणखी एक अवतार मानावा लागतो. तिसऱ्या अवतारामध्यें ते पूर्वीपेक्षांहि निराळेच सूर काढतात! चारित्र्य हें जीविताचें परमोच्च ध्येय असून राजकारण ही नीतिशास्त्राची परिपूर्णता होय, असा विश्वास ते प्रगट करतात! कवि अगर लेखक यांनीं आपलीं भरजरी महावस्त्रें राजकारणाच्या धुळीनें मलिन होऊं देऊं नयेत, हा पूर्वापार समज त्यांना वृथा वाटतो! साहित्यिकांनीं राजकारणांत अवश्य पडावें, असें त्यांचें मत बनतें! जर्मन लोक ज्यावेळीं साहित्यिक व राजकारण यांची फारकत करूं पाहतात, त्यावेळी ते पिसाटपणा व दैन्यच व्यक्त करतात, असें थॉमस मॅन हे बिनदिक्कत सांगतात!

थॉमस मॅन यांचे हे तीन अवतार व एकेका अवतारांतील त्यांची वरील विचारप्रणालि त्यांच्या फक्त निबंधांवरूनच ग्रथित केलेली आहे, हें आरंभीं नमूद केलेलेंच आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानाचा खराखुरा साक्षात्कार व्हावयाचा तर, निबंधाबरोबरच त्यांचें ललितवाङ्मयहि जमेस घेतलें पाहिजे. अर्थात् त्यांच्या ललितकृतींत देखील सर्वत्र एकच एक तत्त्व अनुस्यूत केलेलें नाहीं, हेंहि येथें सांगून टाकावयास पाहिजे.

थॉमस मॅन यांच्या ठळक ललितकृतीचें मराठींत भाषांतर वा रूपांतर झाल्याचें निदान मला तरी ठाऊक नाहीं. कुणा जर्मन भाषेच्या अभ्यासकानें या दिशेनें प्रयत्न केल्यास मराठीवर त्याचे अनंत उपकार होतील.

* * *

## १८३ मराठी–व्याकरण–परिषद

बरोबर शंभर वर्षांपूर्वी कै. **दादोबा पांडुरंग** यांनीं आपलें मराठी व्याकरण लिहून प्रसिद्ध केलें. दादोबा यांच्या या व्याकरणाविषयीं कुणी कांहींहि

म्हटलें, तरी त्यामुळें मराठी भाषेंत आधुनिक व्याकरणाचा पाया घातला गेला, हें नाकारतां येणें शक्य नाहीं. दादोबांविषयीं रा. कृ. पां. कुळकर्णी हे 'भाषाशास्त्रविषयक अभ्यास' नांवाच्या आपल्या निबंधांत पुढीलप्रमाणें लिहितातः—

"मराठीचे आद्य व्याकरणकार म्हणून दादोबांस मान द्यावा किंवा नाहीं, ह्याविषयीं मतभेद आहे. मराठीचे आद्य व्याकरणकार गंगाधरशास्त्री फडके हे होत, असें म्हणतात. १८३८ मध्यें ह्यांच्या 'मराठी भाषेच्या व्याकरणा'ची दुसरी आवृत्ति छापिली. फडकेशास्त्री ह्यांचें व्याकरण संवादरूप असून त्याचा आरंभ संधिप्रकरणानें केला आहे. ज्यांना आपण विभक्तिप्रतिरूपक अव्ययें मानितों, त्यांना फडके त्या त्या विभक्तीचे प्रत्यय मानीत असत ! ह्या व्याकरणाची पहिली प्रत मराठींतील पहिलें व्याकरण असावें. परंतु त्याला मान्यता न मिळाल्यामुळें तें मागें पडलें असावें. दुसरा असाहि एक आक्षेप खुद्द दादोबांच्या हयातींत होता कीं, 'दादोबांनीं आपलें व्याकरण बाळशास्त्री जांभेकर ह्यांनीं जें व्याकरणविषयक साहित्य गोळा केलें होतें, त्याच्या आधारावर रचिलें.' 'ह्या परोत्कर्षासहिष्णु स्वभावाच्या मंडळींनीं जी कंठाळी उठविली,' तिजसंबंधीं खुद्द दादोबा लिहितातः 'वस्तुतः ह्या विषयावर त्या गृहस्थाच्या (जांभेकरांच्या) किंवा कोणाच्याहि हातचा एक कागदाचा चिठोडाहि आम्ही पाहिला नाहीं.' ह्या वादाचा निकाल करणें कठिणच आहे. **व्याकरणाची जी प्रथा पडली ती दादोबांनींच पाडिली व त्या अर्थानें त्यांना जो 'मराठी भाषेचा पाणिनी' म्हणून मान देतात, तो यथार्थच आहे, असेंच कोणीहि म्हणेल.**"

'मराठी भाषेच्या पाणिनी'ने १८३६ मध्यें जें पहिलें मराठी व्याकरण लिहिलें, त्याच्या शतसांवत्सरिक स्मारकाच्या प्रसंगानें लौकरच मराठी–व्याकरण–परिषद भरविली जाणार आहे, असें मराठी–व्याकरण–समितीचे चिटणीस रा. रा. दा. देसाई व महाराष्ट्र–साहित्य–परिषदेचे चिटणीस रा. चिं. ग. कर्वे यांनीं एका पत्रकाद्वारें जाहीर केलें आहे. चालू वर्षी ही

व्याकरणपरिषद भरविण्याची योजना फार मार्मिक व समयोचित आहे, यांत शंका नाही.

मराठी भाषेच्या व्याकरणावर आजतागायत अनेक विद्वानांनीं परिश्रम केलेले आहेत. तथापि, मराठी भाषेचें सर्वमान्य होऊं शकेल असें व्याकरण अद्यापिहि तयार झालेलें नाहीं, हें भाषाभिवृद्धीच्या दृष्टीनें मोठेंच वैगुण्य होय! या परिषदेमुळें सदर वैगुण्य अल्पस्वल्प प्रमाणांत तरी दूर होऊं शकल्यास मोठेंच कार्य झाल्यासारखें होईल.

संकल्पित मराठी–व्याकरण–परिषदेचें अध्यक्षस्थान रा. कृ. पां. कुळकर्णी यांना देण्यांत येईल, असा कित्येकांचा कयास आहे. तो खरा ठरल्यास त्याबद्दल सर्वांच्या तोंडून समाधानाचेच उद्गार निघतील.

* * *

## १८४ 'फ्रान्सचा गोल्डस्मिथ' ॲनातोले फ्रान्स!

इंग्रजी कवि व कादंबरीकार गोल्डस्मिथ हा एवढा फर्डा लेखक; पण, बोलण्याचालण्यांत मात्र तो 'यथातथाच' होता! "गोल्डस्मिथ हा देवदूताप्रमाणें लिहितो, पण मूर्खाप्रमाणें बोलतो!" अशा अर्थाचें विधान त्याजविषयीं एकानें केलेलें आहे!

अलिकडील नामवंत फ्रेंच साहित्यिक ॲनातोले फ्रान्स याचाहि असाच प्रकार होता! ॲनातोले फ्रान्स हा सरस्वतीच्या कंठांतील केवळ ताईतच; तथापि, खाजगी संभाषणांत मात्र त्याची बिलकूल छाप पडत नसे! एका विलायती साप्ताहिकाच्या ताज्या अंकांतील एका लेखामधलें पुढील अवतरण पहा:—

"It was at a party in one of these rival salons that she (Madame Marie Scheikevitch) first met Anatole France. No one would suspect from his mellifluous, chiselled prose that France was a poor conversationalist but apparently he suffered from Goldsmith's disability and 'talked like poll.' He kept correcting himself, we are

told, " looking around in a frightened way to right and left as if he was tired to death of having to talk and make people laugh. "...Madame Scheikevitch once heard him exclaim, " When I speak, you can hear me crossing words out. when you read me, it's different. "

* * *

## १८५ एच्. जी. वेल्स यांचा सन्मान

नुकतीच पुढील बातमी प्रसिद्ध झाली आहेः—' विख्यात इंग्रजी लेखक एच्. जी. वेल्स यांच्या सत्तराव्या वाढदिवसानिमित्त ते ज्या पी. ई. एन्. क्लबाचे अध्यक्ष आहेत, त्याजतर्फे १३ ऑक्टोबर रोजी एक जाहीर भोजन समारंभ होणार असून बॅर्नार्ड शॉ, प्रो. ज्युलियन् हक्स्ले प्रभृतींचीं भाषणें होणार आहेत. कादंबरीकार प्रीस्ट्ले हे अध्यक्षस्थान स्वीकारणार आहेत.

वेल्ससाहेबांना या प्रसंगीं कुणीहि दीर्घायुरारोग्य चिंतील !

इंग्रजी भाषेमध्यें एवढ्यांत जे पट्टीचे साहित्यसेवक झाले आहेत, त्यांत एच्. जी. वेल्स यांची गणना होते. ते कलावंत आहेत, शास्त्रज्ञ आहेत, तसेच तत्त्ववेत्तेहि आहेत. त्यांना '**स्वप्नाळू तत्त्ववेत्ते**' अशी पदवी दिल्यास ती विशेष शोभेल. कारण त्यांना मानवजातीच्या भावी स्थितीचीं स्वप्नें पडत असतात, व तीं ते आपल्या कादंबऱ्या वगैरेमधून रंगवीत असतात !

वेल्स हे सव्यसाची लेखक असल्यामुळें त्यांनी ललितवाङ्मयाबरोबरच गंभीर वाङ्मयहि विपुल प्रमाणांत केलें आहे. त्यांच्या या दोन्ही प्रकारच्या निर्मितीपैकीं कालप्रवाहांत काय काय टिकेल, हें आजच कोण कसें सांगूं शकणार ? तथापि त्यांच्या कांहीं लघुकादंबऱ्या व कादंबऱ्या यांना आंग्ल साहित्यांत अढळ स्थान मिळावयास हरकत असूं नये असें वाटतें. अलिकडे–अलिकडे एच्. जी. वेल्स यांच्या कलादृष्टीवर प्रचारकी धोरणाचें ' वडस ' येऊं नये तितकें आलेलें आहे व याची खुद्द वेल्स यांनाहि जाणीव आहे ! यामुळें त्यांच्या कित्येक ललितकृति कलादृष्ट्या हिणकस उतरल्या आहेत, असा कित्येक थोर थोर टीकाकारांचा अभिप्राय आहे !

वेल्स यांना नोबेल प्राईझ मिळणार असल्याच्या अफवा मधूनमधून उठत असतात ! इतःपर नोबेल प्राईझचा योग वेल्स यांच्या बाबतींत दुर्घटच दिसतो; आणि हा मान एखाद्यास न मिळाल्यानें त्याची योग्यता कमी होते, अशांतलाहि पण भाग नाहीं ! तथापि, या अफवांवरून देखील जनतेला वेल्स यांच्या वाङ्मयाचें अतिशय महत्त्व वाटतें, हें पर्यायानें सिद्ध होतें, व ही गोष्ट दिग्दर्शित करण्यासाठींच या प्रकारचा येथें उल्लेख केलेला आहे.

*　　　*　　　*

## १८६ पंडित भातखंडे गेले !

गायक वर्गांत ' पंडित भातखंडे ' या नांवानें आळविले जाणारे प्रख्यात संगीतशास्त्रवेत्ते रा. विष्णु नारायण भातखंडे हे १८ सप्टेंबर रोजीं दिवंगत झाल्याचें वृत्त वर्तमानपत्रांवरून सर्वांस विदित झालेंच आहे.

पं. भातखंडे यांनीं भारतीय संगीताच्या उत्कर्षाप्रीत्यर्थ कोणकोणते व कसकसे परिश्रम केले, हें आज नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. संगीताची शास्त्रशुद्ध चर्चा करणारे, पं. भातखंडे यांच्यासारखे त्या शास्त्राचे विद्वान् महाराष्ट्रांतच काय, पण अखिल हिंदुस्थानांत देखील अत्यल्प झाले आहेत, या एकाच गोष्टीवरून त्यांच्या त्या शास्त्रांतील अत्युच्च स्थानाची कल्पना येईल ! भारतीय संगीत जोंपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर जीवंत आहे, तोंपर्यंत पं. भातखंडे यांचें नांव अजरामर झाल्यावांचून खचित राहणार नाहीं !

पं. भातखंडे यांनीं पं. जोशी यांच्या सहकार्यानें लिहिलेलें ' हिंदुस्थानी संगीतपद्धति ' या ग्रंथाचे चार खंड त्या विषयाचे संदर्भग्रंथ म्हणून संगीताभ्यासकांस नेहमींच आदरणीय वाटतील.

संगीताच्या प्रसारासाठीं पं. भातखंडे यांनीं केलेले परिश्रमहि अतुलनीय असेच आहेत. ग्वाल्हेरचें ' माधव संगीत विद्यालय ' किंवा लखनौची ' हिंदुस्थानी म्यूझिक ॲकॅडमी ' हीं भातखंडे यांच्याच परिश्रमाचीं गोड फळें होत. बनारसच्या हिंदु युनिव्हर्सिटींतसुद्धां पंडितजींमुळेंच संगीताचा प्रवेश झाला.

थोर थोर संगीतज्ञ व गवई यांनीं पं. भातखंडे यांच्या संगीतशास्त्रांतील अगाध ज्ञानापुढें मोठ्या आदरानें मान वांकविली आहे. कविवर्य रवींद्रनाथ टागोर यांनीं कुठेंतरी पंडितजींवर स्तुति–सुमनें उधळलीं असल्याचे नक्की स्मरतें.

संगीतशास्त्राचे अभ्यासक, पं. भातखंडे यांजविषयीं किती आदर बाळगतात, हें दाखविण्यासाठीं हाताशीं आलेल्या एका ग्रंथांतून पुढील उतारा देतों. सांगलीचे प्रो. ग. ह. रानडे, बी. एस्सी., हे ‘ संगीताचे आत्मचरित्र ’ या आपल्या पुस्तकांत लिहितात:—“ कला रम्य व तत्काल आनंददायी आहे, पण शास्त्रीय विषय रुक्ष व बुद्धिप्रधान, व त्याचा कलेशीं मेळ घालणें अवश्य असल्यानें कष्टसाध्य आहे. तथापि, या बाबतीतहि महाराष्ट्रीय विद्वानांनीं फार श्रेष्ठ अशी कामगिरी केली आहे. **विशेषत: पं. भातखंडे यांचें स्थान या कामीं सर्वदा व सर्व हिंदुस्थानांत अढळच गणलें जाईल**. शास्त्राचे बाबतींत यांनीं एकट्यांनीं विश्वविद्यालयांतील दुसऱ्या कोणत्याहि विषयाइतका संगीताला विदग्धपणा आणिला असून कलेचे बाबतींतहि चिजांचीं पुस्तकें फार परिश्रमानें तयार करून गायकवर्ग व संगीत या उभयतांसहि कायमचें ऋणी करून ठेवलें आहे. बाळकृष्णबुवांचे प्रमाणें ( गायनाचार्य कै. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांच्याप्रमाणें ) याहि ठिकाणीं पं. भातखंडे यांचे वैयक्तिक प्रयत्न व अपूर्व यश हीहि एक विधिघटनाच होय ! ”

—असा हा संगीतशास्त्राचा मुकुटमणी आपणांमधून कायमचा नाहींसा व्हावा, हें सृष्टिक्रमानुसारच असलें, तरी पण त्याबद्दल हळहळ वाटल्याखेरीज रहात नाहीं !

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १८

## १८७ कवि यशवंत यांना उत्तर

ता. १५ सप्टेंबरच्या 'प्रतिभे'त 'कवि यशवंत यांचे भाषण' या मथळ्याचे माझे जे स्फुट आलेले आहे, त्याला यशवंतांनी उत्तर दिलेले आहे. त्यावर माझे प्रत्युत्तर थोडक्यांत येणेप्रमाणे—

बडोद्याच्या भाषणामध्ये धंद्यावरून कुणीहि कुणावर तुटून पडूं नये, असा उपदेश यशवंत यांनी रा. पु. य. देशपांडे यांच्या 'साहित्य आणि समाजजीवन' या लेखमालेवरून केला होता. यशवंतांचे हे शुद्ध 'परोपदेशे पांडित्यम' आहे, असे मी उपरोक्त स्फुटांत २९ मेच्या 'ज्ञानप्रकाशां'तील त्यांच्या एका लेखामधले अवतरण उदधृत करून सिद्ध केले होते. आतां कवि यशवंत म्हणतात की, 'जशास तसें' या न्यायाने वर्मी घाव घालण्याच्या प्रो. माटे यांच्या लेखनपद्धतीचा आपण केवळ अनुकार केला! प्रो. माटे यांची २६ मेच्या 'ज्ञानप्रकाश'मधील लेखांतील 'लेखनपद्धति' आक्षेपार्ह असेल; **परंतु त्यांत कवि यशवंत यांची धंद्यावरून तरी मुळींच हेटाळणी केलेली नाहीं** मग ती यशवंतांनीच आपल्या उत्तरांत कां केली? यांत 'जशास तसे' हा न्याय कुठे आला? प्रो. माटे यांच्या धंद्याचा उल्लेख टाळनहि यशवंतांना त्यांना कडक उत्तर देतां आलें नसते, असे नाही!

आतां यशवंत कदाचित् म्हणतील की, प्रो. माटे यांनी सदर लेखांत 'कवि' शब्दांवरून आपली कुचेष्टा केलेली आहे, म्हणून आपण त्यांचे 'पागेपण' काढले! परंतु, माझा यशवंतांवरील आरोप फक्त उदरंभरणाच्या धंद्याबाबत होता, व तो अजूनहि आहे! काव्यलेखन हा आपला उदरंभरणाचा धंदा आहे, असे स्वतः यशवंतहि खासच म्हणणार नाहीत!

२६ मेच्या 'ज्ञानप्रकाशा'त प्रो. माटे म्हणतात, "त्यांनी (यशवंतांनी) 'बहर' पुस्तकाच्या प्रस्तावनेत व 'ज्योत्स्ने'च्या अगदी पहिल्या अंकाच्या पहिल्या स्फुटांत मजवर हल्ला केला आहे..." माटे म्हणतात तद्वत् "ज्योत्स्ने"च्या पहिल्या अंकांतले पहिले स्फुट यशवंतांचेंच

असल्यास त्यांत माट्यांना उद्देशून 'आतां प्राध्यापक असलेल्या' असा शब्दप्रयोग आलेला आहे. या शब्दप्रयोगांत प्रो. माटे यांच्या पूर्वीच्या व आतांच्याहि धंद्याचा सूक्ष्म उपरोध केलेला नाही काय, हें यशवंतांनींच सांगावें! मेच्या आरंभीं निघालेल्या 'ज्योत्स्ने'च्या पहिल्या अंकांत माट्यांना याप्रमाणें धंद्यावरून चिमटा घेण्यास माट्यांचा २६ मे च्या 'ज्ञानप्रकाशां'तील लेख खचित कारणीभूत आलेला नाही!

तात्पर्य, कवि यशवंत यांजवरील माझा 'परोपदेशे पांडित्यम्' हा आरोप त्यांच्या उत्तराने बिलकूल नाहीसा होत नाही, असें मला नाइलाजाने म्हणावें लागते!

कवि यशवंत यांनी आपल्या उत्तराचा अर्धाअधिक भाग नियतकालिकांतील व्यक्तिविषयक टीकेवर झोड उठविण्यांत खर्च केलेला आहे. व्यक्तिविषयक किंवा अशिष्ट टीकेविषयीं यशवंतांना वाटणारी घृणा अभिनंदनीय आहे. तसेच, अशा टीकेला संपादकांनी आपला अधिकार चालवून मज्जाव करावा, हें त्यांचें म्हणणेंहि विचारार्ह आहे. परंतु या बाबतीत संपादकांप्रमाणेंच लेखकांकडूनहि बरीचशी अपेक्षा करतां येते, असें मला वाटतें. त्यांतहि या लेखकांचा संपादक किंवा उपसंपादक (हा शब्द येथे चांगल्या अर्थानें वापरला आहे)या नात्यानें एखाद्या नियतकालिकाशीं संबंध असला तर त्यांजकडून अर्थात् जास्तच अपेक्षा करावी लागते. अलीकडील कित्येक अनिष्ट वादांचा आरंभ अशाच लेखकांनीं प्रथम आगळीक केल्यामुळें झाला, हें सर्वश्रुतच आहे. एकाची 'अरे'रावी सहन करण्याइतका दुसरा स्थितप्रज्ञ असणें संभवनीय नाही, हें यशवंतांनाहि मान्यच आहे! तेव्हां, नियतकालिकांतील वैयक्तिक वाद अल्पस्वल्प प्रमाणांत तरी कमी होण्यासाठीं वर उल्लेखिलेल्या लेखकांना आंवरून धरणें आवश्यक झालें आहे. यशवंतांना अशा कांहीं लेखकांस आंवरून धरतां येणें शक्य आहे, असा माझा समज आहे. तसें त्यांनीं केल्यास विरोधकहि आपला सहकार्याचा हात खात्रीने पुढें करतील, असें मी आश्वासन देतों.—एकानें 'अरे' म्हटलें नाहीं, तर दुसरा 'कां रे' कशाला म्हणेल?

त्याचप्रमाणें एका मासिकाच्या संपादकमंडळांत कवि यशवंत हेहि अंतर्भूत झालेले असल्यामुळें ते मासिक व्यक्तिविषयक टीकेपासून सर्वस्वी अलिप्त ठेवण्याची '*एकसप्तमांश' तरी जबाबदारी प्रस्तुत उत्तरावरून यशवंतांकडे येतेच. ती ते पार पाडतील, अशी आशा आहे. या मासिकाच्या जूनच्या अंकांतील 'बातारामचे युद्धमंडळ' हा लेख वैयक्तिक स्वरूपाचा असल्याची पुष्कळांची भावना आहे, हे मी यशवंतांच्या निदर्शनास आणूं इच्छितो.

आपल्या हस्तकांकरवीं इतरांना 'धंदेवाईक संपादक' असे हिणविणाऱ्या उपसंपादकांना यशवंतांनी कां आवरले नाही, असा गर्भित प्रश्न मी १८ सप्टेंबरच्या 'प्रतिभे'त केला होता. त्यावर सरळ उत्तर न देतां प्रो. माटे यांचा उगारलेला हात मीं आंवरून कां धरला नाही, असा यशवंत हे मला उलट गर्भित प्रतिप्रश्न करतात ! 'प्रतिभासाधन' वादापासून प्रो. फडके हे जसे जवळ जवळ 'एकाकी' पडले आहेत, तसे कवि यशवंत हेहि असते, तर मी त्यांच्या मदतीस अवश्य धांवून गेलो असतो. परंतु यशवंतांना विलेपार्ले, दादर, शिरोडें, नागपूर वगैरे ठिकाणांवरून कुमक येण्याचा संभव असल्यामुळेंच मी तो खटाटोप केला नाही ! अपेक्षेप्रमाणे ही कुमक कितपत आली, नसल्यास तिची कारणे कोणती—यासारख्या प्रश्नांवर मजपेक्षां यशवंत हेच अधिक प्रकाश पाडूं शकतील !×

आपल्या उत्तरांतील कांही मजकुरावरून 'रामशास्त्र्यां'ना वर्मावर प्रहार झाल्यासारखे वाटेल, अशी यशवंत यांनी उपरोधिक भीति प्रदर्शित केली आहे ! तिजबद्दल मला एवढाच खुलासा करावयाचा आहे की, 'रामशास्त्री' हा असा भावनाप्रधान नसून दोन देणारा व दोन घेणारा, पण 'खेळाडू वृत्ति' ठेवूं पहाणारा—असा आहे !

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक १८

*'ज्योत्स्ना' मासिकाचे आरंभीं सात संपादक होते.

×'ज्योत्स्ने'त यशवंतांच्या तरफदारीचा मजकूर आलाच ! ही कुमक बहुधा दादरची असावी.

## १८८ प्रेमचंदांचें शोचनीय निधन !

सुप्रसिद्ध हिंदी साहित्यिक प्रेमचंद हे गेल्या ८ तारखेला दिवंगत झाल्याचें वर्तमान जाहीर झालेलें आहे ! तें वाचून प्रत्येक वाङ्मयभक्तास खेद वाटल्यावांचून खचित रहाणार नाहीं !

प्रेमचंद यांनीं हिंदी भाषेची इतकी थोर सेवा केली आहे कीं, त्या भाषेच्या इतिहासांत त्यांचें नांव सुवर्णाक्षरांनीं लिहिलें जाईल ! हिंदीबरोबरच उर्दूलासुद्धां प्रेमचंदांच्या लिखाणाचा लाभ झालेला आहे ! प्रेमचंदांचें वाङ्मय असें उच्च प्रतीचें, तसेंच तें विपुल व विविधहि आहे. त्यांनी स्वतंत्र कादंबऱ्या लिहिल्या, लघुकथा रचिल्या, नाटकांची थोडीफार लज्जत घेतली, निबंधाकडेहि लक्ष्य पुरविलें – फार काय, अनेक भाषांतरें देखील केलीं ! थोडक्यांत म्हणजे, त्यांची सर्वकुशल लेखणी सर्व प्रांतांत सारखा व अप्रतिहत संचार करणारी होती !

बरें, त्यांची ही प्रचंड निर्मिति गुणवत्तेंत कमी भरते, असेंहि सुतराम् नाहीं ! कादंबऱ्या व लघुकथा लिहिण्यांत तर प्रेमचंद हे केवळ सिद्धहस्तच होते ! प्रेमचंदांच्या तोलाचा कादंबरीकार हिंदींत एकहि झाला नाहीं. आणि, लघुकथालेखनांतहि ' सुदर्शन ' प्रभृति अत्यल्प लेखक वगळले, तर प्रेमचंद हे अतिशय श्रेष्ठ दर्ज्याचेच ठरतात ! किंबहुना, रवींद्रनाथ टागोर, शरच्चंद्र चट्टोपाध्याय, हरिभाऊ आपटे, वगैरे जे अखिल भारतीय योग्यतेचे कथावाङ्मयनिर्माते आज आहेत व पूर्वी झाले, त्यांत प्रेमचंदांचा प्रामुख्यानें समावेश होतो !

प्रेमचंदांच्या कांहीं कथांचें ग्रंथरूपानें इंग्रजींत रूपांतर झालें, तर त्यांना जागतिक वाङ्मयांत सुद्धां मानाचें स्थान प्राप्त होईल, असें म्हटल्यास ती निखालस अत्युक्ति होणार नाहीं !

अर्थात् प्रेमचंदांच्या लेखणीतून उतरलेले अक्षरन् अक्षर रसपूर्ण आहे, असें त्यांचा अंधभक्तहि म्हणणार नाही. विपुल लेखनाचा हव्यास धरणाऱ्या लेखकांची व त्यांच्या वाचकांची कित्येकदां जी फसगत होते, तीच प्रेमचंद व त्यांचे वाचक यांचीहि क्वचित् झाली आहे, हे 'गबन' कादंबरीच्या वाचकांस सांगावयास नकोच !

तें कांही असो, हिंदी साहित्याकाशांतील प्रेमचंद हे सहस्ररश्मिच होते याविषयीं संदेह घेण्याचे लवमात्र प्रयोजन नाही. हिंदी भाषाभक्तांना हा सूर्य अस्तंगत झाल्यामुळें अंधारांत चांचपडत अगल्याचा कांही काल अनुभव येईल; परंतु, त्याला नाइलाज आहे ! हिंदी भाषाभिमान्यांच्या या दुःखांत सर्व महाराष्ट्रहि सहभागी आहे !

* * *

## १८९ साहित्यिकांचें राजकारण

'प्रतिभे'च्या मागील अंकांतील **थॉमस मॅन** यांजवरील स्फुटात साहित्यिक व राजकारण यांच्या परस्पर संबंधाबद्दल उडता उल्लेख आलेला आहे. या विषयाबाबत मी पूर्वीहि थोडेबहुत लिहिले असल्याचे वाचकांस स्मरत असेलच. आज तद्विषयक आणखी कांही मुद्दे मांडावयाचे आहेत.

साहित्यिक हा स्वतः राजकारणांत प्रत्यक्ष भाग घेवो अगर न घेवो; परंतु, त्याने राजकारणाविषयीं भलत्या कल्पना मात्र मनांत वागवूं नयेत ! साहित्य आणि राजकारण या सर्वस्वी परस्परभिन्न वस्तु आहेत, त्यांतील एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूस लवमात्रहि संसर्ग होऊं नये, अशी कित्येक साहित्यिकांची समजूत असलेली दिसते ! परंतु, ती बरोबर नाही. साहित्याने जीवनाच्या सर्व अंगांस स्पर्श करावयास पाहिजे. जीवनामधून राजकारण अजिबात वगळून कसे चालेल ? आणि, मग साहित्याला तरी त्याचे वावडे कसे मानतां येईल ?

साहित्य व राजकारण या दोहोंतून निवड करावयाचा प्रसंग उद्भवल्यास पुष्कळांची '**किं कर्म किमकर्मेति**' अशी गत होणे साहजिक आहे. लॉर्ड

मेकॉले एका ठिकाणी म्हणतो:—" That a man before whom the paths of Politics and Literature lie open, and who may hope for eminence in either, should choose Politics and quit Literature seems to me madness ! "— राजकारणाविषयींचे हे स्मशानवैराग्य मेकॉले महाराजांस पार्लमेंटच्या निवडणुकींत सपशेल कोलमडून पडल्यानंतर स्फुरलें आहे, हें लक्ष्यांत घ्यावयास पाहिजे ! तथापि, या उद्गारांत सत्यांश नाहीं, असेंहि नाहीं. कुणी घ्या सूर्य !—कुणी घ्या चंद्र ! असे म्हणत राजकारण व साहित्य यांची जोडी समोर आली असतां 'पुरुषांच्या धर्मभ्रमा'मुळें राजकारणरूप सूर्याला जवळ करणारे व त्यायोगे सर्वांग पोळून घेणारे इसम आपल्याकडे व इतरत्रहि थोडेथोडके झाले नाहींत ! त्यांनी राजकारणाऐवजीं साहित्य हेंच आपलें ध्येय ठरविलें असतें, तर त्यांचा व समाजाचाहि सापेक्षतः फायदाच झाला असता !

उलटपक्षीं, कित्येक लोक साहित्यापेक्षां राजकारणालाच जास्त लायक असतात, व त्यांतील कांहीजण आपापल्या माध्याची बिनचूक निवडहि करतात. त्यांची साहित्यामध्ये विलकुल प्रगति झाली नसती, अशांतला अर्थातच प्रकार नसतो. किंबहुना, ते प्रसंगोपात्त जेव्हां लेखणी हातीं घेतात, तेव्हां तीतून अनेकदां वाचनीय मजकूर उतरतोहि. परंतु, त्यांच्या पराक्रमाचें खरें क्षेत्र साहित्य हें नसून राजकारण हेंच असतें, ही वस्तुस्थिति देखील विसरतां कामा नये. इंग्लंडचे कुप्रसिद्ध साम्राज्यवादी मुत्सद्दी **विन्स्टन चर्चिल** यांचेंच उदाहरण घ्या. चर्चिलसाहेबांच्या राजकारणाबद्दल कुणाचा कितीहि प्रतिकूल अभिप्राय पडो; तथापि, ते एक धडाडीचे राजकीय पुरुष आहेत, याविषयीं मतभेद होणार नाहीं. बरें, त्यांचे लेखन कमी प्रभावशाली असेल म्हणावें, तर तसा आरोप त्यांचे साक्षात् शत्रूहि करणार नाहींत ! लॉर्ड किचनेर याने **महादीच्या** थडग्याची विटंबना करून त्याच्या प्रेताचा जो भयंकर उपमर्द केला होता, त्याबाबत चर्चिल यांनी त्यावेळीं वर्तमानपत्रांतून किचनेरवर उठविलेली झोड पहावी, म्हणजे त्यांच्या लेखणीच्या सामर्थ्याची कल्पना येईल ! चर्चिलसाहेबांचीं कांहीं पुस्तकें आणि अनेक नियतकालिकांतील त्यांचें इतर लिखाणहि असेंच

जोरकस आहे ! तथापि, हे सारे लेखन जमेस धरूनहि ' साहित्यिक ' या नात्याने चर्चिल यांची योग्यता विशेष मोठी मानतां येत नाही; आणि हे जणुं काय भविष्याप्रमाणे आगाऊ ध्यानांत घेऊनच त्यांनी साहित्याची कांस न धरतां राजकारणाचा आश्रय केला ! चर्चिलसाहेबांची ही निवड व्यवहारचातुर्याची द्योतक नव्हे, असे कोण म्हणेल ?

श्रीमती सरोजिनी नायडू व सर महंमद इकबल यांनी आपल्या उत्तर आयुष्यांत काव्योपासनेचा जवळजवळ त्याग करून राजकारणाचा अंगीकार केल्याबद्दल नेहमी सखेदाश्चर्य व्यक्त करण्यांत येत असते. सर इकबल यांचे काय असेल ते असो; सरोजिनीबाईविषयी मात्र थोर थोर रसज्ञांनी असे उद्गार काढले आहेत की, त्यांच्या आरंभीच्या कृतींनी त्यांजविषयी जी अपेक्षा निर्माण केली होती, ती नंतरच्या कृतींनी तितकीशी पुरी केली नाही ! ' The Bird of Time ' व ' The Golden Threshold ' या त्यांच्या दोन काव्यसंग्रहांनंतर प्रसिद्ध झालेल्या ' The Broken Wing ' या तिसऱ्या काव्यसंग्रहाबद्दल कवि व टीकाकार जे. एच्. कूझिन्स हे लिहितातः " I have to confess that this book has disappointed me. It does not add, except in quantity, to the poetess' revelation. It goes no deeper and no higher than anything in her two previous books " सरोजिनीबाईंच्या ' The Broken Wing ' या पुस्तकानंतरच्या कवितांबद्दल सुद्धां कमी अधिक प्रमाणांत असेच विधान करतां येईल. अर्थात् त्या राजकारणांत भाग घेऊं लागल्यामुळे साहित्याची विशेष हानि झाली, असे ठासपणे म्हणतां येत नाही हे खास.

कांही कांही व्यक्ति – कविकुलगुरूची उपमा किंचित फरकाने वापरावयाची तर – आपला जीवनौघ साहित्य व राजकारण या दोन्ही थडींना स्पर्श करीत वाहावयास लावतात. बंगालीतील कै. देशबंधु दास, हिंदीतील प. माखनलाल चतुर्वेदी किंवा मराठीतील रा. न. चिं. केळकर ही सहज आठविलेली नांवे अशा व्यक्तींची उदाहरणें म्हणून नमूद करतां येतील. या गृहस्थांची राजकारणपर अगर साहित्यविषयक कामगिरी कुणाला

मान्य नसली, तथापि त्यांचे हे सव्यसाचित्व अमान्य करतां येणें सर्वथैव अशक्य आहे.

कित्येक साहित्यिकांना या लोकांप्रमाणे राजकारणाच्या आखाड्यांत प्रत्यक्ष उतरून त्यांतील ' मुलतान माती 'ने रंगणे आवडणार नाही, व त्याबद्दल त्यांना दोष देणें देखील रास्त होणार नाही. राजकारण हा जाणून बुजून कृतिप्राधान्याचा विषय; तो झाडून सर्व साहित्यिकांच्या मनःप्रवृत्तीला कसा काय मानवणार ? कारण, साहित्यिक म्हटले कीं, ते सामान्यतः कृतिप्रधान नसून विचारप्रधान असावयाचे. कविवर्य रे. टिळक यांनीं भ्रमराला उद्देशून काढलेले

जातीच्या भ्रमरास ' सोडुनी फुलें ये, तोड हीं लांकडें ! '—
ऐसें कोण म्हणेल ?...

हे उद्गार साहित्यिकांनाहि लागूं पडतात. तथापि, साहित्यिकांनी राजकारणांत साक्षात् भाग न घेतला, तरी पण त्यांनी त्याचा अजिबात विटाळ न मानतां, शक्य झाल्यास विशिष्ट राजकीय तत्त्वांचा आपल्या लेखनामधून प्रत्यक्षाप्रत्यक्ष पुरस्कार करावा, व वेळोवेळीं उद्भवणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या राजकीय प्रश्नावरील आपली मतेंहि प्रदर्शित करावीं. विशेषतः अतिशय नाणावलेल्या साहित्यिकांनीं हा क्रम सुरू ठेवल्यास तो हितावह ठरल्यावांचून खचित राहणार नाहीं. कारण, त्यामुळे ते ते राजकीय तत्त्व व तो तो राजकीय प्रश्न यांना एक प्रकारचे नैतिक बळ प्राप्त होईल, व तद्द्वारां लोकमत बनणें सोपे जाईल.

बड्याबड्या साहित्यिकांनीं आपल्या प्रतिपादनाचे हे महत्त्व जाणून कोणत्याहि राजकीय तत्त्वाचा पुरस्कार करतांना अत्यंत खबरदारी घेतली पाहिजे, हें उघड आहे. त्यांनीं कसल्याहि प्रकारच्या संकुचितपणाला थारा देतां कामा नये. जात, धर्म अगर देश यांपैकीं कोणतेच कुंपण त्यांच्या मतास पडावयाला नको आहे. अखिल मानवजातीबद्दल प्रेम वाटणें, सर्व प्रकारच्या अन्यायांचा तिरस्कार करणें, तो तिरस्कार व्यक्त करण्याइतकें धैर्य बाळगणें — यांसारखा साहित्यिकांचा राजकीय दृष्टिकोन असला पाहिजे.

अशा व्यापक दृष्टिकोनाचा ताजा मासला म्हणून रोमाँ रोलाँ यांच्या ' I will not rest ' या नूतन ग्रंथाकडे अंगुलिनिर्देश करतां येईल. आपण कलावंत असलो, तरी राजकारणाकडे पाठ फिरवूं शकत नाही, असे या ग्रंथात रोमाँ रोलाँ यांनी स्वच्छ म्हटले आहे. तसेच, या ग्रंथांतील ' Against Fascism in Europe ' या पत्रामध्ये हिटलरशाहीचा निषेध करण्यासाठी ते इतराबरोबर व इतरांच्या आधी पहिल्याने लेखकवर्गास आवाहन करीत आहेत. त्यावरूनहि खुद्द रोमाँ रोलाँ हे साहित्यिकाच्या राजकारणपर अभिप्रायाची किती मातब्बरी मानतात, हे स्पष्टपणे निदर्शनास येते.

रोमाँ रोलाँ हे फ्रेंच असले, तथापि त्यांचे राजकारण ' फ्रान्स व फ्रेंच ' यांच्यापुरते मर्यादित नाही. ' **हें विश्वचि माझें घर** ' अशी त्यांची विशाल जागतिक दृष्टि आहे. लीबनेश्त व रोझा लक्झेमबर्ग यांच्या खुनाचे प्रकरण असो, इंडो–चायनाच्या ' Nguyen-An-Ninh ' या देशभक्ताला राजद्रोहावरून शिक्षा झाल्याचा प्रश्न असो, की आपल्या हिंदुस्थानातील मीरत खटल्याच्या निकालाचा मुद्दा असो, जेथे जेथे पाशवी शक्तीने थैमान घातलेले असते तेथे तेथे त्या शक्तीशी झुंज करण्यासाठी पददलितांच्या वतीने रोमाँ रोलाँ हे रणक्षेत्रावर प्रकट होतात ! युद्धासंबंधी त्यांना वाटणाऱ्या उत्कट घृणेबद्दल तर बोलावयासच नको ! गेल्या महायुद्धाला रोमाँ रोलाँ यांनी केवढा विरोध केला, व त्यांची फळे त्यांना कशी भोगावी लागली, याची साक्ष या ग्रंथांत ठिकठिकाणी पटते !

अलीकडे रोमाँ रोलाँ हे कम्युनिझमकडे उघड उघड वळले आहेत. मात्र कम्युनिझमचे ते अंधभक्त निःसंशय नव्हत ! ( पहा: पा. १७७ व १८०–१८७ ) पुढील एकच अवतरण पहा:—I have never concealed all that divides me from the Russian Revolution, my aversion for certain methods of its policy ( too closely related to the worst aberrations of the reactionary policies which it combats ), for its narrowness of doctrine, for its **dictatorial spirit.** I have without regard condemned its duplicities and its violences. यांतील ' dictatorial spirit ' या शब्दप्रयोगाकडे

' प्रतिभा,' वर्ष ३, अंक १९ यामधील ' नवमतवाद ' नामक माझ्या एका स्फुटावरून मजवर डोळे वटारणाऱ्या माझ्या एका ' नारदी ' मित्रांनी जरूर अवधान द्यावे.

अंतःकरणाला पटलेल्या तत्त्वांना उचलून धरतांना रोमाँ रोलाँ हे ज्याप्रमाणें शासनदंडाची भीति बाळगत नाहींत, त्याप्रमाणें कुणाची भीडमुर्वतहि ठेवीत नाहींत. या दृष्टीनें थॉमस मॅन यांजवर त्यांनी झाडलेला ताशेरा उद्बोधक आहे. " And in his ' Thoughts in War Time ' Thomas Mann basely insulted France, ridiculed the grief and the emotions evoked by German devastation ( and specially by the ruin of the cathedral of Rheims ) and made an apology for German militarism, which he identified with the cause of Kulter. "

* * *

## १९० कै. शिवरामपंत परांजपे यांचे लेख

कै. **शिवराम महादेव परांजपे** यांची पुण्यतिथि सप्टेंबर अखेरच्या आठवड्यांत महाराष्ट्रांत कांहीं ठिकाणीं साजरी करण्यांत आली. या प्रसंगी शिवरामपंतांच्या ' काळां'तील सरकारजमा लेखसंग्रहांचे पुनरुज्जीवन करण्यासंबंधीचे विचार अनेकांच्या अंतःकरणांत जोरानें उद्भूत झाले असल्यास त्यांत नवल वाटण्याचें कांहीच कारण नाहीं. किंबहुना, शिवरामपंतांच्या ऋणांतून मुक्त होण्याचा हाच एकमेव उपाय आतां उरलेला आहे.

शिवरामपंतांच्या लेखनकौशल्याची आज वेगळी स्तुति काय करावयाची आहे ? गारुड्याच्या पुंगीनें जसा नाग डोलतो, तसा त्यांच्या ' काळ ' पत्रांतील लेखांनीं उभा महाराष्ट्र डुलत झुलत होता ! **व्याजोक्ति-वक्रोक्तीचे मराठींतील आचार्य म्हटले म्हणजे शिवरामपंत परांजपे हेच होत !** कै. वि. का. राजवाडे यांनीं महाराष्ट्रांतील प्रतिभासंपन्न व्यक्तींत ' वक्रोक्तिकुशल ' म्हणून शिवरामपंतांची गणना केली होती, ती उगाच नव्हे ! **त्याचप्रमाणें, मराठी भाषेंतील राजकीय स्वातंत्र्याचे पहिले**

उद्गाते या नाट्यानेंहि शिवरामपंतांचें नांव अजरामर होण्यासारखें आहे. अशा या स्वातंत्र्यभक्त भाषाप्रभूचें अव्वल दर्ज्याचे लिखाण सरकारी रोषामुळें आपणास पारखें व्हावें, याबद्दल कुणाला हळहळ वाटणार नाही! स्वतः शिवरामपंतांना ही गोष्ट किती लागून राहिली होती, याचें प्रत्यंतर त्यांच्या भासावरील सुंदर निबंधावरून येईल. या निबंधामध्यें त्यांनीं भासाच्या मुखानें स्वतःचे हृदय अतिशय मर्मस्पर्शी रीतीनें उकलून दाखविलें आहे! शिवरामपंतांच्या हयातींत नाही, पण त्यांच्या निधनानंतर इतक्या वर्षांनीं तरी 'काळां'तील निबंध पुनरुज्जीवित होण्याचा योग यावयास पाहिजे! पण तो केव्हां येईल तो येवो!

किती तरी वर्षें सरकारजमा असलेले रा. खाडिलकर यांचे 'कीचकवध' नाटक पुनर्मुद्रित करावयास सरकारने परवानगी दिली! तोच अनुभव शिवरामपंतांच्या लेखांबाबतहि येणार नाही कशावरून?

**प्रतिभा,** वर्ष ४, अंक १९

## १९१ चार संमेलनाध्यक्ष

चालू महिन्यांत जळगांव येथें भरणाऱ्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान **प्रो. माधव त्रिंबक पटवर्धन** यांना व पुढील महिन्यांत ठाणें येथें भरणाऱ्या मुंबई-उपनगर-साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान **श्री. भार्गवराम विठ्ठल वरेरकर** यांना देण्यांत आलें आहे, हें वर्तमान-पत्रांच्या वाचकांना विदित झालेंच आहे.

गतवर्षी महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षत्वाबद्दल मी अनेकवार स्फुटें लिहिलीं, परंतु या वर्षी त्या बाबतींत मी 'ब्र'हि काढला नाहीं, हा विरोध वाचकांच्या लक्ष्यांत आलाच असेल. नव्हे, तो तसा पुष्कळांच्या लक्षांत आला, ही गोष्ट 'प्रतिभा' कचेरीकडे यासंबंधीं आलेल्या अनेक पत्रांवरून सूर्यप्रकाशासारखी स्पष्ट होते. या विरोधाचें कारण एवढेंच कीं, अध्यक्षाबाबत तरुणांच्या आकांक्षा कस्पटासमान समजण्याचाच कांहीं सत्ताधारी 'साहित्यबुद्रुकांनीं' चंग बांधला असल्याचें गेल्या खेपेस सर्वांच्या अनुभवास आलें होतें; यामुळें चालू सालीं संमेलनाध्यक्षांच्या निवडीसंबंधीं मौन धारण करणें हेंच मला श्रेयस्कर वाटलें. परंतु, अनपेक्षित रीत्या महाराष्ट्र-साहित्य-परिषदेनें अध्यक्षस्थानाकरतां सुचविलेल्या नांवांत या वर्षी प्रो. मा. त्रिं. पटवर्धन यांचेंहि नांव होतें; आणि, जळगांवकरांनीं देखील अखेर त्यांचीच निवड केली, यामुळें परम समाधान वाटून मी आज हें स्फुट लिहिण्यास उद्युक्त झालों आहे.

प्रो. पटवर्धन यांना अध्यक्षपद लाभल्याबद्दल मला हर्ष कां होत आहे, हें 'प्रतिभा' वर्ष ३, अंक १४, यांतील माझ्या 'साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद' या स्फुटावरून वाचकांच्या निदर्शनास येईल. या स्फुटांत मीं पुढील उद्गार काढले होतेः "...ज्याची उमेद अजून जशीची तशी शाबूत आहे, साहित्यविषयक नवेनवे प्रयोग करून पाहण्याची जो कांक्षा बाळगतो आणि तद्द्वारां उदयोन्मुख लेखकांस जो स्फूर्तिप्रद होऊं शकतो, अशाच

साहित्यिकाच्या गळ्यांत इतःपर अध्यक्षत्वाची माळ पडावयास पाहिजे." आणि, यानंतर या कसोटीस उतरूं शकणारे साहित्यिक म्हणून मीं अध्यक्षस्थानासाठीं बॅ. सावरकर, प्रो. फडके, प्रो. पटवर्धन ही तीन नांवें उपलक्षणादाखल सुचविली होतीं. गतवर्षी सुचविलेल्या या नामत्रयांतील एका नांवास तेव्हां नाहीं तर नसो, पण निदान आतां तरी मान्यता मिळत आहे, याविषयीं मला आनंद कां न वाटावा ? या आनंदांत इतरहि अमूप साहित्यभक्त भागीदार आहेत, हे मुद्दाम सांगावयास नकोच.

प्रो. पटवर्धन हे जसे उत्कृष्ट कवि, तसेच उत्कृष्ट लेखकहि आहेत. मराठींतील अतिशय कल्पक साहित्यिकांत त्यांचा प्रामुख्याने अंतर्भाव होतो. त्यांची कल्पकता केवळ लागू-गैरलागू उपमा-उत्प्रेक्षांपुरतीच मर्यादित नाहीं, ही विशेष उल्लेखनीय बाब आहे ! त्यांच्या बऱ्याच स्फुट कविता व 'छंदोरचना' हा ग्रंथ मराठी वाङ्मयांत दीर्घकाल टिकल्यावांचून खचित राहणार नाहीं. 'छंदोरचने'तील त्यांची कित्येक ठिकाणची कल्पकता व मूलगामी विवेचन खरोखरच आश्चर्योत्पादक आहे ! प्रोफेसरसाहेबांच्या निबंधलेखन, पद्यरचना इ. विविध पृथक् चेष्टा पुढेपुढें येण्याच्याच हेतूने करण्यांत आल्या आहेत, असे कुणी खुशाल म्हणोत,* पण असें म्हणणारेच पुढे पुढे येण्यासाठीं निबंधलेखन व पद्यरचना करीत असतात काय, असा सवाल त्यांनाहि करतां येणे कठिण नाहीं ! आणि प्रो. पटवर्धन यांनी या 'विविध पृथक चेष्टा' कोणत्याहि उद्देशाने केलेल्या असल्या, तथापि त्यामुळे मराठी वाङ्मयाचे मुख त्या त्या प्रमाणांत उजळच झालेलें आहे, ही वस्तुस्थिति काय अन्यथा ठरते ?

कांहीं वर्षांपूर्वी प्रो. पटवर्धन यांनी 'सकाळ' पत्रांत स्वतःच्या काव्यलेखनाची माहिती देतांना एका स्मृतिशेष मासिकांत आपल्या कविता कुणामुळें प्रकाशित झाल्या, याचा उल्लेख–अनवधानामुळे म्हणा, किंवा अनवश्यकतेमुळे म्हणा–केलेला नव्हता. या महान् अपराधाबद्दल त्यांना

---

* 'महाराष्ट्र' ता. ९ फेब्रु. १९३६ यांतील डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांचा 'महाराष्ट्रांतील टीकेला उत्तर' हा लेख पहा.

प्रायश्चित्त घडविण्यासाठीं त्या मध्यस्थ गृहस्थांनी त्यांच्या काव्यप्रकाशनाचे, एवढेच केवळ नव्हे, तर लेखनकीर्तीचेहि श्रेय स्वतःकडे असल्याचा बोभाटा खऱ्याखोट्या नांवांनी वर्तमानपत्रांत चालविला होता !* हे गृहस्थ, त्यांचे पित्ते आणि पटवर्धनांचे पूर्वोक्त आक्षेपक यांना ' रामशास्त्र्या 'ने या अंकांत आणखी एकवार प्रोफेसरमजकुरांचें ' संवाहन ' ( हा शब्दप्रयोग त्यांचाच !) चालविल्याबद्दल त्याचा मोठा धुस्सा येईल, हे मी जाणून आहे ! परंतु प्रो. पटवर्धन यांना संमेलनाध्यक्ष निवडून अखिल महाराष्ट्रानें त्यांचे पर्यायानें जें ' संवाहन ' केले आहे, त्यापुढें विचाऱ्या ' रामशास्त्र्या 'च्या पूर्वीच्या व आतांच्याहि ' संवाहना 'चा काय पाड लागणार ?

जो प्रकार प्रो. पटवर्धन यांचा, तोच रा. वरेरकर यांचाहि. वरेरकरांची देखील साहित्यविषयक कामगिरी दडपून टाकण्याचा प्रयत्न थोडाथोडका झालेला नाहीं ! तथापि मेघांनी सूर्यप्रकाश कितीहि झांकोळून टाकावयाचा म्हटले तरी तो किती वेळ तसा राहणार ? आणि, तो अल्पस्वल्प झांकोळला गेला, तरी पण त्यामुळे दिवसाढवळ्या अमावास्येचा कृष्णांधःकार थोडाच पसरणार आहे ? रा. वरेरकर यांचे व्यक्तिदोष काय असावयाचे ते असतील, परंतु त्यामुळें त्यांच्या वाङ्मयकीर्तीस झळ पोंचण्याचे कांहीच कारण नाही ! मराठीतील अव्वल दर्जाच्या नाटककारांत वरेरकर यांचा ठळकपणानें समावेश होतो. **किर्लोस्कर, कोल्हटकर, खाडिलकर व गडकरी यांच्या नंतर नाटककार या नात्यानें वरेरकरांचाच नामनिर्देश करावयास** पाहिजे ! ' अद्यावत् ' सामाजिक नाटके लिहावीं वरेरकरांनीच ! कोल्हट-करांचे शिष्यत्व पत्करूनहि व गडकऱ्यांविषयीं आदर बाळगूनहि वरेरकरांनीं त्या दोघांच्या अवजडपणाचें अनुकरण केले नाहीं, हें एकच उदाहरण त्यांच्या स्वतंत्र प्रज्ञेची ग्वाही देण्यास पुरेसें आहे ! कथाविषय, तंत्र, भाषा वगैरे सर्वच बाबतींत वरेरकर यांची नाटकें पृथगात्म आहेत ! अशा या श्रेष्ठ साहित्यिकास महाराष्ट्र–साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षत्वाचा मान

---

* ' महाराष्ट्र ' ता. २३ फेब्रु. १९३६ यांतील ' संघशक्ति व जाहिरात कला ' हा लेख पहा.

अजूनहि मिळूं नये, हे आश्चर्य नव्हे काय? 'अनुल्लेखानें मारण्या'च्या **वरेरकरांच्या** तक्रारीची नेहमीं थट्टा करण्यांत येते, व ही तक्रार किंचित अतिशयोक्तहि आहे, हे खरे; पण वरेरकरांच्या योग्यतेच्या मानाने त्यांची चहा झालेली नाही, हे देखील तितकेच खरे आहे! संमेलनाध्यक्षत्व नाही तर नाहीं, तथापि मुंबई–उपनगर–साहित्य–संमेलनाचें तरी अध्यक्षपद वरेरकर यांना या वर्षी प्राप्त होत आहे, याबद्दल निःपक्षपाती वाङ्मयभक्तांच्या तोंडून खात्रीने समाधानाचेच उद्गार निघतील!

काल व आज व्हावयाच्या सोलापूर–जिल्हा–साहित्य–संमेलनाच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्षस्थान **रा. वि. स. खांडेकर** यांजकडे गेलेले आहे. एकामागून एक प्रदेश पादाक्रांत करीत सुटणाऱ्या सेनानीप्रमाणे खांडेकर हे अलिकडे अनेक संमेलनाचे अध्यक्षपद भूषवीत आहेत, यावरून त्यांची लोकप्रियता चांगलीच प्रत्ययास येते.

त्याचप्रमाणे बडोदें साहित्य–संमेलनाचे अध्यक्ष **प्रो. ना. सी. फडके** यांस निवडले, हे ऐकून प्रत्येक वाङ्मयभक्तास अपरिमित आनंद होईल.

—या सर्व संमेलनाध्यक्षांचे 'प्रतिभे'तर्फे मी मनःपूर्वक अभिनंदन करतो.

* * *

## १९२ 'काळां'तील निबंधांचें पुनरुज्जीवन

कै. शिवरामपंत परांजपे यांच्यावरील गेल्या अंकामधील स्फुटांत त्यांच्या 'काळां'तील निबंधाचे पुनरुज्जीवन होण्यासंबंधी अल्प विवेचन आलेलं आहे. आज त्याच विषयावर पुनः लिहिण्याचे कारण हे आहे की, महाराष्ट्र–साहित्य–संमेलन आतां केवळ नऊदहा दिवसांवर आले आहे, व त्यांत सरकारजमा वाङ्मयाचा प्रश्न पुनः उपस्थित होण्याचा संभव आहे. यामुळे 'काळां'तील निबंधाच्या पुनरुज्जीवनासंबंधी प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीने आणखी एकदां लिहिणे जरूरीचे झाले आहे

'काळां'तील निबंधांवर एवढा भर देण्याचे प्रयोजन हे आहे की, सरकारजमा झालेल्या मराठी वाङ्मयांत त्यांची महति केवळ अनन्यसाधारण

असून शिवाय त्यांत कै. शिवरामपंतांचे लेखनसर्वस्व सामावलेले आहे. ‘ काळां’तील निबंध वगळले, म्हणजे शिवरामपंतांच्या लिखाणाचे बहुतेक सर्वच अंग लुळें पडतें !

ज्यांचे वाङ्मय जप्त झाले आहे, अशा श्रेष्ठ प्रतीच्या अन्य साहित्यिकांची सदृश गत होत नाहीं. उदाहरणार्थ, ‘ मालाकार ’ चिपूळणकरांचा ‘ आमच्या देशाची स्थिति ’ हा निबंध सरकारजमा झाल्यामुळें त्यांच्या लेखणीचे कौशल्य वाचकांच्या अनुभवास यावयाला अडचण पडते, अशांतला बिलकूल भाग नाही. तेंच ‘काळां’तील निबंधांच्या अभावी तरुण पिढीला खऱ्याखुऱ्या शिवरामपंतांची यथार्थ कल्पनाच होऊं शकत नाही ! तात्पर्य, मराठी वाङ्मय व व्यक्तिशः कै. शिवरामपंत परांजपे या उभयतांच्याहि दृष्टीनें ‘काळां’तील निबंधांचें पुनरुज्जीवन होणें अत्यावश्यक ठरतें यांत शंका नाही.

आतां, ‘ काळां’तील निबंधासंबंधी येत्या संमेलनांत कोणतें धोरण ठेवावयाचें, याचें प्रतिनिधींना कोडेंच पडणार आहे ! कारण, सरकारनें त्यांच्या व इतरहि कांही जप्त वाङ्मयाच्या बाबतींत फेरविचार करायास साफ नकार दिलेला आहे ! ‘ महाराष्ट्र–साहित्य–पत्रिके ’च्या जानेवारी १९३६ च्या अंकांत बडोदे संमेलनांतील ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तांत आला आहे, त्यांतील एतद्विषयक मजकूर असाः—

“ **ठराव २२**—’ वाङ्मयनिर्बंधनिवारक समितीनें कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरकृत ‘ आमच्या देशाची स्थिति, ’ कै. शि. म. परांजपेकृत ‘ काळांतील निवडक निबंध, ’ रसिकरंजन नाट्यमालेंतील ‘ विजयदुर्ग अथवा गर्वविलसित ’ आणि कै. ना. कृ. गद्रेकृत ‘ महाराष्ट्रमहोदयाचा पूर्वरंग ’ या चार पुस्तकांवरील सरकारी निर्बंध उठविण्याबद्दल सरकारांत खटपट केली होती. परंतु ‘ पहिल्या तीन पुस्तकांवरील निर्बंधाचा फेरविचार करण्याचें कारण दिसत नाहीं; चवथ्या पुस्तकावर निर्बंध घालणाऱ्या सरकारी जाहीरनाम्याचा क्रमांक व तारीख कळवावी, ’ अशा आशयाचें उत्तर आलें.”

या माहितीवरून सरकारकडे उपरोक्त ग्रंथांवरील बंदी उठविण्या विषयी संमेलनानें यंदां ठराव करावा कीं काय, याबद्दल कित्येकांची दोलाचल वृत्ति

होणें शक्य आहे. तथापि 'काळां'तील निबंधांबाबत तरी ती तशी होऊं नये, असे मला वाटते व इतरहि साहित्यभक्तांचा असाच अभिप्राय पडेल. त्यांच्याविषयी इतःपर खटपट करतांना किंचित् निराळें धोरण आंखावें, म्हणजे आलें. गेल्या अंकांत "**एतद्विषयक प्रयत्न मात्र योग्य दिशेनें व्हावयास पाहिजेत**," असा इषारा मीं दिला होता, त्याचे मर्म हेंच होय. या धोरणाची कांहीं रूपरेषा सूचनारूपाने येथे थोडक्यांत देतो:—

'पत्रिके'तील वरील अवतरणाने '**सरकारांत** खटपट **केली होती**' म्हणजे नक्की काय केले होतें, यावर कसलाहि प्रकाश पडत नाहीं! त्यांतील शेवटच्या '**सरकारचे उत्तर आलें**' या शब्दप्रयोगावरून तरी ही 'खटपट' फक्त पत्रव्यवहाराचीच असावी, असा तर्क होतो. तो खरा असल्यास व 'वाङ्मयनिर्बंधनिवारक समिती'नें पुढील योजना अमलांत आणल्या नसल्यास त्या यापुढें अमलांत आणून पहाव्या. कदाचित् यश आल्यास येईल, अशी नम्र प्रार्थना आहे: (१) शिवरामपंतांच्या वारस-दारांशी आगाऊ ठरवून घेऊन अथवा त्यांजशी सहकार्य करून 'काळां'तील निबंधांच्या पुनर्मुद्रणासाठीं एखादा प्रकाशक गांठावा, अगर शक्य तर परिषदेनें हें काम स्वतःच अंगावर घ्यावें. (२) सरकारी परवानगी 'काळा'तील निवडक निबंधांच्या सर्व पुस्तकांकरतां न मागतां त्यांतील फक्त वेचक भागाकरितां मागावी. ही निवड वाङ्मयगुणांवरून व्हावी, व सरकारला कदाचित् आक्षेपार्ह वाटतील, असे निबंध तूर्त तींत समाविष्ट करूं नयेत. (३) हे वेचक निबंध सरकारदरबारी वजन असलेल्या थोर थोर व्यक्तींना प्रथम दाखवून त्यांजवरील त्यांचीं मतें मिळवावी, व सरकारच्या निदर्शनास आणावी. (४) सरकारकडे एक शिष्टमंडळ पाठवावें व त्यांत अशा कांहीं थोरामोठ्यांचा अंतर्भाव करावा. (५) सरकारशी प्रत्यक्ष बोलणें—चालणें कायदेमंडळाच्या नवीन निवडणुकी होऊन गेल्या-खेरीज करूं नये. कायदे मंडळाचे नवीन सभासद व कांहीं नवीन दिवाण यांची या कामी सहानुभूति मिळविणें विशेषच सद्यःफलदायी होईल.

संमेलन-परिषदेच्या बरोबरीने किंबहुना त्याच्यापेक्षांहि ज्यास्त शिवरामपंतांच्या आप्तेष्टांनीं या कार्यांत पुढाकार घ्यावयास पाहिजे. त्यांना शक्य तें साह्य इतरांकडून निश्चयाने मिळेल, हे उघड आहे.

*　　*　　*　　*

## १९३ झांशीच्या संग्रामदेवतेवर शिंतोडे !

झांशीची इतिहासप्रसिद्ध महाराणी लक्ष्मीबाईच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविणारे एक नाटक फिलिप कॉक्स नामक लेखकानें लिहिलें असून त्या बाबतीत आपल्याकडील नियतकालिकांच्या सृष्टीत मोठीच खळबळ उडाली आहे ! वस्तुतः, या नाटकाला एवढे महत्त्व देण्यांत कांहीच मतलब नाही. फिलिप कॉक्स तो कोण व त्याची वटवट ती काय ! शिवाज, ज्या व्यक्तीने आपल्याला अथवा आपल्या जमातीला पूर्वी अगर आता तान दाखविलेला असतो, तिला 'येनकेन प्रकारेण' खाली ओढण्यासाठीं तिच्या चारित्र्यावर चिखल उडविण्याकडे नादानांची नेहमीच प्रवृत्ति होत असते ! 'पेशवा' पत्राने शिवछत्रपतींसंबंधीं असेच निरर्गल प्रलाप काढले होते, हे सर्वश्रुतच आहे ! हा मनुष्यस्वभाव ध्यानांत घेऊन प्राप्त परिस्थितीत अशा उद्गारांकडे दुर्लक्षच केलेले चांगलें. एका एकोणीस-वीस वर्षांच्या पोरीने सर्वनाश होणार असल्याचे कळूनसवरूनहि इंग्रजांसारख्या बलाढ्य शत्रूशीं दोन हात केले, या तिच्या शौर्य-धैर्याबद्दल फिलिप कॉक्ससारखे संकुचित बुद्धीचे मंडूक तिला क्षमा कशी करणार ? बरे, तिचे शौर्य स्वच्छ नाकारावे, तर आपल्याच भाईबंदांनी त्याविषयी प्रशंसा केलेली आढळते ! व्हिन्सेंट स्मिथसारखे 'कट्टर' इंग्रज इतिहासकार महाराणी लक्ष्मीबाईबद्दल पुढीलप्रमाणे कबुलीजबाब देतातः "when she had been installed she certainly proved herself to be a resolute and bitter enemy of the British Government, earning from Sir Hugh Rose the compliment that she was the **best and bravest** of the rebel leaders." तेव्हां, तिला हाणून पाडण्याचा एकच उपाय राहिला, आणि तो हा की, तिच्या शीलाविषयी खरें-खोटें लिहावयाचे व चार दोन भोळसटांच्या दृष्टीने तिला कमीपणा आणावयाचा !

परंतु, अशा कारवाईने फगण्याइतके सारेच हिंदी लोक आतां दूधखुळे राहिलेले नाहीत, हें या पाजी लोकांना खूप समजून असावे ! झांशीच्या संग्रामदेवतेविषयी कुणी कांहींहि बरळला, तरी इंग्रजांशीं स्वातंत्र्याप्रीत्यर्थ झगडण्याची तिची कर्तबगारी इतकी लोकोत्तर आहे, की तरुणांच्या अंतःकरणामधील या देवतेचें स्थान कदापि रिते होणार नाही !

*  *  *

## १९४ आंग्ल कविवर्य ए. ई. हाउसमन

३० एप्रिल १९३६ रोजी दिवंगत झालेले इंग्रजी कविवर्य **प्रो. ए. ई. हाउसमन** हे व्यक्ति या नात्याने कांहीसे लोकविलक्षणच होते ! ते स्वभावाने मितभाषणी व प्रसिद्धिपराङ्मुख असत. यामुळे त्यांच्या हयातीत त्यांची खाजगी माहिती फारच थोडी उजेडांत आली. किबहुना, गुणांच्या मानाने त्यांच्या कवित्वाची व्हावी तशी चहा झाली नाही, याला त्यांचा हा स्वभावविशेषच कारणीभूत झाला. प्रो. हाउसमन यांच्या पश्चात् आतां त्यांच्या व्यक्तित्वाचा परिचय करून देणारे विपुल लिखाण बाहेर पडूं लागले आहे, हे त्यांतल्या त्यांत सुचिन्ह होय

प्रो. हाउसमन यांच्या अबोलकेपणाची एक मौजेची आख्यायिका सांगतात. एका भोजनसमारंभाला प्रख्यात नाटककार **सर जेम्स बॅरी*** व हाउसमन हे जवळजवळ बसूनहि ते एकमेकांशी चकार शब्द देखील बोलले नाहीत ! पुढे त्या दोघांत त्रुटितपणे फार गंमतीचा पत्रव्यवहार झाला, तो येणेप्रमाणेः—

### बॅरी यांचें हाउसमनना पत्र

Dear Professor Houseman,

You must have found me very incommunicative in hall to-night. But I am a strangely silent man.

Yours sincerely,
J. M. BARRIE

* सर जेम्स बॅरी हे दुर्दैवाने आतां हयात नाहीत !

## हाउसमन यांचें बॅरींना उत्तर

Dear sir James,

You must have found me very incommunicative in hall the other night. I, too, am a strangely silent man.

Yours sincerely,
A. E. Housman

By the way, you spell my name wrong.

प्रो. हाउसमन यांच्या प्रसिद्धिपराङ्मुखतेचे तर कितीतरी दाखले दाखविता येतील ! त्यांनी आपल्या हयातीत 'A Shropshire Lad' व 'Last Poems' हे कविताग्रंथ व निबंधादि कांही गद्य मजकूर छापला, हेच 'दहावे आश्चर्य' म्हणावयाचें ! एरवी गाजावाज्याचे बहुतेक सर्व प्रसंग गमाविण्याचाच त्यांनी धूमधडाका चालविला होता ! एखाद्या निवडक कवितांच्या संग्रहांत कुणी कविता मुद्रित करण्याची परवानगी मागितली, तर ही स्वारी सहसा 'नकार' दिल्याखेरीज रहावयाची नाहीं ! इतकें कशाला ? 'ऑडर ऑफ मेरिट' सारखे दुर्मिळ मानसन्मान घरीं चालत आले असतांना सुद्धा या भल्या माणसानें दिंडी-दरवाजा खुशाल धाडदिशी लावून घ्यावा ! प्रो. हाउसमन यांचा विचित्र स्वभाव त्यांच्या मृत्यूनंतरहि त्यांच्या लिखाणास व पर्यायानें इंग्रजी वाङ्मयासहि बाधलेला आहे ! त्यांनी नियतकालिकांत विखुरलेले आपले निबंध वगैरे ग्रंथरूपानें संग्रहित करण्यास सक्त मनाई केलेली आहे ! यामुळे जिज्ञासू वाचकांना ए. एस. एफ. गौ. यांच्या 'A. E. Housman—A Sketch' चा नुकत्याच प्रकाशित झालेल्या ग्रंथांतील हाउसमन यांच्या निबंधादिकांच्या फक्त सूचीवरच इतःपर आपली तहान भागवून घ्यावी लागणार आहे ! ही प्रसिद्धिपराङ्मुखता अद्‌भुत नव्हे, असें कोण म्हणेल ?

प्रो. हाउसमन यांचे उपरिनिर्दिष्ट काव्यग्रंथ सापेक्षतः छोटेखानीच असले, तथापि ते गुणांनीं अतिशय 'आगळे' आहेत. या दोन ग्रथांच्या बळावर हाउसमन यांनी आंग्ल साहित्यांत, कायमचे उच्चासन पटकावले

आहे ! प्रो हाउसमन हे ग्रीक व लॅटिन भाषेचे महापंडित असूनहि त्यांच्या काव्याला बोजडपणाचा संपर्क देखील झालेला नाही ! त्यांच्या कविता जितक्या अर्थपूर्ण, ठाकठिकीच्या व रसाळ आहेत, तितक्याच त्या साध्याहि आहेत. त्यांच्या 'A Shropshire Lad'मधील निराशेचा तीव्र सूर श्रवण करून एकाला अशी शंका आली कीं, कवि पराकाष्ठेच्या दुःखांत असतांना त्याने या पुस्तकातील कवितानिर्मिति केली असली पाहिजे ! या शंकेचे प्रो हाउसमन यांनीं जे निरसन केलेले आहे, त्यातील एक मुद्दा आधुनिक मराठी कवींसाठी येथे उद्धृत करणें जरूरीचे आहे **ही शंका खोडून काढतांना प्रो हाउसमन असें सांगतात की, कवींच्या वैयक्तिक सुखदुःखासारख्या क्षुद्र व अप्रस्तुत आधारांवर** 'A Shropshire Lad'-**मधील काव्यरचना झालेली नाहीं तर ती जगाच्या त्यांना आलेल्या कटु अनुभवावर झालेली आहे.** हा सूक्ष्म फरक आमच्या कवींनी स्मृतिमंजुषिकेंत सांठवून ठेवण्याजोगा आहे !

प्रो. हाउसमन हे जसे उत्कृष्ट कवि होते, तसेच ते उत्कृष्ट टीकाकारहि होते ! त्यांच्या टीका ' एक घाव दोन तुकडे'–अशा स्वरूपाच्या असत ! एका भाषणांत त्यांनीं स्कॉटलंडचा कवि बर्न्स याजवर एवढे तीक्ष्ण शस्त्र चालविले की, एक स्कॉच प्रोफेसर तिरिमिरीने उभे राहून म्हणाले, " या टीकेबद्दल वक्त्यांना मी कदापि क्षमा करणार नाही ! "

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक २०

## १९५ खांडेकरांचें भाषण

रा. वि. स. खांडेकर यांचें सोलापूरचें भाषण नेहमीप्रमाणेच झालें ! याहि भाषणांत खांडेकरांनी प्रो. फडके यांजवर हल्ला चढविला, हे आश्चर्यकारक असले तरी अनपेक्षित मात्र नव्हे ! या भाषणांत ‘ किनीतरी ’ नियतकालिकांबद्दल रा. खांडेकर सांगतात, “ आपल्या गैर-मर्जीतील साहित्यिकांना ओचकारा, चिमटा, गुद्दा, चावा, कांही ना कांही तरी त्यांत असतेंच. कित्येक प्राण्यांना आपले मतभेद यापेक्षां अन्य रीतीने प्रदर्शित करण्याची शक्ति निसर्गाने दिलेली नसते; पण वाङ्मयांतील टीकाक्षेत्र पूर्णपणें या मनुष्यांच्या हवाली करणे म्हणजे माकडाला सर्कशीचा मॅनेजर करण्यासारखें आहे. ” खांडेकरांचे हे उद्गार फडक्यांबाबत त्यांनाहि लागू पडतात ! परंतु खांडेकरांचा हा अहेर त्यांचा त्यांस परत करतांना ‘ प्राणी ’ व ‘ माकड ’ हे दोन शब्द मात्र मी वगळूं इच्छितों ! खांडेकरांचे शब्दप्रयोग कवि ‘यशवंत’ यांनी जरूर लक्षांत घ्यावे !

रा. खांडेकर यांचे हे भाषण एका बाबतीपुरते किंचित् निराळें झाले, हें त्याचे वैशिष्ट्य मीहि मान्य करतों ! या भाषणांत साम्यवादाचा अल्पस्वल्प संबंध त्यांनीं आणलेला असला, तथापि त्याची पूर्वीसारखी घनगर्जना त्यांनी केलेली नाही, हा फरक कुणाच्याहि लक्षांत येण्याजोगा आहे ! कदाचित् खांडेकरांचे एकनिष्ठ भक्त देखील ते ‘ साम्यवादी ’ नसून ‘ भूतदयावादी ’ असल्याचे सांगूं लागले आहेत ( ‘ चित्रा,’ २० सप्टेंबर १९३६ चा अंक पहा ) त्याचा हा परिणाम असावा !

ललितकृतींतील पात्रांच्या ‘ विभूतिमत्त्वा’विषयीं खांडेकरांनी या भाषणांत व्यक्त केलेला अभिप्राय विचारार्ह असल्यामुळें त्यांतील तेवढ्यापुरता भाग उद्धृत करतों. “ भव्यता, अलौकिकता, विभूतिमत्त्व वगैरे विषयींच्या आपल्या आजच्या कल्पना पुढें अशाच राहतील म्हणून काय नेम आहे ? नाटकांचा नायक राजाच असला पाहिजे, असा जवळजवळ

संस्कृतमध्ये दंडकच नव्हता का? पण या संकुचित कल्पनेपलीकडे जाऊन चारुदत्ताला नायक करणारा शूद्रक यशस्वी झालाच की नाही? पूर्वीच्या नायक–नायिकांना असणारे विभूतिमत्त्व आजच्या सामान्य भूमिकांना नाही हे खरे. पण या भूमिकांच्या द्वारे वैयक्तिक सुखदुःखापेक्षां सामाजिक सुखदुःखे चित्रित केली जातात, हा त्यांचा विशेष आहे. व्यक्तिविषयक अलौकिकत्वाची उणीव सामाजिक भव्यतेला भरून काढता येणे अशक्य नाही. गाल्सवर्दीच्या ' Silver Box ' मधील नायक कोण आहे? एका अकिंचन मोलकरणीचा दारूबाज नवरा! पण त्याच्याविषयी वाचकांच्या मनांत जी महानुभूति उत्पन्न होते, ती तो तशाच प्रकारच्या परिस्थितीत सांपडलेल्या दलितांचा प्रतिनिधी वाटतो म्हणून. उत्कटतेचे शिखर गांठण्याला सामान्य भूमिकेच्या मागे अदृश्य समाज हवा, यात मात्र शंका नाही.

*　　　　*　　　　*

## १९६ साहित्यिकांची विचित्र अभिरुचि

थोर थोर साहित्यिकांची क्वचित् प्रस्फुट होणारी वाङ्मयविषयक विचित्र अभिरुचि पाहिली म्हणजे मौज वाटते! ही अभिरुचि मूळ लेखकांस अनुकूल असेल, किंवा प्रतिकूल असेल. कै. श्री कृ. कोल्हटकर यांची बोजड भाषाशैलीसुद्धां प्रो. वामनराव जोशी यांना आवडली, हे पहिल्या प्रकारचे उदाहरण होय! उलटपक्षी कै. कोल्हटकरांस 'Bee' यांची कविता मनापासून आवडत नसे हे दुसऱ्या प्रकाराचे उदाहरण म्हणतां येईल! कित्येकदां ही पसंती–नापसंती व्यक्तिगत संबंधावर अवलंबून असेल हे खरे, परंतु हा सर्वसामान्य नियम मात्र खचित होऊं शकत नाही!

पाश्चिमात्य वाङ्मयांतून तर अशी उदाहरणे शेकड्यांनी काढून देण्यात येतात! हेच पहा ना. व्हॉल्टेअरसारखा श्रेष्ठ साहित्यिक शेक्सपीयरला तोंड भरून ' रानटी ' ही शिवी देत असे. प्रख्यात ' Elegy 'चा जनक ग्रे हा कॉलेरिजला ' यथातथा'च वाटत असे, तर स्वतः कॉलेरिजच्या ' The Ancient Mariner ' या लोकप्रिय काव्याला साउदे हा नाक मुरडी! कीटसला नांवे ठेवणारा बायरन पोपची मात्र सडकून तारीफ करीत

असे ! " कादंबरी–लेखन हें एकतर मला कळलें नसेल, किंवा ते निदान डिकन्सला तरी कळलें नसावें ! "—असें थॅकरे हा डिकन्सच्या कादंबऱ्यांवरून म्हणत असे ! खुद्द थॅकरेविषयीं देखील डिकन्सचें थेट हेंच मत होतें ! नुकतेच दिवंगत झालेले आंग्ल कविवर्य ए. इ. हाउसमन यांना जॉन गाल्सवर्दी यांच्या कृति बिलकुल रुचत नव्हत्या ! शेवटीं एका आंग्ल लेखकाचें वर्डस्वर्थसंबंधींचें अत्यंत बहारीचें विधान जसेंचें तसें नमूद करून ही मुख्यतः त्याच्याच लेखनाधारें दिलेली 'नामावली' पुरी करूं. तें विधान असेः " Wordsworth termed 'Candide' the dull product of a scoffer's pen to the astonishment of many, who would have otherwise considered the author 'Peter Bell' *an authority on dullness.*"

* * *

## १९७ " कुठेंतरी थांबलेंच पाहिजे ! "

वर्डस्वर्थला वरीलसारखा टोमणा केवळ 'Peter Bell'वरूनच नव्हे, तर त्याच्या इतरहि अनेक कृतींवरून मारतां येतो ! छे, छे, छे ! बहुलेखनाचा कोण तो त्याचा हव्यास ! वर्डस्वर्थाच्या समग्र कवितासंग्रहाचें आलोडन करणें म्हणजे सहारा वाळवंटांतून प्रवास करणेंच होय ! त्यांत क्वचित् कुठे हिरवळीची जागा आढळली, तर नशीब ! बाकी सारी वाळूच वाळू ! एका टीकाकाराची तर, " वर्डस्वर्थ हा मरण पावला त्यापूर्वींच कांहीं वर्षें निजधामास गेला असता, तर त्याची कीर्ति अधिक काळ टिकली असती ! "–असे निष्ठुरतम उद्गार काढण्यापर्यंत मजल गेली आहे ! !

वर्डस्वर्थच्या काय, किंवा आणखी कुणाच्या काय, मृत्यु ही कांहीं स्वाधीनची गोष्ट नव्हे ! तथापि लेखनव्यवसायांतून विमुक्त होणें, अगर निदान अवास्तव लेखनास आळा घालणें एवढें तरी प्रत्येक लेखकास सहज करतां येण्याजोगें आहे ! या प्रकरणीं सुप्रसिद्ध इंग्रजी साहित्यिक थिओडोर एफ्. पॉविस यांनीं काल–परवां दिलेला सल्ला बहुमोल वाटतो. पॉविस यांनीं आपला लेखनोद्योग बहुधा कायमचाच स्थगित केल्याचें वृत्त गेल्या

महिन्यांत वर्तमानपत्रांतून जगजाहीर झालेंच आहे ! त्यासंबंधीं दिलेल्या एका मुलाखतीत पॉविस यांनी पुढीलप्रमाणे अप्रत्यक्ष उपदेश केलेला आहेः-

" A writer should know when to stop, when he has said enough. If he's a failure, the danger is less because he will probably stop, anyway. But if he has a measure of success, the temptation to write-and write and write-is deadly. If you can stop at a little fame, you are a lucky man, and a wise one. So many excellent writers go on wanting more, more fame, more money more prestige, more publicity, betraying their animal roots, the animal instinct to amass blindly against an unknown future!!

थिओडोर पॉविस यांची 'Soliloquies of a Hermit, Mr. 'Tarker's Gods' व 'Mr. Weston's Good Wine' हीं पुस्तकें नामांकित आहेत. ते पुढील आठ वर्षे आपल्या मुलीच्या शिक्षणांत व्यतीत करणार आहेत.

लेखनाचे ' पिरॅमिड्स ' निर्मू पाहणाऱ्या आमच्या कित्येक कलमबहाद्दरांस पॉविस यांचा हा विचार, व विचारास अनुसरून असणारा त्याचा हा आचार बहुतेक मूर्खपणाचाच वाटेल !

* * *

## १९८ 'केसरी'ची फोल गर्जना !

' केसरी 'च्या ६ नोव्हेंबरच्या अंकामधील ' मराठी साहित्यावर दुहेरी सक्ति 'या अग्रलेखांत सरसकट सर्व ' भाई ' लोक आणि ' पुरोगामी-लेखक-संघ ' ही संस्था यांवर निष्कारण आग पाखडण्यांत आली आहे ! महाराष्ट्रांतील मार्क्सवादी वाङ्मयभक्तांची सारीच साहित्यविषयक मते सर्वमान्य होतील अथवा व्हावीत, असें त्यांचे ते देखील म्हणणार नाहीत ! तथापि ' केसरी 'नें त्यांना ' बाजारबुणगे ' ही संज्ञा द्यावी, हे मात्र अतिशय आक्षेपार्ह आहे ! ' केसरी ' किंवा त्याचे पुराणमतवादी भाईबंद यांनी केवढेंहि आकांडतांडव केले, तरी साम्यवादी तत्त्वांची लाट त्यांना थोपवून

धरतां येणे शक्य नाही ! अर्थात् त्या लाटेचे कांही तुषार वाङ्मयावरहि जाऊन पडल्याखेरीज कसे राहतील ?

याच अग्रलेखांत संशोधनपर व शास्त्रीय वाङ्मयाची पिछेहाट होत असल्याबद्दल '(केसरी)'ने जो गर्भित निषेध व्यक्त केला आहे, तो मात्र अगदीं यथायोग्य आहे. नियतकालिकें वाचणाऱ्यांच्या हे दृष्टोत्पत्तीस आले असेल कीं, कित्येक लेखक जाणूनबुजून गभीर वा विद्वत्ताप्रचुर लिखाणाची प्रकट-अप्रकट टवाळी करीत असतात ! ललितवाङ्मयाचें महत्त्व कुणीच नाकारीत नाही; परंतु ललित वाङ्मयाबरोबरच गंभीर वाङ्मयाची सुद्धां बूज राखावयास नको काय ? मराठी भाषेत आधीच अव्वल दर्जाचे विद्वान अत्यल्प झाले ! तशांत नवोदित लेखकांचा गंभीर वाङ्मयाविषयीं बुद्धिभेद करणे म्हणजे मायभाषेचें कळत-नकळत भयंकर नुकसान करणेंच होय ! ही गोष्ट अशा लेखकांना केव्हां पटेल ती पटो !

* * *

## १९९ मृत्यूनंतर नको, जीवंतपणींच !

विख्यात हिंदी कवि बाबू मैथिलशरण गुप्त यांच्या एका सत्कार-समारंभाप्रीत्यर्थ भाषण करतांना म. गांधी यांनी असे उद्गार काढल्याचे प्रसिद्ध झाले आहे कीं, कोणत्याहि थोर व्यक्तीचा किंवा साहित्याचा मान त्याच्या मृत्यूनंतर करण्यांत यावा ! गांधीजीसारख्या साधुपुरुषाने असे उद्गार काढावे, हें ठीकच आहे, आणि, कित्येक साहित्यिक देखील

**फुलें कुणाला वहायचीं तर । पुढें समाधीवरी वहा ।**

असा आग्रह धरणारे आढळतील ! परंतु सर्वसामान्य साहित्यिक मात्र जिवंतपणींच सन्मानाची अपेक्षा करतील; आणि, ती सत्पात्र पाहून जनतेने पुरीहि करावयास पाहिजे ! कै. राजवाडे यांच्या सारखा मराठीतील श्रेष्ठतम गंभीर वाङ्मयनिर्माता मराठी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षत्वापासून आणि कै. प्रेमचंद यांच्यासारखा हिंदीतील श्रेष्ठतम ललितवाङ्मयनिर्माता हिंदी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षतत्वापासून वंचित रहावा, हें स्पृहणीय खचित

नव्हे ! उलटपक्षीं, यासारख्या मानाचा शेंदूर वाटेल त्याला फांसला गेल्याचेहि अनुभव येतात !

* * *

## २०० लेखक व लोकप्रियता

एका आंग्ल भाषेच्या नियतकालिकाच्या अंकांत पुढें दिलेल्या अर्थाचें विधान केलेलें आढळलें:—

“ **लोकाभिरुचीस रुचणार नाहींत, अशा लेखनविषयक लकबा टाळून व त्यांतल्या त्यांत थोडीबहुत कल्पकता उपयोगांत आणून लेखकांनीं लेखन करावें, म्हणजे त्यांना लोकप्रियता मिळेल.** ”

या उपदेशांत पुष्कळ तथ्यांश आहे, हें मुद्दाम सांगावयास नकोच. तशांत नवख्या लेखकांस तर त्यांचें विशेषच महत्त्व वाटेल ! लोकप्रियता ही कुणाला नको असते ? लोकप्रियतेपासून होणारे इतर लाभ विचारांत न घेतले, तरी लोकप्रियतेमुळें लेखकांना वाङ्मयसेवेबाबत अपूर्व उत्तेजन मिळतें, हा लाभ काय थोडथोडका झाला ? अर्थात् नवोदित साहित्यिकांनी तरी लोकाराधनेकडे अगदींच दुर्लक्ष्य करून भागण्यासारखें नाहीं ! आणि लोकप्रियता मिळवावयाची, तर लोकाभिरुचीस मान हा दिलाच पाहिजे ! वाचकांना न आवडेल अशा भाषासरणीचा, तंत्राचा अथवा विचारविकारांचा अवलंब करून त्यांच्या पसंतीची अपेक्षा कशी करतां येईल ?

मात्र हें लोकाराधन सर्वच साहित्यिकांनीं सदोदितच करतों म्हटलें, तर वाङ्मयाची प्रगति होणें कठिण जाईल ! वाङ्मयांत जीवंतपणाचें वारें सदैव खेळत राहण्यासाठीं साहित्यिकांनीं नित्य नवे नवे प्रयोग करावयास पाहिजेत. ‘ ठराविका ’च्या आवर्तात घोंटाळणाऱ्या सर्वसामान्य वाचकांना, हे नूतन वाङ्मयीन प्रयोग लब्धप्रतिष्ठितांनीं केल्यास ते कालांतरानें मान्य होण्याचा संभव असतो. परंतु तेंच धाडस नवोदितांनीं केल्यास त्यांची अल्पस्वल्प लोकप्रियता तर रसातळास जातेच, पण, शिवाय सदर नवीन प्रयोगहि कायमचेच मागें पडतात ! यामुळें, वाङ्मयाच्या सर्वांगीण विकासाची

चिंता वाहणाऱ्या नामवंत साहित्यिकांनीं '**मागणी तसा पुरवठा**' या महामंत्राचा जन्मभर जप करीत न बसतां लोकाभिरुचीस इष्ट वळण लागण्यासाठी धैर्यानें बद्धपरिकर झालें पाहिजे ! मग या महामंत्राचें एखादा बेगडी मार्क्सवादी कितीहि व कसेंहि समर्थन करो !

परंतु, दुर्दैवानें मराठींतील प्रथितयश साहित्यिकांना या विचारसरणीचें महत्त्व पटावें तसें पटलेलें दिसत नाही ! ते अजूनहि जॉन्मनसारख्याच्या **ज्या गोष्टींबद्दल बहुजनसमाज बहुतकाळ विचार करतो, तीच गोष्ट सर्वसाधारणपणें सत्य असते**" अशा अर्धसत्य सिद्धांतांनाच चिकटून बसतात ! हे जाडे जाडे साहित्यिक एक तर पराकाष्टेचे प्रगतिपराङ्मुख तरी असले पाहिजेत, किंवा निदान त्यांना आपली लोकप्रियता तकलादू असल्याचें भय तरी वाटत असलें पाहिजे !

केव्हां केव्हां तर वाङ्मयीन प्रयोगांबाबत या साहित्यिकांचें धोरण '**गुह्यात्गुह्यतरम्**' अशाच स्वरूपाचें असतें ! 'सुनीता'सारख्या सर्वस्वी परकीय वाङ्मयप्रकाराचा हिरिरीनें 'उदो उदो' करणारे एक साहित्यिक इतरांच्या सदृश चळवळीवर असा आक्षेप घेतातः—"**आमच्या सद्यःकालीन बहुतेक वाङ्मयीन चळवळी पश्चिमेकडल्या वाऱ्यावरून आलेल्या वराती होत !**"—पाश्चिमेकडील वारे न सोसणाऱ्या या साहित्यिकांनी 'सुनीता'ला जाहीर रीतीनें त्याज्य मानल्याचें मला तरी ठाऊक नाहीं ! मग हा नसता आक्षेप कां ? या आक्षेपाच्या मुळाशीं उपरोक्त दोन कारणांपैकी एकहि कारण असेलसें वाटत नाही ! परंतु त्याचें खरें कारण कोणतें असेल, हें सांगणें मात्र माझ्या सर्वस्वीं आटोक्याबाहेरचें आहे !

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक २१

## २०१ मराठी चिजांचा पुरस्कार

पुण्याचे सुप्रसिद्ध संगीतशास्त्रज्ञ **पं. दत्तात्रेय केशव जोशी** यांचे पदवीधर चिरंजीव रा. लक्ष्मण दत्तात्रेय जोशी यांनीं गतवर्षी ' संगीतशास्त्रकार व कलावंत यांचा इतिहास ' या नांवाचें एक अतिशय मनोरंजक पुस्तक प्रसिद्ध केले. या पुस्तकांतील सर्वच मतें तज्ज्ञांस मान्य होणारीं नसलीं, अगर त्यांतील सर्वच माहिती बिनचूक नसली, तथापि त्यामुळें त्याच्या रंजकत्वास तिळमात्रहि बाधा येत नाहीं. या सुंदर पुस्तकाचा व्हावा तसा गाजावाजा होऊं नये, हें दुर्दैव होय.

प्रस्तुत ग्रंथास लेखकानें बरीचशी तात्त्विक चर्चा असलेला तेवीस पानी उपोद्घात जोडला आहे. त्यांत मराठी चिजांचा जो पुरस्कार करण्यांत आला आहे, तो ' संगीताचें मराठीकरण ' ( ? ) करूं इच्छिणाऱ्या व न करूं इच्छिणाऱ्या अशा उभयवर्गासहि उद्बोधक वाटेल. रा. जोशी म्हणतातः—

"...गायनाची खरी मजा अनुभवावयाची तर स्वभाषेंतील भावात्मक पद्यच त्या कामीं योग्य आहे. पण ही खरी गोष्ट कांहीं लोकांस पटत नाहीं. कारण ते परंपरेच्या पलीकडे जाऊन गतस्थितीचें सिंहावलोकन करीत नाहींत. त्यांनीं गायन म्हणजे उत्तरीच अगर हिंदी भाषा असें जणुं समीकरणच बसवून टाकलें आहे ! हिंदी हीच गायनाला योग्य अशी भाषा आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. आपण ज्या पद्धतींत गाणें गातों ती **उत्तर पद्धति अमीर खुशरू** यानें दिल्ली प्रांतामध्यें स्थापिली व वाढविली असल्यामुळें व त्या प्रान्ताची भाषा हिंदी ( हिंदुस्थानी ) असल्यानें तीमध्यें साहजिक त्यानें पद्यरचना केली; व मुसलमानी अमलामुळें व राजकीय सत्ता व श्रीमंत लोक यांची भाषा हिंदी असल्या कारणानें ती प्रतिष्ठित मानली गेली आणि त्यामुळें अनेक शतकें त्याच भाषेंत पद्यें रचिलीं गेलीं. **परंतु अमीर खुशरूपूर्वी ' प्रबंध ' गात, ते संस्कृत व इतर प्रांतीय भाषेंत असत.** हल्लीं दक्षिणेकडे तामिल, तेलगू व कानडी ह्या भाषेंतील पद्यें म्हणत नाहींत का !

" मराठी ही भाषा गायनास योग्य नाहीं, असे कांहीं म्हणतात; परंतु खरें गाणें म्हणजे भावनांची अर्थस्पष्टता आवाजाच्या मदतीनें डोळ्यांसमोर उभी करणें. मनुष्याचा स्वभाव व भावना ह्या तो राहत असलेल्या देशाची अगर प्रांताची भौगोलिक रचना, त्याची सामाजिक परंपरा आणि परिस्थिति यांनीं बनत असतात. भाषा ही त्याच्या भावनांचें व विचारांच्या संक्रमणाचें साधन आहे. तेव्हां त्याच्या भावनांना व स्वभावाला अनुकूल, त्यांशीं समरस असेंच स्वरूप त्याच्या भाषेला येणार, हे उघड आहे. मनुष्याचे भाव प्रगट करण्याचें काम स्वभाषेइतकें उत्तम दुसऱ्या कोठल्याहि भाषेमुळें होणार नाहीं. **अशा स्थितींत महाराष्ट्रीय मनुष्याला खरें आनंददायक गायन मराठी भाषेव्यतिरिक्त असलेल्या पद्यांत अनुभवावयास सांपडेल, हें म्हणणें, खोटा अभिमान सोडून शास्त्रीय विचार व प्रत्यक्ष अनुभव हेच ध्यानांत घेतां, कोणीहि योग्य आहे, असें म्हणणार नाहीं.**"

मराठी चिजांसंबंधीचें ग्रंथकर्त्याचें जें मत तेंच त्याच्या वडिलांचें म्हणजे **पं. द. के. जोशी** यांचेंहि असलें पाहिजे, असें अनुमान केल्यास तें फारसें चुकीचे होणार नाहीं. अर्थात् या मतास विशेष किंमत आहे हें वेगळें सांगावयास नकोच. '**गारा भरारा**' या पद्याची थट्टा करतां आली, म्हणून सर्वच मराठी चिजांची थट्टा करतां येईल, असें खचित नव्हे !

देवगिरीचा राजा सिंघण यादव ( १२१०–१२४७ ) याच्या कारकीर्दींत होऊन गेलेल्या **शार्ङ्गदेव** या संगीतशास्त्रकारानें **मराठी ओंवीचा** 'प्रबंधां'त समावेश केला आहे, असे या पुस्तकांत पृष्ठ ५ वर नमूद केलेलें आहे. म्हणजे त्या काळीं ओंवी छंद गेय होता, हें स्पष्ट होतें.

—**प्रतिभा**, वर्ष ४, अंक २२

## २०२ संशोधनांतील श्रेय

'रिसायतकार सरदेसाई विरुद्ध प्रो. पोतदार' या वादापासून संशोधनांतील श्रेयाच्या प्रश्नाकडे अनेकांचें पुनः एकदां जोरानें लक्ष वेधलें गेलें आहे.

संशोधनक्षेत्रांत थोडेंबहुत कार्य केलेले लोकहि तऱ्हेतऱ्हेचे अनुभव सांगत असतात. एका अभ्यासकानें परप्रांतांतील एका फार मोठ्या संस्कृत पंडिताकडे एक अप्रसिद्ध प्राचीन लिखाण स्वतःच्या तद्विषयक शोधांची शहानिशा होण्यासाठीं पाठविलें होतें. दिवसांमागून दिवस लोटले, पण त्या विद्वानानें उत्तर धाडलें नाहीं, कीं मूळ लिखाण परत केलें नाहीं! अखेर त्या पंडिताचा त्याच लिखाणासंबंधीं संशोधनात्मक निबंध जेव्हां कोठल्याशा नियतकालिकांत फडकला तेव्हां कोठें उपरोक्त अभ्यासकाच्या मनांत लख्ख प्रकाश पडला! सदर निबंधांत मूळ लिखाण अमुक अमुक गृहस्थापासून मिळालें, असा देखील उल्लेख नव्हता, हें सांगावयास नकोच! याला म्हणतात संशोधनांतील श्रेय उपटण्याची खरी शिताफी!

वरील हकीकत ही सत्यकथा आहे. आतां एक दंतकथा सांगतों. दंतकथाच ती! तिच्या खरेपणाची कोण कशी ग्वाही देईल? ही दंतकथा अशी: अ संशोधक बकडे ऐतिहासिक कागदपत्रें पहाण्यासाठीं गेले. अ यांनीं त्यांतील एका कागदाची ब याजजवळ विशेष तारीफ केली. ती तारीफ साहजिकच बच्या मनांत अबद्दल संशय उत्पन्न होण्यास कारणीभूत झाली! आणि कर्मधर्मसंयोगानें तो संशय खराहि ठरला! नियोजित कार्य पार पाडून अ यांनीं ब यांचें घर सोडतांच ब यांनीं पूर्वोल्लिखित कागदाचा शोध केला. पाहतात तों कागदाचा ठावठिकाण नाहीं. झालें! क्षणभर ब यांच्या तोंडचें पाणी पळालें! परंतु त्यांनीं प्रसंगावधान ठेवून लगेच स्टेशनकडे धांव ठोकली, व अ यांना गांठून त्यांचा धिटाईनें हात धरला! प्रकरण

गळ्याशीं येत आहे, असें पाहून अ यांनी क्षमायाचना करीत कागद परत केला, व पुढील अनर्थ टाळला !

पहिली सत्यकथा व दुसरी दंतकथा ही नमूद करण्याचा उद्देश हाच की, संशोधनक्षेत्रांतहि कसकशा कारवाया होतात याची त्रयस्थांस कल्पना यावी ! माझे एक संशोधक मित्र संशोधकानें पुढील नियम सदैव अंमलांत आणले पाहिजेत, असें पुष्कळदां म्हणत असतात. ते नियम हे : ( १ ) संशोधकानें अप्रकाशित अस्सल कागद—स्वतः प्रकाशित करावयाचा नसल्याखेरीज कदापि दुसऱ्यास देऊं नये. त्याची नक्कलसुद्धां माणूस पाहून व आवश्यक अटी घालूनच द्यावी. ( २ ) आपल्या पूर्वीच्या संशोधनांतील प्रमाद आपले आपणासच कळून आल्यास ते साधार प्रसिद्ध करण्याबाबत संशोधकानें कधीहि आळस व दिरंगाई करूं नये. मागें कै. प्रो. चिं. गं. भानू यांनीं कै. राजवाडे यांच्या संशोधनांतील दोष राजवाड्यांच्याच साधनाधारें दाखविण्याचें धाडस केलें होतें, व त्यामुळे राजवाड्यांनीं प्रोफेसरमजकुरांस बरेंच फटकारलें होतें, हा वृत्तांत संशोधकानें सर्वदित दृष्टीपुढें ठेवावा. ( ३ ) ताम्रपट किंवा हालवितां येण्याजोगा शिलालेख उपलब्ध झाल्यास त्याची संशोधकानें आपण होऊन क्युरेटरसारख्या योग्य व्यक्तीस माहिती द्यावी. शक्य तर तो प्रसिद्ध करण्याचा हक्क स्वतःसाठीं राखून ठेवावा. मात्र, त्यासंबंधी अन्य संशोधकापाशीं आगाऊ वाच्यता साहसा करूं नये. न जाणों, तो संशोधक, केवळ स्वार्थबुद्धीनें पण बाह्यतः परार्थाचें निमित्त करून, आपणाला कायद्याच्या कैचींत पकडावयाचा, आणि मग ‘ **तेल गेलें, तूप गेलें, हातीं धुपाटणें आलें** ! ’—अशी स्थिती व्हावयाची !–वगैरे वगैरे.

येथें हेंहि सांगून टाकावयास पाहिजे की, स्वतः संशोधक नसलेले पण संशोधनाची आवड असलेले कित्येक गृहस्थ कागदपत्रें, ताम्रपट इत्यादि साधनें आपल्याशीं व्यर्थ गुंतवून ठेवतात ! अध्ययनाच्या वगैरे अभावीं त्या साधनांचें यथाशास्त्र संपादन व प्रकाशन करण्यास हे गृहस्थ असमर्थ असतात. अशा प्रसंगीं त्यांनीं तीं साधनें सत्पात्र संशोधकाच्या हवालीं करणें हेंच परिणामीं शहाणपणाचें ठरेल ! मूळ साधनांवर अशास्त्रीय संस्कार

होण्यापेक्षां किंवा तीं वर्षानुवर्षें तशींच कुचंबत पडण्यापेक्षां हा मार्ग श्रेयस्कर नव्हे काय ?

महाराष्ट्राच्या सुदैवानें कमालीचे निरपेक्ष संशोधक आजहि तुरळक आढळतात. उपलब्ध झालेल्या यच्चयावत् सर्व साधनांचें संपादन व प्रकाशन आपणच करणार, अशी नसती हांव ते धरीत नाहींत. आपल्या आसपासच्या उदयोन्मुख अभ्यासकांना ते तीं साधनें स्वयंप्रेरणेनें देतात, व त्यांना प्रोत्साहनपूर्वक व्यासंग करावयास लावतात. कुठें हे वंदनीय संशोधक व कुठे ते श्रेयासाठीं वखवखलेले उपरिनिर्दिष्ट संशोधक ! !

परस्पर मैत्री असलेल्या संशोधकांनीं श्रेयाचें भांडण उपस्थित न व्हावें, आणि संशोधनहि शिस्तवार व झपाट्यानें पार पडावें, म्हणून आपापसांत कार्यक्षेत्र वांटून घेतलेलें बरें होईल. असें सांगतात कीं, कै. राजवाडे हे रामदासाविषयींची कागदपत्रें प्रायः रा. शं. श्री. देव यांच्या स्वाधीन करीत असत; उलटपक्षीं रा. देव हेहि राजवाड्यांच्या कक्षेंतील कागदपत्रें राजवाड्यांच्या स्वाधीन करीत असत ! दुसऱ्या प्रकारचें उदाहरण म्हटलें म्हणजे चोंभा कवीचें ' उषाहरण ' काव्य हें होय. हें काव्य मुळांत देवांना प्राप्त झालें होतें. पण तें त्यांनीं प्रसिद्धीकरणार्थ राजवाड्यांच्या स्वाधीन केलें. या काव्यावर राजवाड्यांनीं दिलेल्या अपूर्व महत्त्वाच्या भाषाशास्त्रीय टीपा पाहिल्या, म्हणजे रा. देव यांच्या या औदार्याचें जास्तच महत्त्व वाटतें !

इतिहासांतील लहानमोठे दुवे जुळविण्यासाठींच संशोधित साधनें उजेडांत आणावयाचीं असतात. मुद्रित साधनांचा कुणी स्वरचित ग्रंथ **' सजविण्यासाठीं '** जरी उपयोग केला, तरी तें चांगलें कीं वाईट समजावयाचें ? मग त्यायोगें खुद्द संशोधकाला विशाद कां वाटावा, व त्याच्या चहात्यांचें तरी पोट कां दुखावें ? बरें, जो न्याय मुद्रित साधनांना लागू होतो, तोच अमुद्रित साधनांनाहि लागू करावयास पाहिजे. संशोधकांच्या परवानगीनें व त्याचा यथोचित नामनिर्देष करून त्याच्या अमुद्रित साधनांचा देखील उपयोग करण्यास हरकत नसावी, असेंच कुणीहि निःपक्षपाती तिऱ्हाईत म्हणेल. फक्त तसें करतांना उपयोग करणाऱ्या गृहस्थानें कसलीहि **' चालबाजी '** केलेली नसली, म्हणजे झालें !

हें सर्व विवेचन ऐतिहासिक संशोधनांतील श्रेयास अनुलक्षून केलेलें आहे. विज्ञानशास्त्रीय संशोधनांतील श्रेयांचा त्यांत विचार केलेला नाहीं! कित्येक शास्त्रसंशोधकांच्या प्रयोगशाळेंत जे अभ्यासक काम करीत असतात, त्यांनीं लावलेले सारे शोध त्या प्रयोगशाळांच्या प्रमुख शास्त्र-संशोधकाच्या नांवावरच प्रकाशित करावयाचे असतात, असें आपण प्रत्यहा ऐकतों. एका अर्थी हा प्रकार रास्तहि म्हणतां येईल. इतिहाससंशोधनांत देखील क्वचित् असें घडत असावें.

* * *

## २०३ पुन्हां एकदां 'तांबे-प्रकरण!'

प्रत्येक नियतकालिकाच्या कचेरीकडे, वाचकवर्गाचीं मौजेचीं पत्रें येत असतात, तशीं तीं 'प्रतिभा' कचेरीकडेहि येतात. अलिकडे आलेल्या अशा पत्रांत कांहीं नामवंत मराठी साहित्यिकांचें 'वाङ्मयचौर्य' दिग्दर्शित करणारीं पत्रें आहेत. कविवर्य तांबे यांच्या नूतन वाढदिवसाचें निमित्त करून एका पत्रलेखकानें तांबे यांनीं रवींद्रनाथ टागोर यांची 'अतिरिक्त' उसनवारी केल्याचा आरोप केलेला आहे. वस्तुतः, हा आरोप नवा नाहीं. 'प्रतिभे'च्या दुसऱ्या वर्षाच्या शेवटल्या अंकांत रा. डोंगरे यांनीं तांबे व टागोर यांच्या कवितांतील साम्यस्थलें दाखविल्यापासूनच रसिकांत खळबळ उडाली आहे. तशांत गतवर्षी माधवराव पटवर्धन यांनीं 'तांबे-समग्र कविता' हा संग्रह प्रकाशित करून त्यांतील टीपांत अशीं साम्यस्थळें डोंगऱ्यांपेक्षां जास्त दाखविल्यामुळें तर तांबे यांच्या कवितेकडे संशयानें पाहणाऱ्या लोकांची संख्या हल्लीपेक्षांहि अधिकच वाढली आहे, असें खाजगी बोलण्याचालण्यावरून सहजीं अनुमान होतें. तरी बरें कीं, या संग्रहाच्या संपादकीयांत प्रो. पटवर्धन यांनीं तांबे यांच्या आक्षेपकांना आधींच चोख उत्तर दिलेलें आहे.

रा. डोंगरे यांचा वर निर्देशिलेला लेख प्रसिद्ध झाल्यानंतर लगेच म्हणजे 'प्रतिभे'च्या तिसऱ्या वर्षाच्या पहिल्या अंकांत 'तांबे व टागोर' या मथळ्याचें एक स्फुट लिहून मीं तांब्यांचें समर्थन केलें होतें, हें वाचकांस

स्मरत असेलच. आज तोच मुद्दा किंचित् निराळ्या पद्धतीनें पण थोडक्यांत मांडतों.

प्रो. पटवर्धन यांनीं तांब्यांच्या कवितेंत रवींद्रनाथांच्या ' Gardener ' या ग्रंथाचे उमटलेले बहुतेक सर्व पडसाद वाचकांच्या निदर्शनास आणलेले आहेत. परंतु त्यासंबंधीं एक विचार वाचकांनीं मनांत आणावयास पाहिजे. तो हा कीं तांबे यांना कांहीं कविता वा कांहीं पंक्ति 'Gardener'-वरून सुचल्या असल्या, तथापि त्या कविता किंवा ह्या पंक्ति सामान्य कवीस तितक्या सफाईनें रचतां येणें अशक्य आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर " तुझी हालचाल " या कवितेंतील पुढील कडवें पहा:—

**ही अपूर्व शक्ति सगुण**
**झाडितसे मम अंगण**
**हें माझें भाग्य बघुन**
**जळफळतिल देव ते !**

हे कडवें प्रो. पटवर्धन म्हणतात तद्वत् ' Gardener 'वरून तांबे यांना सुचलेलें असेल. पण तें त्यांनी इतकें सुंदर लिहिलें आहे कीं, या ' उसनवारी 'बद्दल तांबे यांचा राग न येतां त्यांना उलट धन्यवादच द्यावेसे वाटतात ! तात्पर्य, परप्रेरित कल्पना असल्या, तरी पण त्या झोंकदार-पणानें शब्दबद्ध करावयास थोडेंथोडकें कौशल्य लागत नाही. हा मुद्दा आक्षेपकांना पटत असल्यास त्यांना तांब्यांची ही ' उसनवारी ' तेवढीशी खटकणार नाहीं !

यापेक्षांहि महत्त्वाचा असा मुद्दा आहे :. टागोरप्रमाणेंच टेनिसन, स्कॉट, कॉलेरिज, ब्रौनिंग प्रभृतींच्या कवितेचें तांबे यांनीं अनुकरण वा रूपांतर केलेलें आहे. **या अनुकरणात्मक व रूपांतरित सर्व कविता वगळा, आणि नंतरहि तांबे हे श्रेष्ठ प्रतीचे कवि ठरतात किंवा नाहीं, याचा निर्णय करा. माझी खात्री आहे कीं, असें करूनहि तांबे यांच्या श्रेष्ठतेस बिलकूल धक्का लागणार नाहीं.** ' Gardener ' मधील साम्यस्थळें २०–२५ पेक्षां ज्यास्त आढळत नाहींत. तसेंच इंग्रजी

कवीचें अनुकरण वा रूपांतर १२-१५ कवितांपेक्षा अधिक कवितांत दृष्टिगोचर होत नाहीं. म्हणजे, तांबे यांच्या फार फार तर ४० कविता परसृत ठरतात. त्या वगळल्या तरी त्यांच्या संग्रहांत पहिल्या प्रतीचीं भावगीतें कितीतरी शिल्लक राहतात. त्यांच्या बळावर देखील कविवर्य तांबे यांचें विद्यमान कविमंडळांतील पहिलें स्थान यथापूर्व अबाधित राहतें.

या ठिकाणी एका गोष्टीचा ओझरता उल्लेख करावयास हरकत नाही. गेल्या पिढींतील रसिक पुढील गाणें आपण आपल्या बाळपणीं ऐकत असूं. असें सांगत असतातः—

डोळे तुमचे जादुगिरी आमूच्याकडे पाहुं नका !
तुम्हि जातां मुल्खावरी माझी चिंता कोण करी
एकलि मी राहुं कशी फार दिवस लावुं नका !

हे गाणे पाठभेदानें कुठें कुठें भिन्न असेल. पण त्याचा माझ्या ऐकण्यांत आलेला पाठ वरीलप्रमाणें आहे, व तें केव्हां निर्माण झालें हें कळत नाही. तथापि, कित्येकजण म्हणतात त्याप्रमाणें याच गाण्यावरून तांबे यांनीं ‘ डोळे हे जुलमि गडे ’ हें गीत रचिलें असलें, तरी उपरोक्त वजा करावयाच्या ४० कवितांत आणखी एका कवितेची भर पडेल एवढेंच.

बर्न्स, वगैरे आंग्ल कवि जुनीं लोकगीतें थोडाफार बदल करून पुनर्लिखित करीत असत, हें या आक्षेपकानें ध्यानांत ध्यावयास पाहिजे.

* * * *

## २०४ “ निद्रा-भ्रमिष्ट ”

भारतीय साहित्य परिषदेचें मराठी मुखपत्र जे ‘ विहंगम ’ मासिक त्यांत आचार्य काकासाहेब कालेलकर हे सीरियाचा महाकवि खलील गिब्रान यांच्या ‘ पागल’चा अनुवाद क्रमशः प्रसिद्ध करीत आहेत. डिसेंबरच्या अंकांतील वरील मथळ्याचा मजकूर त्याच्या असीम सौंदर्यास्तव येथें उद्धृत करण्याचा मोह अनावर होतोः—

" माझ्या गांवीं एक बाई आणि तिची मुलगी अशीं दोघें राहत असत. दोघींनाहि झोंपेंत उठून चालण्याची संवय होती. एके रात्रीं सर्व जगावर शांति पसरली असतां ती बाई आणि तिची मुलगी झोंपेंतल्या झोंपेंत उठलीं आणि चालतां चालतां धुक्याची पासोडी पांघरलेल्या बागेंत त्या एकमेकींना भेटल्या.

" आई प्रथम बोलली. ती म्हणाली, ' वैरिणी, आढळलीस का एकदांची ? तूंच माझ्या यौवनाचा नाश केलास. माझ्या यौवनाची इमारत पाडून टाकून त्याच मसाल्यानें आपल्या यौवनाची इमारत तूं उभी केली आहेस. तुझा जीव घ्यावासें वाटतें.'

" यावर मुलगी बोलली. ती म्हणाली, ' हडळ कुठली ! अप्पलपोटी थेरडी ! मला मोकळेपणानें वावरूं देत नाहीं. हिला वाटतें कीं, आपल्या सुकून गेलेल्या आयुष्याचा मी फक्त प्रतिध्वनि बनून रहावें. तूं केव्हां मरून जाशील, असें मला झालें आहे.'

" इतक्यांत कोंबडा आरवला आणि त्या दोघी जाग्या झाल्या. गोड वाणीनें आईनें म्हटलें ' लाडके, तूंच का आहेस येथें ? ' आणि अगदीं प्रेमांत येऊन मुलगी म्हणाली, ' काय ग आई ? '

* * * *

## २०५ जर्मनींतील टीकावाङ्मयाची मुस्कटदाबी !

थोड्या दिवसांपूर्वी वर्तमानपत्रामध्यें पुढील बातमी वाचण्यांत आली:—

" राइशस्टागचें कल्चरल चेंबर कलामंडळ ( Cultural Camera ) व ' आनंदांतून सामर्थ्य ' संस्था ( Strength through Joy ) यांच्या संयुक्त बैठकींत डॉ. गोबेल्स यांनीं कला व वाङ्मय यांवरील टीकेला निर्बंध घालणारा हुकूम जाहीर केला आहे. डॉ. गोबेल्स म्हणाले कीं, बावीस वर्षांच्या अल्लड तरुणानें ४०।५० वर्षांच्या प्रौढ मनुष्याच्या कलेवर किंवा वाङ्मयावर वर्तमानपत्रांत टीका केलेली खपणार नाहीं. त्यांनीं प्रथम अशी

कला किंवा वाङ्मय यांचे वर्णन करण्याला शिकावें. कारण, अशा वर्णनालाहि ज्ञान व शिक्षण यांची जरूर आहे. ''

ज्ञान व शिक्षण यांचे निमित्त पुढें करून तरुण कलावंत व वाङ्मयसेवक यांच्या कला व वाङ्मय यांजविषयींच्या निर्भीड मतांना दडपून टाकण्याचा हा जर्मनीचा डाव आहे, हें उघड आहे. ही वार्ता ऐकून एक मध्यमवयीन साहित्यिक मजजवळ उद्गारले, " आमच्या हातीं सत्ता असती, तर आम्हीहि असाच हुकूम काढला असता! काय ते मराठी वाङ्मय, व काय तो नवमतवाद! छे, छे! नुसता धुडगूस घातला आहे गुलामांनीं! "

प्रौढांच्या हातीं अशी सत्ता येईपर्यंत हा 'धुडगूस' बहुधा असाच चालू राहणार! आणि, ती सत्ता त्यांना प्राप्त होईल, असाहि रंग तूर्त दिसत नाहीं!

* * *

## २०६ वरेरकरांचें भाषण

मुंबई मराठी साहित्यसंमेलनाचें अधिवेशन ठाणें येथे रा. भा. वि. वरेरकर यांच्या अध्यक्षत्वाखालीं ठरल्याप्रमाणें पार पडलें. या प्रसंगीं रा. वरेरकर यांनीं जें भाषण केलें, त्यांतील सर्वच मुद्दे मान्य होण्याजोगे नसले, तथापि त्यामुळें त्याची मननीयता नाहीशी होत नाहीं.

कला ही सहेतुक असावी कीं निर्हेतुक असावी, या प्रश्नाचा ऊहापोह करतांना रा. वरेरकर म्हणतात, " निदर्शक, प्रेरक आणि दिग्दर्शक अशीं कलेचीं समन्वयात्मक स्वरूपें असल्यामुळें निर्हेतुकवादाला शास्त्रीय विवेचनांत स्थान मिळणें शक्य नाहीं. सुखासीनतावाद अलिकडे मधूनमधून डोकावूं लागला आहे. सुखासीन अवस्थेंत कलेची आवश्यकता असते, ही कल्पना भ्रामक आहे. परभृत वर्गाला तसें वाटत असेल. पुराणवस्तुसंशोधनांत असें दिसून आलें आहे कीं, अर्धरानटी माणूस मारलेल्या जनावरांच्या हाडांवर मुद्दां चित्रें कोरीत असे. कलात्मकता ही कोणत्याहि प्रसंगांत केव्हांहि प्रगट होत असते. तिला सुखासीनतेची आवश्यकता नाहीं. ट्रॉट्स्की यानें

लिहिलेला रशियाच्या वर्गयुद्धाचा इतिहास वाङ्मयांत कलाकृतीचा उत्कृष्ट नमुना नाहीं, असें कोण म्हणेल ? कै. शिवराम महादेव परांजपे यांचे कित्येक राजकीय लेख म्हणजे उत्तम कलाकृति नव्हत्या काय ? प्रचारात्मकतेनें कलेला वैगुण्य येत नाहीं. मनोभावनांचें वैयक्तीकरण म्हणजेच कला. जीवनकलहाची तीव्रता जर कमी असेल, तर या कलेच्या उभारणीच्या प्रमाणांत त्या अनुरोधानें बदल होईल एवढेच."

प्रो. ना. सी. फडके यांच्या वाङ्मयकृतींसंबंधीं रा. वरेरकर यांनीं अभिप्राय प्रगट केला आहे. तो असा:—"श्रीमंतांच्या जीवनाचें सौंदर्य वाङ्मयांतून मांडण्याचे कार्य आपण करतो, अशी जरी फडके ग्वाही देतात. तरी श्रीमंता-श्रीमंतांतील संग्राम देखील त्यांनीं सत्यस्वरूपांत दाखविण्याचा प्रयत्न केलेला नाहीं. सुखासीन जीवनाचीं अद्‌भुतरम्य चित्रें वाङ्मयांतून चितारतांना वास्तववादाच्या कांटेखोर सत्याकडे त्यांनीं कळून वा नकळून दुर्लक्ष्य केलें आहे. जमिनीचे मालक असलेले खेडवळ श्रीमंत आणि यंत्रयुगांतील औद्योगिकतेवर परपुष्ट झालेले सुसंस्कृत शहरी भांडवलवाले श्रीमंत या दोघांचा संघर्ष दाखवून श्रीमंत जीवनांतील दोन पक्षांतील चित्रें त्यांना मांडतां आलीं असतीं. श्रीमंतांचा ऐदीपणा, सुखासीनतेमुळें उत्पन्न झालेली कर्तव्यपराङ्‌मुखता यांच्या शहरी आणि खेडवळ चित्रांकणानें या दोन श्रीमंत समाजांबद्दल त्यांना विशिष्ट भावना उद्दीपित करतां आल्या असत्या." वरेरकरांचे हें विवेचन अतिशय मार्मिक आहे. परंतु प्रो. फडके यांना खेडवळ श्रीमंतांचा बहुतेक परिचयच नसावा, मग ते त्यांचीं चित्रें कशीं रेखाटणार ?

या भाषणांत रा. वरेरकर यांनीं आक्षिप्त वाङ्मयाचें पुनरुज्जीवन करण्याच्या आवश्यकतेसंबंधीं तळमळीचें प्रतिपादन केलें आहे. विशेषतः, कै. शिवराम महादेव परांजपे यांच्या 'काळां'तील निबंधांच्या पुनरुद्धाराबद्दल त्यांनीं जी कळकळ व्यक्त केली आहे, तिजवरून त्यांची गुणग्राहकता स्पष्टपणें प्रत्ययास येते. जळगांव येथील साहित्य-संमेलनाच्या किंचित् पूर्वीपासून मी या विषयाची चर्चा 'प्रतिभे'मधून सुरू केली होती. हेतु हा कीं, या

विषयास सम्मेलनामध्ये पुनः एकवार जोराची चालना मिळावी. परंतु सरकारने परिषदेच्या पत्राला दिलेल्या नकारामुळें म्हणा, कीं कसेंहि म्हणा, हा विषय अधिवेशनांत जागच्या जागीं थंडावला खरा ! *

रा. लालजी पेंडसे यांच्या ‘ गुन्हेगार ’ या उत्तम पुस्तकाबाबतहि असाच उद्योग व्हावयास पाहिजे.

—प्रतिभा, वर्ष ८, अंक २३

* ता. ५ आक्टोबर १९३७ रोजीं मुंबई सरकारने ‘काळां’तील निबंधाचा फक्त १० वा भाग निर्बंधमुक्त केला ! इतर भागहि लौकरच सरकारी शापांतून मुक्त होतील, अशी आशा आतां करतां येते. याबाबत ‘प्रतिभे’नें केलेल्या अत्यल्प प्रचाराची स्मृति रहावी, एतदर्थ, हा उल्लेख व मागील कांहीं स्फुटें कायम ठेवली आहेत. ‘आमच्या देशाची स्थिति’ हा चिपळुणकरांचा प्रबंध व ‘ गुन्हेगार’हि ‘शापमुक्त’ झाला !

## २०७ इतिहासक्षेत्रांतील वादळ !

'प्रतिभे'मध्यें गतवर्षी रियासतकार सरदेसाई व प्रो. द. वा. पोतदार यांचें वाग्युद्ध झाले, त्याचा परिणाम म्हणूनच की काय, चालू वर्षाच्या आरंभाला पुढील तीन ' लढाऊ ' लेख प्रसिद्ध झाले आहेतः—

( १ ) "इतिहासलेखन व संशोधन"—द. वि. आपटे,—'चित्रमयजगत्', जाने. १९३७

( २ ) " जदुनाथ सरकार आणि महाराष्ट्रीय संशोधन "—द. वा. पोतदार—' सह्याद्रि ', फेब्रु. १९३७

( ३ ) " अपराध कोणाचा ? "—त्र्यं. श. शेजवलकर—' प्रतिभा ' विशेषांक, १९३७

हे तिन्ही—विशेषतः पहिले दोन—लेख वाचले असतां तुलनात्मक विरोधाने ' व्यक्तिदर्शन ' ज्याला म्हणतात, त्याचा फक्कड अनुभव येतो ! रा. आपटे यांचा लेख सौम्य, तर प्रो. पोतदार यांचा लेख आवेशयुक्त आहे ! ( असे ऐकतो की, एका कॉलेज-बोर्डिंगमधील एक विद्यार्थी सदर लेख स्वतःशीच मोठ्याने वाचीत असतां ही कुठल्या वीररसपर नाटकाची तालीम आहे, हे पाहण्यासाठी पुष्कळ विद्यार्थी त्या विद्यार्थ्याच्या खोलींत शिरले ! ! ) पोतदारांच्या व रा. शेजवलकर यांच्याहि लेखांत अनुक्रमे सर जदुनाथ सरकार व रियासतकार सरदेसाई यांजवर कित्येक गंभीर आरोप केलेले आहेत ! विरुद्ध बाजू पूर्णपणे उजेडांत आल्याखेरीज त्याबाबत तूर्त लिहितां येत नाही.

प्रो. पोतदार यांनी क्वचित् अभावितपणे हास्यरसहि उत्पन्न केला आहे ! सर जदुनाथ सरकार यांनी आपल्या शिवाजी-चरित्रांत मराठींतील कित्येक ऐतिहासिक कागदपत्रें ' बनावट ' ठरविली आहेत. कां ? — तर म्हणे स्वतःचें मोडी लिपीचें अज्ञान झांकण्यासाठी ! '

' नाट्याचार्य खाडिलकर ' या एका नूतन टीकाग्रंथाच्या कर्त्यानें खाडिलकरांच्या पदांची तरफदारी करतांना अशीच मौज केली आहे ! आधुनिक कवि हे प्रायः ' गोडेल्या ' ( ! ) मुखड्याचे व खाडिलकर हे ' दृष्टिदुष्ट ' असल्यामुळें आधुनिक कवींस खाडिलकरांचीं पदें रुचत नाहींत, असा अपूर्व शोध या ग्रंथकर्त्यानें लावला आहे ! !

मात्र पोतदारांची उपपत्ति सर जदुनाथ यांस ( व वाचकांस देखील ! ) ' बनविण्या'साठीं केलेली दिसते, हें सांगणें जरूर आहे. तथापि, ती फारशी ' फिट ' न बसल्यानें तिचें पर्यवसान हास्यरसांत होतें, एवढेंच ! असो.

बाकी, रा. आपटे व प्रो. पोतदार या ' दत्तोपंतद्वयां'नीं उपस्थित केलेला मुख्य प्रश्न बिनतोड आहे हें कबूल केलें पाहिजे. सर जदुनाथ यांनी मराठी कागदपत्रांना ' बनावट ' म्हणण्याचा नसता उपद्व्याप केल्यामुळे महाराष्ट्रीय संशोधक व त्यांचें संशोधन यांजकडे इंग्रज, मुसलमान वगैरे परकीय इतिहास–लेखक उघडउघड संशयानें पाहूं लागले आहेत, आणि मागेंपुढें हें विषारी रोपटें जास्तच फोंफावण्याचा संभव आहे, अशा अर्थाची उभय ' दत्तोपंतां'नीं जी तक्रार केली आहे, ती अगदीं रास्त आहे. अर्थात् सर जदुनाथ यांनीं मराठी कागदपत्रांचा बनावटपणा सिद्ध करावा, असें त्यांना प्रो. पोतदार यांनीं केलेलें जाहीर आव्हानहि यथायोग्यच आहे. सरसाहेबांनीं हे आव्हान स्वीकारून आपले विधान खरें ठरवावें, किंवा निदान तें परत तरी घ्यावें ! तसें त्यांनीं न केल्यास त्यांची बाजू सपशेल लंगडी आहे, एवढेंच नव्हे, तर तात्त्विक विषयांत अपेक्षित असलेला साधा प्रामाणिकपणाहि त्यांच्यांत वास करीत नाहीं असा तिऱ्हाइतांचा गैरसमज झाल्यावांचून कसा राहील ?

रा. शेजवलकर यांनीं 'प्रतिभे'च्या विशेषांकांतील लेखांत सरदेसायांच्या रियासतींना अगदींच तुच्छ लेखिलें आहे ! १० फेब्रुवारी १९३० च्या ' प्रगतीं'तील त्यांच्या, रियासतीच्या परीक्षणाचा सूर थेट असाच होता कीं काय, हें – तो अंक सांप्रत मजपुढें नसल्यामुळें – सांगतां येत नाहीं. सरदेसायांच्या रियासतींत परस्परविरोध असेल, त्यांत तत्त्वविवेचकता नसेल,

आणि कोणत्याहि दृष्टीनें सरदेसाई हे ' गिबन–कोटी'तले इतिहासकार नसतील ! तथापि, रियासतींपूर्वी मराठीमध्यें मराठीशाहीचा इतका विस्तृत, स्वतंत्र व नवें संशोधन जमेस धरून लिहिलेला इतिहास नव्हता, आणि अजूनहि दुसरा नाहीं. ही एकच गोष्ट सरदेसायांच्या कामगिरीचें महत्त्व दर्शविण्यास पुरेशी नाहीं काय ? आधींच मराठींतील साधनसामुग्री विपुल, आणि तशांत ती ठायींठायीं विखुरलेली ! तिचा बारकाईनें अभ्यास करून व महत्प्रयासानें अनेक लहानमोठे दुवे जुळवून इतिहासलेखन करणे हें काम वाटतें तितकें खरोखरच सोपें आहे काय ? अर्थात् हा जाणूनबुजून अक्षुण्ण मार्ग. त्यांत पदोपदीं ठेंचा खाव्या लागल्यास काय आश्चर्य ? ' पुढच्यास ठेंच मागचा शहाणा ' ही म्हण खरी ठरण्यापुरता जरी रियासतींचा उपयोग भावी मराठी ' गिबन 'ला झाला, तरी सरदेसायांना धन्यता वाटेल, असें मला वाटतें ! बस, हेंच त्यांचें कार्य आणि हीच त्यांची योग्यता !

* * *

## २०८ किर्लोस्करांचे तीन सुरुंग !

रा. शं. वा. किर्लोस्कर व श्रीमंत वहिनीसाहेब घोरपडे यांच्या वादाच्या निमित्तानें नियतकालिकांच्या सृष्टीत मध्यंतरीं जी खडाजंगी माजली होती, तिचे पडसाद अजूनहि क्वचित् उमटत आहेत !

रा. किर्लोस्कर यांच्या ' किर्लोस्करा'दि तीन मासिकांतून ' नवमतवादी ' म्हटविलें जाणारें लिखाण प्रकाशित होत असतें, हें प्रसिद्धच आहे. यामुळे हीं तीन मासिकें म्हणजे पुराणमतवादाच्या तटाला लावलेले तीन सुरंगच होत, अशी सनातन्यांना भीति वाटणें साहजिक आहे. वस्तुतः नीति–अनीतीच्या कल्पना या कधींच स्थिर नसतात. त्या त्या वेळेच्या समाजाच्या आवश्यकतेनुसार या कल्पना बदलत असतात. सध्यांच्या तरुण पिढीला राजकीय स्वातंत्र्याप्रमाणेंच सामाजिक स्वातंत्र्याचीहि पिपासा लागलेली आहे. या पिपासेस अनुसरून ' किर्लोस्करा 'दि मासिकत्रय व अन्य सुधारणावादी पत्रें यांत मजकूर प्रसिद्ध होत असतो. अर्थात्

ह्याचाच्या सनातन्यांना तो कसा बरें आवडणार ! श्रीमंत वहिनीसाहेबांना किर्लोस्करांचीं तिन्ही मासिकें 'अनैतिक' वाटावीं, आणि 'केसरी' प्रभृति पत्रांनाहि त्यांचीच री ओढावी, यांत अद्भुत असें कांहींच नाहीं ! हा नव्या जुन्याचा झगडा जगाच्या अंतापर्यंत असाच चालू रहाणार !

कांहीं तपशीलाच्या बाबी वगळल्यास वहिनीसाहेबांना शंकररावांनीं जानेवारीच्या 'किर्लोस्करां'त दिलेलें उत्तर निरुत्तर करणारें असेंच आहे ! हें उत्तर मूळ मुद्यांस बगल देणारें आहे, अशी हांकाटी झाल्याचें मला ठाऊक आहे, तथापि तींत कांहींच 'जान' नाहीं !

या वादाच्या धुमश्चक्रींत एकदोघां टीकाकारांनीं किर्लोस्करी मासिकांना 'समाजसत्तावादी' असें म्हटलें आहे, तर उलटपक्षीं कांहीं जणांनी त्यांची 'आचुकमाचुकाच्या कथा व चित्रें देणारीं मासिकें' अशा संज्ञेनें हेटाळणी देखील केली आहे ! किर्लोस्करी मासिकांत राजकारणाला स्थान नसल्यामुळें त्यांना यांतील पहिल्या वर्णनापेक्षां दुसरें वर्णनच अधिक यथार्थत्वानें लागू पडतें, असा जरी कुणी आग्रह धरला, तरी त्यांत कमीपणा वाटण्याचें बिलकूल कारण नाहीं ! कारण, किर्लोस्करी मासिकांतील कित्येक कथा व चित्रें बाह्यतः केवळ 'आचुकमाचुकपर' वाटली, तरी तीं तशीं निव्वळच 'निरुपद्रवी' नसतात; तर, त्यामुळें जुन्या समजुतींना चांगलेच 'धरणीकंपा'चे धक्के बसतात ! तसे नसते, तर सनातन्यांनीं या मासिकांविरुद्ध वेळीं-अवेळीं हांकाहांक कशाला केली असती ? नुसत्या आचुकमाचुकाच्या कथांनीं वा चित्रांनीं हादरून जाण्याइतके आमचे सनातनी लेचेपेचे नाहींत, हें 'शिवलीलामृता'सारख्या त्यांच्या नित्यपाठांतील पोथ्यापुराणामधल्या 'अश्लील' वर्णनांवरून आणि त्यांच्या देवघरांतील देवदेवतांच्या शृंगारिक चित्रांवरून अनेकवार सिद्ध झालेंच आहे !

किर्लोस्करी मासिकांनीं हे 'धक्के' देण्याचे कार्य अविरत चालविलें, तरी पुरे आहे. नव्हे, आज त्याचीच जरूरी आहे !

* * *

## २०९ पु. य. देशपांडे यांचें भाषण

प्रो. फडके व रा. माडखोलकर यांनीं नाकारलेलें बडोदें-वाङ्मय-परिषदेच्या पांचव्या अधिवेशनाचें अध्यक्षपद रा. पु. य. देशपांडे यांनीं स्वीकारून मोठेंच धैर्य दाखविलें यांत शंका नाहीं. प्रो. फडके यांनी हा मान नाकारतांना ते विचित्र पत्र लिहावयास नको होतें; आणि माडखोलकरांनींही त्या पत्रानें बुजून जाऊन फडक्यांचें अनुकरण करण्यांत स्वारस्य नव्हतें! माडखोलकरांच्या नकारामुळें मराठी वाङ्मय तूर्त तरी एका उत्कृष्ट प्रबंधास मुकलें आहे! हा योग पुढील खेपेस तरी येवो, असें मी मनःपूर्वक चिंतितो.

रा. पु. य. देशपांडे यांचे भाषण अपेक्षिल्याप्रमाणें साम्यवादाच्या रंगानें रंगलेलें असें झालें! यामुळें त्यांत दणदणीतपणा आला, पण त्याबरोबरच तें कांहींसें एकांगीहि झालें! कोणत्याहि संप्रदायाचा चष्मा लावला, म्हणजे त्याची परिणति अखेर एकांगीपणांतच व्हावयाची! अर्थात् मी हे विधान तात्त्विक चर्चेपुरतेंच करीत आहें. राजकारणादिकांत संप्रदायाचें महत्त्व नसतें. असें मला येथें ध्वनित करावयाचें नाहीं.

रा. देशपांडे यांच्या भाषणांतील सर्वात महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे त्यांनी केलेली कलेची मीमांसा हा होय. पण, ही मीमांसा पूर्णसत्य नसून अर्धसत्य आहे! भावनांच्या संघर्षमय कल्लोळांत कलेचें बीज सांठलेलें आहे, असें म्हणण्याकडे देशपांडे यांचा कल झुकतो. परन्तु, किती तरी कलाकृति अशा आहेत कीं, ज्यांच्या बुडाशीं भावनांचा संघर्षमय कल्लोळ नसून निर्भेळ आनंदमय कल्लोळ असतो! देशपांडे यांची ही विचारसरणी सदोष असल्यामुळे तिच्या आधारावर त्यांनीं कलेचा '**प्रतिकारात्मक मानवी कृति**'—हा जो विशेष ग्रथित केलेला आहे, तोहि सदोषच ठरतो!

व्यक्तिनिष्ठ टीकापद्धतीला क्षुद्र लेखण्यांत देखील रा. देशपांडे यांनीं अशीच 'अतिशयोक्ति' केली आहे! याच भाषणांत पृष्ठें १५, २१ व २२ यांवर कलावंतांमध्यें व्यक्तिनिष्ठा असावयास पाहिजे, असें देशपांडे

सांगतात. मग टीकावाङ्मयालाच व्यक्तिनिष्ठेचें वावडे कां व्हावे, हे कळणें दुर्घट आहे! कलाकृतीला मार्क्सवादाचा निकष लावूं नये, असें कुणीच म्हणत नाही. पण, म्हणून व्यक्तिनिष्ठ टीकापद्धति त्याज्य कशाला ठरवावयास पाहिजे?

'प्रतिभे'च्या नव्या विशेषांकांतील 'विशाखा' यांचा 'नव्या दृष्टींतील एक अपूर्णता' हा लेख मार्क्सवाद्यांनीं लक्षपूर्वक वाचावा, अशी शिफारस केल्यावांचून मला राहवत नाहीं.

वरील तात्त्विक मतभेद वगळल्यास रा. देशपांडे यांच्या भाषणांत मान्य होण्याजोगे असे अनेक मुद्दे आहेत. 'कलेकरितां कला' 'मागणी तसा पुरवठा' ह० वादांचा त्यांनीं पुरता धुव्वा उडविला आहे! त्याचप्रमाणें, डॉ. केतकरांसारखे महापंडित आणि रा. ग. म. वीरकरांसारखे थोर प्रकाशक यांच्याबद्दल देशपांडे यांनीं जे आदरोद्गार काढले आहेत ते त्यांची गुणग्राहकताच दिग्दर्शित करतात.

भाषणाच्या अखेरीस मराठी वाङ्मय व महाराष्ट्रीय संस्कृति यांच्या प्रगतीस हातभार लावण्याची रा. देशपांडे यांनीं राजे-रजवाडे व 'भाग्यवान् धनिक' यांना 'विनंती' केलेली आहे, ती उचितच आहे. तथापि, त्यांच्यासारख्या मार्क्सवाद्यानें 'भांडवलवाल्यां'ना अशी 'विनंती' करावी, हे दृश्य पाहून सदर भाषण ऐकणाऱ्या-वाचणाऱ्यांच्या मुखावर क्षणभर मिस्किलपणाचें हास्य झळकलें नसेल अगर झळकणार नाही, याची शाश्वति कोण कशी देणार?

*　　*　　*

## २१० राहुल सांकृत्यायन

पाटण्याचे त्रिखंडकीर्ति पंडित बॅ. के. पी. जयस्वाल यांचा फेब्रुवारीच्या 'मॉडर्न रिव्ह्यू'त 'Lost Sanskrit Works recovered from Tibet' या मथळ्याखालीं एक उल्लेखनीय लेख प्रसिद्ध झाला आहे. **बिहार** प्रांतांतील प्रख्यात बौद्ध भिक्षु व महापंडित **राहुल सांकृत्यायन** यांनीं

तिबेटांतून दुर्मिळ संस्कृत ग्रंथ आणून प्राच्यविद्यासंशोधनांत कशी क्रांति केली आहे, याचा मनोवेधक वृत्तांत जयस्वाल यांनी या लेखांत दिलेला आहे.

राहुल सांकृत्यायन हे सुमारें चव्वेचाळीस वर्षांचे असून त्यांचा जन्म संयुक्तप्रांतांतील एका ब्राह्मणकुळांत झाला. ते सीलोनमध्यें संस्कृताध्यापक होते. १९३० मध्यें त्यांनी बौद्ध-धर्म-स्वीकार केला. त्यांनीं तिबेटावर संशोधनाच्या दृष्टीनें तीनदां 'स्वाऱ्या' केल्या; आणि त्यांच्या योगानें त्यांनीं कितीतरी संस्कृत, पाली वगैरे ग्रंथ आणि चित्रें यांची 'लूट' मिळवून आणली आहे! मोठमोठ्या युरोपियन पंडितांनी या संशोधनाचें 'युगप्रवर्तक' या शब्दानें वर्णन केलें आहे!

राहुल सांस्कृत्यायन हे जसे प्रकांड पंडित आहेत, तसेच ते जाडे देशभक्तहि आहेत. त्यांनीं दोनदां कारागृहवास भोगला आहे! बॅ. जयस्वाल यांच्या मागण्यावरून अलीकडे ते राजकारण सोडून वाङ्मयाच्या मागे लागले आहेत! राहुलजींना राजकारणापासून परावृत्त करून या हतभागी देशाला गांधी-जवाहरलालसारखा एक महान् पुढाऱ्यापासून आपण मुकविलें तर नाहीना असा हृदयस्पर्शी प्रश्न जयस्वाल यांनी स्वतःला केला आहे! जयस्वालसारख्यांनीं एवढी तारीफ करावी, ही एकच गोष्ट राहुल सांकृत्यायन यांची अलौकिक योग्यता दर्शविते!

राहुलजींनी साम्यवादावर हिंदीमध्ये एक ग्रंथ लिहिला आहे, त्यावरून ते साम्यवादास पुष्कळच अनुकूल असलेले दिसतात.

संशोधनांत हिंदुस्थानचें नांव जगभर गाजविणाऱ्या या थोर भिक्षूपुढें कुणाचें मस्तक नम्र होणार नाही?

—प्रतिभा, वर्ष ५, अंक २

## २११ भारतीय वाङ्मयांत मराठी नाटकें !

बंगाली, हिंदी वगैरे प्रमुख भारतीय भाषांशीं परिचय असलेले महाराष्ट्रीय विद्वान् नेहमीं असें प्रतिपादन करीत असतात कीं, मराठी नाटकें या भाषांतील नाटकांपेक्षां केव्हांहि श्रेष्ठतरच ठरतात. आणि, या प्रश्नाबाबतचें, बहुतेक परभाषाकोविद रसिकांचें ऐकमत्य विचारांत घेतां त्यांचें हें प्रतिपादन मान्य करावयास प्रत्यवायहि दिसत नाहीं.

रा. वरेरकर यांजसारखे चतुरस्र मराठी नाटककार देखील प्रसंगोपात्त असाच अभिप्राय प्रगट करतांना दृष्टोत्पत्तीस येतात. 'प्रतिभे'च्या गेल्या अंकांतील आपल्या विचारार्ह लेखांत रा. वरेरकर यांनीं याच मताचा पुनरुच्चार केलेला आहे. मीं येथें वरेरकरांचा आधार घेतलेला पाहून "अरे! हे शास्त्रीबुवा सुद्धां 'वातारामा'च्या जाळ्यांत सांपडले, बरें का!—" असें एखादा 'मानवधर्मप्रकाशम्' डोळे मिचकावीत पुटपुटेल! परंतु त्याजकडे लक्ष्य देण्याचें फारसें प्रयोजन दिसत नाहीं.

ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, कांहीं वर्षांपूर्वी 'मॉडर्न रिव्ह्यू'-मध्यें प्रसिद्ध झालेल्या एका लेखांत सर जदुनाथ सरकार यांनीं मराठी नाटकांना नाक मुरडलें होतें! सरसाहेबांच्या त्या उद्गारांचें तेव्हां खंडन करण्यांत आलें होतें किंवा नाहीं, हें मला सांगतां येत नाहीं. तसेंच, मराठी नाटकांबद्दल त्यांचें आजमितीस देखील पूर्वीचेंच मत कायम आहे कीं कसें, हेंहि मी सांगूं शकत नाहीं. तथापि, रॉय, टागोर प्रभृतींच्या कांहीं नाट्यकृतींचा बिंब–प्रतिबिंबावरून मला जी थोडी माहिती आहे, तिच्या बळावर मी एवढें म्हणतों कीं मराठी नाटकांना क्षुद्र लेखण्यांत सर जदुनाथ यांनीं प्रमादच केलेला आहे! साहित्यिक या नात्यानें खाडिलकर, कोल्हटकर, वरेरकर इ. मराठी नाटककार व्यक्तिशः रवींद्र-बाबूंच्या तोलाचे नसतील. तरी पण मराठी नाटकांचा सर्वसामान्य दर्जा पुष्कळच वरचा लागतो, हें नाकारण्यांत अर्थ नाहीं.

मात्र, मराठी नाटकांविषयींच्या सर जदुनाथ यांच्या उपरोक्त प्रतिकूलतेच्या बुडाशीं भिन्नाभिरुचीखेरीज अन्य हेतु असेल, असें समजणें वाजवी होणार नाहीं. कारण साध्या मतभेदांतहि जर आपण 'हेतु' हुडकूं लागलों, तर मग प्रांजळ चर्चा ठारच झाली म्हणावयाची! तर, जदुनाथ सरकार यांच्या मोडी लिपीच्या खऱ्याखोट्या अज्ञानाचा अवास्तव डंका वाजविणारे, आणि वाटेल त्या गोष्टींचा उगम सदर अज्ञानांत शोधणारे त्यांचे टीकाकार "सरसाहेबांना मराठी नाटकें आवडत नाहींत, याचे कारण त्यांचें मोडीचें अज्ञान!"—असा अपूर्व बादरायण संबंध जोडतात कीं काय, हेंच आतां पाहावयाचें आहे!

* * *

## २१२ "राजसत्ता व वाङ्मयप्रसार"

'विविधज्ञानविस्तारा'च्या नुकत्याच प्रकाशित झालेल्या जून-डिसेंबर १९३६ च्या संयुक्त अंकांत 'मराठी भाषेचा इतिहास' या मथळ्याचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. या लेखाचे पदवीधर लेखक एके ठिकाणी लिहितातः—

"ज्ञानेश्वर आणि सकलकलानिवास रामदेवराव यादव, गोब्राह्मणप्रतिपालक शिवप्रभु व रामदास, मराठी राज्याचे प्रसारक पेशवे व शब्दालंकाराचे विस्तारक पंत-पंडित आणि आधुनिक कालांत लोकशाही तत्त्व आणि नात्यासाहेब केळकरांसारख्या जोड्या लावल्यास राजसत्ता व वाङ्मयप्रसार यांचा अन्योन्य संबंध कसा जोडतां येतो, हें सहज कळून येईल."

या उताऱ्यांतील 'पंडित' म्हणजे बहुतेक रघुनाथपंडित असावा. तसें असल्यास या लेखकाला रा. प्रियोळकर यांनीं ठरविलेला रघुनाथपंडिताचा कालनिर्णय मान्य नसावा, असें अनुमान करावें लागेल!

शिवाजी व रामदास ही जोडी वगळल्यास उर्वरित जोड्यांचा संबंध जोडणें खरोखरच दुर्घट आहे! रामदेवरावाने ज्ञानेश्वराला, किंवा पेशव्यांनी

पंतादिकांस वाङ्मयप्रसाराबाबत तर राहोच. पण निदान योगक्षेमाप्रीत्यर्थ तरी प्रत्यक्ष हातभार कितपत लावला असेल, हा प्रश्नच आहेच ! लोकशाही तत्त्व आणि रा. न. चिं. केळकर ही या लेखकानें उल्लेखिलेली अखेरची ' जोडी ' तर याहूनहि जास्त बुचकळ्यांत पाडणारी आहे ! केळकरांचें वाङ्मय सरस असते, व त्याचा प्रसारहि चांगला आहे, हें–मला वाटतें–रा. महादेव राजाराम बोडस देखील कबूल करतील ' परंतु, हे सरसत्व व हा प्रसार यांचा लोकशाही तत्त्वाशीं कशाचा संबंध पोंचतों, याचा मात्र बिलकूल अंदाज होत नाहीं ! आतां, रा. केळकर हे लोकशाही–स्वराज्य–पक्षाचे पुरस्कर्ते आहेत. एवढ्याचसाठीं या लेखकानें त्यांच्या वाङ्मयप्रसाराच्या वडाची साल लोकशाही तत्त्वाच्या पिंपळाला लावून दिली असेल, तर गोष्ट निराळी !

बरें, केळकरांच एक राहो; पण केळकरांच्या तोडीचे, किंबहुना कांहीं बाबतींत त्यांजपेक्षांहि वरचढ–असे जे लेखक मराठींत होऊन गेले व आहेत, त्यांच्या वाङ्मयाच्या प्रसाराचा कोणत्या राजसत्तेशीं–अथवा निदान राजकीय तत्त्वाशीं–संबंध जोडावयाचा ? गतलेखकांपैकीं कै. हरिभाऊ आपटे, किंवा विद्यमान लेखकांपैकीं प्रो. ना. सी. फडके यांच्या कादंबऱ्या " गरमागरम ताज्या रोट्यांप्रमाणें " खपतात, यांचें मूळ कसल्या राजकीय तत्त्वांत शोधावयाचें ? त्याचप्रमाणें कै. श्री. कृ. कोल्हटकर अगर प्रो. वा. म. जोशी यांच्या लेखनांत सरसता नुसती ओसंडतांना दिसते तिचें कारण तरी कोणत्या राजकारणपर तत्त्वामध्यें हुडकावयाचें ?

राजसत्ता अगर राजकीय तत्त्वज्ञान आणि वाङ्मय यांचा परस्परसंबंध केव्हांच नसतो, असें नव्हे. तथापि, सर्वच यशस्वी साहित्यिकांचें त्यांजशीं नाते–गोतें जोडणें सत्यास धरून होईलच, अशी ग्वाही बरीक देतां येत नाहीं.

गंमत अशी का, वरीलप्रमाणें जोड्या ठरवितांना या लेखकानें मराठी भावकवींचा सम्राट् जो तुकाराम, त्याला अजिबात बगल दिली आहे ! रा. केळकर हे परतंत्रतेच्या काळांत होऊनहि लोकशाही तत्त्वाचें निमित्त

करून लेखकाला त्यांचा वरील नामावळींत उल्लेख करतां आला. परंतु बिचाऱ्या तुकारामाच्या साह्याला असें कोणतेंच राजकीय तत्त्व धांवून आलें नाहीं ! मग त्याचा नामनिर्देश लेखकाला कसा करतां येणार ? अथवा, या लेखकाच्या मतानें तुकाराम हा मोरोपंतादिकांपेक्षां अगदींच निकृष्ट कवि ठरत असेल. नाहीं कुणी म्हणावें ? कुठें तो अशिक्षित शूद्र व कुठें हा विद्वान् ब्राह्मण ! पंतांची विद्वत्ताप्रचुर कविता तुकारामाच्या पाहण्यांत आली असती, तर त्याने आश्चर्यभरित होऊन " अरं, ह्यो बामन म्हनतुया तरी काय ? "—असा प्रश्न स्वतःला खचित विचारला असता !

*  *  *

## २१३ पुश्किन

जानेवारी १९३७ महिन्यांत रशियन साहित्यिक पुश्किन याचा शत-सांवत्सरिक स्मृतिदिन कित्येक ठिकाणीं पाळण्यांत आला. कारण, बरोबर शंभर वर्षांपूर्वीं आपल्या बायकोच्या ' यारा 'शी द्वंद्वयुद्ध होऊन पुश्किन बळी पडला होता !

पुश्किनचा जन्म १७९९ मध्यें झाला. लहानपणापासूनच त्याला काव्य-रचनेचा हव्यास होता. त्याने कांहीं काळ झारशाहींतील सरकारी नोकरींत काढला. पण १८२४–२६ मध्यें त्याला अज्ञातवास कंठावा लागला ! कवित्वदृष्ट्या मात्र त्याचा हा अज्ञातवासहि उपकारकच ठरला ! १८२६ मध्यें तो पुनः मॉस्कोला परत आला. या वेळचा झार निकोलस यानें पुश्किनला भेट देऊन सर्वसाधारण सेन्सॉरपासून त्याच्या लिखाणाची सुटका केली. परंतु त्या लिखाणावर स्वतः देखरेख ठेवण्याचें मात्र ठरविलें ! याचा परिणाम साहजिकच पुश्किनच्या अंतःकरणाची व त्याचबरोबर त्याच्या लिखाणाचीहि कुचंबणा होण्यांत झाला ! याहि परिस्थितींत त्यानें ' लेखनकामाठी ' सुरूच ठेवून १८३१ मध्यें आपलें ' Eugene Onegin ' हें सर्वोत्कृष्ट काव्य लिहून पुरें केलें. याच वर्षीं त्याचें एका सुंदर, पण चंचल रमणीशीं लग्न झालें. तिचा Baron d Anthe's याजशीं प्रेमसंबंध असल्यानें उघडकीस

येऊन आरंभीं सांगितल्याप्रमाणें या दोघांचें द्वंद्वयुद्ध झालें, त्यांत बिचाऱ्या पुश्किनची हृदयद्रावक रीतीनें इतिश्री झाली !

पुश्किन व आंग्लकवि बायरन यांच्यांत पुष्कळच साम्य आहे. दोघेहि तारुण्यांतच मृत्युवश झाले. दोघांचाहि स्वभाव चंगीभंगी होता. दोघांचेहि विवाह सुखावह झाले नाहींत. आणि, दोघेहि सारखेच ओजस्वी कवि होते. फार काय, पुश्किनच्या बऱ्याच कवितेवर बायरनच्या कवितेची अगदीं ढळढळीत छाप पडलेली आहे ! पुश्किनच्या अन्य लिखाणाप्रमाणेंच त्याच्या काव्यावरहि झारशाहीची सक्त 'निगराणी' होती, ही एकमेव वस्तुस्थिति त्याच्या पद्यात्मक कृतींची तेजस्विता व्यक्त करण्यास पुरेशी आहे !

कवितेप्रमाणेंच पुश्किननें नाट्य व कथाहि रचलेल्या आहेत.

—**प्रतिभा**, वर्ष ५, अंक ३

## २१४ जुन्या घटनांच्या अद्भुत उपपत्ति !

परवां कांहीं संदर्भासाठीं एच्. डी. वेल्स यांचा 'The Outline of History' हा नामांकित ग्रंथ पुनः एकवार चाळण्याचें काम पडलें. त्यांत एके ठिकाणीं वेल्ससाहेबांनीं कित्येक 'ठोकळेबाज' विद्वानांची चांगलीच रेवडी उडविली आहे ! प्राचीन ग्रीकांनीं ट्रॉय शहरावर स्वारी करण्याचें कारण हे पंडितमन्य व्यापारविषयक धोरणांत हुडकतात ! वेल्ससाहेबांचा मूळ मजकूर असाः—

"Modern writers, with modern ideas in their heads. have tried to make out that the Greeks assailed Troy in order to secure a trade-route to Colchis or some such fine-spun commercial advantage. If so, the authors of the Iliad hid the motives of their characters very skilfully! It would be about as reasonable to say that the Homeric Greeks went to war with the Trojans in order to be well ahead with a station on the Berlin to Bagded railway!"

या 'ठोकळेबाज' विद्वानांच्या चालीवर आपणासहि कांहीं गंमतीच्या उपपत्ति बसवितां येतील ! प्रथम आपण 'पुराण' काळाकडे वळूं. रामानें सीतेला परत आणण्यासांठीं लंकेवर चाल केली, असा रामायणावरून बाह्यतः निष्कर्ष निघतो. परंतु, या विद्वानांची नक्कल करून असें म्हणतां येतें कीं, मराठी म्हणींतील लंकेंतल्या सोन्याच्या विटा अयोध्येस नेण्यासाठींच रामानें ही लंकेवरील स्वारी केली असावी ! रामानें सेतु बांधला ही घटना त्याची बांधकामासंबंधींची आवड व्यक्त करते, आणि सदर आवड उपरोक्त अनुमानास पुष्टीच देते ! कौरव-पांडव-युद्धाचीहि कांहीं तरी हास्यास्पद मीमांसा करतां येईल. अज्ञातवासांत असतांना बल्लवाचार्य बनलेल्या भीमाच्या नेतृत्वाखालीं 'सरदारगृहा'चें आणि बृहन्नडा बनलेल्या अर्जुनाच्या नेतृत्वाखालीं 'गांधर्वमहाविद्यालया'चें भरतखंडभर जाळें

पसरविण्यासाठीच पांडवांनी हें युद्ध केले, असा सिद्धांत ठोकून दिल्यास तो या पंडितांच्या विचित्र विचारसरणीशी अगदीच सोडून होणार नाही !!

इतिहासकाळांतील घटनांबाबतहि असेच असंबद्ध तर्क लढवितां येतील ! मावळांतील स्वादिष्ट मधाला उत्तर हिंदुस्थानांत बाजारपेठ मिळविण्यासाठीं शिवाजीने आग्रा येथे औरंगजेबाची मुलाखत घेतली, जानवीजोडांचा ' पूनामां बनेलो माल ' उठविण्यासाठी बाळाजी विश्वनाथाने दिल्लीचे राजकारण केले; किंवा, अक्रोड, किसमिस, हिंग वगैरे ' काबुली मेवा ' खपविण्यासाठी अहंमदशहा अब्दालीने हिंदुस्थानवर आक्रमण केले— यांसारखे अकलेचे तारे तोडण्यास काय हरकत आहे ?

केव्हां केव्हां ' काकतालीय न्याया 'ने कल्पित वर्णनांचीहि बरवर खरीखुरी वाटणारी अशी उपपत्ति लावली जाते ! पुराणादिकांत समुद्रमथनाची जी कथा ग्रथित केलेली असते, तींत या विद्वानांना सागरामधून वर आलेल्या हिमालयपर्वताचा जन्मेतिहास भासमान होतो ! एका अर्थी ही उपपत्ति बुद्धिमत्तासूचक आहे खरी; तथापि, उघड उघड कविकल्पित असलेल्या या वर्णनांत वरील सत्य खरोखरच अभिप्रेत असेल काय, याविषयी जबरदस्त संशय वाटतो !

अशा प्रकारे ' वडाची साल पिंपळाला ' लावण्यांत विवेकवादी म्हणविणारे कित्येक मार्क्सवादी देखील अभावितपणे प्रसंगोपात्त सहभागी होत आहेत, हे दुर्दैव होय ! मराठींतील कांही मार्क्सवादी लिखाण पाहिलें असतां वाचकांस या विधानाची सत्यता पटेल. एच. जी. वेल्स यांच्या आरंभी उद्धृत केलेल्या अवतरणांतील टीका अशा लिखाणास यथार्थत्वाने लागू पडते !

*　　　*　　　*

## २१५ रे. टिळकांपेक्षां लक्ष्मीबाई श्रेष्ठ ?

श्रीमती लक्ष्मीबाई टिळक यांचा पहिला स्मृतिदिन १ मार्च रोजी पुणे येथे साजरा करण्यांत आला, त्याप्रसंगी केलेल्या भाषणांत प्रि. प्र. के. अत्रे यांनी पुढील विधान केल्याचें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले आहे:—

" रे. टिळकांच्या वाङ्मयाबद्दल पूर्ण आदर ठेवून मीं असें म्हणेन कीं. रे. टिळकांच्या वाङ्मयापेक्षां हीं स्मृतिचित्रें अधिक काल टिकतील." ( ज्ञानप्रकाश, ५ मार्च. १९३७. )

लक्ष्मीबाईंचीं ' स्मृतिचित्रे ' मराठींतील स्मृतिग्रंथांच्या मालिकेत अग्रस्थानीं शोभण्याजोगीं आहेत, याबद्दल वाद नाहीं. तसेंच, एका अशिक्षित वृद्धेनें असा प्रतिभासंपन्न ग्रंथ लिहिला. हा लोकोत्तर चमत्कारच समजला पाहिजे, याविषयींहि मतभेद होणार नाहीं. शिवाय. सध्यांच्या मराठी साहित्यिकांना आजीप्रमाणें, किंवा काकूप्रमाणें वाटणाऱ्या लक्ष्मीबाईनीं आपल्या पतीवर वाङ्मयसेवेंत खरोखरच मात केलेली असल्यास त्याबद्दल त्यां: वैषम्य न वाटतां हर्षच वाटेल ! कारण, आजापेक्षां आजीविषयीं अथवा काकापेक्षां काकूविषयीं अधिक प्रेम कुणाला वाटत नाहीं ? फार काय, पत्नीकडून पराभव पावण्यांत खुद्द रे. टिळकांनासुद्धां पराकाष्ठेची धन्यता वाटली असता ! परंतु लक्ष्मीबाईंचीं ' स्मृतिचित्रे ' व रे. टिळकांची कविता हे सर्वथैव परस्परभिन्न वाङ्मयप्रकार असल्यामुळें त्यांची मुळीं तुलना करणेंच श्रेयस्कर नाहीं. तशांत टिळकांची कविता भिकार असती, तर गोष्ट निराळी होती. पण टिळक हे सर्व रसिकांच्या मतानें एक उत्कृष्ट आधुनिक कवि ठरतात. आणि ' वनवासी फुला 'सारख्या त्यांच्या कांहीं कविता महाराष्ट्रसारस्वतांत निःसंशय अजरामर होण्यासारख्या आहेत; तेव्हां या दांपत्यांत श्रेष्ठकनिष्ठ कोण कसें ठरणार ?

याहून महत्त्वाचा मुद्दा हा आहे की. अतिरिक्त स्तुतीनें स्वतः लक्ष्मीबाईच्या साहित्यकीर्तीस उजाळा न येतां आलें तर मालिन्यच येईल ! अतिरिक्त स्तुतीची प्रतिक्रिया केवढी प्रभावी असते, याची प्रतीति कै. गडकऱ्यांच्या मृत्यूनंतर सर्वांस आलीच आहे ! गडकऱ्यांच्या निधनानंतर त्यांच्या चाहत्यांनीं त्यांची इतकी बेछूट तारीफ केली की, कांहीं गृहस्थांच्या अंत:करणांवर तिचा विपरीत परिणाम घडून येऊन त्यांना गडकरी-वाङ्मयाबद्दल अकारण अरुचि उत्पन्न झाली ! तसा प्रकार लक्ष्मीबाईच्या बाबतीत होऊं नये, एवढ्याकरतां तरी त्यांचा आवश्यक तेवढाच गौरव करावयास पाहिजे.

अर्थात् प्रि. अत्रे यांच्या उपरिनिर्दिष्ट उक्तीचा शब्दशः अर्थ न घेतला तरी चालेल, हें मीहि मान्य करतो. कारण सभादिकांतून माणूस इतके कांटेतोल बोलणें प्रायः दुष्कर असतें !

* * *

## २१६ टागोरांचा एक आंग्ल टीकाकार

रवींद्रनाथ टागोर हे बंगालबाहेरच्या जगाला त्यांच्या मूळ बंगाली ग्रंथांच्या इंग्रजी भाषांतरावरूनच ठाऊक आहेत. ही भाषांतरे वाचून बहुतेक बंगीयेतर रसज्ञांचा असा ग्रह झालेला दिसतो की, नाटकें व कादंबऱ्या यांत रवींद्रबाबू हे फारसे यशस्वी झालेले नसले, तरीपण काव्य व लघुकथा यांत मात्र त्यांनी उच्च प्रतिभा प्रत्ययास आणून दिलेली आहे. तथापि, या समजुतीला देखील धक्का देणारे टीकालेख क्वचित् प्रकाशांत येत असतात ! ' John o ' London's Weekly 'मध्ये कांही दिवसांपूर्वी जेरॉल्ड बुलेट यांनी लिहिलेले ' The Oxford Book of Modern Verse ' या डब्ल्यु. बी. यीट्स-संपादित नूतन काव्यसंग्रहाचे परीक्षण प्रसिद्ध झालेले आहे. त्यांत रवींद्रबाबूंच्या काव्यासंबंधीं पुढील मजकूर आढळतो:—

" When I read a poem by this famous Hindu mystic ( Rabindranath Tagore ) I frequently find in it **the raw material of poetry, but seldom or never poetry itself.** The best that one can say is: 'this is probably very beautiful in the Bengali original, from which the poet has translated it.' The solemn but self-conscious rhythms, the diction that somehow contrives to be at once precious and commonplace, these do not avail, in my judgment, to give poetic quality to the expression of familiar mystical doctrine."

जेरॉल्ड बुलेट यांचा हा अभिप्राय म्हणजे रवींद्रबाबूंची त्यांच्या भक्तांनी केलेल्या अतिरिक्त स्तुतीची केवळ प्रतिक्रिया होय, असे कदाचित् कुणास वाटेल. पण, तें बहुधा वस्तुस्थितीस धरून होणार नाही. कारण, रवींद्रबाबूंचें भरमसाट कोडकौतुक 'मॉडर्न रिव्ह्यू'त क्रमशः होत असते; आणि हें मासिक

थोरथोर गौरकाय साहित्यिक कशाला वाचीत असतील? नव्हे, गौरकाय वाचक आपलें मासिक प्रायः वाचीत नाहींत, अशी खुद्द या मासिकाच्या संपादकाचीच जाहीर तक्रार असते! अर्थात् कित्येक गौरकायांनीं 'मॉडर्न रिव्ह्यू'बाहेर रवींद्रबाबूंचीं यशोगीतें गाइलीं नाहीत, असें नव्हे; तरी पण सर्वच गौरकाय टीकाकारांचे " **सी. एफ. अँड्र्यूज** " झालेले नाहीत, हेंहि तितकेंच खरें आहे! सी. एफ्. अँड्र्यूज यांनी दगडी कोळशावर जरी लेख लिहिला, तरी त्यांतहि रवींद्रबाबूंची तारीफ येईल, असें माझा एक मित्र म्हणत असतो! तात्पर्य, जेरॉल्ड बुलेट यांची ही टागोरविषयक प्रतिकूल टीका पूर्वग्रहदूषित असण्याचा कांहींच संभव नाहीं, असा माझा होरा वाहतो.

तथापि, या टीकाकाराशीं सहमत न होणारे माझ्यासारखेच पुष्कळ वाचक असतील. मात्र रवींद्रबाबूंची खरी योग्यता ठरवण्यास अद्यापि फार अवकाश आहे, हे मीहि कबूल करतो.

—**प्रतिभा,** वर्ष ५, अंक ४

## २१७ राजकवीचा स्वर्गवास !

राजकवि **चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे** यांनीं १७ मार्च रोजी वयाच्या सहासष्टाव्या वर्षी स्वर्गलोकांत प्रयाण केल्याचें दुःखद वर्तमान वृत्तपत्रां-वरून सर्वत्रांस विदित झालेंच आहे.

मराठींतील विद्यमान कवींत चंद्रशेखर, तांबे व Bee हे तीन कवि सर्वश्रेष्ठ मानले जात असत. या त्रयींतील एक दैदीप्यमान हिरा आतां कायमचा हरवला गेला, ही महाराष्ट्र-काव्य-वाङ्मयाची अपरिमित हानी झाली आहे. आधींच हे दिवस काव्यास पोषक नाहींत; तशांत असा श्रेष्ठ कवि दिवंगत व्हावा, याबद्दल विशेष हळहळ वाटल्यावांचून कशी राहील ?

राजकवि चंद्रशेखर हे जुन्या-नव्याच्या संधिकालांतील कवि होते. यामुळेंच कीं काय, त्यांच्या कवितेंत जुन्या-नव्याचें मधुर मीलन झालेलें दृष्टोत्पत्तीस येतें ! अर्वाचीन कवींत पराकाष्ठेची रेखीव रचना करावी चंद्रशेखरांनींच. एखाद्या घाटदार इमारतीसारखें चंद्रशेखरांचें ' रचना-शिल्प ' आंखबंद असतें ! बरें, या ठाकठिकीमुळें त्यांची कृति नीरस उतरली असावी म्हणावें, तर तसाहि प्रकार सहसा आढळणार नाहीं. रचनेसारखीच रसवत्ताहि तींत ओतप्रोत भरलेली आहे ! जुन्या धर्तीची कविता लिहिणाऱ्यांत असा रससिद्ध कवि खरोखरच विरळा !

चंद्रशेखरांची ' काय हो चमत्कार ! '—या काव्यासारखीं कांहीं काव्यें मराठी वाङ्मयाच्या जामदारखान्यांत दिव्य तेजानें सदोदित तळपत राहिल्याखेरीज खचित रहाणार नाहींत.

वस्तुतः, चंद्रशेखर हे महाराष्ट्राचे मिल्टनच व्हावयाचे. परंतु, प्रतिकूल परिस्थितीमुळें म्हणा, कीं कसेंहि म्हणा, त्यांच्या हातून महाकाव्यनिर्मिति झाली नाहीं, एवढें खरें ! मात्र त्यांच्यांत महाकवीचे बहुतेक सर्व गुण वास करीत होते, याची साक्ष त्यांची ' चंद्रिका ' देतेच !

* * *

## २१८ राष्ट्रभाषा संस्कृत अं ?

रा. अ. का प्रियोळकर यांनी गेल्या डिसेंबरांत येथील मराठी ग्रंथ-संग्रहालयांत केलेलें भाषण 'मराठी व्याकरणाची ऐतिहासिक पार्श्वभूमि' या मथळ्याखालीं 'विविधज्ञानविस्तारा'च्या जानेवारी १९३७ च्या ताज्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. या भाषणांत एके ठिकाणी पुढील मजकूर आढळतोः—

"हिंदूंचा संस्कृतकडे व मुसलमानाचा पर्शियनकडे जो स्वाभाविक ओढा आहे, आणि या दोन समाजांमध्यें जी तीव्र तेढ आहे, त्यावरून या नव्या राष्ट्रभाषेचे ( हिंदीचे ) हाल होतील असें वाटतें. त्यापेक्षां खिस्तोत्तर कांहीं शतकांनीं आपले लोक ज्याप्रमाणे वर सांगितल्याप्रमाणें नवी भाषा जन्मास घालण्याऐवजीं पुनश्च जुन्या संस्कृतकडे वळले तसेंच आतांहि केल्यास पुष्कळ भानगडी मिटतील."

या अवतरणावरून हिंदीऐवजीं संस्कृत ही हिंदुस्थानची राष्ट्रभाषा व्हावी, असा रा. प्रियोळकर यांचा अभिप्राय असलेला दिसतो. अर्थात् संस्कृत ही राष्ट्रभाषा होण्यारा कित्येक अडचणी येतील, याची प्रियोळकरांना जाणीव असल्याचें त्यांच्या याच भाषणावरून व्यक्त होतें, हेंहि नमूद करावयास पाहिजे; तथापि, राष्ट्रभाषेच्या प्रश्नाचा विचार करतांना त्यांना संस्कृतचें स्मरण व्हावे, हेंच मुळीं चमत्कारिक वाटतें !

संस्कृत भाषेचें महत्त्व कमी लेखण्याचें किंवा तिला तुच्छ समजण्याचे 'पातक' कोण करील ? परंतु मूठभर पंडितांखेरीज जी भाषा बोलली-लिहिली जात नाहीं, ती राष्ट्रभाषा होऊं शकणें हें निखळलेली चांदणी स्वस्थानीं परत विराजमान होण्याइतकेंच अशक्य आहे !

बरे, राष्ट्रभाषा म्हणून संस्कृतचा स्वीकार करावयाचा, तो तरी कसा ?— आहे त्या रूपांत ती स्वीकृत करावयाची की काय ?—छे, छे ! रा. प्रियोळकर यांची खालीं दिलेली क्लृप्ति पहाः—

" जुन्या संस्कृत भाषेशीं असलेला संबंध एकदम न सुटेल अशा प्रकारे जुन्या संस्कृतामध्यें फेरफार करून तिला सोपेपणा आणणे शक्य आहे. सातशें वर्षामागची ज्ञानेश्वरकालीन मराठी जर आज भाषणांत किंवा लेखनांत जशीची तशी योजत नाहींत, तर आज हजारों वर्षामागची पाणिनीय संस्कृत – तिचे पुनरुज्जीवन करावयाचे झाल्यास जशीची तशी योजिली पाहिजे, असा कोणीही विचारी माणूस आग्रह धरणार नाहीं. हे फेरफार कोणते करावेत, याचा विचार तज्ज्ञांनी करण्यासारखा आहे."

रा. प्रियोळकर हे विनोदी लेखक असल्याचे निदान माझ्या तरी ऐकिवांत नाही. तसे ते असते तर या अवतरणांत त्यांनी बहारीचा विनोद केला आहे, असें मी म्हटले असते! परंतु या माहितीच्या अभावी ते जबरदस्त आशावादी गृहस्थ आहेत, एवढेंच तूर्त मी म्हणतो!

ज्ञानेश्वरकालीन मराठी आपण सध्यां वापरीत नाही, याचे कारण तिच्यांत मध्यंतरी राज्यक्रांति वगैरेमुळे बदल होत गेला हे होय. चारदोन 'तज्ज्ञां'नी तिच्यांत बळें बळें 'फेरफार' केल्यामुळे तिचें मूळचे स्वरूप बदललेले नाही, हे प्रियोळकरांना सांगावयास थोडेंच हवे?

हिंदी भाषेच्या मस्तकावर राष्ट्रभाषेचा मुकुट घातला जावयास रा. प्रियोळकर यांचा विरोध दिसतो. या प्रयत्नाबाबत आपणास 'अत्यंत आदर' वाटत असल्याचा निर्वाळा देऊनसुद्धां त्यांना पुढील वाक्य लिहिण्याचा मोह आवरतां आला नाही हे ध्यानांत घेण्याजोगें आहे! ते वाक्य असें:—" **आपल्यापैकीं हिंदी ह्या एकाच प्रांतभाषेला राष्ट्रभाषेचा दर्जा दिल्यास इतर प्रांतीय भाषांना वैषम्य वाटणें स्वाभाविक आहे.**" रा. प्रियोळकर यांचा हिंदी भाषेला असलेला विरोध तात्त्विक मतभेदापेक्षां '**वैषम्या**'वरच जास्त आधारलेला असावा, असें या वाक्यावरून कुणी अनुमान काढल्यास त्याला त्यास फारसा दोष देतां येईल काय?

हिंदी भाषेकडे पहाण्याची अनेक महाराष्ट्रीयांची दृष्टि असावी तितकी निर्मळ नसते, याची प्रतीति पुष्कळदां येते. अल्प प्रमाणांत कां होईना, पण

प्रियोळकरांना तोच अनुभव पुनः एकवार आणून दिलेला आहे अशीच, हे भाषण वाचून, कुणाचीहि कल्पना होईल !

*  *  *

## २१९ भाषाशास्त्रज्ञाचा अभिप्राय

मृत भाषेला पुनरुज्जीवित करणें, भाषेचे प्रचलित स्वरूप बदलविणें, किंवा नूतन भाषा निर्मिणें, या गोष्टी व्यक्तिशः एखाद्या पंडितास अगर पंडितांच्या समितीस साध्य होण्याजोग्या नाहीत, याविषयीं भाषाशास्त्रज्ञांचें प्रायः एकमतच आहे. सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय भाषाशास्त्रज्ञ **प्रो. कृ. पां. कुळकर्णी** यांच्या ' भाषाशास्त्र आणि मराठी भाषा ' या हाताशीं असलेल्या ग्रंथांतून सहजगत्या निदर्शनास आलेला एक उतारा वाचकांस सादर करतों:—

" परंतु नागर काय, किंवा शिष्ट काय, किंवा ग्रांथिक काय, ह्यांपैकीं कोणतेंहि भाषेचें स्वरूप असो, तें **स्वरूप आपोआप बनत असतें. भाषा उत्पन्न करण्याचें काम कोणाहि बृहस्पतीच्या हातून होणें शक्य नाहीं.** तिकडच्या कांहीं पाश्चात्य पंडितांनीं सर्व राष्ट्रांत कांहीं विशेष प्रकारच्या व्यवहारांत एकच भाषा व्यवहारांत असावी, ह्या सदिच्छेनें ' एस्परॅन्टो ' किंवा ' इडो ' नांवाची भाषा बनविण्याचा प्रयत्न आरंभिला. पण असला प्रयत्न कोठें यशस्वी होणार आहे ? सर्वच ओंफस् झालें, त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. **भाषा का एकदोन दिवसांत तयार होणारा माल आहे, कीं पंडितांनीं आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर त्याला " तयार हो ! " —म्हणावें आणि त्यानें लागलींच तयार व्हावें ! भाषा ही हळुहळू बनत असते, व तिला बनविणारा घटक समाज."** ( पान १६५ )

प्रो. कुळकर्णी यांचा हा अभिप्राय नजरेसमोर ठेवला असतां संस्कृत भाषेसारख्या ' मृत ' भाषेला ( या शब्दप्रयोगाबद्दल प्रियोळकरांनीं क्षमा करावी ! ) 'तज्ज्ञ' लोकांनीं 'फेरफार' करून पुनरुज्जीवन आणून देण्याच्या कल्पनेची शक्याशक्यता वाचकांस पर्यायानें पडताळून पाहतां येईल.

राजाश्रय असलेल्या पंडितांस देखील हा चमत्कार करून दाखविणें दुष्कर आहे. मग राजाश्रय नसलेल्या पंडितांच्या प्रयत्नांबद्दल काय बोलावयास पाहिजे ?

* * *

## २२० हिंदी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष जमनालाल !

मद्रास येथील हिंदी साहित्यसंमेलनाचे अध्यक्षस्थान शेवटी शेठ जमनालाल बजाज यांनाच देण्यांत आल्याचें समजतें ! हें स्फुट लिहीत असतांना तरी जमनालालजींनी हा मान नाकारल्याचें जाहीर झालेलें नव्हतें ! अर्थात् ईस्टरमध्यें भरण्यांत यावयाचें हें संमेलन जमनालालजीच्याच अध्यक्षते-खाली पार पडलें असेल, असें गृहित धरण्यास हरकत नाहीं.

या संमेलनाच्या अध्यक्षपदासाठी राहुल सांस्कृत्यायन, मैथिलीशरण गुप्त वगैरे आणखी कांहीं नांवें सुचविण्यांत आलीं होती. परंतु शेठ जमनालाल बजाज यांनीं हिंदी भाषेच्या प्रसारासाठीं तनु, मन व **विशेषतः धन** खर्च केलें असल्यामुळेंच, त्यांना हा मान प्राप्त झाला म्हणतात ! हें खरे असल्यास औंध–संस्थानाधिपतींच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मराठी साहित्य-संमेलनाची ही ' हिंदी आवृत्ति 'च बाहेर पडत आहे, असें म्हणावयास प्रत्यवाय कसला ?

शेठ बजाज यांच्या एका पक्षपाती लेखकानें तर सरळ सरळ पृच्छा केली आहे कीं, " द्रव्यसाह्यासाठीं जमनालालजींकडे धांव घेतां, मग त्यांना संमेलनाध्यक्ष करण्यासच मागेंपुढें कां पहातां ? "—होय बाबा, तूं म्हणतोस तें कांहीं खोटें नाहीं ! धनानें वश होत नाहीं, असें काय आहे ? आणि, **' वाङ्मय व अर्थशास्त्र '** यांचा परस्परसंबंध तर प्रत्यक्ष मार्क्सवादानेंच सिद्ध होणारा आहे ! ! मग जमनालालजींनीं राहुल सांकृत्यायन, मैथिलीशरण गुप्त प्रभृति वाग्भटांवर मात करावी, यांत नवल ते कोणतें ?

तसेंच म्हटलें, तर हा प्रश्न गंभीरपणानें विचार करून सहज सोडवतां येतो. ज्या धनिकानें वाङ्मयाबाबत पदरमोड केली असेल, त्याच्या ऋणांतून

मुक्त होण्यासाठीं त्याला साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान द्यावयास पाहिजे, असें नव्हे. त्याच्या हस्तें संमेलनाचें उद्घाटन करूनहि त्याजविषयीं कृतज्ञताबुद्धि व्यक्त करतां येईल. भाषाभिवृद्धीकरतां झटणाऱ्या राजकीय पुढाऱ्यांबद्दलहि असेंच धोरण ठेवावें. मराठी, हिंदी वगैरे भाषांतील संमेलनें भरविणाऱ्या गृहस्थांनीं या दृष्टीनें अध्यक्षादिकांची निवड केल्यास साहित्यिकांस वारंवार घडणारा हा अन्याय खात्रीनें दूर होईल.

—**प्रतिभा**, वर्ष ५, अंक ५

## २२१ महाराष्ट्राचा महापंडित गेला !

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे १० एप्रिल रोजीं परलोकवासी झाल्याचें शोचनीय वर्तमान ऐकून ज्याला अतिशय दुःख झालें नसेल, असा एकहि सहृदय मराठी-भाषा-भक्त नसेल ! डॉक्टरसाहेब हे इतक्या लौकर आपणांमधून निघून जातील, अशी खरोखरच कल्पना नव्हती. परंतु, अघटित-घटना-पटु कालपुरुषाने तोहि प्रसंग घडवून आणला आहे !

डॉ. केतकर यांच्या तोडीचा अष्टौप्रहर कल्पक पंडित महाराष्ट्रांतच काय, पण सबंध हिंदुस्थानांतहि एवढ्यांत क्वचितच झाला असेल ! वेदांपासून तो थेट समाजशास्त्रासारख्या नवज्ञान विषयापर्यंत-अनेक शास्त्रांत त्यांची मति सारख्याच अकुंठितपणें अवगाहन करीत असे ! कित्येक वेळां त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनी देखील 'सर्वज्ञः स हि श्रीधरः।'-अशी मनोमय साक्ष निःसंशय दिली असेल ! 'साहित्याचार्य' म्हणविणारे लोकहि डॉक्टर-साहेबांवर अनेकदां घसरतांना दिसून आले आहेत; परंतु, त्यांनीं सुद्धां एखाद्या शास्त्रीय विषयाबाबत डॉक्टरांशी पूर्वोत्तरपक्ष केल्याचे प्रायः दृष्टो-त्पत्तीस येत नाहीं, यांतील मर्म स्पष्ट करून सांगण्याचें प्रयोजन आहे काय ? बरें, लोकोत्तर विद्वत्तेमुळें डॉ. केतकर यांची कल्पकता कोळपून गेली असेल म्हणावें, तर तसेंहि सुतराम् आढळत नाहीं. डॉक्टरांचें कोणतेंहि लिखाण काढा त्यांत कल्पकतेच्या ठिणग्या तडतडत नाहींत, असें सहसा घडावयाचेंच नाही ! किंबहुना वाचकवर्ग त्यांच्या लेखनावर एवढा 'लट्टू' असे, तो या अपूर्व कल्पकतेमुळेच ? एरवीं नुसत्या पांडित्यानें 'बरवटलेल्या' मजकुराची तो काय पत्राज ठेवतो ?

त्यांतहि मौज ही की, डॉ. केतकर यांची भाषा कमालीची बोजड व नीरस असावयाची ! मराठी बायबलानंतर इतकी विचित्र भाषा केतकरांनीच लिहिली ! रा. वरेरकर यांचे 'संन्याशाचा संसार' हें नाटक अलीकडे

रचिलें गेलें असतें, तर त्यांत त्यांनीं विनोदासाठीं मराठी बायबलऐवजीं केतकरांचाच एखादा ग्रंथ घेतला असता, असेंहि म्हणावेसें वाटतें !

जशी त्यांची भाषा विलक्षण, तसेच त्यांचे विचारहि पण विलक्षण— टागोरबाबूंच्या ऐन जयजयकारांत त्यांना कमी प्रतीचे कवि लेखणें, स्वतःच्या कादंबऱ्यांतून वाटेल तसा 'चावटपणा' (हा डॉक्टरांचाच आवडता शब्द !) करूनहि 'विरहतरंग' काव्यांत नायिकेनें नायकाचें चुंबन घेतल्याबद्दल कवीस दोष देणें, जातिभेद मोडण्याची भाषा सर्वत्र बोलली जात असतांना पोटजातीचे संघ काढण्याची तरफदारी करणें, साम्यवादाची तुतारी दीर्घ स्वरानें निनादत असतांना त्या तत्त्वज्ञानास 'शूद्रसंस्कृति' या संज्ञेनें हिणविणें — वगैरे वगैरे. डॉ. केतकर यांच्या त्रिक्षिप्त विचारसरणीचीं उदाहरणें कुठवर म्हणून उद्धृत करावीं ?

अलीकडे—अलीकडे "हिंदुस्थानला स्वराज्य मिळालें असून तें मींच मिळवून दिलें आहे !"—असें डॉ. केतकर बोलत व लिहीत असत ! पुष्कळांना या विधानानें त्यांच्या विक्षिप्तपणावर कळसच चढविल्यासारखें वाटे ! परंतु, डॉ. केतकर यांची एवढ्यांतली आर्थिक दुर्दशा लक्ष्यांत घेतली, म्हणजे स्वतःकडे व तद्द्वारां आपल्या ग्रंथाकडे खपाच्या दृष्टीने जनतेचें चित्त वेधून घेण्यासाठीं तर ते अशीं चमत्कारिक विधानें करीत नसतील ना, असा संशय अंतःकरणास स्पर्श केल्यावांचून रहात नसे ! आणि या स्पर्शाबरोबर वरील विधानामुळें मुखावर विलसूं लागणारें स्मित जागच्या जागीं विरून जाऊन तेथें गांभीर्य आपलें ठाणें देई !

डॉ. केतकर यांच्यासारखा दिग्गज पंडित उत्तर वयांत दारिद्र्याच्या भोंवऱ्यांत सांपडवा, आणि त्याला हात देण्याची बुद्धि समर्थांसहि होऊं नये, हा देखावा पाहून त्यांच्या चहात्यांच्या हृदयांत भयंकर कालवाकालव होत असे ! आतां ते दिवंगत झाल्यामुळें मराठी साहित्याची अपरंपार हानि झाल्याबद्दल खेद मानावा, कीं ते आकाबाईच्या फेऱ्यांतून कायमचे मुक्त झाल्याबद्दल त्यांतल्या त्यांत समाधान मानावें हेंच कळत नाहीं !

डॉक्टर केतकर तर गेलेच, पण 'ज्ञानकोश', 'प्राचीन महाराष्ट्र', 'ब्राह्मण कन्या', शेंकडों स्फुट प्रबंध, इत्यादि-इत्यादि त्यांचें लिखाण महाराष्ट्र-सारस्वतांत सदैव टिकेल, यांत बिलकुल शंका नाहीं.

डॉक्टरसाहेबांच्या निधनानें 'प्रतिभे'चेंहि अतोनात नुकसान झालें आहे! 'प्रतिभे'चे ते एक प्रमुख लेखक असून त्यांच्या अनेक विचारप्रवर्तक लेखांचा आस्वाद वाचकांनीं वेळोवेळी घेतलेलाच आहे. आपला असा एक आधारस्तंभ एकाएकीं कोसळून पडल्याबद्दल 'प्रतिभे'स अनिवार दुःख होत आहे!

* * *

## २२२ साम्यवादाचा आसूड

हिंदी 'विशाल भारत' मासिकाच्या मार्च १९३७ च्या अंकांत 'हिंदुस्थानांत प्रगतिशील साहित्याची आवश्यकता' या शीर्षकाचा एक लेख प्रकाशित झाला आहे. त्यांत लेखकानें हिंदी साहित्याकडे साम्यवादाच्या चष्म्यामधून नजर-फेंक केलेली आहे. सांप्रदायिक अभिनिवेशामुळें लेखांतर्गत प्रतिपादन साहजिकच एकांगी झालें आहे. तथापि, 'क्रियेस प्रतिक्रिया' या न्यायानें वाङ्मयांतील कांहीं कुप्रवृत्तीचा नायनाट होण्यासाठीं असें एकांगी विवेचनहि प्रसंगोपात्त उपकारकच ठरण्याचा संभव असतो! एकच उदाहरण द्यावयाचें तर, हिंदी भाषेंतील गूढवादी काव्याकडे अंगुलिनिर्देश करतां येईल. रवींद्रनाथ टागोर प्रभृतींच्या गूढवादी कवितेमुळें हिंदीमध्यें त्या स्वरूपाच्या रचनेला उमाप भरती आली आहे! सुमित्रानंदन पंत, सूर्यकांत त्रिपाठी 'निराला', जयशंकर 'प्रसाद' वगैरे ठळक ठळक हिंदी कवि गूढवादाचा पावा घुमवितातच; पण इतर सटरफटर कवि देखील गूढवादाच्याच नांवाखालीं भलभलते बेसूर व भेसूर सूर काढूं लागले आहेत! उपरोक्त लेखांत गूढवादावर पुढीलप्रमाणें कडाखा उडविण्यांत आला आहे, तो यथार्थच वाटतो—

"या गूढवादाच्या प्रवाहाने हिंदी साहित्याला जेवढा धक्का दिलेला आहे, तेवढा हिंदुमहासभा व मुस्लीम लीग यांनीं भरतखंडाला क्वचितच

दिला असेल ! तो इतका कीं, सध्यां कुणी कवि काव्यरचना करावयास बसला रे बसला कीं, त्याचा ' प्रियतम ' हरवळा जातो, त्याचा सोन्याचा संसार नष्ट होतो, आणि त्याच्या हृत्तंत्रीच्या तारा झंकृत होऊन छिन्नभिन्न होऊन जातात ! ' पैलथडी'वरून त्याला मूक संदेश येऊं लागतात, अभिसार होऊं लागतो, आणि कुणाला ठाऊक–आणखी काय काय होतें तें ! ही आत्म-हत्याच नव्हे, तर दुसरें काय होय ? ही साहित्यिक आत्महत्या असून भावी पिढ्या या कवींना तिजबद्दल कदापि क्षमा करणार नाहीत ! ''

हे उद्गार पराकाष्ठेचे कटु वाटले, तथापि ते सार्थ असल्याची ग्वाही हिंदी साहित्याचा प्रत्येक अभ्यासक देईल. मराठी भाषेत गूढवाद या थराला गेलेला नाही व बहुधा पुढेहि जाणार नाही, हें सुदैवच म्हटलें पाहिजे.

येथे हेंहि नमूद करावयास हवें की, विकृत पद्यरचना म्हणजे गूढवादी कविता नव्हे. 'गूढवाद' हा शब्द आपल्याकडे अतिशय ढिलाईने वापरण्यांत येतो. यामुळें कित्येकदां कष्मलाबरोबर कांचनहि भस्म करण्यांत येते !

प्रस्तुत लेखांत सुप्रसिद्ध हिंदी कवि मैथिलीशरण गुप्त यांच्या 'भारत–भारती ' या गाजलेल्या काव्याला साम्राज्यशाहीचा पुरस्कार केल्याबद्दल जो दोष दिलेला आहे, तो सुद्धां अगदीं रास्त आहे ! हिंदुस्थानावरील इंग्रजी साम्राज्याचा पुरस्कार करणारी व्यक्ति एक तर अत्यंत भोळी असली पाहिजे किंवा निदान इरसाल ढोंगी तरी असली पाहिजे ! गुप्तबाबू अर्थातच पहिल्या कोटींत येतात.

महाराष्ट्रांतहि रे. टिळकांसारखे कांही कवि '' आंग्लभूमिचें हिंदभूमिचें नातें प्रेमळ... '' इ० चर्पटपंजरी करतांना आटळतात ! न्यायमूर्ति रानड्यां-सारख्या महान् प्रज्ञावंताचा जेथें बुद्धिभ्रम झाला, तेथे या कविमंडळीचा काय पाड ?

मैथिलीशरण गुप्त यांचे ' भारत–भारती ' काव्य त्यांच्या सर्व कृतींत नाणावलेलें आहे. परंतु निःपक्षपातपणे विचार केल्यास ' काव्य ' या नात्यानें त्याची फारशी मातब्बरी वाटत नाही ! स्थूलमानानें हा ' पद्यमय इतिहास'च होय, असें त्याचें वर्णन करतां येईल !

लोकप्रियता काय ?—ती एखाद्यास प्रसंगीं नसत्या गोष्टींमुळें देखील प्राप्त होते !

*　　　*　　　*

## २२३ झेकोस्लोव्हाकियांत गीता

'विशाल भारता'च्या मार्चच्या अंकांत **कुमारी अमला नन्दी** या नर्तकीच्या सहीखालीं 'नृत्ययात्रेचे अनुभव' या नांवाचा एक लेख आलेला आहे. जगद्विख्यात भारतीय नर्तक **उदयशंकर** यांच्या यूरोपांतील कांहीं जलशांचा वृत्तांत या लेखांत ग्रथित केलेला आहे. उदयशंकर हे आपल्या साथीदारांसह झेकोस्लोव्हाकियांतील प्राग शहरीं गेले असतां तेथें त्यांना झेकोस्लोव्हाकियाचे सेनापति जनरल व्लाडीमीर क्लॅकेडिया यांच्या घरी जाण्याचा योग आला. सेनापतिसाहेबांचें घर म्हणजे प्राचीन दुर्मिळ वस्तूंचें एक संग्रहालयच होते ! तेथें एका कांचेच्या पेटींत एक ग्रंथ काळजीपूर्वक ठेवण्यांत आला आहे. यापुढील हकीकत लेखिका अमला नन्दी हिच्याच शब्दांत दिलेली बरी—

"तो ग्रंथ आम्हांस दाखवून सेनापतिसाहेब म्हणाले कीं, "हें पुस्तक माझ्या जीवनाचें सर्वस्व आहे !" "कसें काय ?" म्हणून पृच्छा केल्यानंतर त्यांनीं उत्तर दिलें कीं, "गेल्या महायुद्धांत मी व माझे कांहीं सैनिक रशियनांच्या हातीं कैदी म्हणून सांपडलों होतों. रशियनांनीं आम्हांला सेंट पीटर्सबर्ग येथें नेऊन तुरुंगांत ठेवलें, आणि आम्हां सर्वांस मृत्यूची शिक्षा फर्मावली ! देहांत शासन प्राप्त झालेल्या बंद्यांच्या स्थितींत आम्ही लोक कारागृहांत दिवस कंठीत असतांना आमची मानसिक अवस्था अतिशय शोचनीय झाली होती ! आमची ती स्थिति पाहून ॲलेक्स अलादिन नामक एका रशियन सेनापतीनें मला हा ग्रंथ वाचावयास दिला, तो वाचून माझ्या मनाला पुष्कळच शक्ति व शांति प्राप्त झाली ! मग मी माझ्या सर्व सोबत्यांकडूनहि तें पुस्तक वाचून घेतलें. त्यांचेंहि अंतःकरण त्यामुळें स्थिर झालें ! असें हें पुस्तक म्हटलें म्हणजे भगवद्गीतेचें जर्मन भाषांतर होय."

—असहाय परिस्थितींत असतांना कित्येकदां साध्या बोधवचनांनीं देखील चित्तशांति मिळूं शकते. मग गीतेसारख्या नामवंत ग्रंथानें तसा

अनुभव आला असल्यास त्यांत नवल तें कोणतें ! तथापि, गीताभक्तांसच केवळ नव्हे, पण सर्वसाधारण वाचकांसहि मनोरंजक वाटेल म्हणून वरील मजकूर मुद्दाम दिलेला आहे.

* * * *

## २२४ केळकरांचा प्रसाद

कै. कवि चंद्रशेखर यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शित करण्यासाठीं पुणें येथें रा. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षत्वाखालीं एक सभा भरली होती. या सभेंतील आपल्या समारोपाच्या भाषणांत रा. केळकर यांनीं पुढील विधान केल्याचें वृत्तपत्रांवरून समजतें:—

> " कवि चंद्रशेखर यांच्याअंगीं प्रसाद हा फार मोठा गुण होता. प्रसादाच्या बाबतीत श्रीयुत लेंभे पहिले, चंद्रशेखर दुसरे, टिळक तिसरे व बालकवि चौथे असा मी नंबर लावीन."

'प्रसाद' या काव्यगुणाची फोड अनेक टीकाकारांनीं केलेली असली, तरी पण या काव्यगुणांत कोणकोणत्या गोष्टींचा समावेश होतो किंवा व्हावा, याबद्दल मात्र मतभेद असूं शकेल. तसेंच, एखाद्या रचनेत प्रसाद आहे कीं नाहीं आणि असल्यास त्याचें प्रमाण किती आहे, हें गुंजा–मासे–तोळ्यांनीं मापतां येत नाहीं ! अर्थात् लेंभे, चंद्रशेखर, टिळक व बालकवि यांचा केळकर यांनीं प्रसादाच्या बाबतींत जो क्रम लावला आहे, तो सर्वसमंत होईलच, याची शाश्वति कोण कशी देईल ?

तथापि, आधुनिक मराठी कवींत सर्वांत ज्यास्त प्रसादयुक्त कविता कुणाची असते, असा प्रश्न विचारला असतां बहुसंख्य रसिक टिळकांच्याच बाजूनें कौल देतील, असें मला वाटतें. इतरांचें राहो, पण खुद्द रा. केळकर यांनीं देखील तेवीस वर्षांपूर्वी थेट असाच अभिप्राय व्यक्त केला होता ! 'टिळकांची कविता' या काव्यसंग्रहाला १–१२–१९१४ रोजीं लिहिलेल्या प्रस्तावनेंत केळकर म्हणतात: 'टिळकांच्या कवितेचे माझ्या मतें मुख्य दोन गुण आहेत. एक प्रसाद व दुसरा प्रेमळपणा. हे दोनहि प्रकारचे गुण कोणत्याहि चांगल्या कवितेस आवश्यक आहेत. **प्रसादा-**

**संबंधानें तर दुसरा कोणी आधुनिक कवि टिळकांची बरोबरी करील असें सहसा वाटत नाहीं.**" पण, १९१४ सालचें हें मत १९३७ सालीं केळकरांनीं काय म्हणून कायम ठेवावें? " Consistency is the virtue of an ass "—हें तर स्वतः केळकरांचेंच आवडतें सूत्र आहे! त्या सूत्राचा अवलंब केळकरांनीं न करावा, तर इतर कुणी करावा? दुसरें असें की, आरंभीं उल्लेखिलेली पुण्याची शोकसभा चंद्रशेखरांप्रीत्यर्थ भरविण्यांत आली होती. त्या सभेमध्यें प्रसादासारख्या गुणांत चंद्रशेखरांना पहिला नंबर नसला, तरी निदान दुसरा नंबर तरी देणें आवश्यक होतें! नाहींतर, '**गंगा गये गंगादास – जमना गये जमनादास**'–हा केळकरी खाक्या तो कुठें राहिला? आतां म्हटलें तर हें औचित्य आहे, अथवा म्हटली तर ही धरसोड आहे!! कारण, " उडाला तर कावळा अन् बुडाला तर बेडूक! "–या पलीकडे बिचारे केळकर झाले तरी ते अधिक काय सांगणार?

तात्पर्य, टिळक–बालकवींपेक्षां लेंभे–चंद्रशेखरांना प्रसादगुणाबाबत वरचें स्थान देऊन रा. केळकर यांनी काव्यप्रेमी जनांस चांगलाच 'प्रमाद' दिला आहे, एवढें खरें!

* * *

## २२५ जमनालालजींचें भाषण

हिंदी–साहित्य–संमेलनाच्या अध्यक्षपदावरून शेठ जमनालाल बजाज यांनीं केलेलें भाषण कसें काय होतें, याचा विचार करणें म्हणजे देखील त्याला अवास्तव महत्त्व देणें होय! तसें तें देण्याचें आपणांस कांहींच प्रयोजन नाहीं. परंतु, त्यांतील एका मुद्याचा परामर्ष घेणें मात्र जरूरीचें आहे.

या भाषणांत शेठ जमालालजी यांनीं 'जीवन परिवर्तनशील आहे, पण साहित्य हें अमर आहे' असें एके ठिकाणीं म्हटलें असून नंतर लगेच पुढीलप्रमाणें 'सदिच्छा' प्रदर्शित केली आहे:—

" आमच्या साहित्यसेवकांची प्रतिष्ठा हिंदुस्थानांतच केवळ नव्हे, तर सर्व देशांत वाढो, आणि आमच्या साहित्यामुळें जगांत आमचें माथें उंच राहो, ही आमची पवित्र अभिलाषा आहे. "

रामशास्त्री

शेठमहाशयांची ही ‘ सदिच्छा ’ ठीक आहे. पण बापड्या साहित्यिकां-साठीं करतां येण्यासारखें एक साधें कृत्य देखील शेठजींनीं केलें नाहीं, याची वाट काय ? हिंदींतील कुणा साहित्यिकाचा जमनालालजी योगक्षेम चालवीत असल्याचें निदान माझ्या तरी ऐकिवांत नाहीं. नव्हे, त्याची फारशी अपेक्षाहि नव्हती ! तथापि, पात्रता नसतां आपल्याकडे आलेला संमेलनाध्यक्षत्वाचा मान नाकारून राहुल सांकृत्यायन, मैथिलीशरण गुप्त-यांसारख्या साहित्यिकांपैकीं कुणा एकास शेठजींनीं तो अर्पण करण्याची मात्र खचित अपेक्षा होती. ती त्यांनीं पुरी केली असती, तरीहि त्यांना साहित्य व साहित्यिक यांजविषयी खराखुरा जिव्हाळा वाटतो, असे मानण्यास जागा झाली असती ! साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान भूषविल्यामुळें कुणा साहित्यिकाला “ जगांत आमचें माथें उंच ” राहण्याच्या योग्यतेचें साहित्य निर्माण करता आलें असतें, अशांतला भाग नव्हे. परंतु, अशा मानाचे प्रसंग साहित्यिकांना प्रेरणाप्रद होण्याचा अल्पस्वल्प संभव असूं शकतो. एवढ्यासाठीं तरी या प्रसंगापासून त्यांस वंचित राहूं देणें इष्ट नसतें. शेठ जमनालाल बजाज यांनीं तें फुकाचें सत्कार्य करण्याची सुद्धां संधि गमावली, हें आश्चर्य होय !

मागे एकदां शेठजींना काँग्रेसचें अध्यक्षपद देण्यांत यावें, अशी सूचना पुढे आली असतां त्यांनी ती नाकारली होती असें स्मरतें. पण, साहित्य-संमेलनाचे अध्यक्षस्थान मात्र त्यांनीं नाकारलें नाहीं ! आपण काँग्रेसचे अध्यक्ष होण्यास अपात्र असलों, तथापि साहित्यसंमेलनाध्यक्ष होण्यास मात्र निःसंशय पात्र आहोंत, असेंच या वर्तणुकीवरून शेठजींनीं दिग्दर्शित केलें नाहीं काय ? आपल्या भाषणाच्या सुरवातीस जमनालालजींनीं जे विनयदर्शक उद्गार काढले आहेत, ते उघड उघड मानभावीपणाचे आहेत, असाच आतां निष्कर्ष काढावा लागतो !

—**प्रतिभा**, वर्ष ५, अंक ६.

## २२६ " महाराष्ट्राचें सुणें " कोण ?

'केसरी 'च्या २० एप्रिलच्या अंकांत 'तर्खड पारितोषिकाचे टीकाकार' या शीर्षकाचा एक लेख आलेला असून त्यांत 'प्रतिभे'विषयीं पुढीलप्रमाणें मुक्ताफळें उधळण्यांत आलीं आहेतः—

> " परंतु रा. भावे पुण्याचे आणि त्यांतहि 'केसरी'चे सह-संपादक असल्यामुळें कांहीं लोकांच्या पोटांत दुखूं लागलेलें दिसतें, आणि या पोटदुखीच्या वेदना ' मराठी भाषेचें लेणें' म्हणून 'केसरी'नेंच एके काळीं स्तविलेल्या परंतु संपादक बदलल्यापासून निष्कारण दुसऱ्यांवर तोंड टाकून 'महाराष्ट्राचें सुणें ' होऊं पाहणाऱ्या ' प्रतिभा ' पाक्षिकामध्यें घुमूं लागल्या आहेत......"

'केसरी'तील हा लेखक समजतो तद्वत निर्भीड टीका करणें म्हणजे चावरें कुत्रें बनणेंच होय असें मी समजत नाहीं. तथापि, वादासाठीं घटकाभर या लेखकाचें विधान मान्य केल्यास त्याच्याच अंगावर बाजू उलटल्याखेरीज कशी राहील ? कारण, या लेखकानें ' प्रतिभे 'ला दिलेली ' महाराष्ट्राचे सुणें ' ही पदवी जर पहिल्यानें कुणाला यथार्थत्वानें लागूं होईल, तर ती ' केसरी 'लाच होय ! न्या. मू. रानडे यांजपासून तों तहत म. गांधी यांजपर्यंत झालेल्या अनेक विभूतींवर बेगुमान झोड उठविणाऱ्या ' केसरी 'ला सदर लेखकाच्या विचारसरणीप्रमाणें वरील उपाधि लागूं करतां येणार नाहीं काय ? मग ती शिरसावंद्य समजण्यास खुद्द 'केसरी 'कर्ते, सहसंपादक रा. वा. कृ. भावे अथवा त्यांचा हा लेखक-पित्त्या सिद्ध आहे काय ?

पण, मुळीं ही विचारसरणीच सदोष आहे. एखादी व्यक्ति केवढीहि थोर असली, तरी ती अस्खनलशील आहे, असें मानण्याचें कारण नाहीं. अर्थात् लेखन-भाषण-स्वातंत्र्याच्या पुरस्काराच्या या युगांत त्या थोर व्यक्तीच्या चुकांचें माप कुणी तिच्या पदरांत घातल्यास त्याबद्दल हर्षित व्हावयाचें कीं

रागवावयाचें ? आतां, 'केसरी'ला रानडे–आगरकर–गोखले–गांधी यांचे देखील वाभाडे काढण्याचा अधिकार आहे, आणि 'प्रतिभे'ला मात्र 'केसरी'च्या संपादक–उपसंपादकांच्या तर काय, पण देवडीवाल्याच्याहि विरुद्ध चकार शब्द काढण्याचा हक्क नाही, असाच कुणाचा हट्ट असेल तर गोष्ट वेगळी !

'केसरी'नें आपल्या हस्तकाकरवीं इतरांस 'सुणें' म्हणविणें म्हणजे '**श्वानवत् गुर्गुरायते**' या उक्तीचा प्रत्यय आणून देणेंच होय ! एरवीं तरी अलीकडल्या 'केसरी'च्या नांवामागें कंसांत 'श्राम' शब्द घालण्याचा रिवाज पुष्कळांनीं पाडलाच आहे !

'प्रतिभे'च्या सध्यांच्या संपादकांच्या निःस्पृह धोरणाचे चटके या लेखकाला, किंवा निदान त्याच्या इष्टमित्रांना, चांगलेच बसल्याचे त्याच्या वरील अवतरणावरून दिसतें ! आपली गोळी बरोबर लागू पडल्याबद्दल संपादकांनीं समाधान मानावें, अशी त्यांस माझी मित्रत्वाची सूचना आहे !

*  *  *

## २२७ टीकाकारांची कैफियत

नामवंत आंग्ल साहित्यिक रॉबर्ट लिंड यांचा २६ मार्चच्या 'John O' London's Weekly मध्यें Writers and Reviewers या मथळ्याचा एक अत्यंत मार्मिक लेख प्रकाशित झाला आहे. महाराष्ट्रांतील यच्चयावत् सर्व नाजुक मिजाशीच्या साहित्यिकांकडे या लेखाच्या सुट्या प्रति काढून त्या विनामूल्य रवाना केल्या, तरी तें एक मोठें वाङ्मयकार्य होणार आहे !

या लेखांत रॉबर्ट लिंड यांनी थोर थोर इंग्रजी साहित्यिकहि टीका व टीकाकार यांजकडे कसे तिरस्कारानें पहात असत, याचें सुंदर बयाण केलें आहे ! वर्डस्वर्थ हा एवढा तत्त्वज्ञ कवि ना, पण त्याला प्रतिकूल टीकेचा वारा देखील सहन होत नसे ! The Edinburgh Review चा संपादक जेफ्रे हा फटकळ टीकाकार म्हणून आंग्ल साहित्यांत अतिशय बदनाम झालेला आहे ! परंतु त्याची टीका नेहमींच वृथा किंवा अन्यायमूलक असे,

असा अभिप्राय व्यक्त करणे खाचित सत्यास धरून होणार नाहीं! वर्डस्वर्थच्या ' The Excursion ' या काव्याला जेफ्रेने रद्दड ठरविलें होतें आणि बहुतेक रसज्ञ आज या बाबतींत जेफ्रेच्याच मताचा अनुवाद करतात. तथापि, उपरोक्त मासिकांतील प्रस्तुत काव्यावरील प्रतिकूल टीका वाचून वर्डस्वर्थ इतका खवळला होता कीं, " या मासिकाच्या स्पर्शानें मी आपले हात विटाळणार नाहीं ! " असे पराकाष्ठेचे क्षुद्र उद्गार काढण्यापर्यंत त्याची मजल गेली होती ! फार काय सांगावें, कॉलेरिजसारख्या निकट स्नेह्याची स्वतःसंबंधींची समतोल टीका सुद्धां वर्डस्वर्थला विशेष रुचली नाहीं ! !

जगद्विख्यात कादंबरीकार थॉमस हार्डी याची त्याच्या हयातींतहि थोडीथोडकी तारीफ झाली नाहीं ! तरी पण, आपण एक टीकाकारांनीं झोडपलेले ग्रंथकार आहों, असें रडगाणें गावयाचा तो राहत नसेच ! मग लोकांनीं सकाळीं उठून आपणापुढे दररोज ' साष्टांग नमस्कार ' घालीत जावा, अशी त्याची अपेक्षा होती की काय, न कळे !

मौजेची गोष्ट ही की, जे ग्रंथकार इतरांच्या पुस्तकाचें परीक्षण करतांना वाटेल तसें तोडून लिहितात तेच स्वतःविरुद्ध ' ब्र ' देखील ऐकण्यास तयार नसतात ! अजबसंग्रहालयांत नेऊन ठेवण्याजोगा अशा ' प्राण्यां'बद्दल रॉबर्ट लिंड म्हणतातः " They ( The authors ) have themselves been fairly severe critics of the work of other authors, believing this severity to be a proof of their honesty, but severe criticism of their own work they have resented as dishonest and unfair ! "

याचें आपल्याकडील एवढ्यांतलें ठळक उदाहरण म्हटलें म्हणजे रा. वि. स. खांडेकर यांचें देतां येईल ! रा. खांडेकर हे किती जलाल टीकाकार आहेत, याची साक्ष त्यांचे अनेक टीकालेख देतील ! असे कांहीं टीकालेख ' वनभोजन ' पुस्तकांत संग्रहित करून आपल्या जलालपणाचा अनुभव घेऊं इच्छिणाऱ्या वाचकांची खांडेकरांनीं कायमची खाशी सोय केली आहे ! हेच उग्र टीकाकार खांडेकर इतरांच्या आपल्यावरील सापेक्षतः सौम्य

टीकेनेंहि कसे बावचळून जातात, याचा अनुभव अलीकडे सर्वत्रांस आलाच आहे !

बरें, पुनः गंमत ही कीं, या साहित्यिकांना टीकाकार नको असतात, असें निखालस नव्हे ! परंतु, त्यांना ते स्वतःची निर्भेळ स्तुति करणारे असे हवे असतात ! टीकाकारांनीं नव्याण्णव टक्के गुण गाऊन एक टक्का जरी दोष दाखविले, तरी त्यांची मर्जी खप्पा होते ! लिंडसाहेबांनीं म्हटल्याप्रमाणें अशा साहित्यिकांना जर 'अष्टाधिकार' प्राप्त झाले, तर ते नवीन ग्रंथांवर प्रतिकूल टीका म्हणून होऊंच नये, असा नाझींसारखा फतवा काढतील !

अर्थात् टीकाकार तितके सारे देवदूत असतात, किंवा त्यांच्या सर्वच टीका सद्धेतुमूलक असतात अशांतला बिलकुल प्रकार नाहीं. तथापि साहित्यिकांनीं देखील '**नका शिवूं मम कवनाला**' अशी हास्यास्पद 'Touch me not'–प्रवृत्ति ठेवूं नये, हेंहि तेवढेंच खरें आहे.

*   *   *   *

## २२८ केंद्रवादाची कोण ही दहशत !

आपल्या पुणेंकर बांधवांना केंद्रवादाची केवढी दहशत बसली आहे याची वारंवार फार बहारीची प्रतीति येते ! बागुलबोवामुळें लहान मूल, लाल चिंधीमुळें बैलोबा अथवा साम्यवादामुळें साम्राज्यवादी जितके बुजत नसतील तितके पुणेकर केंद्रवादामुळें बुजतात ! हेंच पहा ना. ता. १४ एप्रिलच्या 'ज्ञानप्रकाशां'त क. डॉ. श्री. व्यं. केतकर यांजवर अग्रलेख आलेला आहे. त्यांत प्रयोजन नसतांना केंद्रवादाचा पुढीलप्रमाणें संबंध आणलेला आहेः—

"डॉ. केतकरांच्या ज्ञानकोश–संपादन–कार्याला मध्यप्रांतांत आरंभ झाला; पण पुढें परिस्थित्यनुकूलतेमुळें त्यांना पुण्यनगरीला कसें कायमचें स्थलांतर करावें लागलें, हा इतिहास नागपूरकेंद्रवाद्यांनीं अभ्यास करण्यासारखा असला, तरी या लेखांत त्याचा निर्देश करण्याचें कारण नाहीं."

"निर्देश करण्याचें कारण नाहीं," असें म्हणतां म्हणतां या अग्रलेखाच्या लेखकाला हा निर्देश केल्यावांचून राहवलें नाहीं, ही एकच गोष्ट,

केंद्रवादाचें शल्य त्याच्या हृदयांत किती खोलवर जाऊन रुतलें आहे, याची कल्पना आणून देण्यास पुरेशी आहे ! तसेंच, डॉ. केतकरांचा मृत्यूलेख व केंद्रवाद यांची सांगड घालून देण्यांत या लेखकानें 'बादरायणसंबंधा'वर देखील कडी केली आहे ! बाकी रा. नरसोपंत केळकर यांच्यासारख्यांनींहि अप्रासंगिकपणा पत्करून केंद्रवादावर जाहीर तोंडसुख घेण्याचा प्रसंग जेथें घडला आहे, तेथें या बिचाऱ्या लेखकाचा काय पाड ?

महाराष्ट्राचें नागपूर हें एकमेव केंद्रस्थान आहे, अगर व्हावें, असा आग्रह कोणत्याहि जबाबदार व्यक्तीनें धरल्याचें मला ठाऊक नाहीं. मग नागपूरकरांस ही अनाठायीं कोपरखळी कां ?

प्रो. श्री. ना. बनहट्टी व रा. वि. बा. आंबेकर यांचा 'चंद्रगुप्त' कादंबरीविषयीं वाद झाला होता, त्यावेळीं सुद्धां आंबेकरांना केंद्रवादावरून उखाळ्यापाखाळ्या काढल्याखेरीज चैन पडलें नाहीं, ही ध्यानांत घेण्यासारखी बाब आहे !

पुणेंकरांतील 'साहित्यवृद्धकां'पासून तों थेट त्या विषयामधील 'बाबा लोकां'पर्यंत बहुतेक सर्वांनीं केंद्रावादाबाबत कमालीचा चीडखोरपणा प्रगट केला आहे !

—**प्रतिभा**, वर्ष ५, अंक ७

## २२९ साहित्यिकांची उपेक्षा

हिंदी 'विशाल भारत' मासिकाच्या एप्रिल १९३७ च्या अंकांत संपादक पं. बनारसीदास चतुर्वेदी यांनीं संपादकीयांतील एका स्फुटामध्ये साहित्यिकांच्या उपेक्षेबद्दल जोराची तक्रार केली आहे. हिंदींतील कादंबरीकारांचे मुकुटमणी कै. प्रेमचंद्र हे अखेरच्या दुखण्यानें अत्यवस्थ असतांना त्यांच्या आजाराची हकीकत वृत्तपत्रांतून वेळोवेळीं व तपशीलवार प्रसिद्ध होत नव्हती, असा पंडितजींचा वर्तमानपत्रें व त्यांचे बातमीदार यांजवर आक्षेप आहे व तो सत्यपूर्णहि आहे.

मराठींतील साहित्यिकांची देखील हुबेहूब अशीच उपेक्षा होत नाहीं काय ? 'ज्ञानप्रकाश 'सारखीं फार थोडीं वृत्तपत्रें साहित्यिकांचा आजार वगैरे वृत्तान्त छापतात. केवढाहि थोर साहित्यिक असला, तरी इतर वर्तमानपत्रांत त्याच्या निधनाची ( अर्थात् तो निधन पावल्यास ! ) तेवढीच बातमी एकाएकीं प्रसिद्ध होते, आणि त्याच्या रुग्णावस्थेची माहिती नसणाऱ्या वाचकांना ती अनपेक्षित शोकवार्ता वाचून जबरदस्त धक्का बसतो ! याचें एवढ्यांतलें उदाहरण द्यावयाचें असल्यास तें डॉ. केतकर यांच्या मृत्यूचें देतां येईल. डॉक्टरसाहेब आजारी असल्याची बातमी अतिशय थोड्या वृत्तपत्रांनीं छापली. त्यांत त्यांची निधनवार्ताच काय ती अकस्मात् प्रगट झाली. यामुळें डॉ. केतकर यांच्या चाहत्यांना त्या वार्तेनें क्षणभर भांबावल्यासारखें झालें असल्यास नवल नाहीं ! डॉक्टरांसारख्या प्रख्यात पंडिताची जेथें ही गत, तेथें चिल्लर साहित्यिकांचा काय पाड ?

मात्र जे साहित्यिक वाङ्मयनिर्मितीबरोबर राजकारणादिकासारखे 'जोड धंदे' करतात, त्यांच्या खाजगी हालचालींना वेळच्यावेळीं प्रसिद्धि मिळण्याचा अधिक संभव असतो. निर्भेळ साहित्यसेवा करणारे लोक या गाजावाजापासून प्रायः वंचितच राहतात ! 'प्रायः' म्हणण्याचें कारण असें आहे कीं, या एकमार्गी साहित्यिकांनीं नियतकालिकांच्या वाचकांच्या विनोदबुद्धीला खाद्य

मिळण्याजोगें असे एखादे कृत्य केलें, तर तें तिखटमीठ लावून व टीकाटिपणी जोडून छापावयास संपादकवर्ग नेहमीं सज्ज असतो ! हेंच पहा ना, मध्यंतरीं साहित्यिकांत एक बायको जिवंत असतां दुसरें लग्न करण्याची सांथ उमळली होती. त्यावेळीं " (अ) शुभ मंगल सावधान ! " —असें ओरडण्यारा आमच्या वर्तमानपत्रांनी बिलकुल मागेंपुढें पाहिलें नाहीं ! या गलबल्याचा अभावितपणें परिणाम असा झाला कीं, हे सरस्वती-पुत्र निव्वळ शारदोपासनेने जितके ' प्रथितयश ' झाले नसतील, तितके ते सदर द्वितीय परिणयानें झाले ! !

पण, असे प्रसंग क्वचितच यावयाचे. एरवीं ' **तेवढेंच ज्ञानप्रकाशांत** ! ' या नाटककार दिवाकरांच्या उक्तीचा प्रत्यय साहित्यिकांना बहुधा एकदांच यावयाचा, आणि तो अर्थात्‌च त्यांची सोनापूर किंवा ओंकारेश्वर येथे रवानगी झाल्यानंतर ! बाकी, त्यांच्या सुखदुःखाच्या गोष्टी जगापुढें मांडण्याबाबत नियतकालिकांनी ' अळीमिळी गुपचिळी 'च केलेलें असावयाचें ! पहिल्या प्रतीच्याच नव्हे, तर दुय्यम दर्जाच्या राजकारणी पुढाऱ्यांच्याहि क्षुद्रातिक्षुद्र हालचालींचा डंका पिटणारीं वर्तमानपत्रें थोर थोर साहित्यिकांच्या बाबतीत मात्र ' मौनं चैवास्मि गुह्यानाम् ' असा मंत्र जपूं लागतात, हें आश्चर्यकारक नसलें, तरी साहित्यिकांच्या दृष्टीने वैषम्यकारक तर खरेंच !

येथें आपणाला साहित्यिक व राजकारणी यांची तुलना करावयाची नाहीं, अथवा त्यांतील एकास दुसऱ्याच्या वरची खुर्ची द्यावयाची नाहीं. समाजाला जसे राजकारणी हवेत, तसेच साहित्यिकहि पण हवेत. तेव्हां त्या दोघांना औचित्य साधून मानमरातबानें वागवावयास नको काय ? उत्कृष्ट वाङ्मय प्रसवणारे प्रेमचंदजी कोणत्याहि भारतीय पुढाऱ्यापेक्षां कमी सन्माननीय होते, असें मला वाटत नाहीं. मग त्यांची उपेक्षा करण्यानें त्यांची योग्यता नाहींशी झाली म्हणावयाचें, कीं तशी उपेक्षा करणाऱ्या वर्तमानपत्रकारांचा गाजरपारखीपणा चव्हाट्यावर आला म्हणावयाचा ?

यावर कुणी म्हणेल, "अहो सर्वसामान्य वाचकांना राजकारणी पुढाऱ्यां-इतकें साहित्यिकांचें जर मुळीं महत्त्वच वाटत नाहीं, तर वृत्तपत्रकारांनीं

त्यांच्या हकीकती छापाव्यात तरी कशाला?"—अर्थात् तेथेंहि पुनः 'मागणी तसा पुरवठा' हें नेहमीं तोंडावर फेंकण्यांत येणारें तत्त्व आलेंच! पण, हें तत्त्व विकृत स्वरूपांत मांडण्यांत येत असल्याचें मी पूर्वी दाखविलेंच असल्यानें त्याची आणखी फोड करण्याचें कारण नाहीं. फक्त एवढेंच नमूद करतों कीं, सर्वसामान्य जनतेला साहित्यिकांचें महत्त्व जर वाटत नसेल, तर तें त्यांना पटवून देण्याची जबाबदारी संपादकवर्गावर येऊन पडते! आतां त्याला केवळ 'बनानेवाला'च व्हावयाचें असेल, तर गोष्ट निराळी!

रवींद्रनाथ टागोर यांच्यासारख्या एखाद दुसऱ्या वाग्भटाचा मात्र यथेच्छ बोलबाला करण्यांत येतो, हें खरें आहे. परंतु तो मुद्धां कधींपासून?—तर त्यांना नोबेल प्राईझ मिळाल्यापासून! येथें कुणी "सारेच साहित्यिक म्हणजे टागोर नव्हत!"—असाहि टोमणा मारील. तथापि, "हे साहित्यिक रवींद्रनाथबावूंइतका मानसन्मान मुळीं मागतातच कुठें?—त्यांना त्यांच्या परीनें गौरविलें, म्हणजे पुरें आहे!"—असें उत्तर देऊन आघातास प्रत्याघात करणें कठिण नाहीं!

*　　　*　　　*

## २३० 'भारतभारती'चें फोल समर्थन!

'विशाल भारता'च्या उपरिनिर्दिष्ट अंकांतच 'आमचें साहित्य व साम्यवाद' या मथळ्याचा एक लेख प्रकाशित झाला आहे. त्यांत त्या मासिकाच्या मार्चच्या अंकांत 'हिंदुस्थानांत प्रगतिशील साहित्याची आवश्यकता' हा जो लेख प्रसिद्ध झाला आहे, त्याचें यथामति खंडन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. उत्तरोक्त लेखांतील एक दोन मुद्यांचा परिचय १६ एप्रिलच्या 'प्रतिभे'त मीं वाचकांस करून दिलेलाच आहे. त्यांतील एक मुद्दा हिंदी कवि मैथिलीशरण गुप्त यांच्या 'भारतभारती' या काव्याविषयींचा असल्यामुळें व तो पूर्वोक्त लेखांत खोडण्यांत आल्यामुळें त्याचा येथें परामर्ष घेणें अपरिहार्य आहे.

भारतभारती काव्यांत एका ठिकाणीं हिंदुस्थानावरील ब्रिटिश सत्तेचा पुरस्कार करण्यांत आला आहे, व त्यामुळें त्याजवर उत्तरोक्त लेखांत

कडाखा उडविण्यांत आला आहे. यावर पूर्वोक्त लेखांत प्रस्तुत काव्याचें असे समर्थन करण्यांत आलें आहे कीं, हें काव्य लिहिलें गेलें, तेव्हां 'गरम' (जहाल) पुढारी देखील 'साम्राज्यांतर्गत स्वराज्या'चीच मागणी करीत होते; सबब, 'भारतभारती'सारख्या 'प्रातिनिधिक' (Representative) काव्यांत तोच सूर उमटत आहे, यांत कवीचा काय अपराध आहे?— परंतु, हें समर्थन उघडउघड हेत्वाभासमूलक आहे. आपल्याकडे कित्येक 'बोरूबहाद्दर' स्वजातीयांच्या पुष्टीकरणार्थ मागणी तसा पुरवठा हें तत्त्व जसें विकृत स्वरूपांत प्रतिपादित असतात, तसेच येथे 'प्रातिनिधिकत्वा'चे तत्त्वहि विकृत स्वरूपांतच प्रतिपादिलेलें आहे. प्रातिनिधिकत्वाच्या ढालीचा जर असा दुरुपयोग केला, तर वाटेल त्या हीन लिखाणाची सुद्धां पाठीराखी करतां येईल? ती या समर्थकांना संमत होऊं शकेल काय? दुसरें असें की, श्रेष्ठ कवि हे स्वतःला 'द्रष्टे' म्हणवीत असतात, व तसे ते स्थूल मानानें असतातहि. हें जर खरें, तर मग या द्रष्ट्यांनीं 'वर्तमाना'पेक्षां चार पावलें पुढें जावयास नको काय? आणि, जर ते वर्तमानाच्या आवर्तांतच भिरभिरत राहिले, तर त्यांचा 'द्रष्टेपणा'चा अधिकार कोण कसा मान्य करील? तात्पर्य, गुप्तबाबूंनीं साम्राज्यवादाचा केलेला पुरस्कार क्षणभरहि समर्थनीय होऊं शकत नाहीं, हें उघड आहे.

गुप्तबाबूंच्या अन्य काव्यांत गांधीवादाचा जयजयकार केलेला असेल, नाहीं असें नाहीं; तथापि त्यावरून 'भारतभारती' काव्यामधील साम्राज्यवादाचा पुरस्कार अन्यथा कसा ठरणार?

—**प्रतिभा**, वर्ष ५, अंक ८

## २३१ ऐतिहासिक व्यक्तींचे दोष झांकावे काय ?

झांशीची राणी लक्ष्मीबाई हिच्या चारित्र्यावर नाहक शिंतोडे उडविणाऱ्या एका इंग्रजी 'कलमकसाया'ला अखेर नाकदुऱ्या काढणें कसें भाग पडलें, याचा इतिहास ताजाच असल्यामुळें त्याचें वाचकांस मुद्दाम स्मरण करून द्यावयास नकोच. झाला हा प्रकार उचित असाच झाला. नभः-प्रांगणांत आपल्या दैदिप्यमान तेजानें विराजणाऱ्या शुक्रतारकेवर एखादा दुरात्मा थुंकल्यास ती थुंकी त्याच्याच अंगावर आल्याखेरीज कशी राहील ? या दृष्टीनें सदर लेखकबुवाची शरणागति क्रमप्राप्तच ठरते.

परंतु, एखाद्या ऐतिहासिक विभूतींत खरोखरच कांहीं दोष असले, आणि ते प्रत्यंतर-पुराव्यानें सिद्ध होत असले, तर त्याचें दिग्दर्शन करण्यास हरकत कोणती ? आणि, त्या दिग्दर्शनानें कुणींहि झालें तरी ओक्साबोक्शीं रडत कां सुटावें ? मानवमात्र हा जाणूनबुजून स्खलनशील. सर्वस्वीं सर्वांगपरिपूर्ण अशा व्यक्ति काव्यसृष्टींत वैपुल्यानें आढळल्या, तरी पण प्रत्यक्ष सत्यसृष्टींत त्यांचा आढळ अपवादादाखलच व्हावयाचा ! मग थोरा-मोठ्यांत कांहीं उणिवा असल्या अगर त्यांची कांहीं लफडीं असलीं, म्हणून बिचकून जाण्याचें काय कारण ? सूर्यदेखील काळ्या डागांपासून अलिप्त नाहीं, हें सर्व जाणतातच !

उलटपक्षीं, बड्या लोकांत कित्येक दोष असल्याचें समजल्यास सर्वसामान्य माणसाला त्यांच्याविषयीं अल्पस्वल्प तरी जास्त जिव्हाळा वाटण्याचा संभव असतो ! शिवाजी व पहिला बाजीराव ही राजकारणांतील, अथवा मिल्टन व गोल्डस्मिथ ही साहित्यांतील जोडी वाचकांनीं नजरेपुढें आणावी म्हणजे त्यांना या विधानाची सत्यता पटेल. शिवाजी व मिल्टन यांजबद्दल आपणांस उत्कट आदर वाटतो; पण तो कांहींसा भीतियुक्त असतो. तेंच पहिला बाजीराव व गोल्डस्मिथ यांच्यांतील कांहीं व्यंगें कळूनहि – नव्हे, तीं कळल्यामुळेंच–आपणांस त्यांच्याविषयीं चट्‌कन् आपुलकी वाटते ! आपण

स्वतःशीं उद्गारतोंः " अरे, हे थोर पुरुष देखील अगदींच निर्दोष नाहींत, अं! यांच्यांतहि थोडथोड्या उणिवा असतातच म्हणायच्या! एकूण, '**मनुष्य तितका एकच आहे!**' ही वसंत कवींची – कै प्रो. वा. ब. पटवर्धनांची – उक्ति निराळ्या अर्थानें खरीच ठरते तर!"...इ० इ० ज्याला 'human touch' असें म्हणतां येईल, तो अंशतः अशा दोषांमुळेंच येतो!

अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं, थोरामोठ्यांची कुलंगडीं छिद्रान्वेषण-बुद्धीनें चव्हाट्यावर आणावीं! तसेंच, त्यांच्या उणिवांचे अनुकरण व्हावयास पाहिजे, असेंहि मुतराम् सुचवावयाचे नाहीं. '**न देवचरितं चरेत्**' हें वचन किंचित् फेरफारानें त्यांच्या बाबतींतहि लागू करावयास हरकत नाहीं.

तथापि, या प्रकरणीं सुबुद्ध इसमहि जेव्हां संकुचितपणा व्यक्त करतात, तेव्हां आश्चर्य वाटल्यावांचून रहात नाहीं! वर निर्देश येऊन गेलेल्या पहिल्या बाजीरावाचेंच आपण उपलक्षणादाखल उदाहरण घेऊं. पहिला बाजीराव पेशवा अभक्ष्यभक्षणादि व्यवहार करीत असे ही गोष्ट कागदोपत्रीं नमूद आहेच. तत्संबंधीं कांहीं कागदपत्रें रियासतकार सरदेसाई यांनीं ग्वाल्हेरच्या इतिहाससंमेलनांत स्वमतपुष्ट्यर्थ नेलीं असतां त्यांजवर कित्येक बाजीरावभक्तांचा केवढा तरी पित्तप्रकोप झाला होता! जिज्ञासूंनीं माजी 'रत्नाकर' मासिकाच्या मार्च–एप्रिल १९३१ च्या जोड अंकांतील प्रो. श्री. म. माटे यांचा 'थोरले बाजीराव यांचें चरित्र' हा परीक्षणलेख अवश्य वाचावा, म्हणजे त्यांना त्याची प्रतीति येईल! या लेखांत बाजीरावाची निष्फळ तरफदारी करतांकरतां प्रो. माटे हे महादजी शिंद्यांवर अकारण गरळ ओकले आहेत! त्यांचें तें मूळ विषदिग्ध अवतरणच येथें उतरून घेतोः—

" इतिहाससंशोधकांत अशी एक बारीक गुणगुण चालू आहे कीं, वरील दप्तरखान्यांत ( पेशवे–दप्तरांत ) व इतरत्रहि महादजी शिंदे यांच्या संबंधानें कांहीं महत्त्वाचे कागद सांपडले आहेत. एकाचें तात्पर्य असें आहे, महादजींनीं नाटकशाळा ठेविल्या होत्या; आणि दुसऱ्याचे तात्पर्य असें आहे कीं,

महादजी हे राणोजीचे अनौरस पुत्र; म्हणून ते इकडे दाक्षिणेंत आले असतां त्यांच्याशीं पंक्तिव्यवहार करावा कीं नाहीं, याबद्दल इकडील मराठामंडळांत बरीच कटकट उत्पन्न झाली होती !...हे दोनहि कागद अशा रीतीनें सरदेसाई यांच्या प्रस्तुत उद्योगाला फार उपयोगी पडण्यासारखे आहेत, यांत कांहींच शंका नाहीं ! असें असतां सुद्धां रा. सरदेसाई यांनीं हे कागद ग्वाल्हेरीस वाचून दाखविल्याचें कांहीं ऐकिलें नाहीं ! ''

महादजी शिंद्यांसंबंधीची ही माहिती कुणाहि लेखकानें झांकून ठेवण्याचें तिळमात्र प्रयोजन नाहीं ! परंतु, महादजींचीं लचांडें पुढें मांडल्यानें बाजीराव निर्लेप असल्याचें कसें सिद्ध होतें, हें प्रोफेसरमजकूरच जाणोत ! माट्यांच्या या खळखळींत जातीयतेपलीकडे दुसरें कांहींच दृष्टिगोचर होत नाहीं.

आजचा नवमतवादी तरुण प्रो. माटे यांना मांसाशन इतकें निषिद्ध वाटत असल्याचें पाहून पोटभर हंसेल ! पण तो मुद्दा येथें अप्रस्तुत असल्यानें त्याचा तूर्त विचार करीत नाहीं.

मात्र ' शास्त्रीय चर्चे 'च्या अगडबंब नांवाखालीं थोरामोठ्यांस भलभलते अवगुण चिकटविणें म्हणजे स्वतःचाच नादानपणा व्यक्त करणें होय, हेंहि येथे सांगून टाकलें पाहिजे ! ' केसरी 'च्या सनातनी संपादकांच्या चिरंजिवांनी राम–लक्ष्मण–सीता यांजविषयीं मानसशास्त्राच्या पोकळ आधारावर किती चमत्कारिक लेख लिहिला होता, हें पुष्कळांच्या ध्यानांत असेलच ! या लेखाचें माझ्या एका मित्रानें " The Ramayan seen through French eyes ! "—असें मौजेचें वर्णन केलें होतें ! ना. भास्करराव जाधव यांनींहि सीतेबद्दल अशीच वायफळ धूळफेंक चालविली आहे !

आपणांस प्रिय असलेल्या व्यक्तीचे दोष प्रकट करून तिच्या मस्तका-भोंवतालचें दिव्यत्वाचें तेजोवलय नष्ट झालेलें पाहणें मानवी मनास सहसा रुचत नाहीं, हें मीहि मान्य करतों. तथापि, ही निव्वळ भावनावशता झाली ! इतिहास अगर चरित्र लिहीत असतांना लेखकानें भावनेला सत्याचें चरणसंवाहनच करावयास लावलें पाहिजे !

नैतिकच केवळ नव्हे, तर किरकोळ स्वभावदोषांबाबतहि लेखकानें हेच धोरण ठेवावयास हवें. असे न्यायनिष्ठुर इतिहासग्रंथ अगर चरित्रग्रंथ मराठींत कितीसे सांपडतील ?

* * *

## २३२ गडकरी व चंद्रशेखर

चंद्रशेखरांच्या निधनानंतर त्यांच्या काव्यकृतीचा पुनः **एक**वार आस्वाद ध्यावा, अशी इच्छा होऊन मीं त्यांचा '**चंद्रिका**' हा काव्यसंग्रह फिरून एकदां चाळला. '**चंद्रिके**'चे प्रस्तावनाकार रा. ग. त्र्यं. माडखोलकर यांच्या प्रस्तावनेंतील पुढील वाक्यांनीं माझें या खेपेस विशेष लक्ष वेधलें:—

"केशवसुतांच्या वैणिकांतील उद्दाम भावनांचे तांडव पाहून स्तिमित झालेल्या तत्कालीन तरुण पिढीला चंद्रशेखरांच्या विचारगंभीर कवितेची बूज करण्याचें भान राहिलें नाहीं, असें दिसतें. एरवीं, 'असे गंजीफांचे धडधडित वाडे वसवितां' ही त्यांची 'तारातरंगां'तील एकच ओळ तेवढी काव्यमय आहे, या गोविंदाग्रजांच्या अविचारी उद्गारांचा काय अर्थ करणार ?"

'**चंद्रिके**'पूर्वीं कांहीं वर्षें प्रकाशित झालेल्या '**काव्यचर्चा**' या ग्रंथांतील प्रो. माधवराव पटवर्धन यांच्या 'चंद्रशेखर व त्यांची कविता' या लेखां-मधला खालील उतारा उपरोक्त अवतरणाबरोबर तुलनेसाठीं वाचण्या-जोगा आहे:—

"चंद्रशेखरांच्या कवितेंत अपूर्व कल्पकता नाहीं. कल्पनेच्या भराऱ्या व उपमेच्या अभिनव चमत्कृति नाहींत. परंतु, ही उणीव त्यांनी भावनेच्या उत्कटतेनें व अर्थानुरूपिणी भाषेच्या निरुपम सौंदर्यानें भरून काढली आहे. 'असे गंजीफांचे धडधडित वाडे वसवितां' ही एकच ओळ नावीन्यपूर्ण आहे, असे उद्गार गोविंदाग्रजांनीं १९११ सालीं काढले होते. नावीन्यपूर्ण ओळी त्यांच्या काव्यांत थोड्या असतील; परंतु, एक एक काव्य संपूर्ण असें पाहिलें, म्हणजे त्यांत नावीन्य दिसूं लागेल."

या दोन्ही अवतरणांतील तपशिलामधला फरक मननीय आहे. रा. माडखोलकर गोविंदाग्रजांच्या तोंडचा म्हणून 'काव्यमय' हा संदिग्ध शब्द वापरतात, तर प्रो. पटवर्धन यांनी 'नावीन्यपूर्ण' हा शब्द उपयोजिला आहे! गोविंदाग्रजांचें उपमा–उत्प्रेक्षांवरील प्रेम लक्ष्यांत घेतलें असतां प्रो. पटवर्धन यांचाच मजकूर सत्याच्या अधिक जवळ असलेला दिसतो. मात्र प्रोफेसरसाहेबांनीं चंद्रशेखरांच्या कवितेला 'भावनेच्या उत्कटते'चें जें शिफारसपत्र दिलें आहे, तें अगदींच 'लाडिकपणा'चें दिसतें! त्याऐवजीं माडखोलकरांनीं तिला जोडलेलें 'विचारगंभीर' हें विशेषणच ज्यास्त साभिप्राय ठरतें!

उपमा–उत्प्रेक्षा म्हणजे शुद्ध बौद्धिक कसरत आहे, त्यांत काव्यांश नाहीं, असें प्रतिपादिणारे कित्येक आधुनिक विद्वान् उत्तर ध्रुवाला जातात म्हटलें, तर उपमा–उत्प्रेक्षांतच सारें काव्य सांठवलेलें आहे, असें सांगणारे रसिक दक्षिण ध्रुवाला जातात, असें म्हणतां येईल! कारण उचित अर्थालंकारांनीं जसें काव्य सरस वठतें, तसें तें त्यांच्या अभावींहि वठूं शकतें. अर्थात् अर्थालंकारांना डोक्यावर घेऊन नाचण्यांत अर्थ नाहीं, त्याचप्रमाणें त्यांना पायदळीं तुडविण्यांतहि शहाणपणा नाहीं.

आपल्याकडील बहुसंख्य काव्यवाचकांना मात्र अजूनहि उपमा–उत्प्रेक्षांवांचून कविता 'अळणी' वाटते! चिल्हर काव्यकल्पना एखाद्या कृतीत चकचकत नसल्यास त्यांना तो कवीच्या प्रतिभेचा अभाव भासतो! अभिनव कल्पनाचमत्कृति नसूनहि एखादें काव्य नावीन्यपूर्ण व सरसरमणीय असूं शकतें, याची या अलंकारभक्तांना प्रायः जाणीवहि नसते! तथापि आमची ही अनिवार अलंकारप्रीति हळुहळू कमी होत जाईल, अशी आशा वाटूं लागण्यास जागा झाली आहे.

*  *  *

## २३३ मराठीविरुद्ध मोरोपंतांची साक्ष!

२००० रुपयांचें देव–पारितोषिक सर्वप्रथम मिळालेल्या 'दुलारे–दोहावली' नामक व्रजभाषेंतील काव्यग्रंथाला एका हिंदी लेखकाचा रा. खांडेकर

यांच्या 'मांजरपाटा'सारखी लांबलचक प्रस्तावना जोडलेली आहे. या प्रस्तावनेंत लेखकानें पर्यायानें मराठीविरुद्ध मोरोपंत कवीचीच साक्ष देण्याचा प्रयत्न केला आहे ! पहाः—

" जे लोक हिंदी वाङ्मयाला मराठी वाङ्मयापेक्षां हीन समजतात, त्यांनीं मराठीचे सर्वश्रेष्ठ कवि महाराष्ट्रकोकिळ महाकवि मोरोपंत आपल्या कवितेंत हिंदी कवीविषयीं कसा आदरभाव व्यक्त करतात, हें पहावें. त्यांचें मत त्यांच्याच शब्दांत पहा...ते म्हणतातः—

**श्रीसूरदास–तुलसीदास–कबीरादि–सुकवि–कवनातें ।**
**सोडुनि लावील कवण रसिक दुज्याशीं रिझोनि नव नातें ॥**

या अवतरणाचा रोख असाः सूरदास, तुळसीदास, कबीर यांच्या हिंदी कवितेला सोडून कोणता रसिक दुसऱ्या कवीच्या (अर्थात् त्यांत मराठी कवीहि आलेच ) कवितेशीं नातें जोडील, असा प्रश्न ज्याअर्थी मराठींतील सर्वश्रेष्ठ कवि मोरोपंतच विचारीत आहे, त्याअर्थी सूरदासादि कवि होऊन गेलेल्या हिंदी भाषेपेक्षां मराठी भाषा श्रेष्ठ असू शकत नाहीं, असें दर्शविण्याकडे या लेखकाचा कल झुकतो ! तेव्हां तो मराठीविरुद्ध मोरोपंतांची अप्रत्यक्षपणें साक्ष देत आहे, असें म्हटल्यास त्याम अन्याय केल्यासारखें खचित होणार नाहीं ! मात्र या हिंदी लेखकमहाशयाचा हा ' अव्यापारेषु व्यापार ' पाहून मराठी भाषेची आजन्म सेवा करीत रहाणारा तो बारामतीचा सोज्ज्वळ विद्वान् ब्राह्मण – तो मयूरकवि – स्वर्गलोकामध्यें बहुधा अगदीं गार झाला असेल !

मराठी व हिंदी साहित्य यांत श्रेष्ठ–कनिष्ठ कोण, हा स्वतंत्रच प्रश्न असल्यामुळें त्याचा या स्फुटाशीं फारसा संबंध येत नाहीं.

* * *

## २३४ ही ओहोटी कीं भरती ?

शारदोपासक संमेलनाच्या या अधिवेशनांत ' काव्यवाङ्मयास ओहोटी लागली आहे काय ? ' या अर्थाच्या विषयावर चर्चा व्हावयाची होती, असें वर्तमानपत्रावरून समजतें. वृत्तपत्रीय अहवाल अद्यापि माझ्या हातीं आले

नसल्यामुळे ही चर्चा झाली कीं नाहीं व झाली असल्यास तींत कोणी काय सांगितलें, हें मला तूर्त कांहींच विदित नाहीं. तथापि, या चर्चेंत ज्यांनीं काव्याला ओहोटी लागल्याचें प्रतिपादन केलें असेल, त्यांच्या पदरांत चुकीचें माप टाकतां येण्यासारखें खास आहे ! आणि, तेंहि कशावरून ?–तर खुद्द पुण्यांतच घडलेल्या एका प्रसंगावरून ! साहित्याचार्य नरसोपंत केळकर यांनी मोन्यामारुतीच्या सत्याग्रहांत उडी टाकण्यापूर्वी रा. ल. ब. भोपटकर यांना जें पत्र पाठविलें होतें, त्यांत पुढील ' कवित्व ' होतें:

Tinkle tinkle little bell
Let this order go to hell !

सत्याग्रहासारख्या गंभीर प्रसंगीं देखील केळकरांना काव्य सुचतें, तेव्हां काव्याची ही ओहोटी समजावी, की भरती मानावी ? आतां केळकरकृत सदर पद्य इंग्रजीत असल्यामुळे ही ओहोटी इंग्रजी कवितेस आलेली नसून मराठी कवितेस आलेली आहे, असा पेच टाकतां येईल ! आणि तो बिनतोडहि आहे, हें मीसुद्धां कबूल करतों ! अरेरे ! केळकरांनी हे दोन चरण इंग्रजीत न लिहितां मराठींत लिहिले असते तर मराठी काव्यावरील ओहोटीच्या आरोपाचें निरसन करतां आलें नसतें काय ? परंतु गरीब बिचाऱ्या मराठी काव्याचें तेवढें भाग्य कुठें आहे ? असाच योग पुनः कधींकाळीं आल्यास साहित्याचार्यांनी मातृभाषेला विसरूं नये एवढेंच त्यांस सुचवितो.

—**प्रतिभा**, वर्ष ५, अंक ९

## २३५ ललित ग्रंथांस पारितोषिकें कमीच

तळेंड पारितोषिक गेलीं दोन वर्षें गंभीर विषयावरील ग्रंथांस मिळालें, यांत सहेतुक असें कदाचित् कांहींहि नसेल. पारितोषिकार्ह असे ललित ग्रंथ या अवधींत प्रकाशित न झाल्यामुळेंच हें पारितोषिक तशा प्रकारच्या कृतींस प्राप्त झालें नाहीं, असेंच आपण तूर्त समजूं या.

तथापि, अशा प्रकारच्या पारितोषिकांच्या बाबतींत ललितग्रंथांस पक्षपात करण्यांत येत नाहीं, असें मात्र खचित म्हणतां येत नाहीं. पारितोषिक हें प्रायः गंभीर ग्रंथाच्याच वांट्यास जावयाचें, असाच जणूं काय ' अलिखित नियम ' असलेला दिसतो ! ज्याचा विषय सडकून बोजड आहे, ज्याची भाषा घृतपक्व पदार्थासारखी पचावयास कठिण आहे, आणि ज्यांत विद्वत्तेचें प्रचंड अकांडतांडव केलेलें आहे, असाच ' ग्रंथराजु ' जेहेत्ते पारितोषिकास पात्र ठरणार ! तेंच एखादी ललितकृति अपूर्व कल्पकता व लालित्य यांनीं कितीहि विनटलेली असली, तथापि ती बहुधा या मानापासून वंचितच रहावयाची ! पोतींचीं पोतीं उचलून फेंकणाऱ्या हमालाला शाबासकी मिळावी, आणि तारेवरील कसरतीचें नाजूक काम करणारा मात्र उपेक्षिला जावा, ही गुणग्राहकता कशी म्हणतां येईल ?

वरील 'हमाला'चा दृष्टांत वाचून सारे विद्वन्मणी मजवर क्रुद्ध होतील. कुणी नाकावरील चष्मा कपाळावर चढवून टवकारून पाहूं लागतील, कुणी हातांतील लेखणी खालीं आदळतील, तर कुणी जवळचा जाडजूड संदर्भ-ग्रंथच फेंकून मारतील ! परंतु, या कोपप्रदर्शनाला काडीइतकीहि किंमत देण्याचें प्रयोजन नाहीं. अव्वल दर्जाच्या विद्वत्तेपुढें कुणीहि आनंदानें मान वांकवील. कारण, तींत प्रतिभा व पांडित्य यांचा मिष्टान्न संगम झालेला असतो. अशा प्रतिभायुक्त विद्वत्तेची सर नुसत्या अंगमेहनतीला—अवजडपणाला—कुठून येणार ? शं. बा. दीक्षित, राजवाडे, टिळक, डॉ. केतकर प्रभृति प्रतिभाशाली पंडित आणि भाराभर पुस्तकें वाचून त्यांचे

भाराभर हवाले देणारे "बौद्धिक श्रमजीवि" यांच्यांतील विरोध वाचकांनीं लक्षांत घ्यावा, म्हणजे त्यांना माझ्या म्हणण्याची सत्यता चटकन् पटेल.

प्रतिभा व पांडित्य यांनीं रसरसलेल्या गंभीर ग्रंथांचे कोडकौतुक झाल्यास त्याबद्दल कोण तक्रार करील? परंतु, ज्या ग्रंथांना भोजराज, तर्खंड वगैरे पारितोषिकें देण्यांत आलीं, त्यांतील कितीसे या कोटींतील ग्रंथ होते? मग त्यांचा एवढा 'उदो उदो' कशाला?

कादंबरी, नाटक, काव्य वगैरे ललितकृति केवळ करमणूक म्हणून वाचावयाची असते. बक्षिसें देण्यासारखें किंवा डोक्यावर घेऊन नाचण्यासारखें तींत कांहीं नसतें, अशी पुष्कळ सुशिक्षितांची देखील समजूत असलेली दृष्टोत्पत्तीस येते! खरेंच आहे: ललित ग्रंथांत घनघोर गहन विषयाची साधकबाधक चर्चा केलेली नसते, अवतरणांच्या उतरंडी रचिलेल्या नसतात, अगर पादटीपांच्या पायांत संदर्भाचे दगडहि भरलेले नसतात! तेव्हां गंभीर ग्रंथाइतका ललित ग्रंथांचा या 'जडभरतां'नी कसा बरे बडिवार करावा? भव्य-रम्य ललित रचना करावयास बोजड विद्वत्ता नसली तरी एक प्रकारची बहुश्रुतता हवी असते, उच्च कल्पकतेशिवाय तर तिचा जन्मच होत नाहीं, एवढेंच नव्हे, तर प्रसंगविशेषीं 'मेंदूचें भजें' होईतों श्रमसुद्धां घ्यावे लागतात, याची या लोकांना सहसा जाणीव नसते! तिचाच परिणाम म्हणजे ललित रचनेची अशी उपेक्षा.

ललित ग्रंथाला भाग्यवशात् एखाद वेळीं पारितोषिकादिकांचा लाभ होतोहि, नाहीं असें नाहीं. तथापि, अशा वेळी कित्येकदां त्या सन्मानास सदर ग्रंथाच्या योग्यतेपेक्षां त्याच्या कर्त्याचें व्यक्ति महात्म्यच कारणीभूत झालेलें असते! उदाहरणार्थ, प्रो. वा. म. जोशी यांच्या 'सुशीलेचा देव' या कादंबरीला भोजराज पारितोषिक मिळालें, याचा अर्थ ती कादंबरी उत्तम आहे, असा करणे बरोबर होणार नाहीं. प्रोफेसरसाहेबांऐवजी या कादंबरीचा निराळा लेखक असता, तर तिचें भाग्य असें कदापि फळास आलें नसते!

माझ्या या स्फुटाचा रोख विद्वत्ता तितकी सर्रास तुच्छ मानण्याकडे नाही, हें प्रायः आंधळ्याच्याहि ध्यानांत यावें. पहिल्या प्रतीच्या म्हणजे प्रतिभायुक्त विद्वत्तेला मीच काय पण प्रत्येक जण वंदनीय समजेल. फार काय सांगावें, दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारच्या विद्वत्तेला व तज्जन्य गंभीर ग्रंथांना देखील आपापल्या परीनें महत्त्व हें आहेच, या विषयींहि माझा मतभेद नाही. दुय्यम–तिय्यम दर्जाच्या अवजड व नीरस गंभीर ग्रंथानें त्याजपेक्षां श्रेष्ठतर अशा ललित ग्रंथांवर मात केली, म्हणजेच फक्त अंतःकरणांत विषाद उत्पन्न होतो आणि मग वरीलप्रमाणें चार कटु शब्द लिहिल्यावांचून गत्यंतर उरत नाहीं. एरवीं, ‘ गंभीर ग्रंथ विरुद्ध ललित ग्रंथ ’ असलें व्यवच्छेदक स्वरूपाचें भांडण आपणास बिलकुल भांडावयाचे नाहीं, हें येथें नमूद करणें अत्यवश्य आहे.

तरुण साहित्यिकांकडून मधुनमधून प्रगट होणाऱ्या विद्वत्तेसंबंधींच्या अनादराबद्दल मी ‘ प्रतिभे ’त पूर्वी नापसंति दर्शविली होती, हे ज्यांच्या स्मरणांत असेल, त्यांचा या स्फुटानें गैरसमज होणार नाही, अशी उमेद आहे.

पारितोषिकें देणाऱ्यांनी यापुढें तरी पंक्तिप्रपंचास मूठमाती देऊन व्यापक दृष्टीचा अवलंब करावयास पाहिजे.

*　　　*　　　*

## २३६ पांगारकरांचें ‘ वाङ्मयपुराण ’

पुण्याच्या शारदोपासक संमेलनाचे अध्यक्ष रा. ल. रा. पांगारकर यांचे भाषण अपेक्षिल्याप्रमाणेंच प्रतिगामी स्वरूपाचें झालें ! “ आस्तिक्य बुद्धीवर उभारलेले वाङ्मय हेंच पुरोगामी वाङ्मय होय; ” “ ज्ञानेश्वरी, दासबोध, तुकोबाचे अभंग हेंच खरें पुरोगामी वाङ्मय आहे. ” असले खास पांगारकरी सिद्धांत ऐकले, म्हणजे ‘ पुरोगामी ’ शब्दाच्या अर्थाचा हा शुद्ध अनर्थ होत आहे, याबद्दल संशय उरत नाहीं !

आधुनिक मराठी कवितेकडे पाहण्याचा रा. पांगारकर यांचा दृष्टिकोन त्यांतल्या त्यांत पुष्कळच निर्मळ दिसतो, असें म्हणावें लागतें. चंद्रशेखर, बालकवि, दत्त व माधवानुज हे चार कवि पांगारकरांचे आवडते आहेत !

केशवसुतांसारखा खराखुरा पुरोगामी कवि पांगारकरांसारख्या संतवाङ्मय-भक्तास सुचूं नये, यांत नवल तें कोणतें? तरी पण उपरोक्त कविचतुष्टय त्यांस मान्य आहे, '**हेही नसे थोडकें**'! कारण, या कवींऐवजीं दासगणूंसारखे आधुनिक संत (?) कवीच आपणांस आवडतात, असें जर पांगारकरबुवा उद्गारले असते, तर त्यांचें आपण काय केले असतें?

रा. पांगारकर यांचीं कांहीं विधानें बऱ्याच 'दे. भ.' साहित्यिकांस मिरच्यासारखीं झोंबल्याचें कळतें! तीं विधानें अशीः

> "'**निबंधमाला' आणखी दहा वर्षें टिकेल. सध्यांच ती मागें पडली आहे. टिळकांचें' गीतारहस्य' हेंहि पंचवीस वर्षांपेक्षां अधिक टिकणार नाहीं.**"

अरेरे! 'निबंधमाला'च नामशेष झाली, तर मग 'द्विविधदर्शना'चें काय होणार? आणि, 'गीतारहस्य'च पंचत्वाप्रत गेलें, तर टिळकांच्या प्रत्येक पुण्यतिथीच्या निमित्तानें 'केसरी'मध्यें 'गीतारहस्या'वरील ठरीव छापाच्या लेखांचें रवथ कसें करतां येणार? अफसोस! खुदातालानें काय हा बांका प्रसंग आणला!!

मात्र 'निबंधमाला' व 'गीतारहस्य' कायमचें मागें पडले, तरी संतवाङ्मय हें शाश्वत टिकणार आहे, असें जे म्हापणकरांवर ताण करणारे भविष्य पांगारकर वर्तवितात, तें त्यांचा केवळ 'लाडिकपणा' दिग्दर्शित करतें. संतवाङ्मय काय, 'निबंधमाला' काय, अथवा 'गीतारहस्य' काय, या त्या त्या काळच्या उत्कृष्ट वाङ्मयकृति असल्या, तथापि त्या यावच्चंद्रदिवाकरौ वाचकांस स्फूर्तिप्रद वाटत राहतील, असा वृथा डौल त्यांच्या त्या थोर कर्त्यांनीं सुद्धां मिरवला नसेल! मग त्या कालौघांत न टिकल्या, म्हणून त्यांत हर्षखेद मानण्याचें काय कारण? आणि, त्यांतील एका प्रकारच्या वाङ्मयाहून दुसऱ्या प्रकारचें वाङ्मय श्रेष्ठ-कनिष्ठ ठरवूनहि काय उपयोग? जी ध्येयें, ज्या आकांक्षा काल होत्या त्याच आज शिल्लक राहिलेल्या नाहींत. अर्थात् हीं ध्येयें, या आकांक्षा प्रज्वलित करावयास तेच ते 'जरीपुराणे' ग्रंथ सदैव समर्थ कसे ठरतील?

ज्ञानेश्वरीसारख्या संतवाङ्मयकृतीचें अध्ययन तरुणांमध्यें विद्यापीठाबाहेर होत असेल, असा माझा होरा वाहत नाहीं!

*    *    *

## २३७ माडखोलकरांचें भाषण

महेश्वर येथील चतुर्थ मध्यभारतीय मराठी साहित्यसंमेलन **रा. ग. त्र्यं. माडखोलकर** यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें. रा. माडखोलकर यांचें अध्यक्षीय भाषण एकंदरीनें फक्कड झालें, हें कबूल करावयास मला अत्यानंद वाटतो.

'एकंदरीनें' हा शब्द वापरण्याचें कारण हे आहे कीं, रा. माडखोलकर यांनीं देखील आपल्या भाषणाचा फार मोठा भाग 'कला व जीवन' याच ठराविक विषयाला वाहिलेला आहे! कोणतेंहि लहान मोठें साहित्य-संमेलन असो, त्याच्या अध्यक्षानें कला व जीवन यांच्या परस्पर संबंधाविषयीं अनुकूल प्रतिकूल विवेचन करावयाचें, ही एवढ्यांत जशी काय रूढीच पडल्यासारखी झाली आहे! या रूढीच्या शृंखला निदान रा. माडखोलकर हे तरी तडातड तोडतील, अशी कल्पना होती; पण, ती त्यांच्या भाषणानें फोल ठरविली आहे! विषय महत्त्वाचा व विवाद्य खरा; परंतु ज्या त्या संमेलनांत सर्व वक्तृत्वकौशल्य त्यावरच वेचणें इतरांस वैरस्यकारक झाल्याखेरीज कसें राहील? हा एक दोष वगळल्यास रा. माडखोलकर यांचे हें भाषण खरोखरच उत्तम वठलें आहे.

'कलेसाठीं कला' हा वाद जसा निरर्थक आहे, तसाच 'मतप्रसारासाठीं कला' हा वादहि आग्रहमूलक आहे, हें या भाषणांत रा. माडखोलकर यांनीं निःसंदिग्धपणें दाखवून दिलें आहे. त्याचप्रमाणें साम्यवादाबद्दल त्यांना उघड उघड पक्षपात वाटतो, तथापि ते साम्यवादाचे, हातांत गंडा बांधलेले, कट्टर अनुयायीहि नव्हत, अशी त्यांची दुहेरी भूमिका आहे! 'रामशास्त्री' याची प्रथमपासून हीच भूमिका आहे. परंतु, मौज ही कीं, तिजबद्दल माडखोलकरांच्याच एखाददुसऱ्या ऋणानुबंधी मित्रानें त्याजवर टीकाहि केली आहे. खुद्द माडखोलकरांचा देखील एतद्विषयक दृष्टिकोन

आतांपर्यंत स्पष्ट कळत नव्हता. अलीकडे मात्र ते टीकेची पर्वा न करतां निर्भीडपणें लिहूं लागले आहेत, ही समाधानाची गोष्ट होय.

अशा प्रकारच्या विचारसरणीवर दुटप्पीपणाचा अगर विसंगतीचा शिक्का मारण्यांत येतो, याची मलाहि जाणीव आहे. तथापि, त्याचबरोबर हीच विचारसरणी कालांतरानें बिनचूक ठरेल, असा मला दृढ विश्वास वाटतो.

अर्थात् उपरोक्त खुलासा करण्यांत मोडखोलकरांवर स्वतःच्या उसनवारीचा आळ घ्यावयाचा नाहीं, हें मुद्दाम सांगावयास नकोच. मजव्यतिरिक्त किती तरी लेखकांचा दृष्टिकोन याच स्वरूपाचा पूर्वी होता, व अजूनहि आहे.

बारकाईनें पाहिल्यास रा. माडखोलकर यांनीं प्रस्तुत मुद्दा मांडतांना क्वचित् विसंगति केली असेल, अगर त्यांच्या या भाषणांत कुठेंकुठें किरकोळ प्रमादहि सांपडतील. तरी पण तेवढ्यानें त्यांच्या मूळ विवेचनास किंचिन्मात्रहि बाधा येत नाहीं.

याच भाषणांत मराठी लेखकांच्या दैन्याचें व अडचणीचें माडखोलकरांनीं हृदयस्पर्शी वर्णन केलेलें आहे. स्वजातीय व स्वधर्मीय यांच्या पलीकडे गेल्याशिवाय मराठी वाङ्मयाची कूपमंडूकता नष्ट होणें शक्य नाहीं, हें त्यांनीं केलेलें निदान सर्वथैव बरोबर आहे. आमच्या साहित्यिकांनीं एवढा उपदेश जरी प्रत्यक्ष आचरणांत आणला तरी आमचें वाङ्मय अल्पस्वल्प प्रमाणांत तरी व्यापक स्वरूपाचें होईल. किमानपक्षी, साहित्यिकांमधील कांहीं वैमनस्यें तरी त्यामुळें निखालस लयास जातील !

रा. माडखोलकर यांच्या या भाषणांतील

> **“...समाजवादांतील जीं तत्त्वें महाराष्ट्राच्या पुनर्घटनेला उपकारक आहेत, असें मराठी ललित लेखकांना वाटेल, त्या तत्त्वांचा त्यांनीं आपल्या वाङ्मयांतून कलात्मक पुरस्कार करणें आवश्यक आहे.”**

हे वचन प्रत्येक उदयोन्मुख साहित्यिकानें हृत्फलकावर कोरून ठेवण्याच्या पात्रतेचें आहे.

* * *

## २३८ ‘ काव्याला ओहोटी लागली आहे काय ? ’

शारदोपासक संमेलनाच्या यंदांच्या अधिवेशनांत मथळ्यांतील विषयावर चर्चा झाली. चर्चेमध्यें प्रि. अत्रे, प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, ‘ गिरीश ’ प्रभृति रथीमहारथींनी भाग घेतला होता. तथापि, चर्चा सर्वांगीण व मूलग्राही झाली, असें म्हणतां येत नाहीं. तरीपण कित्येक वक्त्यांच्या कांहीं विधानांचा परामर्ष घेण्याजोगा आहे. पुढील मजकुरामधली अवतरण चिन्हांतर्गत वाक्यें ४ जूनच्या ‘ ज्ञानप्रकाश ’वरून उद्धृत केलीं आहेत. तसेंच, ह्याच अंक त्या त्या वक्त्याच्या त्या त्या विधानास आधारभूत आहे.

मराठी कवितेची हल्लीं पिछेहाट होत आहे, हा मुद्दा बहुतेक सर्व वक्त्यांनीं मान्य केलेला आहे. मात्र ह्या पिछेहाटीची कारणमीमांसा भिन्न भिन्न विवादकांनीं भिन्न भिन्न केलेली आहे. प्रि. अत्रे यांनी अनुकरणावर सपाटून झोड उठविली ! आणि, ती अगदी योग्यहि आहे. माधवज्यूलियन् यांनीं गज्जल लिहिण्यास सुरुवात केली न केली, तोंच महाराष्ट्रकाव्यदेवतेवर नकली गज्जलांच्या कण्हेरपुष्पांची बरसात झडूं लागली ! केशवकुमारांनीं विडंबनकाव्ये लिहिण्यास मध्यंतरीं सुरुवात केली होती. झालें ! आमचे कविबंधूहि झपाटल्यासारखे झाले, आणि धर एखादें प्रसिद्ध काव्य की कर त्याचें विडंबन, असा त्यांनीं धूमधडाका चालू केला ! अशा थिल्लर अनुकरणानें का कुठे काव्यवाङ्मयास फुलोर येणार आहे ?

अनुकरण हें तत्त्वतः त्याज्य नव्हे. पण, तें कशाचें व कसें करावयाचे हें ओळखण्यांतच खरें चातुर्य आहे. तसेंच म्हटलें, तर माधवज्यूलियन्‌चे गज्जल, फार्शी कवींचें, आणि केशवकुमार अत्र्यांचीं विडंबनकाव्यें इंग्रजी कवींचें अनुकरण नव्हे, तर दुसरें काय होय ?

या चर्चेत प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं रा. अनंत काणेकर यांच्या कवितेचे पुन्हां एकवार मुक्तकंठानें गोडवे गाइले आहेत. ‘ चांदराती ’ चे प्रस्तावनाकारक के. नारायण काळे यांच्याशीं काणेकरांची वाहवा करण्याच्या

बाबतींत प्रो. पटवर्धन यांनीं जणुं काय स्पर्धाच चालविलेली दिसते! काणेकर उत्तम कवि आहेत, हे निर्विवाद आहे. परंतु, त्यांच्या कवितेंत इतकें भाळून जाण्याइतकें व अन्यत्र न आढळणारें असें काय आहे, याचें पुष्कळांस मोठें कोडेंच पडतें! काणेकर यांनीं आपल्या एका कवितेचें विडंबन केलें आहे, तेव्हां त्यांची जर आपण तोंडभर स्तुति केली नाहीं, तर आपल्यावर संकुचितपणाचा आळ येईल, अशा प्रकारची अंधुक भावना प्रोफेसरसाहेबांच्या सुप्त मनांत कुठें तरी वावरत असावी, असा माझ्या एका मित्राचा कयास आहे! कदाचित् तो खोटाहि असेल!

"ठिकठिकाणीं हिरकण्यांप्रमाणें जी भावगीतें पडलीं आहेत, त्यांचें कौतुक झालें पाहिजे—" असें प्रो. पटवर्धन आपल्या भाषणांत म्हणाले. गेल्या आठ--दहा वर्षांतील वेंचक कवितांचा संग्रह कुणी प्रसिद्ध केल्यास तशा कवितांचें भरीव कौतुक केल्यासारखें होणार आहे. किंबहुना, आधुनिक मराठी कवितांचा 'सुवर्ण-निधि' निघावयास अजूनहि वाव आहे. असेंमुद्धां व्यापक विधान करतां येईल. कारण 'अभिनव काव्यमाला' 'महाराष्ट्रशारदा', 'काव्यकौमुदी', इ० सर्वच काव्यसंग्रह कमीअधिक प्रमाणांत अपुरे व असमाधानकारक वाटतात!

'केसरी'चे संपादक रा. दा. न. शिखरे यांना या चर्चेत स्वातंत्र्य-भक्तीचा जबरदस्त पुळका आला! ते म्हणाले, "स्वातंत्र्ययुद्धाची चळवळ चालू असली, तरी त्याचे पडसाद काव्यांतून विशेष ऐकूं येत नाहींत. यावरून काव्याला ओहोटी लागणार असा संभव दिसतो!"—वा! कोण हा मार्मिक कार्यकारणसंबंध!! मात्र काव्यांत स्वातंत्र्ययुद्धाचे पडसाद उमटावे, ही शिखऱ्यांची अपेक्षा एका दृष्टीनें समर्थनीयहि ठरते! मुळांत स्वातंत्र्ययुद्धासाठीं निघालेलें 'केसरी' पत्र अलीकडे त्या युद्धापासून हळुहळू पण निश्चितपणें परावृत्त होत आहे, असा त्याजवर अनेकांचा आरोप आहे. तेव्हां, त्या पत्राच्या एका उपसंपादकानें स्वातंत्र्ययुद्धाच्या प्रतिध्वनीसाठीं मराठी कवींकडे आशाळभूतपणानें पहावें, यांत औचित्य नाहीं, असें कोण म्हणेल?

रा. वि. मा. दी. पटवर्धन यांनी प्रि. अत्रे यांच्या विडंबनकाव्यविषयक गुरुपदास अप्रत्यक्षपणे नक्का दिला ! त्यांच्या मते " काव्याच्या उपहासाला विडंबनकाव्य कारणीभूत झाले ! " हे मत कुणास अतिशयोक्तिपूर्ण वाटले, तथापि विडंबनकाव्याने आधुनिक मराठी कवितेला फारसे सौंदर्य येणार आहे असे नव्हे, हा पटवर्धनांच्या एकंदर भाषणाचा मुख्य सूर बहुसंख्य रसिकांस मान्य होण्यासारखा असाच आहे.

कवि ' गिरीश ' यांनी एक अतिशय विवाद्य विधान केले ! " काव्यापेक्षां कादंबरी, लघुकथा वगैरे लिहिणे सोपे असते—' असे ते बोलले ! काव्य लिहिणे सोपे आहे, असे नव्हे परंतु, कादंबरी व लघुकथा काव्यापेक्षांहि लिहावयास सुलभ आहेत हे म्हणणे कादंबरीकार व लघुकथाकार यांस संमत होणे दुर्घट आहे

बर्नार्ड शॉ यांना आपले एक नाटक पद्यात्मक लिहून व गद्यापेक्षा पद्य लिहिणे सोपे असते, असा निर्वाळा देऊन कविवर्गाची कशी कुचेष्टा केली आहे, याची येथे कित्येकांस स्मृति होईल !

* * *

## २३९ शाबास प्रो. माटे !

प्रो. श्री. म. माटे यांचें पुणे येथे नुकतेच " सदाशिव पेठी संस्कृतीच्या हत्येची घोषणा " या विषयावर जाहीर व्याख्यान झाले. डॉ. केतकर यांच्या निधनानिमित्त पुण्यास भरलेल्या एका शोकसभेत सदाशिव पेठी संस्कृतीच्या लोकांनी केतकरांचा छळ केला, अशा अर्थाचे विधान रा. शेजवलकर यांनी केले होते. आणि त्याच सभेत या संस्कृतीचा नायनाट करण्याची भाषा कॉंग्रेसपुढारी रा. न वि. गाडगीळ बोलले होते ! त्यांना प्रत्युत्तर देण्यासाठी प्रो. माटे यांचें हें व्याख्यान झाले !

प्रोफेसरमजकुर या व्याख्यानांत येणेप्रमाणे बोलते झाले :—

" डॉ. केतकरांची उपेक्षा झाली नाही...स्वतः डॉ केतकरांनी समाजावर असले आरोप केलेले नाहीत. डॉ. केतकरांचा छळ झाला, ही

माफ खोटी गोष्ट आहे...डॉ. केतकरांच्या या पूजकांना व भजकांना त्यांच्या दानतीची कल्पनाच आलेली नाहीं...स्वकीयांना शिव्या देऊन आपलें कातडें बचवायचें, अशी कांहीं लोकांची चोरटी भावना असते. या वृत्तीचीच वरील वक्त्यांचीं विधानें निदर्शक आहेत...डॉ. केतकरांना पुढें गरिबी येणें हा परिस्थितीचा दोष आहे. " इ० इ०

प्रो. माटे यांचें हें ' प्रवचन ' वाचून " शाबास माटेसाहेब ! "—असेच कुणीहि उद्गार काढील ! डॉ. केतकर यांनीं आपल्या लिखाणांत अनेक स्थळीं ' केसरी ' कंपूच्या ज्या कारवाया नमूद केल्या आहेत, त्यांचें प्रो. माटे यांनीं या व्याख्यानांत निरसन केलें कीं काय, हें कळण्यास मार्ग नाहीं. ' केसरी ' कंपूची केतकरांशीं झालेली वागणूक हा जर केतकरांचा छळवाद नसेल. तर मग त्या शब्दाची व्याख्याच बदलावी लागेल !

—प्रतिभा, वर्ष ५, अंक १०